

# आगरकर-वाङ्मय

३

संपादक

म. गं. नातू । दि. य. देशपांडे

'लोकमान्य टिळकांचे नाव "केसरी"शी इतके निगडित झाले आहे की ४ जानेवारी १८८१ रोजी 'केसरी' निघाला तेव्हा टिळक 'केसरी'कर्ते नसून 'मराठा'कार होते, व आरंभीच्या जवळजवळ सात वर्षांत टिळकांनी 'केसरी'त फारच थोडे लिहिले आहे, या वस्तुस्थितीची अनेकांना आठवण करून द्यावी लागते... आगरकरांनी "केसरी"त बरेच लिहिले, एवढेच नव्हे तर अनेक विषयांवर लिहिले. "केसरी"तील बराच मजकूर आगरकरलिखित असल्या-मुळे आरंभीच्या सहा-सात वर्षांतील "केसरी"स "आगरकरांचा केसरी" म्हणणे योग्य ठरते.'

—डॉ. य. दि. फडके

मूल्य रु. चाळीस



गोपाळ गणेश आगरकर

जन्म १४ जुलै १८५६]  [मृत्यू १७ जून १८९५

# आगरकर-वाङ्मय
## खंड ३
(विविध विषय विभाग)

संपादक :
म. गं. नातू
दि. य. देशपांडे




१९८६
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
मुंबई

## प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचा आगरकरांचे वाङ्मय पुनर्मुद्रित करण्याचा संकल्प **आगरकर-वाङ्मय : खंड ३** या खंडाच्या प्रकाशनाने पूर्ण होत आहे, याचा मंडळाला विशेष आनंद होत आहे. वाचक या वाङ्मयाचे स्वागत करतील अशी आशा आहे.

मुंबई,
१ नोव्हें. १९८६

**सुरेंद्र बारलिंगे**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

## संपादकीय निवेदन

आगरकर-वाङ्मयाचा हा तिसरा आणि शेवटचा खंड वाचकांच्या हाती देताना आम्हाला समाधान वाटत आहे. आगरकांचे पुस्तकरूपाने प्रकाशित झालेले समग्र वाङ्मय पुनर्मुद्रित करण्याच्या आमच्या योजनेची या खंडाने पूर्तता होत आहे. अर्थात् याचे श्रेय महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाला आणि त्याचे अध्यक्ष यांनाच आहे हे येथे आवर्जून सांगितले पाहिजे.

आगरकर-वाङ्मय : खंड १ च्या निवेदनात म्हटल्याप्रमाणे या तिसऱ्या खंडात आगरकरांचे '**डोंगरीच्या तुरुंगात आमचे १०१ दिवस**' (१८८२), '**विकारविलसित**' (१८८३), **वाक्यमीमांसा आणि वाक्यांचे पृथक्करण** (१८८८), व **विविधविषयसंग्रह** (१८९१) हे ग्रंथ आणि **केसरीतील निवडक निबंध**, भाग १ व २ (१८८७ व १८८८) यांतील निर्विवादपणे आगरकरांचेच असलेले काही निबंध यांचा समावेश केला आहे. आगरकरांच्या वाङ्मयाची विभागणी प्रकाशनकालक्रमानुसार न करता त्यांचे सर्वांत शेवटी प्रकाशित झालेले **निबंधसंग्रह**, भाग १, २ व ३ हे आम्ही खंड १ व २ यात घेतले आणि त्यांच्या हयातीत प्रकाशित झालेले सर्व वाङ्मय या शेवटच्या खंडात समाविष्ट केले याचे कारण आम्ही पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत सांगितलेच आहे. त्याचा थोडक्यात पुनरुच्चार करायचा तर आगरकरांचे जीवितकार्य जी सुधारणा तिची मीमांसा सामर्थ्याने सुधारकातून निवडलेल्या या निबंधांतून झालेली आहे. त्या मानाने त्यांचे ग्रंथ भिन्न भिन्न प्रकारचे आणि त्यांचे विषयही भिन्न असल्यामुळे या खंडाला काहीसे संकीर्ण स्वरूप आले आहे. म्हणून या खंडाला आम्ही 'विविध विषय विभाग' असे नाव दिले आहे.

हे काम करताना ज्या अनेक सुहृदांनी बहुमोल मदत केली त्यांचे आभार मानणे अवश्य आहे. प्रथम आभार मानायचे साहित्य आणि संस्कृती मंडळाचे आणि त्याच्या अध्यक्षांचे. त्यांच्या मदतीवाचून हे काम होणे अशक्य होते. आगरकरांसारख्या थोर विचारवंताचे दुर्मिळ वाङ्मय अल्प किमतीत उपलब्ध करून देण्याची योजना पूर्ण केल्याबद्दल आम्ही तर त्यांचे ऋणी आहोतच, पण अखिल महाराष्ट्रही ऋणी राहील असा आम्हाला विश्वास वाटतो.

**विविधविषयसंग्रह** या निबंधसंग्रहातील बरेच निबंध वैज्ञानिक विषयांवरील आहेत. त्यांचा परामर्श एखाद्या अधिकारी व्यक्तीने घेतल्यास योग्य होईल

असे वाटल्यावरून आम्ही आमचे स्नेही, नागपूर विद्यापीठातील पदार्थ विज्ञानाचे निवृत्त प्राध्यापक, डॉ. प्र. ल. खरे, यांना त्या लेखांवर अभिप्राय देण्याची विनंती केली. त्यांनी ती आनंदाने मान्य केली आणि आपला अभिप्राय ताबडतोब पाठविला. तो आम्ही प्रस्तावनेत जसाच्या तसाच छापला आहे. या महत्त्वपूर्ण सहकार्याबद्दल आम्ही त्यांचे विशेष ऋणी आहोत.

आगरकरांसारख्या शंभर वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या विचारवंताच्या वाङ्मयाचे संपादन करायचे म्हणजे त्यांच्या मूळ ग्रंथाची गरज तर असतेच, पण अन्यही अनेक ग्रंथांची जरूर लागते. यांपैकी काही दुर्मिळ ग्रंथ नागपूर विद्यापीठातील मराठी विभागाचे प्रमुख डॉ. वि. बा. प्रभुदेसाई यांनी पुरविले. तसेच याच विद्यापीठातील भाषाविज्ञान विभागाचे प्रमुख डॉ. सु. बा. कुळकर्णी, आणि इंग्लिश विभागप्रमुख डॉ. व्ही. आर्. कानडे यांनीही महत्त्वाचे ग्रंथसाहाय्य दिले, एवढेच नव्हे तर काही मुद्द्यांची तात्त्विक चर्चाही केली. अशीच चर्चात्मक मदत प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर आणि डॉ. अशोक केळकर यांनीही पत्रांतून केली. या सर्वांनी केलेल्या साहाय्याबद्दल आम्ही कृतज्ञ आहोत.

या खंडाची मुद्रणप्रत तयार करण्याच्या कामात श्री. राम तारे यांनी त्यांना अडचण असूनही पुष्कळ मदत केली. तसेच मुद्रिते तपासण्याच्या कामात श्री. सुधीर घारे यांची मदत झाली. या दोघांचे आम्ही आभारी आहोत.

हा खंड सुबक स्वरूपात छापून दिल्याबद्दल नारायण मुद्रणालयाचे चालक श्री. मधुसूदन पांडुरंग बनहट्टी व त्यांचे बंधू श्री. श्रीकृष्ण पांडुरंग बनहट्टी यांचेही आम्ही आभारी आहोत.

शेवटी या आगरकर-वाङ्मयाचे वाचकांकडून भरघोस स्वागत होवो आणि महाराष्ट्रात ते काळजीपूर्वक अभ्यासले जावो अशी इच्छा व्यक्त करून हे निवेदन संपवितो.

१४ अंबाझरी लेआउट
नागपूर ४४० ०१०
७ ऑक्टोबर १९८६

म. गं. नातू
दि. य. देशपांडे

# अनुक्रमणिका

| | पृष्ठे |
|---|---|
| ग्रंथकार आगरकर (संपादकीय प्रस्तावना) | एक ते त्रेसष्ट |
| **आगरकर–वाङ्मय : खंड ३** | |
| **१. डोंगरीच्या तुरुंगात आमचे १०१ दिवस** | १–३७ |
| **२. विकारविलसित** | ३९–१९९ |
| प्रस्तावना | ४३ |
| संहिता | ७१ |
| **३. वाक्यमीमांसा** | २०१–३१४ |
| प्रस्तावना | २०५ |
| १. उपोद्घात–वाक्याविषयी सामान्य विचार | २११ |
| २. वाक्याविषयी विशेष विचार | २१९ |
| ३. वाक्यांचे भेद | २४४–२९३ |
| १. शुद्ध वाक्य | २४८ |
| २. मिश्र वाक्य | २६८ |
| ३. संयुक्त वाक्य | २७९ |
| ४. संकुचित वाक्य | २८३ |
| ५. संक्षिप्त वाक्य | २८९ |
| ६. प्रश्न, आज्ञा व उद्‌गार | २९१ |
| **परिशिष्टे** | |
| १. पृथक्करणाच्या पद्धती | २९४ |
| २. वाक्यांचे पृथक्करण | २९६ |
| ३. अभ्यासाकरिता वाक्ये | ३०३ |
| (अ) शुद्ध | ३०३ |
| (ब) मिश्र | ३०५ |
| (क) संयुक्त | ३०७ |

४. वाक्यपृथक्करणातील मुख्य संज्ञा (मराठी व इंग्रजी) ३०९
५. बेनच्या मोठ्या व्याकरणातील इंग्रजी वाक्यपृथक्करणाचा इंग्रजीत स्वल्प सारांश ३११

४. विविधविषयसंग्रह ३१५–४४४
प्रस्तावना ३१९
१. वाचन ३२१
२. ज्ञान ३२९
३. कवि, काव्य, काव्यरती ३३९
४. कै. रा. ब. केरो लक्ष्मण छत्रे ३४७
५. भारतीय कलांचे पुराणत्व[1]
६. व्यापारवृद्धी[2]
७. सूर्याचे कवच ३५२
८. सूर्यावरील ठिपके ३५४
९. हिमालयवर्णन ३५७
१०. महाबळेश्वरवर्णन ३६१
११. स्वेझचा कालवा ३८४
१२. नायगाराचा धबधबा ३९१
१३. शनी[3]
१४. गुरु अथवा बृहस्पति ३९४
१५. धूमकेतु ३९६
१६. यूरेनस व नेपच्यून ३९८
१७. कडक थंडीचे अद्भुत चमत्कार ४०१
१८. पेकिन शहराचे वर्णन ४०५
१९. चीन देशाविषयी ध्यानांत ठेवण्यासारख्या गोष्टी ४०९
२०. सशृंग मनुष्ये ४१६
२१. पेट घेणारा मासा ४१६
२२. शरीरात फिरणाऱ्या सुया ४१८

---

१. हा निबंध आगरकर–वाङ्मय : खंड १ मध्ये पृ. ३२२–३४० या पृष्ठांवर छापला आहे.
२. हा निबंध खंड १ मध्ये पृ. ६६–७० या पृष्ठांवर छापला आहे.
३. हा निबंध खंड १ मध्ये पृ. २७७–२८२ वर छापला आहे.

२३. न्यूयॉर्क येथील हवेत चालणाऱ्या आगगाड्या ४२०
२४. ऊस व साखर ४२२
२५. झोप ४२६
२६. सिडने स्मिथ यांचे स्त्रीशिक्षणाविषयी विचार ४२९
२७. आफ्रिकेतील हिऱ्यांच्या खाणी ४४०

५. केसरीतील निवडक निबंध
कै. विष्णु कृष्ण चिपळोणकर ४४७

व्यक्तिनामसूची ४५३
विषयसूची ४५९

---

# ग्रंथकार आगरकर

**आगरकर-वाङ्मय** या ग्रंथाचा हा तृतीय (आणि शेवटचा) खंड. या खंडाचा विशेष म्हणजे त्यात आगरकरांनी स्वतः प्रकाशित केलेल्या सर्व पुस्तकांचा समावेश केला आहे. पहिल्या दोन खंडांतील एकही पुस्तक त्यांच्या हयातीत प्रकाशित झालेले नव्हते. याचा दुसरा विशेष म्हणजे पहिल्या दोन खंडांचा विषय एकच—सुधारणा—हा आहे, तर या खंडातील पुस्तके भिन्न प्रकारांची आणि भिन्न विषयांवरील आहेत. **डोंगरीच्या तुरुंगात आमचे १०१ दिवस** या पुस्तकाचा विषय काहीसा आत्मनिवेदनाचा, काहीसा समाजशास्त्रीय आणि चिकित्सक आहे, तर **विकारविलसित** हे शेक्सपीयरच्या हॅम्लेट या नाटकाचे भाषांतर आहे; **वाक्य-मीमांसा आणि वाक्यांचे पृथक्करण** हा व्याकरणावरील एक प्रदीर्घ निबंध आहे, तर **विविधविषयसंग्रह** हा केवळ मनोरंजन आणि उद्बोधन करणाऱ्या लेखांचा संग्रह आहे. म्हणून या खंडाला आम्ही ' विविधविषयविभाग ' हे नाव दिले आहे.

आता या सर्व ग्रंथांचा संक्षेपाने परिचय करून द्यायचा आहे.

**केसरीकार आगरकर**

आगरकरांच्या वृत्तपत्रीय कारकीर्दीचा प्रारंभ दि. ४ जानेवारी १८८१ रोजी **केसरी** या वृत्तपत्राचे संपादक म्हणून झाला. ज्या वृत्तपत्राने महाराष्ट्राची अस्मिता जागविली, ब्रिटिश सरकारचे धाबे दणाणून सोडले, वृत्तपत्रसृष्टीत विलक्षण नावलौकिक मिळविला, व जे अखिल महाराष्ट्राच्या अभिमानाचा विषय झाले, त्या **केसरीचे** पहिले संपादकत्व थोडीथोडकी नव्हे, तर सात वर्षे (१८८१ ते १८८७) आगरकरांकडे होते. **केसरीच्या** बाल्यावस्थेत आगरकरांनी त्याचे लालनपालन अतिशय समर्थपणे केले आणि वृत्तपत्राच्या अंगी असलेल्या जन-जागरणसामर्थ्याचा प्रत्यय वाचकांना आणून देऊन वृत्तपत्रव्यवसायास मोठी प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. परंतु दुर्दैवाने आगरकरांच्या या बहुमोल कामगिरीचे आज बहुतेक सर्वांनाच विस्मरण झालेले आहे. पुढील १८८८ ते १९२० या प्रदीर्घ कालखंडात लोकमान्य टिळकांच्या असामान्य कर्तृत्वाचा एवढा खोल ठसा **केसरी**-वर उमटला की **केसरी** म्हणजे टिळक हेच समीकरण महाराष्ट्रीयांच्या मनात

दृढमूल झाले. सुदैवाने सखोल, चिकित्सक आणि नि:पक्ष संशोधनाबद्दल ख्यातनाम झालेल्या डॉ. य. दि. फडके यांनी मात्र आगरकरांच्या **केसरी**तील कार्यास योग्य न्याय दिला आहे. **शोध : बाळगोपाळांचा** या आपल्या ग्रंथात ते लिहितात: 'लोकमान्य टिळकांचे नाव "केसरी" शी इतके निगडित झाले आहे की ४ जानेवारी १८८१ रोजी "केसरी" निघाला तेव्हा टिळक "केसरी"कर्ते नसून "मराठा"कार होते, व आरंभीच्या जवळजवळ सात वर्षांत टिळकांनी "केसरी"त फारच थोडे लिहिले आहे, या वस्तुस्थितीची अनेकांना आठवण करून द्यावी लागते... आगरकरांनी "केसरी"त बरेच लिहिले, एवढेच नव्हे तर अनेक विषयांवर लिहिले. "केसरी"तील बराच मजकूर आगरकरलिखित असल्यामुळे आरंभीच्या सहा–सात वर्षांतील "केसरी"स "आगरकरांचा केसरी" म्हणणे योग्य ठरते.'[१]

**केसरी** व **मराठा** ही वृत्तपत्रे चिपळूणकर, आगरकर, टिळक, आपटे व नामजोशी या मित्रांच्या सामुदायिक प्रयत्नाने निघालेली असल्यामुळे त्यांचे धोरण त्या सर्वांच्या परस्पर विचाराने व संमतीनेच निश्चित होत असे. या मंडळीत अतिमवाळापासून ते अतिजहालापर्यंत सर्व प्रकृतींचे लोक होते, व त्यामुळे प्रत्येकाला आपल्या मतास थोडीबहुत मुरड घालावी लागे. विशेषत: सुधारणेच्या बाबतीत त्यांच्यातील मतभेद तीव्र स्वरूपाचे होते. त्यातही आगरकरांच्या ज्वलज्जहाल मतांच्या जवळजवळ सर्वच विरुद्ध होते. बहुतेकांची कल्पना अशी होती की समाजाची मने न दुखविता त्याला झेपतील तेवढ्याच सुधारणांचा पुरस्कार केला तरच समाज त्यांचा स्वीकार करील. म्हणून सर्वांस पटतील, मान्य होतील, अशाच सुधारणांचा पुरस्कार करणे आगरकरांना भाग पडत असे. त्यासाठी त्यांना स्वमतास फार मुरड घालावी लागे. त्यामुळे त्यांच्या मनाला फार ताण पडत असे, यातना होत असत. तरीही सात वर्षे त्यांनी मोठ्या निग्रहाने **केसरी**चा प्रतिपाळ केला.

१८८१ ते १८८७ या काळात **केसरी**ला अनेक आपत्तींना तोंड द्यावे लागले. तरीही खचून न जाता या जगन्नाथाच्या रथाची वाटचाल चालूच राहिली. **केसरी**वर पहिला आघात, नव्हे वज्राघातच, झाला तो **केसरी**चे प्रधान संस्थापक व देशोन्नतीच्या अनेक चळवळीचे प्रणेते विष्णु कृष्ण चिपळूणकर यांच्या १७–३–८२ रोजी झालेल्या अकाली निधनाचा. त्यांच्या मृत्यूने एका दृष्टीने न्यू इंग्लिश स्कूल व केसरी–मराठा ही शैशवावस्थेत पोरकी झाली. पण या धक्क्यातून ही ध्येयासक्त आणि निष्ठावान मंडळी लौकरच सावरली. शास्त्रीबोवां-

---

१. य. दि. फडके, **शोध : बाळगोपाळांचा** (१९७७), पृ. १७–१९.

वरील मृत्युलेखात आगरकरांनी लिहिले आहे : 'आम्हांस तर असे वाटते की शास्त्रीबोवांसारखा हिम्मतवान, प्रशांत, गंभीर आणि निरपेक्ष मनुष्य अत्यंत विरळा असेल. कोणी हितचिंतक मित्र विनोदाने आमच्या गट्टीस ग्राज्वेट पंचायतन, ग्राज्वेट पांडव असे म्हणत. निष्ठुर मृत्यूने आम्हांपैकी आमचा भ्राता धर्मराज आज यमसदनास पाठविला, व आमच्या बंधाचा ग्रंथिमणि हिरावला ही गोष्ट खरी. तथापि आमची अशी उमेद आहे की आम्ही एकवार मनाचा निश्चय करून देशोन्नतीसाठी झटण्याचा केलेला संकल्प होता होईल तो ढळू देणार नाही. आमचे धैर्य आणि कार्यनिष्ठा ही कसास लागण्याची संधि आली आहे असे आम्ही समजतो. शास्त्रीबोवांचीच कथा काय, पण आम्हांपैकी एक जरी तळावर असला तरी तो आम्ही सर्वांनी आरंभिलेले उद्योग अविच्छिन्न चालविण्यास होईल तितकी खटपट करील.' (पृ. ४५१–५२)[२]

केसरीवर याचवेळी दुसरे गडांतर आले--कोल्हापूर प्रकरणाचे. कोल्हापूर संस्थानचे कारभारी माधवराव बर्वे यांच्याकडून होत असलेल्या अल्पवयी शिवाजीराजांच्या छळासंबंधी आगरकर आणि टिळक दोघांनीही केसरी आणि मराठा पत्रांतून प्रखर टोका केली. त्यावर माधवराव बर्व्यांनी या दोघांविरुद्ध केलेल्या फिर्यादीचा खटला याच वेळेस चालू होता. या खटल्याचा निकाल १५ जुलै १८८२ रोजी लागला व आगरकर आणि टिळक यांना अविचाराने लेख लिहिल्याबद्दल चार महिन्यांच्या कारावासाची शिक्षा सुनावली जाऊन त्यांची रवानगी डोंगरीच्या तुरुंगात झाली. दोन्ही संपादक अशा रीतीने काही काळ बंदिवान झाले, तरीही त्यांच्या सहकाऱ्यांनी दोन्ही पत्रे नेटाने व व्यवस्थितपणे चालू ठेवली.

केसरीवरील सर्वांत मोठी आपत्ती म्हणजे आपसांतील मतभेदांमुळे निर्माण होणारे पेचप्रसंग. या मतभेदांना तोंड देऊन त्यावर मात करण्याची आगरकरांनी जवळ जवळ सात वर्षे आपल्या परीने शिकस्त केली. मतभेदामुळे परस्परांत वैमनस्य निर्माण होण्याचे प्रसंग वारंवार येत. तेव्हा एकोपा कायम राखण्यासाठी त्यांनी अनेक तडजोडी केल्या, आपल्या जिव्हाळ्याच्या आणि महत्त्वाच्या मतांस लगामही घातला. केसरीच्या २९–३–१८८१ च्या अंकात 'पारमहंसिक ब्राह्मधर्म' या पुस्तिकेवर अभिप्राय देताना आगरकर म्हणतात : 'धर्मासंबंधी वाद केसरीत न करावा असा सध्या तरी आमचा हेतू आहे. कारण धर्मासंबंधी आमची मते थोडीशी तऱ्हेवाईक असल्यामुळे...लोक ती स्वस्थपणे ऐकून घेतील

२. कंसातील आकडे याच खंडातील पृष्ठांचे आहेत असे समजावे.

की नाही याचा आम्हाला भरंवसा नाही. यासाठी त्या बिलामतीत आम्ही सध्या पडतच नाही.' मात्र धर्माच्या नावाखाली समाजात ज्या अनेक हास्यास्पद, दुष्ट व हानिकारक चालीरीती प्रचलित होत्या त्यांचा समाचार आगरकर आवर्जून घेत असत. त्याबद्दल तक्रार करणाऱ्या वाचकांस उद्देशून २०-२-१८८३ च्या अंकात ते ठणकावून सांगतात : 'उगाच धर्माची उठाठेव करून लोकांची मने दुखविण्याचा केसरीचा इरादा नाही...तथापि व्यवहारावर लिहिणे आपले कर्तव्य त्यास वाटते, म्हणून जेव्हा एखादी चाल निरर्थक व ग्राम्य असून तिचा धर्माशी अज्ञानाने उगाच संबंध जोडलेला असतो...तेव्हा त्यातील बिंग बाहेर काढण्यास तो कधीही मागेपुढे पाहणार नाही. मग तेवढ्याकरिता धर्मावर लिहावयास लागले तरी हरकत नाही. गर्भाधानासारखी शुष्क, निरर्थक, ग्राम्य व आपल्या हातातली चाल जर आम्हांस सोडवत नाही तर बालविवाह वगैरे घोर चाली कशा सुटणार ?' याविषयीची आपली भूमिका स्पष्ट करताना ६-३-१८८३ च्या अंकात ते म्हणतात : 'वाचकांना खूष राखण्यासाठी त्यांना अप्रिय अशा विषयावर आम्ही लिहिणार नाही असे नाही. कोणत्याही विषयावरील बरेवाईट विचार लोकांपुढे ठेवणे हे आमचे काम आहे.'

बालविवाह, पुनर्विवाहबंदी, मांसाहार, मद्यपान, वेश्यागमन इत्यादींचा निषेध सर्वच सहकाऱ्यांना मान्य होता. त्यामुळे त्यांचा समाचार आगरकर मनमोकळेपणाने घेऊ शकत असत. परंतु बालविवाहास कायद्याने बंदी करावी की नाही, व स्त्रियांना कसे व कोणते शिक्षण द्यावे याबाबतीत आगरकर आणि त्यांचे सहकारी यांच्यातील मतभेद तीव्र स्वरूपाचे होते. ते पुढे इतके बळावले की त्यासंबंधी तडजोड करणे, माघार घेणे आगरकरांना अशक्य झाले, आणि अखेरीस २५-१०-१८८७ रोजी त्यांना केसरी सोडावा लागला.

बालविवाहास कायद्याने बंदी करावी की नाही हा वाद १८८४ साली पेटला, व तो लवकरच विकोपाला गेला. त्यामुळे स्वतः संपादक असूनही आगरकरांना 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' हा लेख स्वतःच्या नावानिशी प्रसिद्ध करावा लागला. त्याचे स्पष्टीकरण करताना २६-१२-१८८४ च्या अंकात ते लिहितात : 'नाव घालून लेख छापण्यात काही मातबरी आहे असे आगरकरास बिलकूल वाटत नाही. पण बालविवाहाच्या निषेधसाधनाविषयी त्याचे आणि त्याच्या मित्रांचे विचार जुळत नसल्यामुळे त्याला या मार्गाचे अवलंबन करावे लागत आहे. माझ्या जिवलग मित्रांनी आम्ही आरंभिलेल्या समाईक उद्योगाची जबाबदारी प्रत्येकाकडे थोडीथोडी वाटून देण्याचा ठराव करून माझ्या माथ्यावर

केसरीचे प्रकाशकत्व ठेवले. त्यामुळे महत्त्वाच्या प्रश्नावर केसरीत एडिटोरिअल कालमाखाली जे अभिप्राय द्यावयाचे ते अर्थात् मला पसंत असून निदान तीतील बहुतेकांस तरी पसंत असले पाहिजेत व शेकडा ९९$\frac{3}{4}$ बाबतीत असतात. पण या बाबतीत माझा बाकीच्यांशी चार आण्याचा विरोध आहे, आणि तो आम्हा उभयतांसही फार महत्त्वाचा वाटत आहे.'

स्त्रीशिक्षणाच्या बाबतीतही आगरकरांनी समझोता टिकविण्याचा प्रयत्न केला, पण तोही दोनच वर्षेपर्यंत टिकू शकला. ऑक्टोबर १८८७ मध्ये आगरकर व टिळक यांच्यातील मतभेद इतके कटु झाले की त्यानंतर सहकार्य अशक्य होऊन आगरकरांनी **केसरी** सोडला, व २५–१०–१८८७ रोजी **केसरी** टिळकांचा झाला. त्यामुळे 'फीमेल हायस्कुलातील शिक्षणक्रम' या विषयावर टिळकांनी लिहिलेल्या लेखमालेस आगरकरांनी दिलेले उत्तर 'लिहून आलेला मजकूर' म्हणून प्रसिद्ध झाले. अशा प्रकारच्या तडजोडीमुळे आगरकरांचा फार कोंडमारा होत होता. हा कोंडमाराही त्यांनी सहन केला असता. परंतु एकोप्यासाठी स्वीकारलेल्या धोरणाने लोकांना जागृत करून शहाणे करण्याचा **केसरी**चा जो हेतू तोही साध्य होत नव्हता. समाजाचे कल्याण कोणत्या तत्त्वांचे व उपायांचे अवलंबन केल्याने होईल याविषयीची आपली मते बरोबर आहेत अशी आगरकरांची खात्री होती. त्यावरील निष्ठेमुळेच अखेरीस त्यांना टिळकांसारख्या जिवलग स्नेह्याची ताटातूट सहन करावी लागली, एवढेच नव्हे तर सात वर्षे अपत्यवत् वाढविलेल्या **केसरी**चाही त्याग करावा लागला. वेळोवेळी स्वमतास मुरड घालून आपण जे लोकानुवर्ती धोरण आजपर्यंत स्वीकारीत आलो त्याचे दुष्परिणाम सांगताना १–११–१८८७ च्या **केसरीत** आगरकर म्हणतात : 'माझ्या सुधारक बांधवांनो ! 'नहि सत्यात्परो धर्मः' या तत्त्वास आपण फार दिवस विसरलो व त्यामुळे आज आपली सर्वत्र अप्रतिष्ठा होत आहे. हिंदुजनांच्या हृदयावर एकाएकी दारुण आघात करू नये अशा सुबुद्धीने आपण आपले खरे विचार त्यांस सांगितले नाहीत. कधी अन्योक्तीने बोलून, कधी विचारशक्ती जागृत करून, कधी हितवाद करून कोणाचे मन न दुखविता आजपर्यंत हिंदुसमाजास सुधारणेच्या दिशेने ओढण्याचा आपण सामोपचाराने प्रयत्न केला. हिंदूंच्या धर्माविषयी, रूढीविषयी व कर्तृत्वाविषयी होईल तितके बहुमानाने बोलून आपला त्याविषयीचा भयंकर तिरस्कार आपण कधीही प्रकट केला नाही. परंतु या सौजन्याचे आपणांस इतकेच फळ मिळाले की आपले वर्तन विसंगत ठरून आपणांवरील सर्वांचा विश्वास उडाला आहे व आपण जननिंदेस व उपहासास पात्र झालो आहोत ! जर हिंदूंची व त्यांच्या धर्माची पर्वा न बाळगता आपल्या मनोदेवतेच्या प्रेरणा

आपण स्पष्टपणे लोकांस सांगितल्या असत्या व आपले वर्तनही तसेच निर्भय ठेविले असते तर आज आपणांस जी शोचनीय स्थिती आली आहे ती कदापि आली नसती, व केसरीकारांच्या बीभत्स अपशब्दास आपण कधीही पात्र झालो नसतो. अद्यापही तसे करण्याची वेळ गेली नाही व केसरीकारांसारख्यांचेही तोंड बांधण्यास तूर्त स्पष्टोक्तीसारखा दुसरा मार्ग नाही.'

केसरी सोडावा लागला तरी आगरकरांना लागलेला लोकशिक्षणाचा ध्यास तिळभरही कमी होणे शक्य नव्हते. समाजोत्कर्षाच्या ध्येयाने पूर्णपणे झपाटलेल्या त्यांच्या जीवनकोशात 'निराशा' हा शब्दच नव्हता. केसरी सोडल्यानंतर एका वर्षाच्या आतच त्यांनी **सुधारक** हे आपले स्वतंत्र वृत्तपत्र काढले, आणि त्यातून त्यांच्या सिद्धहस्त व ओजस्वी लेखणीची जी चौफेर, तुफानी आणि अनिर्बंध घोडदौड सुरू झाली ती आयुष्याच्या अखेरीसच थांबली. सुधारकात प्रसिद्ध झालेल्या, विवेकाच्या दीप्तीने उजळून निघालेल्या सर्वस्पर्शी विचारांनी महाराष्ट्रात चैतन्याची एक प्रचंड लाटच उसळली. या विचारांचा परिचय आपण प्रस्तुत ग्रंथाच्या प्रथम खंडातील प्रस्तावनेत करून घेतलेलाच आहे. म्हणून त्याची येथे पुनरुक्ती करण्याची जरूरी नाही.

**केसरीतील निवडक निबंध**

वृत्तपत्रे दवाच्या थेंबासारखी अल्पजीवी. परंतु **केसरीत** अनेक विषयांवर इतके माहितीपूर्ण लेख येत की वाचकांना ते संग्राह्य वाटत. म्हणून अनेक वाचकांनी ते पुस्तकरूपाने पुन्हा प्रसिद्ध करावे असा आगरकरांच्या मागे लकडा लावला. काही वाचकांनी तर स्पष्टच लिहिले की, 'ज्याअर्थी शास्त्रीबोवांसारख्यांच्या हातचे निबंध आम्हांस किंवा आमच्या पुढील पिढीस वाचावयास मिळण्याचा संभव नाही, त्याअर्थी या आपल्या महाराष्ट्र ॲडिसनच्या व त्याच्या साथ्यांच्या हातून **केसरीरूप** स्पेक्टेटरात जे चांगले चांगले निबंध आले असतील, ते तुम्ही तरी फिरून छापून काढा, नाही तर आम्हांस तरी ते छापण्याची परवानगी द्या. पण ते तुमचे तुम्ही छापावे हे विशेष योग्य आहे.'[३] वाचकांच्या या आग्रहामुळे आगरकरांनी **केसरीतील निवडक निबंध**, पहिले पुस्तक, २०–९–१८८७ रोजी प्रसिद्ध केले. या पुस्तकाच्या प्रस्तावनेत ते लिहितात : 'महाराष्ट्र भाषेत राजकीय, सामाजिक, इत्यादि विषयांवर तरुण वाचकांच्या हातात टाकण्यासारखी पुस्तके मुळीच झालेली नाहीत, असे म्हणण्यास हरकत नाही. ही उणीव अंशतः तरी दूर करावी या हेतूने या निवडक निबंधांची ही आवृत्ती

---

३. **केसरीतील निवडक निबंध**, पुस्तक पहिले, प्रस्तावना.

काढली आहे, व प्रत्येक सुशिक्षित वाचकांस तिची निदान एक प्रत तरी स्वतःच्या संग्रही ठेवता येऊन द्रौपदीच्या स्थालीप्रमाणे तिचा उपयोग करता यावा, यासाठी तिची किंमत खर्चाचे मानाने बेताचीच ठेवली आहे.'

हा पहिला भाग प्रसिद्ध झाल्याबरोबर त्यावर वाचकांच्या उड्या पडल्या; व त्याचबरोबर दुसऱ्या भागाच्याही मागणीची पत्रे आगरकरांना येऊ लागली. म्हणून पुढच्याच वर्षी (१८८८) त्यांनी निवडक निबंधांचा दुसरा भाग प्रसिद्ध केला. त्याच्या प्रस्तावनेत ते लिहितात : 'केसरीपत्र निघाल्यापासून लोकांत वाचनाची गोडी किती वाढली आहे व अगदी स्वल्प किंमतीत प्रत्येक आठवड्यास मनोरंजक व बोधपर किती मजकूर वाचण्यास मिळत आहे, याबद्दल अभिप्राय देण्याचा आम्हांस अधिकार नाही हे आम्ही कबूल करतो. तथापि ज्याअर्थी 'निवडक निबंधां'च्या पहिल्या भागाचा खप इतक्या झपाट्याने होत आहे, व तसाच दुसऱ्या भागाचाही होईल अशी चिन्हे दिसत आहेत, त्याअर्थी केसरीतून जी थोडीबहुत सेवा घडत आहे ती वाचकजनांस अत्यंत मान्य होत आहे, व नाना प्रकारच्या विषयांवर अधिक वाचण्यासारखा निबंधसंग्रह दुसऱ्या कोणत्याही दोन पुस्तकांत सापडण्यासारखा नाही, असे स्पष्ट दिसते. व हे खरे असेल तर आम्ही जे स्वल्प देशकृत्य आरंभिले आहे त्यापासून आमचा मूळ हेतू थोडाबहुत पूर्ण होत आहे, हे पाहून आम्हांस समाधान मानण्यास हरकत दिसत नाही.'

या दोन पुस्तकांत मिळून एकूण ९१ निबंध आहेत. **केसरीपत्रात** त्यावेळी आगरकरांखेरीज आणखी चार-पाच लेखक लेखन करीत असत, आणि त्या सर्वांचे काही निबंध 'निवडक निबंधा'त समाविष्ट केलेले असावेत हे स्वाभाविक आहे. परंतु निबंधलेखकांची नावे पुस्तकात छापलेली नसल्यामुळे त्यांपैकी आगरकरांचे कोणते आणि अन्य लेखकांचे कोणते हे सांगणे कठीण आहे. विद्वानांत यासंबंधाने बराच वाद असून या लेखांचे लेखकत्व अजून निश्चित झालेले नाही. म्हणून त्यांपैकी निर्विवादपणे आगरकरांचेच असलेले असे एकूण पाच निबंध आम्ही येथे घेतले आहेत. यापैकी चार, म्हणजे 'वाचन', 'ज्ञान', 'कवि, काव्य, काव्यरति' आणि 'कै. रा. ब. केरो लक्ष्मण छत्रे', ह्यांचा समावेश **विविधविषयसंग्रह** ' या सुधारकांतील निवडक निबंधांच्या संग्रहात खुद्द आगरकरांनीच केला आहे **विविधविषयसंग्रहाच्या** प्रस्तावनेत ते लिहितात. 'सुधारकातील निबंधांशिवाय **याच लेखकाने केसरी पत्रात लिहिलेल्या**[४] अनेक निबंधांपैकी चार

४. जाड टाइप संपादकांचा.

निबंध आर्यभूषण छापखान्याच्या मालकांच्या परवानगीने या भागात छापले आहेत.' पाचवा निबंध ' कै. विष्णु कृष्ण चिपळोणकर ' हाही निर्विवादपणे आगरकरांचाच याविषयी संदेहाला जागा नाही. शास्त्रीबोवांवरील मृत्युलेख संपादकाने, त्यातही त्यांच्याविषयी इतका आदर आणि प्रेम असणाऱ्या आगरकरांनी, लिहिला नसणे असंभव आहे.

या पाच निबंधांवरूनही लोकांना विचार करावयास शिकविण्याची व त्यायोगे त्यांची विवेकशक्ती जागृत करण्याची आगरकरांची तळमळ सहज लक्षात येते. **केसरीतील निवडक निबंध** या पुस्तकाच्या पहिल्या भागाचा प्रारंभच त्यांनी ' वाचन ' या निबंधाने केला असून दुसऱ्या भागाचा आरंभ ' ज्ञान ' या निबंधाने केला आहे.

आगरकरांचा सारा भर माणसाची विवेकशक्ती जागवून तिचा विकास करण्यावर होता. समाजाची विवेकशक्ती जागृत झाली तरच त्याचा उत्कर्ष होऊ शकतो, व त्यातील व्यक्ती माणूस म्हणून जगू शकतात असे त्यांना वाटे. इतर कोणत्याही प्राण्यास न लाभलेले विवेकाचे वरदान केवळ मनुष्यासच निसर्गाने बहाल केले आहे. या शक्तीमुळेच पंचमहाभूतांवर ताबा मिळविण्याचे व विश्वाच्या रहस्यास हात घालण्याचे सामर्थ्य त्याला प्राप्त झाले आहे. तेव्हा या शक्तीची जोपासना केल्यानेच आपले मनुष्यत्व सार्थकी लागू शकेल हे उघड आहे. त्यासाठी प्रथम हे लक्षात ठेवले पाहिजे की आपल्या शरीरावयवांच्या शक्तीची वाढ जशी त्यांचा वापर करण्यावर अवलंबून असते, एरवी ते निकामी होऊन मनुष्य पंगू बनतो, त्याप्रमाणेच विवेकशक्तीची जोपासना न केल्यास माणसाचे मन दीर्घकाळ न वापरलेल्या लोखंडासारखे गंजून जाऊन पूर्णपणे निकामी बनते असे ते बजावतात. पण मनुष्याला शारीरिक श्रमापेक्षा मानसिक श्रमाचा जास्तच कंटाळा असतो. स्वतंत्रपणे विचार करणे, स्वतःचे निर्णय स्वतःच विचारपूर्वक घेणे, ही गोष्ट सोपी नाही. यापेक्षा गुरू आणि वडीलधारी माणसे देतील ते ज्ञान निःशंकपणे स्वीकारावे आणि तेच सर्वस्व मानावे, परंपरेने चालत आलेल्या आचारानुसार वागावे, म्हणजे आपला मेंदू शिणवावा लागत नाही, व स्वतंत्र विचार करण्यास लागणारे धैर्य, चिकाटी, प्रसंगी धोके पत्करण्याची तयारी, इत्यादी कटकटी अनायासेच टळतात. पण त्यामुळे आपले किती नुकसान होते याची कल्पना बहुतेकांना नसते. आपले पूर्वज, गुरू व परंपरा यावरच संपूर्णपणे अवलंबून राहिल्यामुळे आपण इतके परावलंबी आणि स्थितिप्रिय होतो की कोणी आपल्याला पशुपातळीवर राबविले तरी ते आपण

निमूटपणे सहन करतो. अशा रीतीने माणसाचे मत एकदा मेले की ही गुलामी वृत्ती आपल्या पूर्ण अंगवळणी पडते, आणि तिच्यातून बाहेर पडले पाहिजे हा विचारही आपल्या मनाला शिवत नाही. अशा प्रकारच्या व्यक्तींनी बनलेला समाज किती शोचनीय अवस्थेस जाऊ शकतो हे पाहण्यास आपल्या देशाबाहेर जाण्याची गरज नाही. शेकडो वर्षे गुलामीत राहिलेला आपला देश याचे ज्वलंत उदाहरण आहे.

या सर्व दुरवस्थेवर उपाय म्हणजे ज्ञानप्राप्ती. आगरकर म्हणतात की आपल्याला माणसासारखे जगायचे असेल तर प्रथम मानसिक श्रमांचे महत्त्व आपल्या मनावर आपण बिंबवून घेतले पाहिजे. आपल्या मानसिक शक्तीची वाढ आपल्या ज्ञानप्राप्तीवर अवलंबून आहे. त्यासाठी ज्ञानाची मनःपूर्वक आराधना करणे हे आपल्या जीवनाचे उद्दिष्ट असले पाहिजे. त्याकरिता ज्ञानप्राप्तीची साधने, त्यांच्या मर्यादा व त्यांची श्रेष्ठकनिष्ठताही लक्षात घेतली पाहिजे.

गुरुमुख, वाचन, विचार, अवलोकन व वाद इत्यादि ज्ञानसंपादनाची अनेक साधने आहेत. परंतु यांपैकी गुरुमुख, अवलोकन व वाद या तिन्ही साधनांचे सामर्थ्य अतिशय मर्यादित आहे. त्यांच्या तुलनेत वाचन आणि विचार यांचे सामर्थ्य मोठे आहे असे आगरकर दाखवून देतात. इंद्रियद्वारा प्राप्त झालेल्या अनुभवांवरून कार्यकारणादिकांचा जो निश्चय त्यास विचार असे म्हणतात. हा निश्चय करण्याचे सामर्थ्य इतर साधनांपेक्षा वाचनाने अधिक प्राप्त होते. 'विचारांना ग्रंथग्रथित करणे म्हणजे त्यांस जडस्वरूप देऊन अमरत्व आणण्यासारखे आहे' (३२४). ग्रंथांना स्थलकालादि कोणत्याही मर्यादा नसतात, कारण ते आपण कोठेही आणि केव्हाही वाचू शकतो. तसेच ग्रंथांतील ज्ञानालाही मर्यादा नसतात. आपल्या पूर्णपणे अधीन असे हे साधन आहे. त्यामुळे वाचन हे ज्ञानप्राप्तीचे सर्वश्रेष्ठ साधन ठरते. वाचनाचे व्यसन जेवढे वाढेल तेवढे कल्याणकारकच होते. मनुष्याला ते दुर्व्यसनापासून दूर नेते. त्यापासून मिळणारे सुख आपल्या शरीराची किंवा मनाची हानी करीत नाही. उलट मनुष्याला उत्कट व अक्षय आनंदाचा लाभ करून देते.

मनुष्याची सारी धडपड सुखप्राप्तीकरिता असते. ज्ञानप्राप्तीने शारीरिक, सामाजिक व शुद्ध मानसिक या तीनही प्रकारच्या सुखांची प्राप्ती होते. रानटी लोकांचे अतिशय कष्टमय जीवन माणसाने ज्ञानाच्या योगाने किती सुसह्य, समृद्ध व सुखी केले आहे! शारीरिक सुखांप्रमाणे सामाजिक सुखांच्याही बाबतीत ज्ञानाने अशीच वृद्धी केली आहे, तसेच मानसिक सुखांतही खूपच आघाडी मारली

आहे. ज्ञानी पुरुषाचे अनन्यसाधारणत्व सांगताना आगरकर म्हणतात : 'विश्वाच्या विशाल स्वरूपाच्या विचारात जो गढून गेला, व ज्याला ही पृथ्वी एखाद्या क्षुल्लक वारुळाप्रमाणे दिसू लागली, त्याला तीवरील काही मुंग्यांस दुसऱ्यांपेक्षा दाणे दोन दाणे अधिक सापडले, किंवा काहीस मुळीच न सापडल्यामुळे रिकामे फिरावे लागले, म्हणून खेद होणार आहे काय ?' (३३५).

विष्णु कृष्ण चिपळोणकर व केरो लक्ष्मण छत्रे या महापुरुषांना ज्ञानामुळेच अमरत्व प्राप्त झाल्याचे आगरकर सांगतात. चिपळोणकरांवरील मृत्युलेखाची सुरवातच ते 'देह त्यागिता कीर्ति मागे उरावी' या रामदासांच्या वचनाने करतात. चिपळोणकरांची असामान्य देशभक्ती, अलौकिक कर्तृत्व, मराठी भाषेवरील त्यांचे उत्कट प्रेम व त्यांचा प्रचंड विद्याव्यासंग यांच्या स्मरणाने भारावून जाऊन आगरकर उद्‌गारतात : 'आज महाराष्ट्रवाणीचा पती परलोकवासी झाल्याने ती गतभर्तृका झाली व महाराष्ट्रीयांनी एक अद्‌भुत रत्न गमावले' (४४७). जन्माबरोबर मृत्यू हा ठेवलेलाच असतो, पण शास्त्रीबोवांच्या अकाली निधनामुळे आगरकर अतिशय व्याकुळ झाले. 'एखादा प्रचंड वृक्ष फळास येतो आहे नाही तो विद्युत्पात होऊन तो जमीनदोस्त व्हावा' तेवढी हादरा देणारी ही घटना आहे असे ते लिहितात. चिपळोणकरांनी वयाच्या अवघ्या चोविसाव्या वर्षी महाराष्ट्राचे एक लेणे बनलेल्या **निबंधमालेची** सुरवात केली. याखेरीज चित्रशाळा प्रेस, किताबखाना, इत्यादि संस्था ते चालवीत होतेच. त्यांच्या जोडीला सहकाऱ्यांच्या मदतीने त्यांनी स्वाभिमानी व स्वतंत्र बाण्याचे शिक्षण देणारी न्यू इंग्लिश स्कूल ही संस्था वयाच्या तिसाव्या वर्षी, तर लोकशिक्षण करणारी **केसरी** व **मराठा** ही वृत्तपत्रे एकतिसाव्या वर्षी काढली. अवघे बत्तीस वर्षांचे आयुष्य लाभलेल्या व्यक्तीचे हे कर्तृत्व कोणालाही थक्क करून सोडणारे आहे.

देशाचे पारतंत्र्य, दारिद्र्य व जातिभेद ही शास्त्रीबोवांच्या मनाला तीव्र टोचणी लावणारी मोठी शल्ये होती. ती दूर करण्यासाठी त्यांनी आपले सर्वस्व पणास लावले होते. त्यांच्या विचारशक्तीचा आवाका आणि देशाच्या उज्ज्वल भविष्याची स्वप्ने पाहणारी त्यांची अचूक दूरदृष्टी केवढी विशाल होती ते आगरकरांनी दाखविले आहे. ते म्हणतात : 'एखाद्या वेळेस त्यांचा कल्पनाविहंग पूर्ण पंख पसरून भराऱ्या मारू लागला म्हणजे त्याला हिंदुस्थान देश स्वतंत्र होऊन प्रजासत्ताक राज्याखाली सुखाने नांदत आहे असे दिसे' (४५०).

ब्रिटिशांच्या अन्यायी राजवटीवर किंवा समाजातील दुष्ट चालीरीतींवर त्वेषाने तुटून पडणारे आगरकर छत्र्यांसारख्या ज्ञानमहर्षीचा मृत्युलेख लिहिताना

कमालीचे शोकाकुल आणि हळवे बनले आहेत. तीव्र बुद्धिमत्ता व प्रगाढ व्यासंग यांच्या योगाने गणित, ज्योतिष, पदार्थविज्ञान यांसारख्या गहन विषयांवर प्रभुत्व मिळविणाऱ्या आणि ते ज्ञानामृत विद्यार्थ्यांना जिव्हाळ्याने पाजण्याची तळमळ असणाऱ्या छत्र्यांसारख्या विरळा गुरूच्या निधनाने आगरकरांना अतिशय दुःख होणे स्वाभाविक होते. स्वतः हाडाचे शिक्षक असलेल्या आणि विद्यार्थ्यांना हसत खेळत शिकविणाऱ्या आगरकरांच्या लेखणीला अशा गुरूवर लिहिताना साहजिकच भरते आले आहे. ते लिहितात : 'नानांसारखा अनुभविक, कुशाग्र-बुद्धि व बहुश्रुत शिक्षक भेटल्यावर शिकणाऱ्यांच्या पोटात गुदगुल्या होत यात नवल नाही. ते वर्गात बसले म्हणजे त्यांना आपण आपल्या मुलाबाळांत बसलो आहो असे वाटे' (३५१). म्हणून तर निवृत्त होताना या स्थितप्रज्ञ गुरूचे डोळे रडून रडून सुजले आणि त्यांच्या पायांवर डोके ठेवून त्यांना कडकडून मिठी मारणाऱ्या त्यांच्या शिष्यांनाही रडू कोसळले.

छत्र्यांचे विशेष सांगताना आगरकर म्हणतात की मानवी सुखवृद्धीचे आदिकारण ज्ञानप्रसार असल्यामुळे त्याची आराधना अपरिहार्य आहे. शास्त्रा-भ्यासाने मनुष्याच्या दृष्टीचे क्षितिज विस्तारते, आणि त्यामुळे त्याला स्थळ-काळाचे बंधन राहात नाही. सामाजिक, राजकीय, धार्मिक आदि बाबतींतही तो दुराग्रही राहू शकत नाही. आगरकर लिहितात : 'पदार्थविज्ञानशास्त्रात जो पट्टीचा विद्वान झाला, व जड सृष्टीच्या तत्त्वांपासून मानसिक सृष्टीच्या अत्यंत गहन तत्त्वांपर्यंत खेळणाऱ्या कार्यकारणाचे व सामर्थ्याचे ज्याला आकलन झाले आहे, त्याची धर्मविषयक व समाजविषयक मते विशिष्ट देशाचाराच्या किंवा रीतिरिवाजांच्या पाशात जखडून राहात नाहीत' (३५०). छत्र्यांसारख्या तेजः-परंपरानिर्मितिसामर्थ्य असलेल्या महापुरुषांवर मानवी सुधारणा अवलंबून आहे.

'कवि, काव्य, काव्यरति' हा केसरीतील निवडक **निबंधांपैकी** आणखी एक महत्त्वाचा निबंध. प्रापंचिकांपासून तो योद्धे, मुत्सद्दी, शास्त्रज्ञ–तत्त्वज्ञांपर्यंत सर्वांना काव्याची ओढ का असते ? शोकपर्यवसायी काव्यानेही आनंद का होतो ? काव्याची निर्मिती कशी होते ? काव्याचे काव्यत्व कशात आहे ? काव्य व शास्त्र यांत फरक कोणता ? शास्त्राची वाढ काव्यनिर्मितीस घातक होते काय ? इत्यादि अनेक महत्त्वाच्या प्रश्नांचा मार्मिक ऊहापोह आगरकरांनी या निबंधात केला आहे. काव्याची व्याख्या ते 'जी रचना वाचकाच्या अंतःकरणात अनुकूल संवेदना उत्पन्न करण्याकरिता केलेली असते ती काव्य होय' अशी करतात. शास्त्र व काव्य यांतील फरक सांगताना ते म्हणतात की काव्य व शास्त्र या

दोघांनाही अंतर्बाह्य सृष्टीतील वस्तूंचा यथार्थ निर्णय करावा लागतो. मानवी सुखाची वाढ करण्याचे सामर्थ्य या दोहोंतही आहे. पण शास्त्रीय ज्ञानात काठिण्य व कर्कशता असल्यामुळे ते सर्वांनाच सुखावह होऊ शकत नाही. त्यासाठी ते अनुकूलसंवेदनोत्पादक करावे लागते. काव्याच्या अंगी हे सामर्थ्य आहे, नव्हे तो काव्याचा प्रधान गुण आहे.

शास्त्राच्या वाढीने काव्याची पीछेहाट होते काय या प्रश्नाचे आगरकरांनी केलेले विवेचन त्यांची स्वतंत्र व मार्मिक दृष्टी दर्शविणारे आहे. ज्ञानप्रसार होऊ लागला की कवित्वशक्तीस मांद्य येऊ लागते हा कित्येकांनी दिलेला अभिप्राय आगरकरांना साहसाचा वाटतो. त्यांच्या मते 'काव्यास अलीकडे जे थोडेसे मांद्य आल्यासारखे दिसते त्याचे कारण अर्वाचीन ज्ञानप्रसार नव्हे, तर अर्वाचीन ज्ञानप्रसारामुळे काव्यवस्तू करण्याजोगे जे नवीन विषय उत्पन्न झाले आहेत त्यांचा उपयोग काव्यरचनेत न करता अर्वाचीन कवी प्राचीन कवींच्या काव्यविषयांवर फिरून फिरून लिहितात व त्यांच्या भाषेचे अनुकरण करतात हे आहे' (३४१). ज्या काही गोष्टींचे ज्ञान आज तत्त्ववेत्त्यांसच आनंद देत आहे, ते सर्व लोकांना आनंददायी होण्यासाठी ते ज्ञान आत्मसात् करून प्रतिभाबळाने सुखोत्पदक करण्यास आवश्यक तो अभ्यास व श्रम कवीस घ्यावे लागतील. लॉर्ड टेनिसन याचे 'प्रिन्सेस' नामक काव्य याचे उदाहरण म्हणून आगरकर देतात.

शोकपर्यवसायी काव्यापासून वाचकाला आनंद होण्याचे कारण प्रत्यक्ष दुःख भोगणे आणि त्या दुःखाचे केवळ वाचन किंवा श्रवण करणे यात महदंतर आहे हे आहे असे सांगून आगरकर म्हणतात : 'प्रत्यक्षानुभवाची तीव्रता वाचनात किंवा श्रवणात कधीही येऊ शकणार नाही'. मात्र जरी शोकान्त काव्यापासून आनंद होत असला तरी त्यातील दुःखाने वृत्तीला खिन्नता येतेच. म्हणूनच अप्रबुद्ध लोकांना सुखान्त काव्येच आवडतात.

काव्यनिर्मिती करताना कवीस घ्याव्या लागणाऱ्या सायासासंबंधी आगरकर म्हणतात की प्रत्यक्ष दुःख भोगणाऱ्या व्यक्तीस ज्या यातना होत असतात त्या आपणांसच होत आहेत अशी भावना निर्माण होण्यासाठी कवी त्यांचे सतत चिंतन करीत असतो. 'विचाराने प्रत्यक्ष सुखदुःखाच्या तीव्रतेचे पूर्ण प्रतिबिंब आपल्यावर उठवून घेणे याचेच नाव तादात्म्य, तंद्री किंवा एकतानता' (३४३). हे सामर्थ्य प्राप्त होते तेव्हा कवीस जो आनंद होतो तो तत्त्वशोधकास होणाऱ्या आनंदासारखा असतो. कवीप्रमाणे वाचकाचे किंवा प्रेक्षकाचे काव्यविषयाशी तादात्म्य झाले म्हणजे त्यालाही या आनंदाचा लाभ होतो.

लेखाच्या शेवटी आगरकर कवीला 'कामरूपधारी पटाईत बहुरूप्या'ची उपमा देतात. तिची फोड करताना केलेल्या वर्णनात आगरकरांच्या अंगी असलेल्या असामान्य कवित्वशक्तीचे मनोहर दर्शन घडते.

**डोंगरीच्या तुरुंगात आमचे १०१ दिवस**

आगरकरांचे प्रसिद्ध झालेले हे पहिले पुस्तक आणि मराठीत कैद्यांच्या जीवनावर लिहिलेलेही हे पहिलेच पुस्तक. १७ जुलै १८८२ ते २६ ऑक्टोबर १८८२ या काळात डोंगरीच्या तुरुंगात शिक्षा भोगत असताना आगरकरांनी हे पुस्तक लिहिले. त्यावेळी स्वाभाविकच त्यांच्या मनावर अनेकविध दडपणे होती. शिवाय आधीच दम्याने ग्रासलेली त्यांची प्रकृती तुरुंगातील हालअपेष्टांनी अधिकच खंगली होती. परंतु या पुस्तकात कोठेही त्याचा मागमूसही दिसत नाही. कोठेही कटुता, कर्कशता किंवा तक्रारीचा सूर आढळत नाही. प्रतिकूल परिस्थितीत लिहिलेल्या लहान आकारातील ८० पृष्ठांच्या या चिमुकल्या पुस्तकात त्यांनी व्यक्त केलेल्या विचारांची विविधता, सखोलता, भरीवपणा, प्रांजल, प्रसंगी विनोदी आत्मनिवेदन —ही पाहून मन चकित होते.

आगरकरांनी या पुस्तकाची जाहिरात केसरीच्या २१–११–१८८२ च्या अंकातील 'पत्रकर्त्यांच्या स्फुट सूचनां'त पुढीलप्रमाणे दिली होती. 'वरच्या-सारख्या दिव्य स्थानात वसति करण्याचा अलभ्य लाभ सरळ व समंजस लोकांस सहसा प्राप्त होत नाही. त्यामुळे तेथील स्थितीविषयी ते अगदीच अनभ्यस्त असतात. हे बरोबर न वाटल्यावरून त्यांच्या प्रबोधनार्थ स्वानुभवाच्या आधाराने मी एक निबंधमालेएवढे पुस्तक लिहिले आहे. ते बहुधा पुढील आठवड्यात छापून तयार होईल. याकरिता ज्यांना ते घ्यावयाचे असेल त्यांनी आर्यभूषण छापखान्याचे म्यानेजर यांजकडे प्रत्येक प्रतीस चार आणे या दराने पैसे पाठविल्यास प्रती रवाना करण्यात येतील.— गोपाळ गणेश आगरकर, एम्. ए., केसरीकर्ते'.

ज्या प्रकरणामुळे आगरकर व टिळक यांना तुरुंगवास भोगावा लागला ते प्रकरण 'कोल्हापूर प्रकरण' म्हणून प्रसिद्ध आहे. लॉर्ड डलहौसीच्या तडाख्यातून जी संस्थाने वाचली त्यांपैकी बऱ्याच संस्थानांच्या अधिपतींसाठी इंग्रज सरकार-कडून दिवाण किंवा कारभारी नेमले जात असत. त्यांपैकी कित्येक दिवाण पाठीशी असलेल्या ब्रिटिश सत्तेच्या जोरावर संस्थानिकांवरच मालकी गाजवीत. कोल्हापूर संस्थानात जून १८७० मध्ये रा. ब. माधवराव बर्वे या गृस्थाची कार-भारी म्हणून नेमणूक झाली होती. त्यानंतर पाचच महिन्यांत कोल्हापूरचे

अधिपती राजाराम महाराज यांचा आकस्मिक अंत झाला. तेव्हा त्यांच्या अकरा वर्षे वयाच्या विधवा राणीने भोसले घराण्यातील नऊ वर्षे वयाच्या नारायणरावास दत्तक घेतले. हेच चौथे शिवाजी महाराज—या करुण नाट्याचे दुर्दैवी नायक ! हे अल्पवयी असल्यामुळे संस्थानचा सारा कारभार बर्व्यांच्या हातात आला. त्यांचा एकतंत्री कारभार छत्रपतींसह सर्वांनाच जाचक वाटत होता. १८७९ त राजांना वेड लागले किंवा ते वेडे ठरविले गेले. त्यामुळे त्यांच्या छळात आणखी भर पडली. याचे पडसाद अवघ्या महाराष्ट्रात उमटले. अनेक वृत्तपत्रांतून या छळा-संबंधी अंगावर शहारे आणणारी वर्णने येऊ लागली, आणि हा छळ कारभारी बर्वेच करीत आहेत अशी अनेकांची खात्री झाल्यामुळे बर्व्यांविरुद्ध कंठरवाने ओरड होऊ लागली.

अशावेळी **केसरी** व **मराठा** ही पत्रे स्वस्थ बसणे शक्य नव्हते. अन्यायाचा प्रतिकार आणि लोकजागृती हा तर या पत्रांचा बाणाच होता. अर्थात् त्यांनीही या प्रकरणात उडी घेतली. हे पाहून कोल्हापुरातील अनेक जबाबदार व्यक्तींनी, व काही संस्थानिकांनीही, या संपादकद्वयाकडे अनेक हकीकती पाठविण्यास सुरवात केली, एवढेच नव्हे तर 'आम्ही तुम्हांला अगदी राजवाड्यातून पुरावा आणून देऊ, वेळ आल्यास साक्ष देण्यासही येऊ' अशी आश्वासनेही दिली. त्यातल्या त्यात बर्व्यांनी आपल्या खास विश्वासातील रामभाऊ ऐनापूरकर यांस लिहिलेली किंवा लिहवून घेतलेली तीन पत्रे या मंडळींच्या हाती आली. या पत्रांवरून बर्वे शिवाजी महाराजांना पदच्युत करण्याचा किंवा प्रसंगी त्यांचा घातही करण्याच्या कटात सहभागी होते असे सिद्ध होत होते. कायदेपंडित असलेल्या टिळकांनी प्रथम उपलब्ध माहितीची आपल्या परीने शहानिशा केली व तिच्या अस्सलपणाविषयी खात्री पटल्यावरच त्यांनी **मराठ्या**तून आणि आगर-करांनी **केसरी**तून बर्व्यांविरुद्ध तोफ डागण्यास सुरवात केली. हा मारा किती प्रखर होता हे **केसरी**तील काही उताऱ्यांवरून दिसून येईल. ता. ११-८-१८८१ च्या **केसरी**त पुढील मजकूर आढळतो : 'कोल्हापूर छत्रपती महाराजांची अशी स्थिती आहे की ती ऐकून पाषाणहृदयाच्या काळजाला देखील घरे पडतील. महाराजांचे प्राण जाऊन शव हाती आल्यावर आमचे लॉर्डसाहेब जागृत होणार काय ?' ता. २९-११-१८८१ च्या अंकातील अग्रलेखात **केसरी** म्हणतो : 'कोल्हापुराएवढे संस्थान आणि त्यात इतके दिवस एवढे खूळ माजून राहते, आणि चाबकाचा मार काय, छड्या काय, रंगमहालातील लज्जास्पद आणि अधमाधमतेचा प्रकार काय— हे चालावे आणि इंग्रजबहाद्दरास त्याची खबरही नसावी किंवा त्याकडे एकसारखा काणाडोळा करण्यात यावा ही आमच्या सरकारच्या राजनीतीस व व्यवस्थेस

अतिशय काळिमा आणणारी गोष्ट आहे.' ६-१२-१८८१ चा **केसरी** म्हणतो : 'कोल्हापूरच्या संबंधात जे कागदपत्र आमच्या पाहण्यात आले आहेत त्यांवरून रा. ब. बर्वे यांच्या राक्षसी अंत:करणाविषयी आमची बालंबाल खात्री झाली आहे. आज रोजी त्यांची काळी कृत्ये उजेडात आणता येत नाहीत यास आमचा नाइलाज आहे. पण ती इतकी घोर आहेत की ती ऐकून सहृदय पुरुषाच्या अंत:-करणास घरे पडतील व आकाशपाताळ एक होऊन जाईल.'

आगरकर-टिळकांच्या या भडिमारामुळे होणारी बेअब्रू साफ करून घेण्याची आवश्यकता बर्व्यांना वाटू लागली, व त्यांनी **केसरी** व **मराठा** यांच्या-विरुद्ध २४-१-८२ रोजी अब्रूनुकसानीची फिर्याद दाखल केली. हा खटला सहा महिने चालू होता.

या काळात महाराजांच्या दुर्दशेला पारावार राहिला नव्हता. त्यांचा होत असलेला राक्षसी छळ असह्य होऊन खटला चालू असतानादेखील २०-६-८२ च्या केसरीत आगरकरांनी लिहिले : 'प्रख्यात शिवाजीच्या वंशजाची दुर्दशा पाहवेनाशी झाल्यामुळे आम्ही लेखणीचे दोन चरचरीत हात मारले व शब्दांचे दोन पोकळ बार काढले त्याबद्दल सरकारचा आम्हांवर घुस्सा होतो ! तस्मात् आमचे नशीब. सरकारने काही म्हटले तरी ज्या देशाचे अन्न आम्ही खातो आहो त्याच्या बऱ्यासाठी होईल तितके आम्हास झटले पाहिजे.'

प्रत्यक्ष खटल्यात असे सिद्ध झाले की ज्या पुराव्यावर आगरकर-टिळकांची मुख्य भिस्त होती ती बर्व्यांनी लिहिलेली म्हणून पुढे आणली गेलेली पत्रेच मुळात बनावट होती. शिवाय साक्ष देण्याचे अभिवचन दिलेल्या मित्रांनी व संस्थानिकांनी ऐनवेळी माघार घेतली. त्यामुळे आगरकर-टिळक तोंडघशी पडले. कोर्टाने त्यांना अविचाराने लेख लिहिल्याबद्दल दोषी ठरवून त्यांना चार महिन्यांच्या साध्या कैदेची शिक्षा सुनावली. १७ जुलै १८८२ रोजी संपादक-द्वयाची रवानगी तुरुंगात झाली.

जनतेला आणि अनेक वृत्तपत्रांना कोर्टाने दिलेला हा निकाल अन्याय्य वाटला. आगरकर-टिळकांना झालेल्या शिक्षेमुळे लोक अतिशय हळहळले, व त्यांची आगरकर-टिळकांवरील भक्ती शतगुणित झाली. त्यांच्या सुटकेनंतर जनतेच्या आनंदास पारावार राहिला नाही. अतिशय आनंदाने व अमाप उत्साहाने ठिकठिकाणी या संपादकद्वयाचे अभूतपूर्व स्वागत केले गेले, आणि त्यांना मानपत्रे देऊन त्यांचा गौरव करण्यात आला.

ही झाली **डोंगरीच्या तुरुंगात आमचे १०१ दिवस** या पुस्तकाची पार्श्व-भूमी. आता खुद्द पुस्तकाकडे वळू.

पुस्तकाच्या नावातील 'आमचे' ह्या शब्दाने आगरकरांचा टिळकांवरील प्रगाढ स्नेहभाव सूचित होतो. त्यावरून टिळकांबरोबर तुरुंगात आपले दिवस कसे गेले हे सांगण्याचा पुस्तकाचा हेतू असेल असे वाचकाला वाटणे स्वाभाविक आहे. दोन महापुरुषांची व्यक्तिमत्त्वे आता आपल्यापुढे उलगडत जातील या अपेक्षेने आपण पुस्तक हाती घेतो; कारण थोर पुरुषांच्या खाजगी जीवनाबद्दल सर्वसामान्य माणसाला कुतूहल असतेच. पण लवकरच आपल्या लक्षात येते की देशभक्तांना खाजगी जीवन जवळजवळ नसतेच. म्हणून हे पुस्तक आत्मवृत्तपर असूनही असीम देशनिष्ठेमुळे आगरकरांची लेखणी वारंवार समाजाभिमुख होते.

समान ध्येयाने पछाडलेल्या या दोन उत्साही, त्यागी आणि धडाडीच्या मित्रांना तुरुंगवासाच्या निमित्ताने जो निवांत वेळ मिळाला त्याचा उपयोग त्यांनी वैयक्तिक, कौटुंबिक बाबींच्या विचारांत न घालविता देशोन्नतीच्या अनेकविध उपायांची चर्चा करण्यात, आतापर्यंत हाती घेतलेल्या उपक्रमांचे विश्लेषण करून त्यांतील गुणदोष न्याहाळण्यात, व पुढील कार्याचे बेत आखण्यात केला. चर्चा करण्याची अशीच संधी त्यांना डेक्कन कॉलेजात विद्यार्थी असताना लाभली होती. तेव्हा आणि आता दोन्ही वेळी चर्चेत दोघांमधील मतभेद क्वचित उफाळून येत, परस्परांवर शाब्दिक हल्लेही होत. पण देशोन्नतीच्या ध्यासाच्या समान सूत्राचे भावबंध त्यांच्यातील अकृत्रिम स्नेहास तडा पोचू देत नसत.

आपल्याला झालेल्या शिक्षेची कारणमीमांसा आगरकरांनी तटस्थपणे केली असून त्यातून त्यांची न्यायनिष्ठुर वृत्ती दिसते. जनतेस ही शिक्षा चुकीची व अन्यायाची वाटत होती. पण आगरकर म्हणतात की, 'न्यायाधीश आणि पंच आपले फैसल पुराव्याच्या आधाराने करतात. लोकांचे फैसल त्यांच्या मनोविकाराप्रमाणे चालतात.' पुढे सॉक्रेटिसाचे उदाहरण देऊन ते 'सत्यमेव जयते' या सिद्धांताचा अर्थ उलगडून दाखवितात. ते म्हणतात : '"सत्यमेव जयते" हा पूर्वापार चालत आलेला जो सिद्धांत आहे त्याची पूर्तता होण्यास बराच काळ लागतो. कारण सत्यात म्हणजे काही नैसर्गिक सामर्थ्य आहे, असे नाही; असे असते तर त्याला तत्काळ यश येते. कधी ना कधी तरी त्याचा पगडा बसतो याचे कारण इतकेच आहे की सत्यावलंबन हे बहुतेकांचे फायदेशीर आहे. या बहुतेकांचे ज्यावेळेस प्राबल्य होते, त्यावेळेस सत्याचा विजय होतो; उलट पक्ष प्रबल असतो तोपर्यंत सत्य दडपून राहते' (३०).

तुरुंगातील वातावरण, तेथील अधिकारी, विविध प्रकारचे कैदी, त्यांना होणाऱ्या शिक्षा, तेथे मिळणारे अन्न इत्यादींसंबंधी आगरकरांनी केलेली वर्णने इतकी प्रत्ययकारी आहेत की त्यातून तुरुंगाचे समग्र चित्र आपल्या डोळ्यांपुढे साकार होते.

तुरुंगातील दिनचर्या आगरकरांनी थोडक्यात पण नेटकेपणाने सांगितली आहे. ती पाहिली की असह्य जीवनक्रमही सवयीने माणसाच्या किती अंगवळणी पडतो हे लक्षात येते. थंडीत पुरेसे पांघरूण नसल्यामुळे, आणि असह्य दर्प असलेल्या ओकारी आणणाऱ्या अन्नामुळे पहिल्या रात्रीचे सर्व तास आगरकरांना उजाडेपर्यंत मोजून काढावे लागले. परंतु अशाही प्रतिकूल परिस्थितीत जेव्हा त्यांना लिहिण्या-वाचण्याची परवानगी मिळाली तेव्हा आगरकर त्यात पूर्ण दंग झाले, एवढेच नव्हे तर त्यांनी शेक्सपीअरच्या 'हॅम्लेट' नाटकाचे भाषांतर करण्याचे अतिशय कठीण कामही पुरे केले, आणि प्रस्तुत पुस्तकही लिहिले.

तुरुंगातील नाना तऱ्हेचे कैदी, त्यांची विविध दुःखे व त्यांचे होणारे हाल पाहून आगरकरांना पराकाष्ठेचे दुःख होई, व कधी कधी रडेही कोसळे. पण तेच आगरकर लिहितात की 'मधून मधून डांबीस कैद्यांना फटके देताना ते पाहण्या-साठी सर्वांना एकत्र बोलावीत, त्यावेळेस ते फटके पाहूनही थोडीबहुत सखेद कर्म-णूक होई' (७), तेव्हा माणसाला तुरुंगवासातील तोच तो दिनक्रम किती कंटाळ-वाणा होतो हे जसे जाणवते, तसेच मानवी मनाची गुंतागुंत व अनाकलनीयताही लक्षात येते.

स्त्रीकैद्यांसंबंधी ते लिहितात : 'तुरुंगात बायको आली म्हणजे तिचे केस कापतात व कांकणे पिचवितात; तरी तुरुंगाचे कडक कायदे अपराधी बायकांची डोकी केवळ संन्याशाचे असोले गोटेच होऊ देत नाहीत; निरपराध बायकांस तसली विद्रूपता आणणे आमच्या सदय महर्षींच्या धर्माकडे सोपविले आहे' (८). या शेवटच्या वाक्यांतील जळजळीत उपरोध चटकन नजरेत भरतो. स्त्रियांवर हिंदुधर्माने केलेल्या भयंकर अन्यायाबद्दल संधी सापडेल तिथे प्रहार केल्याखेरीज आगरकरांना कधीही राहावत नाही.

या पुस्तकात आत्मनिवेदनपर वर्णने आहेत, पण तुरळकच. आगरकरांची दृष्टी कैद्यांच्या जीवनावरच अधिक खिळते. तुरुंग का निर्माण होतात ? गुन्हेगार गुन्हे का करतात ? त्यांना तुरुंगात कसे वागविले जाते ? व कसे वागविले पाहिजे ? क्रूर शिक्षेचे दुष्परिणाम किती घातक ठरू शकतात ? इत्यादि अनेक

प्रश्नांवर आगरकरांनी मांडलेले विचार कैद्यांकडे पाहण्याची मानवी, न्यायी, उदार व सामाजिक दृष्टी देणारे आहेत. 'तुरुंगात जो गेला तो पक्का डांबीस असला पाहिजे' हा आपला समज किती चुकीचा आहे हे ते परोपरीने वाचकांच्या मनावर बिंबवितात. कैद्याचा व आपला काही ऋणानुबंध आहे, एवढेच नव्हे तर त्याच्या गुन्हेगारी वृत्तीस आपणही पर्यायाने जबाबदार आहोत ही कल्पनाही आपल्या मनाला स्पर्श करीत नाही. कैद्याच्या दोषांस तोच सर्वस्वी जबाबदार आहे, त्यासाठी त्याला जास्तीत जास्त कठोर शासन करणे, त्याचा राग व तिरस्कार करणे, इत्यादि गोष्टी आपल्याला स्वाभाविक वाटतात. पण आगरकर म्हणतात : 'कोणत्याही देशातील एकंदर तुरुंगांची आणि त्यांतील लोकांची संख्या कमी होत जाणे हे त्या देशाच्या वाढत्या सुधारणेचे चिन्ह होय. . . . मनुष्यतेला कलंक आणणारे अपराध ज्या देशात घडून येत असतात, त्या देशातील सुधारणा कितीही प्रबल असली तरी तीत काही हशील नाही. . . . कोणत्याही देशातील दुराचारी लोक त्या देशाच्या सार्वजनिक विपत्तीला आणि दुर्लौकिकाला कारण होतात' (१२, १३).

मनुष्य गुन्हे का करतो आणि त्याच्याकडे आपण कसे पाहिले पाहिजे इत्यादींसंबंधी आगरकरांनी मांडलेले विचार अतिशय उद्‌बोधक आहेत. ते म्हणतात की दारिद्र्य, अज्ञान, आळस, इत्यादि कारणांनी मनुष्य चोरीकडे वळतो. म्हणून त्याच्यातील ह्या उणीवा दूर करण्याचा समाजाने प्रयत्न केला पाहिजे. त्यांना नुसते तुरुंगात डांबल्याने आणि कडक शिक्षा केल्याने हा प्रश्न सुटणार नाही. उलट अधिकाऱ्यांच्या कडक व निर्दय वागणुकीमुळे ते अधिक बेरड व प्रसंगी सूडबेऊ बनतील. आगरकरांच्या मते इतर कोणत्याही शिक्षेपेक्षा कैद्यांना उपाशी ठेवण्याची शिक्षा सर्वांत कमी हानिकारक, पण सर्वांत प्रभावी ठरेल. ते लिहितात : 'थोडेबहुत अन्न आम्हांस पुरून उरे; ते मिळावे म्हणून इतर कैदी परस्परांशी हमरीतुमरीवर येऊन एकमेकांशी शिवीगाळ किंवा मारामारी करण्याच्या बेतात असत; भाजीची डेखे, कांद्यावरची जाड टरफले, व असले मोरीतून उचलून गट्ट करताना आम्ही कित्येक कैद्यांस पाहिले आहे !!' असल्या दुष्काळ बुभुक्षितांना एक वेळ भाकर न देणे म्हणजे पंचवीस फटके मारल्यासारखे होईल, व कुल्ल्यांवर वेताच्या छड्या फोडून त्यावर मिठाचे पाणी ओतल्याने होणाऱ्या वेदना पहाण्याचे निष्ठुरत्व टाळता येईल' (२२). ते पुन्हा तुरुंगात येऊ नयेत यासाठी तुरुंगाधिकाऱ्याचा सर्व भर मुख्यत: त्यांची अपराधवृत्ती विविध उपायांनी नष्ट करण्यावर व ते ज्याने स्वावलंबी होतील असे शिक्षण देण्यावर

असावे. तसेच नीत्युपदेशाच्या योगे त्यांचे मन सुविद्य व सुसंस्कृत करणेही आवश्यक आहे.

तुरुंगातील शिस्तीत सुधारणा कशी करावी हे समजून सांगण्यासाठी आगरकर हर्बर्ट स्पेन्सरच्या *Prison Ethics* (**कारागृह नीती**) या पुस्तकाची शिफारस करतात. त्या पुस्तकात लेखकाने माणसांतील चांगुलपणावर विश्वास असलेले ओबरमारसारखे सुज्ञ व मायाळू अधिकारी अत्यंत राक्षसी वृत्तीच्या कैद्यांनाही माणसांत कसे आणू शकतात हे दाखविले आहे. म्यूनिखच्या तुरुंगातील अतिशय आडदांड, क्रूर, उच्छृंखल प्रकृतीच्या सात आठशे कैद्यांना एम्. ओबरमार या तुरुंगाधिकाऱ्याने साखळदंड, ब्लडहौंड कुत्रे, व बंदुकधारी शिपाई यांना फाटा देऊन माणुसकीच्या वागणुकीने माणसाळले. त्याचप्रमाणे स्पेनमध्येही एका ठिकाणी असाच प्रयोग चालू असल्याचे मि. हास्किन्स यांच्या *Spain as It Is* (**स्पेनची प्रस्तुत स्थिती**) या पुस्तकाच्या आधारे आगरकरांनी सांगितले आहे.

एवढ्याशा पुस्तकात आगरकरांनी प्रसंगानुरोधाने सरकार आणि प्रजा यांतील संबंध, न्यायपद्धती इत्यादि अनेक विषयांवर अतिशय उद्बोधक व विचारप्रवर्तक भाष्ये केली आहेत. उदा. 'सरकार जुलमी आणि प्रजा मुग्ध असल्याने थोड्या वेळात उभयता लयास जातात' (३३); 'सरकार म्हणजे अधिकारीसमुच्चय यापेक्षा दुसरे काही नाही. व्यक्तिविशेष अधिकाऱ्याला ज्याप्रमाणे अहंकार, लोभ, सौजन्य, मैत्री, आपलेपणा, परकेपणा वगैरे बऱ्यावाईट मनोवृत्ती असतात, त्याप्रमाणे अधिकारी समुच्चयरूप जे सरकार त्यालाही असतात' (३१–३२).

शेवटी ज्यांनी ज्यांनी या खटल्यात मदत केली त्या सर्वांबद्दल आगरकर कृतज्ञता व्यक्त करतात, आणि पुढील इच्छा व्यक्त करून पुस्तक संपवितात. 'आम्ही आरंभिलेल्या उद्योगात जर काही प्रशंसनीय भाग असला तर त्याचा चोहोकडे विस्तार होऊन या महाराष्ट्रभूमीच्या उदरी —

स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि ।
आराधनाय लोकांना मुंचतो नास्ति मे व्यथा ।।

असे मानणारे पुत्र निपजोत !'

**विकारविलसित अथवा शेक्सपीअरकृत हॅम्लेट नाटकाचे भाषांतर**

**विकारविलसित** हे आगरकरांचे दुसरे प्रकाशित पुस्तक. कोल्हापूर प्रकरणात खटल्यापायी फार मोठा खर्च झाला होता. त्यात आपले काही साह्य झाल्यास पाहावे असे आगरकरांना वाटले. त्यासाठी नाटक लिहिणे हा त्यांना सुलभतर

उपाय वाटला; कारण त्याचे प्रयोग करून तावडतोब पैसा उभा करता येतो. या नाटकाचे प्रयोग करून त्यांचे उत्पन्न केसरी फंडास द्यावे या हेतूने आगरकरांनी १८८२ च्या एप्रिल महिन्यात 'हॅम्लेट' नाटकाचे भाषांतर करण्यास प्रारंभ केला आणि डोंगरीच्या तुरुंगात असताना ऑगस्ट महिन्यात, म्हणजे केवळ चार महिन्यांत, ते पूर्ण केले.

या सुमारास महाराष्ट्रात शेक्स्पीअरच्या नाटकांची मराठी भाषांतरे करण्याची एक लाटच आली होती. उदा. 'किंग लीअर'चे 'अतिपीडचरित' हे भाषांतर शंकर मोरो रानडे यांनी १८८१ साली प्रसिद्ध केले, तर विष्णु मोरेश्वर महाजनी यांनी 'सिंबेलाइन'चे 'तारा' नाटक हे भाषांतर प्रसिद्ध केले. त्यापूर्वी 'ऑथेल्लो', 'टेंपेस्ट', 'ज्यूलियस सीझर', 'कमिडी ऑफ् एरर्स', 'मर्चंट ऑफ् व्हेनिस' यांची भाषांतरे प्रसिद्ध झाली होती. विशेषत: 'हॅम्लेट'ची तर १८८२ याच वर्षी पुढील आणखी दोन भाषांतरे प्रसिद्ध झाली.

(१) गोविंद वासुदेव कानिटकर यांचे 'वीरसेन किंवा विचित्रपुरीचा राजपुत्र'.

(२) आनंद सखाराम बर्वे यांचे 'हिंमतबहाद्दर (दानवखंडाचा राजपुत्र)'.

'हॅम्लेट'च्या या तिन्ही भाषांतरांत आगरकरांचे 'विकारविलसित' श्रेष्ठ ठरले. या नाटकाच्या चार आवृत्त्या निघाल्या. त्याचे अनेक यशस्वी प्रयोग झाले. विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांतही हे पुस्तक नेमले गेले. या भाषांतरावर प्रतिकूल टीकेची झोडही उठली, पण तिच्यामुळे रसिकांचे मन त्याकडे अधिकच आकृष्ट झाले.

महाराष्ट्रात 'हॅम्लेट'ला अजरामर करण्याचा मान आगरकरांकडे जातो, तसाच तो चंद्रसेनाची भूमिका आपल्या बहारदार अभिनयाने अप्रतिमरीत्या वठविणाऱ्या नटसम्राट गणपतराव जोशी यांच्याकडेही जातो. इंग्लंडमधील ख्यातनाम नट गॅरिक यांच्या असामान्य अभिनयनैपुण्यामुळे जसे शेक्स्पीअरचे बुद्धिवैचित्र्य लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आले, तसेच शाहूनगरवासी मंडळीतील गणपतराव जोशी यांच्या अभिनयाच्या अलौकिक करामतीमुळे आगरकर, मराठी रंगभूमी, आणि मराठी भाषा यांचा नावलौकिक झाला.

**विकारविलसित** हे भाषांतर असल्यामुळे आगरकरांच्या स्वतंत्र प्रतिभेस त्यात वाव नव्हता. पण या नाटकाला आगरकरांनी एक स्वतंत्र प्रस्तावना जोडलेली आहे. तिचा विचार थोडा सविस्तर करणे योग्य होईल.

या नाटकाच्या चोवीस पानी प्रस्तावनेत आगरकरांनी किती विषय हाताळावेत ! तिच्यात नाटकाचे भाषांतर कसे करावे, त्याच्या मर्यादा कोणत्या, नाटक या वाङ्मयप्रकाराचे वैशिष्टय काय, इत्यादींसंबंधी विचार येणे स्वाभाविक होते. पण त्याचबरोबर देशोन्नती व तिच्यासाठी आवश्यक त्या सुधारणा यावर आगरकरांचा कटाक्ष असल्यामुळे व्याकरणापासून ते बालविवाह–केशवपन यासारख्या दुष्ट रूढींपर्यंत अनेक विषयही त्यांनी येथे चर्चिले आहेत.

चिपळूणकरांनी **निबंधमालेत** 'तारा' नाटकावर अभिप्राय लिहिताना भाषांतरासंबंधी मांडलेले पुढील विचार प्रत्येक भाषांतरकाराने लक्षात ठेवावेत असे आगरकर म्हणतात :

(१) भाषांतरकाराने जर देशकालमानानुसार मूळ नाटकात सढळ हाताने फेरफार केले तर ते पुस्तक सामान्य वाचकांस सहजपणे आकलनीय होईल; पण त्यामुळे नाटककाराच्या अलौकिक कवित्वगुणांचे ज्ञान मात्र त्याला होणार नाही.

(२) परस्परविरोधी असे इंग्रजी–मराठी विचार, रूढी इत्यादि एकत्र केल्यास ते पुस्तक 'गंगाजम्नी', 'गोळकी' स्वरूपाचे होईल.

आगरकरांच्या मते शेक्स्पीअरसारख्या नाटककाराच्या नाटकांचे भाषांतर शक्य तो मुळाला धरून करावे. कारण तरच शेक्स्पीअरच्या बुद्धिवैचित्र्य, कल्पनाशक्ती, वर्णनचातुर्य, अनेकप्रकृतिज्ञान या अलौकिक गुणांचा वाचकांना प्रत्यय येईल. अर्थात् मुळाबरहुकूम भाषांतर करताना इंग्रजी शब्दांस मराठी शब्द शोधून काढण्याचे कष्ट घ्यावे लागतात. तसेच अश्रुतपूर्व परकीय वर्णने वाचकांस दुर्बोध होण्याचे दूषण पत्करावे लागते. पण तरीही आपल्या रंगभूमीवर पाश्चिमात्य रीतिरिवाज दाखविणे आगरकरांना आवश्यक वाटते. ते म्हणतात की आम्ही जर आपल्याच चालीरीतींना चिकटून राहिलो व त्यांचाच पाठपुरावा करीत बसलो, तर इतर राष्ट्रांच्या चालीरीती आम्हांस कशा कळणार व नवीन दृष्टी कशी येणार ? आम्ही जगातील इतरांच्या रीतिरिवाजाविषयी अनभिज्ञ राहू व आमचे ज्ञान संकुचित व मर्यादित राहील. शेक्स्पीअर जर असा आपल्याच चालीरीतींत गुरफटून राहिला असता तर त्याला जगन्मान्यता मिळण्याची सुतराम् शक्यता नव्हती. त्याच्या विश्वव्यापी प्रचंड कल्पनाशक्तीला तर साऱ्या युरोपखंडातील रीतिरिवाज अपुरे पडले म्हणून त्याने कल्पनेने नवसृष्टी निर्माण केली. त्यामुळेच तो अखिल विश्वास पालाण घालूनही दशांगुळे उरला. आपण हे लक्षात घेतले पाहिजे की देशोन्नतीच्या अनेक साधनांपैकी एक प्रमुख साधन म्हणजे धर्म, राज्य, व्यवहार यासंबंधीचे आपले विचार इतर देशांतील विचारांशी ताडून

पाहणे हे आहे. कारण त्यायोगे आपल्या विचारांतील त्रुटी, आपले दुराग्रह, आपली एकदेशीय संकुचित दृष्टी ही आपल्या लक्षात येतात आणि मग त्या दूर करण्याची आवश्यकता आपल्याला भासू लागते. विशेषत: व्यवहारासंबंधी आपले जे दुराग्रह आहेत ते फार हानिकारक असल्याने ते दूर करण्याची निकड फार आहे. त्यासाठी एक सोपा उपाय म्हणजे शेक्स्पीअरसारख्यांच्या नानाविध नाट्यकृतींचे प्रयोग लोकांना वारंवार करून दाखविणे आणि त्यांचा परिचय करून देणे. त्यायोगे भिन्न आचारविचारांच्या सतत अवलोकनाने आपल्या विचारातील एकदेशीयता जाऊन सर्वांस सुखकर असा आचार स्थापणे शक्य होईल. सुधारणेची आगरकरांना लागलेली तळमळ किती तीव्र होती ते यावरून दिसून येईल.

सुधारणेचे महत्त्व पटण्यासाठी प्रथम आपल्या आचारविचारांतील दोष लक्षात यावे लागतात. म्हणून आगरकरांनी ते दोष परखडपणे दाखविले आहेत. ते म्हणतात : 'आजपर्यंत आमचे जे नुकसान झाले आहे ते हरएक प्रकरणात हट्टाने 'आपलेपणा 'स चिकटून राहिल्याने झाले आहे. . . . आमच्या राष्ट्राची उन्नती व्हावी म्हणून आम्ही रात्रंदिवस धडपडतो आहोत; पण उन्नती होण्याची जी खरी साधने आहेत त्यांचा कंटाळा केल्याने आमचा इष्ट हेतू कधीतरी पूर्ण होईल काय ?. . . शिवाय ज्यांना आम्ही आपले रीतिरिवाज म्हणून म्हणतो ते कोणते समजायचे ? आठ–दहा वर्षांच्या पोरांना लग्नशृंखला घालणे, तरुण गतभर्तृका ऋतुमती झाल्याबरोबर त्यांना विकेशा करून चतुर्थाश्रम देणे,. . . पीतांबर नेसून जेवायास बसणे. . .'(४७, ४८) हे आणि अशाप्रकारचे रीतिरिवाज अतिशय घातक असूनही ते आपले म्हणून रक्षणीय आणि इतर देशांतील आचारविचार प्रगतिपर असूनही परकीय म्हणून त्याज्य असे मानणे शुद्ध दुराग्रहाचे आहे. वास्तविक कालानुसार स्थित्यंतर आणि त्यानुसार आचार–विचारांतर झाले तरच समाजाची उन्नती होऊ शकते. आगरकर म्हणतात, 'विचाराने क्षुद्र बुद्धि निरस्त होऊन मन विस्तृत झाले आणि " वसुधैव कुटुंबकम् " अशी वृत्ती त्यात उत्पन्न झाली म्हणजे जो आनंद होतो तो काही अनिर्वाच्य असतो. असे नसते तर कालिदास–भवभूत्यादि महाकवींचा लौकिक सगळ्या जगभर पसरता काय ?. . . असले कवी विवक्षित देशाकडे किंवा देशाचाराकडे लक्ष न देता मनुष्यजातीच्या ज्या अगाध मनोवृत्ती आहेत त्यांत वस्ताद पाणबुड्याप्रमाणे बुडी मारून तळी काय आहे ते पाहण्यासाठी झटत असतात. म्हणून कोणत्याही महाकवीच्या कृतीचे भाषांतर करताना होईल तेवढ्या श्रमाने तीत ढवळाढवळ न करण्याचा प्रयत्न करावा ' (४८–४९).

यानंतर आगरकर कादंबरी–नाटकाच्या भाषांतरांतील भाषा पात्रानुरूप शुद्धाशुद्ध असावी की सर्वत्र शुद्धच असावी या प्रश्नाचा ऊहापोह करतात. येथे मतभेदास भरपूर वाव आहे. नाटक हे संसाराचे हुबेहूब चित्र आहे, त्याअर्थी त्यात पात्रांच्या योग्यतेनुरूप त्यांची भाषा असावी असे पुष्कळांचे म्हणणे आहे. आगरकरांच्या मते आपल्या लिखाणाचा हेतू आनंद देणे हा असतो. बोलीभाषेने तो एकदेशीय करणे योग्य नाही. चांगले विचार वाईट भाषेत व्यक्त करता येत नाहीत. त्यामुळे व्याकरण आणि भाषाशुद्धी यांच्या सुधारणेत अडथळा येतो. स्त्रिया आणि शूद्र आज जरी शुद्ध बोलत नसले तरी त्यांना सुशिक्षण देऊन शुद्ध बोलण्यास लावण्याची आपणास इच्छा असते. कालांतराने सर्वांची लिहिण्याची व बोलण्याची भाषा एक व्हावी असेही आपणास वाटते. हे लवकर तडीस जावे यासाठी सर्व छापील पुस्तकांत व्याकरणशुद्ध अणी एकाच प्रकारची भाषा लिहिण्याचा प्रघात पाडला पाहिजे. पात्रानुरूप भाषा घातल्यास काहींना ती अनाकलनीय अतएव एकदेशीय होईल, आणि पात्रानुकूल भाषा न घातल्यास रसभंग होण्याची भीती आहे, असा हा पेच आहे. यावर आगरकर म्हणतात की रंगभूमीवर हलक्या पात्रांनी पुस्तकातील शुद्ध भाषाच बोलली पाहिजे असे नाही. मात्र तिच्यात कर्णकटुत्व न येण्याइतकेच फेरफार केले पाहिजेत. तसेच यथार्थ चित्रणाच्या नावाखाली वेडीवाकडी भाषा घालणे फार चुकीचे व अप्रशस्त ठरते.

भाषेचा विचार केल्यावर आगरकर नाटक वाचणे व त्याचा प्रयोग पाहणे यांतील भेदाकडे वळतात. ते म्हणतात की प्रयोग चांगला वठत असला तर तो पाहताना नाटक वाचण्यापेक्षा अधिक समाधान होते हे खरे आहे. पण त्यामुळे एकप्रकारे मोठे नुकसानही होते. नाटक वाचताना ते वाचकाच्या अधीन असल्यामुळे विचार करण्यास व पात्रांतील परस्परसंबंध समजून घेण्यास भरपूर अवसर मिळतो, आणि बहारीच्या प्रसंगी तर थबकून मागेही जाता येते आणि त्याचा पुन्हा आस्वाद घेता येतो, व याप्रकारे आनंद द्विगुणित करता येतो. प्रयोग पाहताना हे काहीच शक्य नसते. तेथे पात्रामागून पात्रे आणि प्रसंगामागून प्रसंग येत असल्यामुळे मनावर नीट संस्कार उमटण्यास अवधीच नसतो, व त्यामुळे कोणत्याच रसाचा पूर्ण अनुभव येत नाही. तसेच कधी कधी कवीची खाशी तंद्री लागून त्याचा वेग इतका अनावर होतो की त्याचा प्रयोग वठविणे नटास अशक्य होते. ' " किंग लीअर " सारख्या नाटकात " लीअर " होणाऱ्या मनुष्याचा गळा पहिल्या दुसऱ्या अंकातच फुटून गेल्यावर तो पुढे काय रडणार ? व शेवटच्या तीन अंकांत कवीने जी कमाल करून सोडली आहे तिचे अनुकरण कसे करणार ?' (५९) अशी नाटके प्रयोगयोग्य नसतात, व त्यांचा प्रयोग केला तर विरस होतो.

असल्या नाटकाचे प्रयोग मानसिक रंगभूमीवरच व्हावयाचे. नाटक प्रयोगशरण आहे असे म्हणणाऱ्या लोकांनी वरील विवेचन विचारात घेण्यासारखे आहे.

नाटक या वाङ्मयप्रकारासंबंधी आगरकरांचे विचार पाहिल्यानंतर आपण आता शेक्सपीअर आणि त्याचे प्रस्तुत नाटक यासंबंधीच्या विवेचनाकडे वळू. आरंभीच ते शेक्सपीअरला अमानुष किंवा दैवी मानणाऱ्या त्याच्या भक्तगणांचा थोडा समाचार घेतात. ते म्हणतात की शेक्सपीअर मोठाच कवी खरा ! कदाचित् त्याच्या तोडीचा दुसरा नाटककार नसेलही. पण एवढ्यावरून त्याची कृती निर्दोष आहे आणि तो ईश्वरांश आहे असे आमच्याने म्हणवत नाही. त्याच्याही कृतीत पुष्कळ प्रमादस्थळे आढळतात. शिवाय अशी माणसे एकाएकी आकाशातून पडत नाहीत, तर त्यासाठी देशस्थिती अनुकूल असावी लागते, असे सांगून आगरकर म्हणतात की मोठी माणसे निर्माण होण्यास आवश्यक अशी उत्पत्ति-तत्त्वे शेक्सपीअरकालीन भूमीत होती. मध्ययुगीन काळात सारे युरोपखंड अज्ञान, धर्मभोळेपणा, विषयसुखाविषयी उदासीनता, इत्यादींमुळे एक प्रकारच्या झोपेत घोरत पडले होते. इहलोकनिवास क्षणभंगुर व येथील सुख म्हणजे आभास, खरे सुख व शांती परलोकात, कुटुंब म्हणजे मायापाश, पदार्थशास्त्र म्हणजे जादूगिरीचा खेळ, इत्यादी अनेक भ्रामक कल्पनांमुळे युरोपातील लोक मृतवत् झाले होते. पण पंधराव्या शतकात सुरू झालेल्या ग्रीक विद्येच्या पुनरुज्जीवनामुळे आणि ल्यूथरने केलेल्या धर्मक्रांतीमुळे ऐहिक जीवनाविषयीच्या भ्रामक कल्पना बऱ्याच प्रमाणात दूर झाल्या, पोपचे प्रस्थ गेले, संसारसुख इष्ट ठरले. मानवाचे शरीर व मन उपेक्षणीय नाही; सृष्टी मानवाच्या सुखासाठी आहे, म्हणून तिचा अव्हेर करणे अयोग्य आहे; क्रोध, अहंकार, ममता, विषयवासना इत्यादि मनोविकार विचाराधीन असले म्हणजे त्यापासून कल्याणच होते; शत्रुद्वेष व आप्तप्रेम आदींमुळे इहलोकी सुख प्राप्त होते; सद्विचार व नीती यामुळे इहलोकीच पर-लोकीच्या सुखाचा अनुभव होऊ लागतो— इत्यादि विचारांचा प्रसार होऊ लागला. त्यामुळे सर्वत्र देशाभिमान, उद्योग व विद्या अल्पावधीत उत्कर्षास पावली.

इंग्लंडात हे विशेषत्वाने घडले; आणि त्याने उच्चांक गाठला एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीत. आपल्या असामान्य कर्तृत्वाने साऱ्या युरोपावर दरारा बसविणाऱ्या ह्या राणीच्या कालखंडात शेक्सपीअरचा जन्म झाला. त्यावेळी स्पेनच्या 'अजिंक्य' आरमाराचा फडशा पाडल्यामुळे इंग्रज लोकांस मोठे स्फुरण चढले होते. मोठमोठी जहाजे घेऊन खलाशांना पृथ्वीप्रदक्षिणा करण्याची संधी व उत्तेजन दिले जात होते. व्यापारवृद्धीसाठी ईस्ट इंडिया कंपनी काढली गेली

होती. या आणि अशाच अनेक उपक्रमामुळे इंग्लंडात सर्वत्र उत्साहाचे आणि उमेदीचे वारे खेळत होते. विविध क्षेत्रांत चैतन्य निर्माण होऊन सर्वांगीण उन्नतीस जणू भरते आले होते. अशा चंचलतेच्या काळात किती नाट्यमय घटना घडल्या असतील आणि घडत असतील, व त्यातून कलावंताच्या प्रतिभेस केवढे खाद्य मिळत असेल याची सहज कल्पना करता येईल.

अशा सर्वस्वी अनुकूल परिस्थितीत शेक्स्पीअरचा जन्म झाला असल्यामुळे तो जरी महाकवी होता तरी तो केवळ स्वर्गातून मृत्युलोकावर उतरला व त्याने जे केले ते अमानुष होते असे मानावयाचे कारण नाही असे आगरकर म्हणतात. तसेच शेक्स्पीअरबरोबर नाट्यकलेची परमावधी होऊन गेली असे समजून तिच्या उन्नतीकडे दुर्लक्षही करता कामा नये. शेक्स्पीअरपेक्षाही श्रेष्ठ कवी निर्माण होऊ शकेल. म्हणून शेक्स्पीअरचा गुणगौरव तर करावाच पण दोषदर्शनही करावे. कारण त्यामुळे ते दोष पुढच्या कवींना टाळता येतील.

त्यानंतर आगरकर 'हॅम्लेट' नाटकाकडे वळतात. हॅम्लेटचे वय काय होते ? बापाचा खून काकाने केला असल्याची खात्री झाल्यावरही तो त्याचा खून का करीत नाही ? तो खरोखरच वेडा झाला होता की वेडाचे सोंग वठवीत होता ? इत्यादी समीक्षकांनी विचारलेल्या प्रश्नांचा ते विचार करतात, आणि तसे करताना ते प्रथम पाश्चात्य टीकाकारांची मते सांगून नंतर आपले मत सप्रमाण नोंदवितात.

शेक्स्पीअरचे विशेष गुण सांगताना आगरकर म्हणतात : 'त्याने जी प्रकृती हाती धरली तिच्या अंतःकरणातील अत्यंत गूढ विचार सगळेच्या सगळे बाहेर यायाचे; एकदेखील चुकूनमाकून राहायाचा नाही, असे विलक्षण अंतःकरणग्राहित्व त्याच्या अंगी होते तसेच 'सहस्रात्म' हे नाव त्यालाच योग्य आहे, कारण त्याच्या एवढे अनेकप्रकृतिज्ञान दुसऱ्या कोणत्याही कवीत आजपर्यंत दिसून आलेले नाही. . . . शेक्स्पीअरला या गुणात अजिंक्यपत्र देण्यास काही हरकत नाही, (६०–६१).

'हॅम्लेट' नाटक लिहिले तेव्हा शेक्स्पीअरची बुद्धी परिपक्व झाली असावी असे स्पष्ट दिसते असे आगरकर म्हणतात. या नाटकात कवीचे लक्ष त्याच्या बाह्यरूपाकडे विशेष नाही. त्याचे संविधानक निर्दोष नाही, व त्यातील सर्वच भाषणे नाट्यवस्तूस आवश्यक आहेत असेही म्हणवत नाही. उदा. शालेयाचा तीव्रजवास उपदेश, चंद्रसेनाची मद्यप्राशनावर आणि नाट्यप्रयोगावरील लांबलचक व्याख्याने, इत्यादि. कवी एकदा लिहू लागला की त्याची कल्पना अनावर होऊन तो चऱ्हाट वळत राहतो.

आगरकरांच्या मते चंद्रसेनाचा स्वभावपरिपोष शेक्सपीअरला अप्रतिम साधला आहे. त्याच्या अंगच्या अनेक असामान्य गुणांनी ते मोहित होतात, आणि त्याच्यावर होणाऱ्या कठोर आघातांनी ते व्याकूळ होतात. अतिशय उमदा, विद्वान्, सरळ, माणुसकीवर दृढ विश्वास असलेला, जगात कोणी कपटी, धूर्त, स्वार्थी, कृतघ्न, विषयलंपट, भेकड व्यक्ती असू शकतील याची कल्पनाही नसलेला, सृष्टीतील व मनुष्यातील सौंदर्याने मोहून जाणारा असा हा चंद्रसेन. मल्लिकेने त्याच्याविषयी काढलेल्या पुढील उद्‌गारांतून त्याचे व्यक्तिमत्त्व यथार्थपणे व्यक्त होते असे त्यांना वाटते : ' दृष्टी राजपुत्राची, वाणी पंडिताची, छाती शिपायाची — या सुंदर राष्ट्राचा केवळ जीव आणि सगळी शोभा — व्यवहार आणि आचार यांत अनुकरण करण्यासाठी ज्याने त्याने आपल्यापुढे ठेवलेला कित्ता, व सर्वांचे चित्त आकर्षणारा लोहचुंबक —'.

चंद्रसेनाबद्दल समीक्षकांत मुख्य विवाद होतो तो चुलत्याने बापाचा खून केल्याचा निर्णायक पुरावा हाती आल्यावर मग तो त्याचा सूड का घेत नाही यासंबंधी. या प्रकरणातील काही मते उद्धृत करून आगरकर आपले मत मांडतात. ते म्हणतात : ' मला असे वाटते की चंद्रसेन यास सुशिक्षण मिळाले असल्यामुळे व ज्या त्या कृत्यापासून चांगले परिणाम कोणते होतील व वाईट कोणते होतील, याचा विचार करण्याची त्याला पराकाष्ठेची स्वाभाविक हौस असल्यामुळे, कोणतेही काम अगदी निकरावर येऊन ठेपल्याशिवाय त्याच्याने उरकत नसे हेच त्याच्या वर्तनाचे मुख्य बीज होय. . . . ज्याला ज्या पापाचा अतिशय तिटकारा त्याच्या हातून ते सहसा घडत नाही, हे सर्वांस ठाऊक आहे. त्यामुळे राजा प्रार्थना करीत असता त्याचा खून केल्याचा दोष चंद्रसेनाच्या डोक्यावर न लादता, जेव्हा तीव्रजव आणि राजा या दोघांनी कपटाने त्याचाच जीव घेण्याचा बेत केला, तेव्हा त्यांचे कपट त्यांच्यावर उलटून पाडून ऐन आणिबाणीच्या प्रसंगी नायकाच्या हातून त्यांचा शेवट करविला, यात कवीचे अद्‌भुत संविधानघटनाचातुर्य दिसते, एवढेच नाही तर, निरनिराळ्या मनुष्यस्वभावांचे त्याला किती सूक्ष्म आणि यथार्थ ज्ञान होते हेही दिसून येते' (६३–६४).

नाटकातील इतर पात्रे चंद्रसेनाच्या व्यक्तिमत्त्वाला उठाव देणारी आहेत. मुळात नसलेली तीव्रजव आणि मल्लिका ही पात्रे तर त्याला कोंदण म्हणूनच शेक्सपीअरने निर्माण केली आहेत असे आगरकर म्हणतात. ही सारीच पात्रे चंद्रसेनाच्या मानाने फारच दुबळी आहेत. आईच्या वर्तनाने चंद्रसेनाला भयंकर धक्का बसला असून सबंध स्त्रीजातीसंबंधी त्याचे मत कलुषित झाले आहे. त्यामुळे

चंद्रसेन सर्वच बाजूंनी पूर्ण एकाकी पडतो. प्रियालाने त्याच्यावर खरे प्रेम होते आणि ती दुबळाही नव्हता, परंतु त्याच्या सल्लामसलतीला स्वामिसेवकसंबंधाच्या मर्यादा पडत. उरली मल्लिका. तिने त्याला साथ दिली असती तर त्याची इतकी दुर्दशा झाली नसती असे आगरकरांना वाटते. ते म्हणतात : ‘ चंद्रसेनाचा कृत्रिम भ्रम, त्याचे सौजन्य, त्याची उदारता आणि त्याचा निष्कपटपणा, यापुढे माल्लिकेचे गुण कसे दिपून जातात व अवगुण किती निंद्य दिसतात हे वाचकांच्या लक्षात सहज येणार आहे. अक्कलशून्य, प्रतिष्ठेखोर व वाचाल शालेयाच्या सांगण्या-प्रमाणे हेरपणा ना पत्करिता ती चंद्रसेनास दृढ आश्वासन देती, व त्यावरील आपले प्रेम ढळू न देती तर “ स्त्रीजात तेवढी बेहराम ” असे निर्वाणीचे शब्द त्याच्या तोंडून येते ना, व आईच्या दुर्वर्तनामुळे भडकलेला त्याचा संतापाग्नी त्याच्या मनाचा आणि शरीराचा इतका दाह करता ना !’ (६६) आगरकरांचे चंद्रसेनाविषयीचे विवेचन मार्मिक व पटण्यासारखे आहे, पण त्यांचे मल्लिके-बद्दलचे मत मात्र विस्मयकारक वाटते.

पहिली गोष्ट म्हणजे आगरकरांनी चंद्रसेनाला लावलेली सौजन्य, उदारता आणि निष्कपटता ही विशेषणे मल्लिकेलाही पूर्णपणे लागू पडतात. आईविना वाढलेली ती एक अजाण, निरागस पोर ! अंतर्बाह्य सुंदर व निर्मळ असलेली एक मुग्ध कलिकाच ! चंद्रसेनासारख्या उमद्या व उदात्त राजपुत्राचे प्रेम तिच्या-वर जडते आणि त्याची मजल लग्नाच्या आणाभाकांपर्यंत जाते. पण तिचे वडील आणि भाऊ तिला विरोध करतात. वडील तर त्याने दिलेल्या भेटवस्तू त्याला परत करण्याची व त्याला कधीही न भेटण्याची सक्त ताकीद देतात. चंद्रसेनाचा तिला विश्वास असला तरी आपला भाऊ व वडील यांच्यावरही तिचा विश्वास असणे स्वाभाविकच होते. त्यामुळे ती पेचात पडते. तशात चंद्रसेन तिच्याशी बोलताना वेडाचे सोंग कायम ठेवतो. त्यामुळे ती भांबावून जाते. तिने भेटवस्तू परत केल्यावर तो तिला दूर लोटतो. त्याच्या जोडीस तिच्या वडिलांचा खून होतो. त्याने तर ती पुरती वेडी होते. पण त्या वेडातही तिचे चंद्रसेनावरील प्रेम कायम होते. त्या वेडात ती जी गाणी म्हणते त्यातून एकीकडे वडिलांच्या मृत्यूचे अपार दुःख जसे व्यक्त होते तसेच प्रियकराने झिडकारल्यामुळे होणारी दारुण निराशा आणि त्याच्याकडे धाव घेणारे प्रेमविव्हल मनही व्यक्त होते. अशा शोचनीय अवस्थेतच तिचा करुण अंत होतो. एरव्ही अशा अतिप्रेमळ, हळव्या, निरपराध व मुग्ध किशोरीच्या करुण अंताने आगरकरांना हलवून सोडले असते. त्यामुळे आगरकरांचे तिच्याविषयीचे उद्‌गार अनाकलनीय वाटतात.

शेवटी या भाषांतराच्या गुणदोषांविषयी चार शब्द लिहावयाचे. टीकाकारांनी त्यावर टीकेची झोड उठविलेली होती. विशेषत: हरी नारायण आपटे आणि शि. सी. वागळे यांची टीका प्रसिद्ध आहे. परंतु टीकाकारांकडे वळण्यापूर्वी प्रथम आगरकरांनी स्वत:च या भाषांतराविषयी जे निवेदन केले आहे ते लक्षात घेणे जरूर आहे. कारण ते जर टीकाकारांनी लक्षात घेतले असते तर त्यांच्या टीकेची धार इतकी तीक्ष्ण राहिली नसती.

पुस्तक लिहीत असताना लेखकास आवश्यक अशा गोष्टी म्हणजे मन:स्वास्थ्य, शरीरस्वास्थ्य, वेळ, शांतता आणि पुरेशी सामग्री. यांपैकी एकही गोष्ट आगरकरांना अनुकूल नव्हती. पुस्तक लिहावयास घेतल्यानंतर प्रथम त्यांच्यामागे खटल्याचा ससेमिरा होता, आणि नंतर तुरुंगवासातील हालअपेष्टा आणि गैरसोयी. त्यात भाषांतर करावयास घेतलेले पुस्तक म्हणजे एका महाकवीची श्रेष्ठ कलाकृती. त्यासाठी किती प्रचंड सामग्री जमवावी लागते, किती संदर्भ ग्रंथ, समीक्षाग्रंथ, इतरांनी केलेली भाषांतरे अभ्यासावी लागतात याची कल्पना प्रा. गो. वि. करंदीकरांनी १९७४ साली केलेल्या शेक्सपीअरच्या 'किंग लीअर' या नाटकाच्या भाषांतराची प्रस्तावना आणि त्याची परिशिष्टे पाहिल्यास येऊ शकेल. भाषांतर तुरुंगात केले असल्यामुळे भाषांतरास आवश्यक असे फारच अल्प साहित्य त्यांना तेथे मिळाले. **विकारविलसित** अशा परिस्थितीत जन्मले हे लक्षात घेतले तर त्याचे यश आश्चर्यकारक आहे असेच म्हटले पाहिजे. नाटकाच्या प्रस्तावनेत आगरकरांनी केलेली समीक्षा आणि नाटकाला रंगभूमीवर मिळालेले घवघवीत यश ही दोन्ही अतिशय लक्षणीय आहेत. **विकारविलसिता**नंतर तब्बल ७६ वर्षांनी प्रसिद्ध झालेल्या श्री. नाना जोग यांच्या **तीन अंकी हॅम्लेट**शी त्याची तुलना केल्यास आगरकरांच्या सामर्थ्याची चांगलीच कल्पना येऊ शकेल.

टीकाकारांनी घेतलेल्या आक्षेपांपैकी एक प्रमुख आक्षेप म्हणजे ज्या गंगाजम्नी भाषांतरांविरुद्ध आगरकरांनी प्रस्तावनेत इशारा दिला आहे तो दोष या भाषांतरात भरपूर आहे. पण हा दोष आगरकरांनी स्वत:च दाखविला असल्याने त्याचा इतका गाजावाजा करण्याचे कारण काय ते समजत नाही. 'पुस्तककर्त्याच्या मनाला जी शांतता असावी लागते ती गेल्या वर्षाच्या पहिल्या नऊ महिन्यांत माझ्या मनाला न मिळाल्यामुळे हे पुस्तक जितके वठेल असे मला वाटत होते तितके वठले नाही हे मीच कबूल करतो. . . . भाषांतर करण्यास हवा तितका वेळ मिळाला नाही; इतकेच नाही तर, परक्या भाषेतील

नाटकांची भाषांतरे कोणत्या रीतीने करावी याविषयी माझी जी मते आहेत,... ती माझी मला हवी तशी अमलात आणता आली नाहीत ' (४४), असे आगरकरांनी स्वतःच लिहिले आहे. तसेच ते पुढे म्हणतात, ' प्रस्तुत भाषांतर अगदी वरील नियमांबरहुकूम उतरले आहे असे नाही. . . . हे पुस्तक करण्याचा मुख्य हेतू पूर्वी सांगितल्याप्रमाणे त्याचा प्रयोग करण्याचा असल्यामुळे नावे फिरवूनच भाषांतर करण्यास प्रारंभ केला. '

याप्रमाणे आपले भाषांतर सदोष आहे आणि ते दोष कोणते ते माहीत असूनही आगरकरांनी केवळ नाइलाजाने ते प्रसिद्धीस दिले. त्यामुळे त्यातील वरील दोषांविरुद्ध गहजब करणे योग्य वाटत नाही. सुदैवाने मराठी रसिकांनी या टीकाकारांकडे पूर्ण दुर्लक्ष केले आणि आगरकरांच्या भाषांतराचे सदैव स्वागतच केले आहे.

आपटे आणि वागळे यांनी आपल्या टीकालेखांतून आगरकरांच्या भाषांतरातील अनेक दोष दाखविले आहेत. ते सर्व, किंवा निदान त्यांपैकी बहुतेक खुद्द आगरकरांनीही मान्य केले असते; नव्हे, त्यांनी आपट्यांच्या टीके-बद्दल त्यांचे कौतुकच केले. परंतु त्याशिवाय त्या दोन्ही लेखांत आगरकरां-विषयी अतिशय अनुदार आणि प्रसंगी क्रूरही उद्गार काढले आहेत. उदा. आपटे म्हणतात, 'आमच्या विद्वान भाषांतरकारास कवीचे हृद्गत बिलकूल कळले नाही असे म्हणण्यास काय हरकत आहे ? जर हृद्गत कळले नाही तर निव्वळ भाषांतर तरी करावयाचे होते. पण फुकटची आढ्यता मारून लोकांच्या डोळ्यात धूळ घालावयास कशी सापडेल ? . . . विकारविलसितकारांनी आपले काम कोणत्याही तऱ्हेने चांगले केले नाही. . . . खरोखरच त्यांच्या ठिकाणी महाकवीचे नाटक भाषांतर करण्यास आवश्यक ती नैसर्गिक प्रवृत्ती नाही व म्हणून त्यांनी पुन्हा असल्या फंदात पडू नये '.

वागळे यांनी तर याहूनही कठोर आणि निर्दय भाषा वापरली आहे. या भाषांतराविषयी त्यांनी ' लज्जेची गोष्ट ', ' औद्धत्य ', ' अनर्थोत्पादक ', ' जाणून-बुजून फसवणूक ', ' अप्रशस्त ', ' अप्रयोजक ' इत्यादि विशेषणे वापरली आहेत. याच्याही पुढे जाऊन ते म्हणतात : ' शेक्सपीअरदेशीय आचारविचारांमध्ये एत-द्देशीय आचारविचारांची जागोजाग भेसळ करून मूळ जगद्विख्यात कृतीला आगर-करांनी छिन्नभिन्न करून टाकले . . .ते पाहून बिचाऱ्या शेक्सपीअरचा आत्मा प्रकोपाने लाल झाला असावा, व त्या कविशिरोमणीला समंधरूपाने पुनः या भूतलावर संचार करणे जर शक्य असते तर तो येऊन, आपल्या प्रिय अपत्याच्या खुनाचा

सूड घेण्यास आपल्या पुत्रास न सांगता स्वतःच वायुवेगाने जाऊन 'केसरी'-कारांची गचांडी धरता, यात संशय नाही.... शिव ! शिव ! असले हे भाषांतरच न होते तर बरे होते.... विद्यार्थ्यांना या भाषांतरापासून काडीएवढाही फायदा न होता, उलट ते भाषांतर निमूटपणे ग्रहण करतील तर त्यांचा फारच मोठा तोटा होणार आहे.'

आगरकरांसारख्या सरळ, सात्त्विक वृत्तीच्या व्यक्तीवर केलेले वरील टीकाप्रहार आणि हेत्वारोप वाचून वाचकांना खेद होईल याविषयी शंका नाही. हा हल्ला आगरकरांवर झाला तेव्हा ते आपल्या सामाजिक आणि वाङ्मयीन कारकीर्दीचा आरंभ करीत होते. त्यांचे थोरपण अजून प्रस्थापित व्हायचे होते, आणि म्हणून या टीकाकारांच्या लेखणीतून वरील अन्याय्य आणि अनुदार शब्द बाहेर पडले असे आपण समजू या. पुढे मागे आपण लिहिलेल्या या लेखांबद्दल त्यांना खेद झाला असावा अशी आशा करण्यास हरकत नाही असे वाटते.

आपले भाषांतर अनेक दोषांनी युक्त झाले आहे अशी कबुली देताना आगरकरांनी टीकाकारांना एक अप्रत्यक्ष आव्हान दिले होते. ते म्हणाले होते, 'ज्यांना यासंबंधाने या पुस्तकाचे निःपक्षपाती गुणदोषविवेचन करायचे असेल त्यांनी "जावे त्याच्या वंशा तेव्हा कळे" ही गोष्ट लक्षात ठेवून शेक्सपीअरच्या या किंवा दुसऱ्या एखाद्या नाटकातील कठीणशा पाना दोन पानांचे भाषांतर करून पाहावे व ते करताना किती अडचणी येतात याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन मग माझ्या पुस्तकास जो दोष देणे असेल तो द्यावा, इतकेच माझे सांगणे आहे' (४५). हे आव्हान गेल्या शंभर वर्षांत किती टीकाकारांनी स्वीकारले हे पाहिल्यास आपल्या पदरी निराशाच येते.

**वाक्यमीमांसा आणि वाक्यांचे पृथक्करण**

**वाक्यमीमांसा आणि वाक्यांचे पृथक्करण** (१८८८) हे आगरकरांचे तिसरे प्रकाशित पुस्तक. त्याचा विषय आहे वाक्यार्थविचार आणि वाक्यपृथक्करण. हा विषय त्याकाळी मराठी व्याकरणाला बहुशः अपरिचित. त्याचा विचार मराठीत त्यापूर्वी जवळपास मुळीच झाला नव्हता असे म्हटले तरी चालेल. आगरकरांच्या पूर्वीचे व्याकरणकार म्हणजे दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळूणकर आणि कृष्णशास्त्री गोडबोले. या तिघांपैकी फक्त गोडबोल्यांच्या **मराठी भाषेचे नवीन व्याकरण** (१८६७) या पुस्तकात उभयान्वयी अव्यये आणि संयुक्त वाक्ये यांच्या विवेचनाच्या संदर्भात या विषयाचा थोडा उल्लेख आला होता. परंतु तो अतिशय त्रोटक असल्यामुळे त्याकडे स्वतंत्र विषय म्हणून कोणाचे लक्ष गेलेले दिसत नाही. आता हे खरे आहे की रेव्हरंड गणपतराव नवलकर यांनी *The Analysis*

*and Synthesis of Marathi Sentences* (१८६८) या आपल्या ग्रंथात या विषयाचे बिस्तृत विवेचन केले असल्याचे प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर लिहितात.[६] पण या पुस्तकाकडे मराठी अभ्यासकांचे लक्ष गेले नसावे असे दिसते. निदान आगरकरांना हे पुस्तक माहीतही नसावे. कारण या विषयांत पूर्वी झालेल्या कामाचा निर्देश करताना ते फक्त दादोबा, चिपळूणकर आणि गोडबोले यांचाच उल्लेख करतात, आणि 'मराठी व्याकरणाच्या विवक्षित शाखेविषयी असा विस्तृत विचार प्रथमच होत असल्यामुळे' असे स्वतःच्या प्रयत्नाचे वर्णन करतात. त्यामुळे हा विषय मराठीत प्रविष्ट करण्याचे श्रेय आगरकरांकडेच जाते असे म्हणणे वावगे होणार नाही.

आगरकरांनी ऋण मान्य केले आहे इंग्रजी व्याकरणकारांचे, आणि विशेषतः बेन याचे. बेनने इंग्रजी वाक्यांच्या पृथक्करणाची जी व्यवस्था बसविली तिच्या धर्तीवर, त्याने वापरलेल्या तत्त्वांच्या आधाराने, त्यांनी मराठी वाक्य-पृथक्करणाचे विवेचन केले आहे. हे काम सोपे नव्हते. एक नवीन व्यवस्था मराठी भाषेला लावण्याच्या प्रयत्नात अनेक अडचणी होत्या. इंग्रजी व मराठी या भाषांमध्ये अनेक महत्त्वाचे भेद असल्यामुळे इंग्रजीतील तंत्र मराठीला जसेच्या तसे लावणे अशक्य होते. परंतु आगरकरांनी या सबंध विषयाची उभारणी मुळापासून अतिशय सावधपणे व कौशल्याने केली आहे, आणि त्यामुळे त्यांचे विवेचन उत्तरकालीन वैयाकरणांना मोठ्या प्रमाणात मान्य झाले. उदा. **शास्त्रीय मराठी व्याकरण** या ग्रंथाचे कर्ते मोरो केशव दामले यांनी आगरकरांच्या कार्याची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. ते म्हणतात, 'त्यांनी (आगरकरांनी) या पुस्तकात या विषयाचा शास्त्रीय रीत्या फारच उत्तम ऊहापोह केला आहे यात संशय नाही. तेव्हा हा विषय मराठी भाषेच्या परिचयाचा करून देण्याचे बहुतेक सर्व श्रेय त्यांसच दिले पाहिजे हे उघड आहे....परंतु मराठी भाषेची वाक्यरचना काही विलक्षण पडल्यामुळे हा अलंकार मराठी भाषेस चढविताना विशेष कुशलतेची जरूर होती आणि या कामी आगरकरांनी आपल्याकडून होईल तितकी दक्षता ठेवून आपले काम बरेच समाधानकारक रीतीने पार पाडले आहे असे म्हणण्यास हरकत दिसत नाही.'[७]

---

६. कृ. श्री. अर्जुनवाडकर, 'मराठी व्याकरणाची वाटचाल', **भारतीय इतिहास आणि संस्कृती**, पृ. २०१, २०४.

७. **शास्त्रीय मराठी व्याकरण**, संपादक : कृ. श्री. अर्जुनवाडकर (पुणे, १९७०), पृ. ७०६.

वाक्यमीमांसेची व्याख्या आगरकर थोडक्यात 'वाक्याच्या अर्थाचे व्याकरण' अशी करतात. व्याकरण भाषेचा शाब्दिक अंगाने विचार करते, तर वाक्यमीमांसा आर्थिक म्हणजे अर्थाच्या अंगाने. शब्दांच्या विविध जाती, आणि शब्दांच्या जुळणीने होणारी रचना (किंवा विन्यास) यांचा विचार प्रामुख्याने व्याकरणात येतो. वाक्यमीमांसा हा विषय व्याकरण व तर्कशास्त्र या दोन शास्त्रांच्या संयोगाने निर्माण झाला आहे. तर्कशास्त्रही एका अर्थाने भाषेचाच अभ्यास करते, पण ते भाषेचा अर्थानुरोधाने विचार करते. भाषेला अर्थ असतो. जिला अर्थ नाही अशी भाषा असूच शकत नाही. भाषा वाक्यांची बनलेली असते. वाक्यांचा अर्थ काय असतो ? या प्रश्नाचे सामान्य स्थूल उत्तर द्यायचे झाल्यास विधान, प्रश्न किंवा आज्ञा असे देता येईल. म्हणजे वाक्य विधानार्थी असते, प्रश्नार्थी असते, किंवा आज्ञार्थी असते. यांपैकी मूलभूत वाक्यार्थ म्हणजे विधान; कारण प्रश्नाचे उत्तर विधानानेच द्यावे लागते, आणि तसेच आज्ञेला भाषेत उत्तर द्यायचे झाल्यास तेही विधानानेच द्यावे लागेल. म्हणून वाक्यार्थविचारात विधान-विचार प्रधान आहे. आता विधानाचे मुख्य घटक कोणते ? कोणत्याही विधानार्थी वाक्यात कशातरी संबंधाने काहीतरी सांगितलेले असते. ज्याच्याविषयी काही सांगितले असते त्याला उद्देश्य म्हणतात, व त्याच्याविषयी जे सांगितले असते त्याला विधेय म्हणतात. याप्रमाणे कोणत्याही वाक्याचे विभाजन उद्देश्य व विधेय या दोन घटकांत करता येते.

आता तर्कशास्त्राचे हे विभाजन व्याकरणामध्ये प्रविष्ट करून वाक्यपृथक्करण हा विषय निर्माण झाला आहे. वाक्यपृथक्करणात प्रथम वाक्याचे विभाजन उद्देश्य व विधेय या दोन घटकांमध्ये केले जाते, आणि नंतर त्या घटकांचे आणखी विभाजन करून उद्देश्य व उद्देश्यविस्तार, तसेच विधेय व विधेयविस्तार असे विघटन करून, वाक्यातील प्रत्येक शब्दाचे वाक्यातील कार्य किंवा वाक्याच्या अर्थाला उपदान काय आहे ते सांगितले जाते.

वाक्याचे उद्देश्य आणि विधेय हा भेद मराठी वाक्यांस लागू करण्याच्या मार्गात अनेक अडचणींना आगरकरांना तोंड द्यावे लागले. पहिली अडचण आली ती एकशब्दी वाक्यांची. उदा. 'उजाडले', 'सांजावले'. या वाक्यांत एकच शब्द असल्यामुळे त्याचे उद्देश्य कोणते व विधेय कोणते हा प्रश्न उपस्थित झाला. या वाक्यांना उद्देश्य-विधेय हा भेद लागू पडत नाही असे म्हणावे तर वाक्यमीमांसेच्या मूलभूत नियमास बाध येतो. या प्रश्नाची बरीच विस्तृत चर्चा आगरकरांनी केली आहे. ते म्हणतात की 'उजाडले' हे एक वाक्य आहे, तो केवळ एक शब्द

नव्हे हे तर निःसंशय. वाक्य आणि शब्द यात स्पष्ट भेद आहे. वाक्यात विधान केलेले असते आणि म्हणून ते खरे किंवा खोटे असते. शब्द कितीही अर्थपूर्ण असला तरी तो विधान व्यक्त करू शकत नाही, आणि तो खरा किंवा खोटा असू शकत नाही. 'उजाडले' हे एक संबंध वाक्य आहे. त्याने सत्य किंवा असत्य विधान केलेले असते हे उघड आहे. त्यामुळे या वाक्यात उद्देश्य आणि विधेय हा भेद करणे भाग आहे. अशी क्रियापदे अकर्तृक आहेत असे कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात, तर अन्य वैयाकरण त्यांना 'भावकर्तृक' क्रियापदे हे नाव देतात. त्यांच्या मते 'उजाडले' या शब्दातच 'उजाडणे' या भावाचा अंतर्भाव होतो, तेव्हा तो भाव निराळा कल्पून त्याची कर्तृपदी योजना करावी, आणि 'उजाडणे उजाडले' अशी त्या वाक्याची फोड करावी. या दोन मतांपैकी आगरकर भावकर्तृवादी मतास स्वीकार्य मानतात. ते म्हणतात की 'उजाडणे उजाडले' अशा वाक्यांतील द्विरुक्ती हास्यास्पद खरी, पण ती न केली तर वाक्य व शब्द यांतील भेद विसरल्यासारखे होईल. इंग्लिशमध्येही ही अडचण काही वाक्यां-संबंधाने कांहीशा वेगळ्या प्रकाराने उद्‌भवते. 'It dawned' किंवा 'It rains' या वाक्यांतील 'it' हे सर्वनाम कोणत्या नामाच्या जागी घातले आहे या प्रश्नाला उत्तर देणे कठीण आहे. परंतु कर्तृस्थानी कोणता तरी शब्द पाहिजे म्हणून 'it'ची योजना करण्याचा प्रघात त्या भाषेत पडला असला पाहिजे हे उघड आहे.

ही एक अडचण झाली. पण दुसरी अडचण हिच्याहून खूपच त्रासदायक आहे. ती म्हणजे वाक्यांचे उद्देश्य कसे ठरवायचेही. उद्देश्य म्हणजे वाक्यात ज्याविषयी विधान केले असते ती गोष्ट हे आपण पाहिलेच आहे. आता इंग्लिशमध्ये उद्देश्याला 'subject' म्हणतात. परंतु 'subject' हा शब्द द्व्यर्थी आहे. त्याचा एक अर्थ विधानाचे उद्देश्य हा जसा आहे तसा दुसरा अर्थ क्रिया-पदाचा 'कर्ता' किंवा ज्याला मोरो केशव दामले 'धातुरूपेश' हे नाव देतात तो. धातुरूपेश म्हणजे असा शब्द की ज्याच्या अनुसार क्रियापदाचे रूप ठरते. इंग्लिश-भाषेची रीत अशी आहे की जो शब्द उद्देश्य या अर्थाने subject असतो तोच शब्द धातुरूपेश या अर्थानेही subject असतो. उदा. 'Rama kills Ravana' किंवा 'Rama killed Ravana'. या वाक्यात 'Rama' हा शब्द धातुरूपेश आहे, म्हणजे क्रियापदे त्या शब्दाला अनुसरतात, आणि तसेच ही विधाने Rama विषयी आहेत हेही स्पष्ट आहे. परंतु मराठीची वाक्यरचना या बाबतीत बरीच वेगळी आहे. 'राम रावणाला मारतो' या वाक्यात 'राम' हा शब्द धातुरूपेश आहे आणि विधानाचे उद्देशही आहे; परंतु 'Rama killed

Ravana' या भूतकाळी वाक्याचे मराठी भाषांतर 'रामाने रावणाला मारले' किंवा 'रामाने रावण मारला' असे करावे लागते. यांपैकी दुसऱ्या वाक्यात धातुरूपेश 'रावण' हा शब्द आहे; पण म्हणून त्याचे उद्देश्यही 'रावण' आहे हे म्हणणे बरोबर होणार नाही. 'राम रावणाला मारतो' या वाक्याचे उद्देश्य जर 'राम' असेल, तर त्या वाक्याचा भूतकाळ झाल्याबरोबर त्याचे उद्देश्य वेगळेच होण्याचे कारण काय ? 'रामाने रावणाला मारले' ह्या वाक्यात तर क्रियापद 'राम' किंवा 'रावण' यांपैकी कशालाच अनुसरत नाही, ते नपुंसकलिंगी एकवचनी आहे. वेगळ्या शब्दात सांगायचे तर मराठीत सकर्मक क्रियापदांचा भूतकाळ, काही तुरळक अपवाद सोडले तर, कर्तरिप्रयोगात न होता कर्मणि किंवा भावे प्रयोगात होतो. 'रामाने रावण मारला' या वाक्यात 'रामाने' हा कर्ता तृतीयांत आहे आणि 'रावण' हे कर्म प्रथमात आहे, आणि त्याचे क्रियापद कर्मानुसारी आहे, म्हणून त्याचा प्रयोग कर्मणि आहे असे म्हटले जाते. 'रामाने रावणाला मारले' या वाक्यात क्रियापद कर्त्रनुगामी नाही आणि कर्मानुगामीही नाही. ते स्वतंत्रपणे नपुंसकलिंगी एकवचनी आहे, आणि म्हणून ते वाक्य भावे प्रयोगात आहे असे म्हणतात. परंतु यामुळे वाक्यांची उद्देश्ये कोणती हे ठरविण्याच्या कामी अडचण निर्माण होते. इंग्लिश व संस्कृत भाषांत उद्देश्य प्रथमेत असते, आणि तोच शब्द धातुरूपेशही असतो. त्यानुसार व्यवस्था करायची झाल्यास मराठीतील सकर्मक भूतकाळी वाक्यांचे उद्देश्य कर्म असते असे तरी म्हणावे लागेल, किंवा त्या वाक्यांना उद्देश्यच नसते असे म्हणावे लागेल. पण हे दोन्ही पर्याय स्वीकरणीय नाहीत हे उघड आहे.

या अडचणीतून मार्ग काढण्यासाठी आगरकरांनी 'वाक्याविषयी विशेष विचार' या प्रकरणात या सबंध विषयाचा सविस्तर आणि बारकाईने विचार केला आहे. ते म्हणतात : 'तेव्हा "वाक्यात ज्या वस्तूविषयी विधान केलेले असते ती प्रथमात असून विधेय तदनुषंगी असते" हा जो संस्कृत व इंग्रजी वाक्यमीमांसेचा आद्य नियम, तो सर्व मराठी वाक्यांस लागू करता येत नाही . . . वाक्यमीमांसेचा मुख्य नियम असा आहे की ज्या वस्तूविषयी विधान असेल ती 'उद्देश्य' होय. 'उद्देश्या'ची विभक्ती अमुकच असली पाहिजे असा आग्रह वाक्यमीमांसक धरू शकत नाही. इंग्रजी व संस्कृत वाक्यात 'उद्देश्य' नेहमी प्रथमा विभक्तीत असते हे ठीक आहे; पण एखाद्या भाषेत ती सोय नसली म्हणून भलताच शब्द प्रथमा विभक्तीत आहे एवढ्यासाठीच वाक्यातील विधेयक्रियापदाचे 'उद्देश्य' करावयाचा की काय? . . . तर असे काही उपयोगी नाही; वाक्याच्या अर्थावरून ज्या शब्दाविषयी विधान केले आहे असे स्पष्ट

निघत असेल, त्याची विभक्ती कोणतीही असली तरी त्याला 'उद्देश्य' केले पाहिजे. असे न केले...तर...वाक्यमीमांसा म्हणजे वाक्याच्या अर्थाचे व्याकरण ही जी वाक्यमीमांसेची व्याख्या तिला हरताळ लावावा लागेल' (२२७).

परंतु मराठीत उद्देश्य प्रथमेप्रमाणेच तृतीया विभक्तीतही असू शकते हे मान्य केले की चतुर्थीही तोच हक्क मागू लागते. 'माझ्याने काम करवते' किंवा 'मला काम करवते' या दोन वाक्यांत जितका तृतीयेचा तितकाच चतुर्थीचाही प्रयोग प्रशस्त आहे. तेव्हा 'माझ्याने' हा शब्द व्याकरणात 'कर्ता' मानला तर 'मला' का मानू नये ? आणि वाक्यमीमांसेत 'माझ्याने' उद्देश्य मानले तर 'मला'ही ते मानण्यास काय हरकत आहे ? असा प्रश्न उपस्थित होईल. यावर आगरकर म्हणतात : 'संस्कृतात व इंग्रजीत प्रथमेने जी कार्ये होतात ती मराठीत कधी कधी तृतीयेने व चतुर्थीने होतात, म्हणून मराठी व्याकरणकारांनी काही प्रयोगांत तृतीयांत व चतुर्थ्यंत शब्दांस कर्ते मानले आहेत. हे त्यांचे करणे स्थूलमानाने वाक्यार्थास धरून होते; व वाक्यपृथक्करणही ज्याअर्थी वाक्यार्थावरच अवलंबून आहे, त्याअर्थी त्यात विशेषसा गोंधळ होत नसल्यास व्याकरणकारांनी घातलेल्या सीमेचे उल्लंघन का करावे हे समजत नाही.... वाक्यपृथक्करण रूढ व्याकरणास धरून चालले पाहिजे व चालेल तितके बरे... या दृष्टीने विचार करता प्रथमा, तृतीया व चतुर्थी या विभक्तीशिवाय इतर विभक्ती उद्देश्यस्थानी फार वेळ येऊ द्याव्या लागतील असे वाटत नाही.... यासाठी पुढील वाक्यपृथक्करणात प्रस्तुत व्याकरणास धरून प्रथमा, तृतीया किंवा क्वचित् स्थळी चतुर्थी या विभक्तींहून इतर विभक्तींत असलेले शब्द बहुश: विधेयक्रियाविशेषणवाचकांसारखे मानले आहेत असे दिसून येईल' ( २३८-३९ ).

वाक्यपृथक्करणातील या प्राथमिक अडचणी याप्रमाणे दूर केल्यानंतर आगरकर पुढील विवेचनाकडे वळले. वाक्यांचे शुद्ध, मिश्र आणि संयुक्त हे प्रकार; शुद्ध वाक्यातील उद्देश्य व विधेय यांचा विस्तार करणारे शब्द; मिश्र वाक्यांचे नामवाक्य, विशेषणवाक्य व क्रियाविशेषणवाक्य हे उपप्रकार; आणि संयुक्त वाक्यांचे समानाधिकरण व व्यधिकरण हे उपप्रकार, इत्यादि भेद स्पष्ट केले आहेत. एवढेच नव्हे तर या सर्व वाक्यांची पृथक्करणे करावयाची हे विपुल उदाहरणांच्या साह्याने दाखविले आहे. शेवटीं अभ्यासाकरिता वाक्येही दिली आहेत.

आगरकरांचे पुस्तक प्रसिद्ध होऊन आज जवळ जवळ शंभर वर्षे लोटली आहेत. या काळात ज्ञानाच्या सर्वच शाखांत पाश्चात्य जगतात विलक्षण वाढ झाली आहे. जुन्या शास्त्रांत क्रांतिकारक बदल घडून आले आहेत, आणि काही पूर्णपणे नवीन शास्त्रेही निर्माण झाली आहेत. हा प्रकार भाषेच्या अभ्यासातही घडून आला असून त्यात प्रचंड उलथापालथ झाली आहे. भाषेचा शास्त्रीय अभ्यास करणारे भाषाविज्ञान ( Linguistics ) नावाचे एक बहुश: नवेच शास्त्र निर्माण झाले असून त्यात स्वनविचार ( Phonology ), रूपविचार ( Morphology ), विन्यासविचार ( Syntax ), आणि अर्थमीमांसा ( Semantics ) या शाखांतून कसून अभ्यास होत आहे. संशोधनाचे अनेक संप्रदाय निर्माण झाले असून त्यांच्या प्रवर्तकांमध्ये आणि अनुयायांमध्ये वरील विषयांच्या मर्यादा आणि त्यांचे परस्परसंबंध याविषयी पूर्ण एकवाक्यता नाहीं. भाषाविज्ञानात प्रचलित झालेल्या नवीन परिभाषेमध्ये जुना 'व्याकरण' ( grammar ) हा शब्द अजूनही वापरला जातो, परंतु त्याच्या नेमक्या उपयोगाविषयी मतभेद आहेत. काही भाषावैज्ञानिक तो शब्द इतक्या व्यापक अर्थाने वापरतात की त्यांच्या मतानुसार वरील सर्व शाखांचा अंतर्भाव व्याकरणात होतो. परंतु सामान्यपणे हा शब्द बऱ्याच संकुचित अर्थाने वापरण्यात येतो. या संकुचित अर्थी व्यकरण म्हणजे विन्यासविचार (syntax) ; त्यात स्वनविचार तर येत नाहीच, पण अर्थविचारही येत नाही.

पाश्चात्य जगतात होत असलेल्या ह्या उलथापालथीचे पडसाद मराठीतही उमटू लागले असून नवीन भाषावैज्ञानिक दृष्टिकोणातून लिहिलेली व्याकरणाची पुस्तके प्रकाशित होऊ लागली आहेत. या नवीन होणाऱ्या ग्रंथरचनेत इंग्रजी व्याकरणाच्या धर्तीवर मराठी व्याकरण लिहिण्याच्या आपल्या प्रवृत्तीविषयी टीकात्मक लिखाणही प्रसिद्ध होत आहे. अशा लिखाणात घेतल्या गेलेल्या आक्षेपांपैकी एक आक्षेप प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर यांनी घेतला आहे. अर्जुनवाडकरांचा वाक्यपृथक्करणाला मूलतःच विरोध असून हा विरोध त्यांनी अनेक लेखांतून मांडला आहे. या आक्षेपाचा थोडा विचार येथे करणे योग्य होईल असे वाटते.

'मराठी व्याकरणाची वाटचाल' या आपल्या लेखात प्रा. अर्जुनवाडकर लिहितात : 'उद्देश्यविधेयात्मक वाक्यपृथक्करण हा विषय मूळ तर्कशास्त्रातला, आणि जिचा नमुना आगरकरांसमोर होता त्या इंग्रजी भाषेतल्या वाक्यांची ठेवण वेगळी. यामुळे तो मराठी वाक्यांना बसता करण्यासाठी आगरकरांना पुष्कळच खटपट लटपट करावी लागली आहे. . . . इतका अट्टहास करून हा विषय व्या-

करणात घुसवून लाभ काय ?... आगरकरांचे आणि त्यांना या बाबतीत अनुसरणाऱ्या मराठी वैयाकरणांचे श्रम वाया गेले आहेत'.[८] याच लेखात ते पृ. २१२ वर वाक्यपृथक्करणाची गणना 'व्याकरणाशी संबंध नसलेले विषय' या सदरात करतात. 'मराठी व्याकरणाची बांधिलकी' या लेखातही त्यांनी वाक्यपृथक्करणावर हाच आक्षेप घेतला आहे. त्या लेखात ते म्हणतात: 'उद्देश्यविधेयात्मक वाक्यपृथक्करण हा विषय तर्कशास्त्राचा.... वस्तुस्थिती अशी आहे की वाक्याकडं पाहण्याची तर्कशास्त्राची दृष्टी वेगळी, व्याकरणाची वेगळी. तर्कशास्त्र वाक्याकडं पाहतं एक विधान म्हणून आणि यथार्थ ज्ञानाचं एक साधन म्हणून. व्याकरण त्याकडं पाहतं आख्यात आणि त्याच्याशी अन्वित पदं यांचा समुदाय म्हणून. अशा स्थितीत एका शास्त्रातली व्यवस्था बरी दिसते म्हणून दुसऱ्या शास्त्रात आणून कशी चालेल ?'[९]

अर्जुनवाडकरांच्या मताने वाक्यपृथक्करण हा विषय व्याकरणाचा भाग तर नाहीच, पण तो व्याकरणाशी सर्वथा असंबद्धही आहे. पण या मताच्या पुष्टयर्थ अर्जुनवाडकर काय कारणे देतात ? माझ्या समजुतीप्रमाणे वरील लेखांत त्यांनी एकमेव कारण दिलेले आहे, आणि ते म्हणजे वाक्यपृथक्करण हा विषय मूळचा तर्कशास्त्रातला, व्याकरणातला नव्हे, आणि त्याचा प्रवेश इंग्लिश व्याकरणात झालेला आपण पाहिला म्हणून आपणही तो मराठीत आणला. परंतु हे कारण पटण्यासारखे नाही. एखादा विषय मुळात एका शास्त्रातला असला म्हणून तो अन्य कुठल्याही शास्त्रात प्रविष्ट होऊ शकत नाही असे म्हणणे अनर्थकारी होईल. विशेषत: जिथे दोन शास्त्रांचा अभ्यासविषय एकच–भाषा हा–आहे अशा तर्कशास्त्र व व्याकरण या शास्त्रांमध्ये देवाणघेवाण होणे अपरिहार्य आहे, एवढेच नव्हे तर ते परस्परांना उपकारक होणेही अतिशय संभाव्य आहे. अनेक शास्त्रे दोन किंवा अधिक शास्त्रांच्या सीमाप्रदेशातील असतात. भाषेचा अभ्यास करणारी तर अनेक शास्त्रे आहेत : व्याकरण, तर्कशास्त्र, अर्थमीमांसा (semantics), तत्त्वज्ञान, काव्यशास्त्र, मानसशास्त्र, इ. एकाच विषयाशी संबद्ध असणारी दोन शास्त्रे त्या विषयाचा भिन्न अंगांनी, भिन्न दृष्टिकोणातून अभ्यास करणार, आणि त्यामुळे त्या अभ्यासांतून त्या विषयाची अनेकविध दर्शने घडणार हे उघड आहे.

वर भाषाविज्ञान हे एक नवेच शास्त्र निर्माण झाले असून त्याच्या स्वनविचार, रूपविचार, विन्यासविचार आणि अर्थविचार ह्या शाखा आहेत असे

८. किस्त्रा, पृ. २०४–५.
९. साहित्यचिंतन, १९८३, पृ. १०६.

म्हटले आहे. त्या प्रत्येक शाखेचा अभ्यास स्वतंत्रपणे इतर शास्त्रांची लुडबूड होऊ न देता झाला पाहिजे यावर त्या त्या शाखांच्या अभ्यासकांचा कटाक्ष असतो. विशेषत: विन्यास आणि अर्थमीमांसा ह्या शाखा अगदी वेगळ्या ठेवाव्यात, त्यांची गल्लत होऊ देता उपयोगाचे नाही असे ते मानतात. अनेक भाषावैज्ञानिक तर व्याकरण म्हणजे विन्यासविचार असेच मानतात आणि विन्यासाच्या अभ्यासात अर्थविचार कटाक्षाने दूर ठेवला पाहिजे असा आग्रह ते धरतात. उदा. प्रसिद्ध भाषावैज्ञानिक ब्लूमफील्ड आणि त्याचे अनुयायी यांची व्याकरणाविषयीची दृष्टी हीच होती. आणि अर्जुनवाडकरही त्याच संप्रदायाचे असावेत असे दिसते. वाक्यमीमांसा म्हणजे वाक्यांच्या अर्थाचा अभ्यास असल्यामुळे तो विषय अर्थमीमांसेचा विषय आहे, आणि व्याकरण व अर्थमीमांसा हे अगदी स्वतंत्रपणे अभ्यासाचे विषय आहेत असे ते मानीत असावेत. ते विषय भिन्न आहेत आणि त्यांचा अभ्यास शक्यतो स्वतंत्रपणे केला पाहिजे हे मान्य करावला हरकत नाही. पण त्या दोन अभ्यासांची मेलनभूमी (meeting-ground) कुठेतरी असली पाहिजे हे लक्षात ठेवणे जरूर आहे. व्याकरण भाषेचा अभ्यास केवळ विन्यासाच्या, रचनेच्या दृष्टीने करते, त्याचे अर्थाकडे लक्ष नसते, आणि नसावे, हे खरे असले तरी भाषेचे अंतिम उद्दिष्ट अर्थाभिव्यंजन हेच आहे, आणि अर्थाभिव्यंजन व्याकरणिक संरचनेशी असंबद्ध आहे असे म्हणता येईल काय? व्याकरणदृष्ट्या स्वीकार्य (acceptable) वाक्यात निदान एक क्रियापद आणि एक नाम किंवा नामार्थक शब्द असावा लागतो याचे तरी इंगित हेच आहे ना की ज्यात हे दोन घटक नाहीत अशा शब्दमालिकेने कसलाही पूर्ण विचार (विधान, प्रश्न, आज्ञा, इ.) व्यक्त होत नाही? शेवटी विन्यासशास्त्रीय विचार आणि अर्थमीमांसीय विचार यांचा सांधा जुळवावा लागेलच. अलीकडील काळातील एक प्रसिद्ध उदाहरण द्यायचे तर चॉम्स्की या सध्याच्या भाषावैज्ञानिकांपैकी एका अग्रगण्य भाषावैज्ञानिकाचे देता येईल. ब्लूमफील्डीय विचारसरणीत शिक्षण घेतलेला चॉम्स्की आरंभी बरीच वर्षे केवळ syntax वरच भर देत होता, एवढेच नव्हे तर त्याने त्यात आश्चर्यकारक यशही मिळविले होते. पण शेवटी त्यालाही अर्थाचा विचार केल्याशिवाय व्याकरणाची उभारणी करता येत नाही असे म्हणावेच लागले. त्याच्या Transformational Grammar च्या कल्पनेत अर्थविचार विन्यासविचाराइतकाच महत्त्वाचा आहे.

या पुस्तकात आगरकरांच्या प्रतिभेचा आणखी एक पैलू दिसून येतो. वास्तविक व्याकरण हा काही त्यांच्या अभ्यासाचा प्रमुख विषय नव्हता. परंतु प्रसंगोपात्त ज्या विषयाला त्यांनी हात घातला त्यात त्यांनी काहीतरी

विशेष करून दाखविले. मराठी व्याकरणकारांच्या मालिकेत आगरकरांना मानाचे स्थान मिळाले आहे ते उगाच नव्हे.

**विविधविषयसंग्रह**

या मूळ ग्रंथातील 'भारतीय कलांचे पुराणत्व' (भाग १ ते ४), 'व्यापारवृद्धि' व 'शनि' हे सहा लेख खंड १ व २ मध्ये अगोदरच आले असल्यामुळे उरलेले चोवीस लेख या खंडात घेतले आहेत. या संग्रहाचा उद्देश आगरकरांनी प्रस्तावनेत पुढीलप्रमाणे सांगितला आहे : '"सुधारकांतील निवडक निबंध" पुस्तकरूपाने छापण्याविषयी अनेकाकडून अनेक वेळा सूचना आल्यामुळे . . . त्यांचा हा पहिला भाग प्रसिद्ध केला आहे. या भागाच्या वाचनामुळे कोणाचेही मन दुखावले जाऊ नये म्हणून यात कोणत्याही प्रकारच्या वादग्रस्त विषयांचा समावेश केला नाही.'

या संग्रहातील लेखांची विविधता वाचकांना चकित व आनंदित करते. लेखांची नुसती शीर्षकेही कुतूहलजनक आहेत. उदा. 'पेट घेणारा मासा', 'शरीरात फिरणाऱ्या सुया', 'सशृंग मनुष्ये', इत्यादि. तसेच 'सूर्याचे कवच', 'यूरेनस व नेपच्यून', 'धूमकेतू' यांसारखी ग्रहताऱ्यांची विस्मयजनक व उद्‌बोधक माहिती, हिमालय, नायगारा यासारखे निसर्गनिर्मित आणि 'स्वेझचा कालवा', 'न्यूयॉर्क येथील हवेत चालणाऱ्या आगगाड्या' यांसारखे मानवनिर्मित चमत्कारही यात आहेत. ही विविधता आगरकरांच्या ज्ञानभांडाराची समृद्धता आणि वृत्तपत्रासारख्या माध्यमातून वाचकांपर्यंत ती मनोरंजक रीतीने पोचविण्याचे त्यांचे सामर्थ्य दर्शविते. हे निबंध वाचताना वाचकांना एकाच वेळेस चौफेर ज्ञान व भरपूर मनोरंजन यांचा दुर्मिळ लाभ होतो.

या संग्रहातील बरेच लेख विज्ञानविषयक आहेत. त्यांचा परामर्श पदार्थविज्ञानशास्त्राचे प्राध्यापक डॉ. प्र. ल. खरे यांनी घेतला आहे. तो त्यांच्याच शब्दांत पुढे देत आहोत.

**विविधविषयसंग्रह**

'या पुस्तकात सुधारकात व त्याआधी केसरीत लिहिलेले आपले काही निबंध आगरकरांनी प्रसिद्ध केले आहेत. वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अवलंब करून विवेकाच्या पायावर सामाजिक व राजकीय सुधारणा घडवून आणण्यासाठी भारतीय जनतेची तयारी करण्याकरता सुधारकाचा जन्म झाला. आपल्या उन्नतीसाठी ज्ञानोपासना व उद्योगशीलता यांचा अवलंब करणे आवश्यक आहे यावर आगरकरांचा भर होता.

'उपयुक्त माहिती व मनोरंजन हे हेतू पुढे ठेवून या संग्रहातील निबंधांची निवड केलेली आहे असे आगरकरांनी आपल्या प्रस्तावनेत म्हटले आहे. पण ही उपयुक्त माहिती निवडतानासुद्धा त्यांनी सामान्यतः ज्ञानवर्धन करतील अशा, व विशेषतः वैज्ञानिक शोधांची ओळख करून देतील अशा, विषयांवर या निबंधांमध्ये भर दिलेला दिसतो.

'या संग्रहातील बरेच लेख सूर्यमालिकेतील ग्रहाविषयी सविस्तर माहिती (उदाहरणार्थ त्यांचे आकार, त्यांचे प्रदक्षिणाकाल, त्यांचे चंद्र, त्यांची सूर्यापासूनची अंतरे, वगैरे) देणारे आहेत.

'दुर्बिणीतून हे ग्रह व त्यांचे उपग्रह पाहून व त्यांच्या गतीचे सूक्ष्मावलोकन करून ही माहिती मिळवलेली आहे. यावर त्यांनी जोर दिलेला आहे.

'शनी, गुरू, मंगळ वगैरे आपल्या पृथ्वीप्रमाणेच सूर्याचे ग्रह आहेत ही माहिती, वैयक्तिक जीवनावर त्यांचा मंगळ किंवा अमंगळ परिणाम होतो या समजुतींना शास्त्रीय आधार नाही, याचे आकलन होण्याची पहिली पायरी आहे. असल्या भ्रामक समजुतींवर आगरकरांनी "शनीदेव ऊर्फ साडेसातीचा देव" (**आगरकर–वाङ्मय** : खंड १, पृ. २७७–८१) या निबंधात उपरोधपूर्ण शैलीने टीका केलेली आहे.

'वैज्ञानिक संशोधनपद्धतीचे एक उदाहरण नेपच्यूनवरील लेखांत आगरकरांनी सोप्या शब्दांत, जास्त खोलात न शिरता, स्थूल मानाने दिलेले आहे. सूर्याच्या गुरुत्वाकर्षणामुळे कोणताही ग्रह त्याभोवती वर्तुळाकार किंवा लंबवर्तुळाकार कक्षेत फिरायला हवा. परंतु यूरेनस ग्रहाच्या कक्षेचे सूक्ष्म अवलोकन करताना खगोलशास्त्रज्ञांना त्या कक्षेत काटेकोरपणे लंब वर्तुळाकार मार्गापासून थोडेसे विचलन दिसून आले. गणित करून हे विचलन हा सूर्यापासून यूरेनसच्या पलीकडे असलेल्या एखाद्या ग्रहाच्या गुरुत्वाकर्षणाचा परिणाम असला पाहिजे अशी संकल्पना खगोलशास्त्रज्ञांनी प्रस्तुत केली. पण १८४६ मध्ये हा ग्रह दुर्बिणीतून प्रथम पाहिल्यानंतरच या संकल्पनेला वैज्ञानिक सत्य म्हणून शास्त्रज्ञांकडून मान्यता मिळली. या नवीन ग्रहाला नेपच्यून हे नाव देण्यात आले.

'कोणत्याही समाजाने वैज्ञानिक दृष्टिकोणाचा अंगीकार करण्यापूर्वी त्याला विज्ञानाच्या प्रगतीमुळे मानवी ज्ञानात काय व कशा रीतीने भर पडली आहे याची स्पष्ट कल्पना असायला हवी. त्यानंतरच ज्या कार्य व विचारपद्धतीने विज्ञानाची प्रगती झाली त्या पद्धतीचा, म्हणजे ओघानेच वैज्ञानिक दृष्टिकोणाचा, अवलंब करायला अनुकूल अशी मनोभूमिका समाजात तयार होऊ शकते. या

संग्रहातील निबंध निवडतांना ही गोष्ट प्रामुख्याने आगरकरांसमोर होती असे वाटते.'

या संग्रहातील 'वाचन', 'ज्ञान', 'कवि, काव्य, काव्यरति', आणि 'केरो लक्ष्मण छत्रे' या निबंधांचा परामर्श आम्ही 'केसरीतील निवडक निबंध' ह्या परिच्छेदात अगोदरच घेतला आहे. आता उरलेल्या निबंधांकडे वळू.

वैचारिक निबंधांतून आगरकरांच्या ललितलेखणीला सहसा न मिळणारा वाव या संग्रहातील अनेक निबंधांत भरपूर मिळाला आहे. त्यातून साहित्यिक आगरकरांचे दर्शन घडते. यांतील सुंदर व चमत्कृतिपूर्ण स्थळांची वर्णने इतकी प्रत्ययकारी उतरली आहेत की आगरकरांनी ती प्रत्यक्ष पाहिली आहेत असे वाचकांना वाटावे, नव्हे त्याबद्दल त्यांची खात्रीच व्हावी. पण एक महाबळेश्वर सोडले तर इतर कोणतेही स्थळ पाहण्याची संधी त्यांना लाभली नव्हती. वृत्तपत्रांतून अशा विषयांना मिळणाऱ्या मोजक्या जागेत, नुसत्या वाचनाच्या बळावर, विविध स्थळांची शक्य तेवढ्या बारीकसारीक तपशिलासह हुबेहूब वर्णने करायची, व तीही रोचक पद्धतीने, हे काम अतिशय दुष्कर होते. पण आगरकरांच्या प्रतिभेने ही किमया केली आहे.

आमच्या देशात अनेक प्रेक्षणीय पर्वत, नद्या, किल्ले, लेणी आदि सृष्ट व कृत्रिम सौंदर्यस्थळे असूनही परकयांनी त्यांचा लाभ घ्यावा व आम्ही अतिपरिचयाने त्यांकडे दुर्लक्ष करावे हे आगरकरांना अतिशय शोचनीय वाटते. त्यांच्या मते या स्थळांची रमणीय वर्णने विद्यार्थ्यांच्या पुस्तकांत आणि वृत्तपत्रांत आल्यास त्यांना त्यासंबंधी उत्कंठा वाटेल. ते म्हणतात, 'सुधारकासारख्या स्वल्पमोली व स्वल्पावकाशी पत्रांत असल्या वस्तूंची सचित्र खुलासेवार वर्णन देता येणे अशक्य आहे....आम्ही जी येथील कित्येक वस्तूंची वेडीवाकडी वर्णने करणार आहो, त्यांचा सुदाम्याच्या पोह्यांप्रमाणे वाचक आदर करतील, अशी आशा आहे.' (३५८)

हिमालय, महाबळेश्वर, नायगारा येथील भव्योदात्तता, अद्भुतता, व निसर्गाने तेथे सौंदर्याची मुक्तहस्ताने केलेली उधळण यांची आगरकरांनी केलेली वर्णने इतकी प्रभावी आहेत की ती वाचून ती ती स्थळे पाहाण्याचे कमालीचे औत्सुक्य वाचकांत निर्माण होते.

हिमालयाचे वर्णन करतांना सृष्टीतील भव्य वस्तूंच्या अवलोकनाने किंवा त्यांचे वर्णन वाचण्याने मनोवृत्तींवर फार उत्कृष्ट परिणाम होतात, असे सांगून याबाबतीत भारताला लाभलेल्या भाग्याचा आगरकर गौरवपूर्वक व अभिमान-

पूर्वक उल्लेख करतात. हिमालयाच्या वर्णनात आढळणारा त्यांच्या कल्पनाशक्तीचा विलास मोठा रमणीय आहे. ते म्हणतात, 'हिमालय हा एक पर्वत नाही. तो दोन पर्वतांच्या रांगांनी झालेला प्रचंड गिरिद्रोण आहे ! विमानांत बसून फार उंच गेल्यावर, त्याकडे खाली वाकून पाहिल्यास तो केळीच्या पानाच्या अफाट दुटाकी द्रोणाप्रमाणे दिसेल !' (३५९)

पृथ्वीवरील कोणत्याही शैलशिखरांच्या उंचीला मागे टाकणारी, समुद्र-पृष्ठभागापासून अनुक्रमे २९,००० व २८,००० फुटाहून अधिक उंच असलेली, गौरीशंकर व कांचनगंगा ही शिखरे नेहमी बर्फाच्छादित असतात. आगरकर म्हणतात की ती पाहून कोणी अशी शंका घेईल की, इतक्या उंचीवर एवढा विस्तार बर्फाने झांकण्यासारखे पाणी तरी कोठून येते ? (३६०) या शंकेचे उत्तर देतांना आगरकरांनी पाऊस पडण्याच्या प्रक्रियेच्या वर्णनात चेतनान्योक्ती, उत्प्रेक्षा, उपमा आदि अलंकारांचा मोठा थाट उडवून दिला आहे. तो मुळातूनच वाचायला हवा. पण त्याचा संक्षेप करायचा झाल्यास तो काहीसा असा होईल :

आपल्या सहस्ररश्मींनी नित्य प्रकाशून बंगालच्या उपसागरातील पाण्याची वाफ करणारा भगवान सूर्यनारायण; या उपसागरापासून हिमालयापर्यंत उच्च प्रदेशात भटकणारी ती वाफ; त्या वाफेची वैशाखानंतर दक्षिण ध्रुवाकडून वाहणाऱ्या सोसाट्याच्या वाऱ्याशी गाठ पडून तिचे सजल जलदांत होणारे रूपांतर; बंगाल प्रांतावर पर्जन्यवृष्टी करीत हिमालयाच्या दक्षिण भिंतीवर धडका देणारे हे जलद; या भिंतीतून सुटण्यासाठी त्यांची चाललेली अखंड धावाधाव; द्रोण्युदराने त्यांना निसटून जाण्यास दिलेली वाट; पण लगेच दुसऱ्या प्रचंड भिंतीचा अनुल्लंघ्य अडथळा पाहून संतापून मत्तमतंगजाप्रमाणे त्यांनी त्या भिंतीला दिलेल्या टकरा; आणि तिच्यापुढे हतबल झाल्याने पराभवामुळे त्याच्या डोळ्यांतून वाहणाऱ्या अश्रुधारा म्हणजेच शिखरांना बर्फाच्छादित करणारा हा जलसंचय.

निसर्गसौंदर्याने विनटलेले महाबळेश्वर आगरकरांनी प्रत्यक्ष पाहिले होते. परंतु हिमालयाच्या तुलनेत त्याची भव्योदात्तता आणि रम्यता केव्हाही उणीच ठरणार. आगरकर म्हणतात, 'पृथ्वीचा तो "मानदंड" कोणीकडे आणि सह्याद्रीचा हा एक फाटा कोणीकडे?' परंतु प्रत्यक्षानुभूतीमुळे यातील वर्णने अधिक सविस्तर, जिवंत व बोलकी उतरली आहेत. ही वर्णने करतांना आगरकराची वृत्ती उल्हसित, खेळकर, प्रसन्न व प्रसंगी अवखळही झाली असल्यामुळे त्यांची लेखणी येथे दिलखुलासपणे वावरताना दिसते. लेखाची सुरुवातच त्यांनी मोठ्या विनोदी पद्धतीने केली आहे. ते म्हणतात, 'वाचकवृंदास महाबळेश्वरी कोणत्या वाटेने घेऊन जावे, ही पहिली मोठी नड आहे. . . . वाचक

तर तेथे जाऊन पोहोचण्याविषयी अत्यंत उत्कंठित झाले असतील' (३६३-३६४).

आगरकर सांगतात की महाबळेश्वर कोणत्याही ऋतूत रमणीयच असते. तरी ऑक्टोबरमधील तेथील मौज काही न्यारीच. हिरव्या गार गवताने किंवा नानाप्रकारच्या रानफुलांनी नयनमनोहर झालेली सारी सपाट जमीन, कड्यांवरून खालच्या दऱ्यात प्रचंड आवाज करीत धडाधड उड्या घेणारे शुभ्र ऐरावतांच्या शुंडांसारखे अच्छोदकाचे प्रवाह, मधूनमधून दिसणाऱ्या कापसाच्या ढिगांसारख्या तुषारांच्या राशी—यांची शोभा मोठी नयनरम्य आहे. तेथील झाडांचे व त्यावर साचलेल्या शेवाळीचे वर्णन ते सुंदर उत्प्रेक्षांनी व उपमांनी पुढीलप्रमाणे करतात.

'उभ्या पावसाळाभर अतोनात पाऊस अंगावर घेऊन शेवाळलेली जांभळीची व पिशाची झाडे, आपल्या शरीरात मावेनासे झालेले पाणी बाहेर टाकीत आहेत की काय असे वाटते.'

'कित्येक फांद्यांवरून हे शेवाळीचे लोंबणारे पुंजके, तपसाचरणात फार दिवस गढून गेल्यामुळे श्मश्रू करण्यास संधी न सापडलेल्या तापसांच्या राठ दाढ्यांप्रमाणे दिसतात.'

महाबळेश्वरला जांभळीचे पीक इतके आहे की झाडांवर त्यांचे घोसचे घोस असतात, व रस्त्यावर तर ढीगच पडलेले असतात. त्याविषयी ते विनोदाने लिहितात की वर हात करून किंवा खाली वाकून जांभळे घेण्याइतका त्रास घेण्याचाही ज्याला आळस असेल 'त्याने "आ" करून आकाशाकडे पाहात जावे, म्हणजे निदान दहा-पाच जांभळे तरी त्याच्या तोंडात अचानक येऊन पडतील. ती खाण्याचे कष्ट मात्र त्यालाच घ्यावे लागतील.'

येथे सर्वत्र माजलेल्या घनदाट झाडीतून वेळीअवेळी भटकणाऱ्यास वाघोबा कधीकधी आपला इंगा दाखवून त्याला पळता भुई थोडी करतो याचे वर्णन ते मोठ्या विनोदी पद्धतीने करतात. दूर एकटे फिरण्याचा नाद असलेले मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड रे हे एकदा फिरता फिरता फार लांब गेले, आणि रात्रीच्या अंधारामुळे त्यांना वाट सापडेनाशी झाली. तेव्हा भीतीने त्यांची घाबरगुंडी उडाली. 'कारण लॉर्ड रे यांस पक्के ठाऊक होते की राज्यातील क्रूर श्वापदांपुढे किंवा जिवाणूंपुढे आपण मुंबईचे गव्हर्नर आहोत असे सांगितले असता काही रदबदली होईल व ती आपणांस त्रास न देता निमूटपणे चालती होतील असे काही नाही' (३८०).

महाबळेश्वरच्या विहिरी फार खोल असतात, एवढेच सांगून आगरकर थांबत नाहीत, तर त्या किती खोल असतात ते सांगताना त्यांची विनोदी वृत्ती

पुन्हा डोके वर काढते. ते म्हणतात, 'कोणी विशेष वातबद्ध स्त्री असेल तर तिच्याकडून येथील विहिरीच्या दहाबारा घागरी रोज आणवाव्या, म्हणजे एका पंधरवड्याच्या आत तिच्या बहुतेक वात झडून जाईल, असे आम्हांस वाटते' (३८२).

परंतु या विनोदी वृत्तीप्रमाणेच प्रसंगी अतिशय उदास व खिन्न झालेली त्यांची वृत्तीही आपल्याला दिसते. हिमालयादि पर्वतांवरील उत्तमोत्तम स्थाने आम्ही शोधली आणि त्यावर देवळे बांधून तेथे जाण्याचा परिपाठही घालून ठेवला. मात्र अशा ठिकाणी जाण्यास सुखसोयीचे रस्ते करून आरामशीर वाहनातून तेथे जाण्याचे, आणि तेथे मोठमोठे बंगले बांधून उन्हाळ्यात तेथे राहण्याचे आम्हांला जमले नाही. 'असली सुखे घेण्याची अक्कल व दिवस ही आम्हांस कधीच आली नाहीत' (३७३). याचे कारण सांगताना स्वराज्यहानीने कष्टी झालेले आगरकर म्हणतात, 'कारण एक तर त्यांना तसे करण्यास फुरसतच मिळाली नाही! स्वप्नाप्रमाणे आमच्या स्वराज्याची स्थिती झाली. ते आले केव्हा आणि गेले केव्हा हे देखील आम्हांस पुरते समजले नाही!' विवाहसंस्कार होताच एखाद्या कन्येच्या नशीबी वैधव्य यावे तशी 'आमच्या स्वातंत्र्यवधूची दशा झाली' (३७३).

प्रतापगडाचे भव्य आणि मजबूत बांधकाम पाहून जुन्या लोकांनी ही एवढाली अवाढव्य कृत्ये कशी केली असावी असा त्यांना चमत्कार वाटतो. पण मडमांना आणि साहेबांना खुर्चीत बसवून वीतभर पोटासाठी प्रतापगडच्या किल्ल्याची चढण चढणारे मावळ्यांचे वंशज पाहून ते व्याकूळ होतात. ते लिहितात, 'शिवाजीच्या हाताखाली ज्या अडाणी लोकांनी तोंडात बोटे घालण्यासारखे जिवावरच्या धाडसाचे पराक्रम करून मुसलमानांची खोड मोडली व इतिहासात आपले नाव चिरायू करून सोडले, त्या मावळ्यांस पोटाची वीतभर खळी भरण्यासाठी मडमांस, पार्शिणींस, साहेबांस आणि रावसाहेबांस खुर्च्यांत घालून खांद्यावर वहावे लागत आहे; यावरून दैवाची गती मोठी विचित्र आहे, असा विचार या प्रामाणिक, कृश व गरीब लोकांकडे पाहिल्याबरोबर मनात आल्यावाचून राहात नाही!...असले किल्ले पाहण्यास जाण्यात आनंद किंवा दुःख यांपैकी कोणत्या विकाराचे प्राबल्य क्षणभर अधिक होईल हे सांगता येणे कठीण आहे' (३७७).

महाबळेश्वराचे महत्त्वाचे आकर्षण म्हणजे तेथील पॉइंट्स् किंवा शैलबाहू. त्यांचे वर्णन करताना, विशेषतः 'ऑर्थर्स सीट' नावाच्या पॉइंटचे वर्णन करताना,

आगरकरांची उत्तुंग कल्पनाशक्ती, समर्थ सौंदर्यदृष्टी व अप्रतिम वर्णनकौशल्य ह्यांनी वाचक मंत्रमुग्ध होतो. ब्रम्हारण्याच्या विस्तीर्ण झाडीतून साहेबांनी काढलेली पाऊलवाट जिथे संपते तेथे केलेल्या छोटयाशा जागेस 'ऑथर्स सीट' असे म्हणतात. या सीटवरून दिसणारा देखावा जसा अलौकिक तसेच त्याचे आगरकरांनी केलेले वर्णनही अविस्मरणीय आहे. ते म्हणतात, 'जणू काय ओळंब्यात असलेल्या दोन हजार फूट उंचीच्या सुळक्यावर दोन हात लांब व दोन हात रुंद एवढया जागेत उभे राहून पुढे असलेल्या मृत्युमुखाच्या तळाकडे किंवा त्याच्या दोन बाजूंस कित्येक मैल पसरलेल्या प्रचंड दाढांकडे निर्भयपणे व निश्चलपणे पाहणारा माणूस सहसा सापडणार नाही' (३७५). तसेच 'दरीच्या पलीकडे नजर फेकण्यास धीर होतो तेव्हा नाटयगृहात मांडलेल्या बाकांप्रमाणे एकाहून एक उंच अशा डोंगरांच्या रांगा आकाशास मिडण्यासाठी एकमेकांशी स्पर्धाच करीत आहेत की काय अशा भासतात' (३७६).

सुशिक्षणाने ज्याचे अंतःकरण संस्कारित, संवेदनाक्षम व भावतरल झाले असेल त्याने एकदा तरी अशी स्थाने पाहिल्याशिवाय राहू नये अशी शिफारस आगरकर करतात.

नायगारा धबधब्याचे वर्णन करताना आगरकरांची लेखणी त्या धबधब्यासारखीच संचार करताना दिसते. तेथील अद्भुतरम्य सौंदर्याने त्यांच्या लेखणीला आनंदाचे, औत्सुक्याचे, आणि रसिकतेचे अगदी भरते आलेले आहे. ते म्हणतात की आकाशस्थ गोलांचे प्रत्यक्ष अवलोकन केले असता मनुष्याच्या सामर्थ्याची, बुद्धीची आणि कर्तृत्वाची क्षुद्रता जशी पटते, तशीच या भूगोलावरही अशा अद्भुत सृष्ट वस्तू आहेत की ज्यांना पाहून आपल्या अंगी लीनता उत्पन्न होते. नायगाराचा धबधबा हे त्याचे एक उत्तम उदाहरण आहे.

उत्तर अमेरिकेच्या उत्तर प्रदेशात जो प्रसिद्ध कासारसमूह आहे, त्यांत इरी आणि आंतेरिओ अशी दोन विशाल सरोवरे आहेत. नायगारा नदी इरी सरोवरापासून उगम पाहून, सुमारे ३३ मैल भूम्याक्रमण केल्यावर आंतेरिओ सरोवरास जाऊन मिळते.

या प्रवासात नायगारेच्या मंद, मध्यम, जलद आणि अतिजलद गतींवर आगरकरांनी केलेले रूपक बहारदार आहे. या वर्णनात शृंगार, वीर, भयानक, रौद्र, आदि अनेक रसांचा त्यांनी केलेला आविष्कार मोठा हृदयंगम आहे. ते म्हणतात, 'इरी सरोवरापाशी नायगारेची जी मंदगती आहे ती पाहून मनात असा तर्क येतो की माहेराहून सासरी जाणे हिला अगदी नकोसे झाल्यामुळे ही

अशी रेंगाळत आहे की काय कोण जाणे ! पण हे तिचे रेंगाळणे फार वेळ टिकत नाही. थोड्या वेळात पतिसमागमाच्या आनंदलहरी तिच्या हृदयात येऊ लागून तिचे पाऊल वेगाने पुढे पडू लागते, व प्रत्येक पावलास पुढे जाण्याची तिची उत्कंठा अधिकच तीव्र होते. . . .अजाद्वीपाचा प्रतिरोध या उतावीळ झालेल्या चपलेस दु:सह होऊन ती क्रोधाने इतकी फणफणू लागते की तिचे ते भयानक स्वरूप पाहून व गर्जना ऐकून प्रेक्षकांच्या अंगावर काटा उभा राहतो ! अजाद्वीपास हिसडा देऊन जेव्हा ती दीडशे फूट उंचीच्या कड्याखाली उडी घेते तेव्हा तिला जे रागाचे कल्होळ येतात त्यामुळे . . . क्रोधाग्नीने सर्व उदकसंचय अत्यंत तप्त होऊन त्यास उसळ्या येत आहेत की काय, व त्यातून स्फटिकासारख्या शुभ्र व हिऱ्यासारख्या तेजोमय अंबुकणांच्या बाष्पाचे अनंत लोळ निघत आहेत की काय, असा भास होतो' (३९२–९३).

या धबधब्याचा अफाट विस्तार, प्रचंड खोली आणि कर्णकर्कश आवाज ही सारीच माणसाच्या कल्पनेपलीकडची आहेत. तरी अतिशय अनावर अशा या धबधब्यावर कुरघोडी करून मानवाने त्यावर बांधलेले तीन झुलते पुल पाहून आगरकर म्हणतात, 'आता नदीच्या सामर्थ्याची विशेष तारीफ करावी की अमेरिकन लोकांच्या अकलेची आणि परिश्रमाची विशेष तारीफ करावी, अशी शंका उत्पन्न होते' (३९२).

वाचकांचे मनोरंजन व उद्‌बोधन करण्याच्या हेतूने आगरकरांनी आपल्या वृत्तपत्रांतील निवडक लेखांचा हा जो संग्रह प्रसिद्ध केला आहे तो वाचून या ग्रंथाच्या नावाची यथार्थता आणि लेखकाच्या हेतूची झालेली पूर्तता सहज लक्षात येतील. वाचकांचे मनोरंजन करीत करीत आगरकरांनी त्यांना भारतातील प्रेक्षणीय स्थळे दाखविली, एवढेच नव्हे तर नायगारा, स्वेझचा कालवा, यासारख्या परदेशस्थ स्थळांचेही दर्शन घडविले. अनावर आणि उच्छृंखल अशा निसर्गावर मानवाने केलेली मात दाखवून प्रयत्नांचे अगाध सामर्थ्य त्यांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला. तसेच अनेक अद्‌भुत आणि चमत्कारिक गोष्टींविषयी माहिती देऊन विश्वातील चमत्कारांविषयी त्यांचे कुतूहल जागविले. आणि हे सर्व त्यांनी वाचकांशी हितगूज करावे अशा जिव्हाळ्याच्या शैलीत केले आहे.

आगरकर–वाङ्मयाच्या एकूण तीन खंडांतील सुमारे १५०० पृष्ठांतून आगरकरांच्या बहुविध प्रतिभेचे मनोहर दर्शन घडते. त्यांचे वाङ्मयीन कार्य अनेकविध आहे. आपल्या अवघ्या पंधरा वर्षांच्या वाङ्मयीन आयुष्यात त्यांनी किती पराक्रम करावेत ! दोन वर्तमानपत्रांची स्थापना करून त्यांना त्यांनी

नावारूपाला आणले; सामाजिक, धार्मिक, राजकीय आघाड्यांवर प्रचंड विरोधास तोंड देत त्यांनी या विषयांचे समग्र तत्त्वज्ञान वर्तमानपत्रासारख्या माध्यमातून मांडले; तत्कालीन अनेक चळवळींत त्यांनी भाग घेतला, आणि त्यासाठी तुरुंगवासही भोगला; आणि याखेरीज नाटक, साहित्यसमीक्षा, व्याकरणशास्त्र अशा अतिशय विविध विषयांवर महत्त्वाची ग्रंथरचनाही केली. ही त्यांची कामगिरी पाहिली की मन थक्क होते.

आगरकरांनी आपली लेखणी आणि वाणी स्वजनांना शहाणे करण्यासाठी अखंड झिजविली, आणि अपार वात्सल्याने आणि कळवळ्याने ते जनतेच्या कल्याणाकरिता अहोरात्र निरिच्छपणे झटले. अशा या थोर ज्ञानमहर्षीचे आपल्यावरील ऋण कधीही न फिटणारे आहे. त्यांच्या बहुमोल विचारांचा हा दुर्मिळ झालेला ठेवा आम्ही फिरून महाराष्ट्रीय वाचकांच्या स्वाधीन करीत आहोत. त्याचा ते आस्थेने सांभाळ करोत आणि आपली जीवने उजळोत !

म. गं. नातू
वि. य. देशपांडे

# डोंगरीच्या तुरुंगांत आमचे १०१ दिवस

हें लहानसें पुस्तक

गोपाळ गणेश आगरकर, एम. ए.,

केसरीकर्ते,

यांणीं तयार करून

पुणें येथें

"आर्यभूषण" छापखान्यांत छापविलें.

सन १८८२

किंमत ४ आणे

# डोंगरीच्या तुरुंगांत आमचे १०१ दिवस

स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि ॥
आराधनाय लोकानां मुञ्चतो नास्ति मे व्यथा ॥*

उत्तररामचरित

या छोटेखानी पुस्तकांत तुरुंगांतील शिस्त, तींत करण्याजोगे फेरफार, व अवांतर विचार, या तीन मुद्यांवर मजकूर लिहिला आहे. लिहिणाराचा अनुभव काय तो सध्यां एकाच तुरुंगाचा आहे हें खरें; तरी शितावरून भाताची परीक्षा या न्यायानें वाचकांना तुरुंगस्थितीचें साधारण अनुमान करितां येईल !

कोल्हापूर प्रकरणाच्या संबंधानें लोकांच्या अटकळीचा जसा फजिता उडाला तसा दुसऱ्या संबंधानें पूर्वी कधींच उडाला नसेल! लोकांना वाटत होतें कीं, पत्रकर्ते निदान दंडावर तरी सुटतील, पण जज्जानें आणि जूरीनें त्यांची पच्चीच उडविली ! पत्रकर्त्यांना मात्र अशा प्रकारची भुरळ पडली नव्हती; कोल्हापुरास काढलेल्या कमिशनाचें 'ऑफस' होऊन टाळघा वाजवीत मंडळी परत आली त्याच वेळीं आपल्या खटल्याचा काय निकाल होणार हें पत्रकर्त्यांच्या लक्ष्यांत चांगलें येऊन चुकलें होतें. न्यायासनापुढें खटला शाबीत होण्यास कशा प्रकारचा पुरावा लागतो, याची ज्यांना बरोबर कल्पना नसते, त्यांची अशीच निराशा होते. न्यायाधीश आणि पंच पुराव्याच्या आधारानें आपले फैसल करितात; लोकांचे फैसल त्यांच्या मनोविकारांप्रमाणे चालतात. असो.

कैद्यांना 'द्वेषाच्या' चाजांतून मुक्त करून अविचाराचे लेख लिहिल्याबद्दल शिक्षेची सुनावणी केल्यानंतर हायकोर्ट उठलें, व मंडळी खालीं तोंडें घालून आपापल्या घरीं चालती झाली. नंतर आम्हांला माडीवरून खालीं आणून तळ-

* लोकांना संतुष्ट राखण्यासाठी स्नेह, दया, सौख्य आणि प्रसंग पडल्यास जानकी यांचा त्याग करावा लागला तरी त्याबद्दल मला खेद होणार नाही.

मजल्यांतल्या एका कोठडींत ठेविलें. सहा वाजण्याच्या सुमारास घोडयाच्या दोन गाडया आणवून त्यांत आम्हांला व्यवस्थेनें बसविलें; व आमच्या बंदोबस्ताकरितां बरोबर शिपाई लोकांचा पहारा देऊन बिनभाडयाच्या घराकडे आमची रवानगी केली. आमच्या समजुतीप्रमाणें देशाच्या बऱ्यासाठी आम्ही आरंभिलेले उद्योग, करवीरस्थ प्रभूचें चांगलें व्हावें म्हणून आम्ही लिहिलेले लेख, खटला उभा राहिल्यावर आम्हांस व आमच्या मित्रमंडळीस पडलेली दीर्घ यातायात, लोकांची आमच्यावर बसलेली प्रीति आणि त्यांच्याशीं आमचें वर्तन, आमच्या देशाची स्थिति, आणि जगांतील न्यायपद्धति वगैरे अनेक विषय झपाटयानें आमच्या डोक्यांतून जात आहेत तों आमच्या गाडया तुरुंगाच्या दारापाशीं येऊन ठेपल्या. त्यांतून खालीं उतरून दिंडींतून आंत शिरतांना आमच्या मनाची काय स्थिति झाली असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. आंत गेल्यावर आम्ही थोडा वेळ स्वस्थ बसलों; नंतर घरचे कपडे उतरून टाकल्यावर सरकारी वार्डरानें खाल-पासून वरपर्यंत आमची झडती घेतली व आम्हांस तुरुंगचे पोषाख दिले. या पोषाखांत तीन डाग असतात; (१) तुमान किंवा गुडघ्यांइतका सईल चोळणा; (२) कोपरांइतक्या अस्तन्यांचा सदरा; (३) आणि वाटोळी टोपी. हीं वस्त्रें खादीचीं केलेलीं असून मजबूत, व थंडीवाऱ्याला सहसा दाद देणारीं नसतात. हीं दर आठवडयास एकदां धुऊन मिळतात. याखरीज स्नान करावयाचें असलें म्हणजे त्या वेळेपुरती रुंद लंगोटी मिळते. ही लंगोटी घालतांना करदोटयाची गरज न लागावी अशी तिच्यांत खुबीची सुधारणा केलेली आहे ! माझी प्रकृति जात्या शैत्यखोर असल्यामुळें मला वारंवार पडसें होई; तेव्हां जमादाराच्या परवानगीनें शिप्यापासून (तो तरी एक कैदीच होता) नाक पुसण्यासाठीं मीं एक वीत दीडवीत फडकें मिळविलें, तें माझ्यापाशीं आम्ही सुटेतोंपर्यंत होतें !

वस्त्रपरिधान झाल्यावर आमचीं नांवें रजिष्टर झालीं; व लत्ताकपडयाचीं टिपणें होऊन त्यांच्यावर आमच्या सह्या घेतल्यावर निजण्यासाठीं आम्हांस तरळांत (Trial yard cells) नेलें; तेथें एका दगडी फरशीच्या पण बिनढेकणी खोलींत आम्हां सगळयांस कोंडून घालून व आमच्या अंगावर दहा बारा फाटकीं तुटकीं घोंगडयांचीं रखटीं फेंकून देऊन कोंडण्यास आलेला शिपाई दाराला जंगी कुलूप लाऊन चालता झाला. त्या रात्रीं पोटांत थंडी, बाहेर थंडी, व थंडप्रकृति असल्यामुळें मी उजाडेपर्यंत सगळे तास मोजिले; व माझ्या प्रमाणेंच सरासरी बाकीच्यांची स्थिति होती. सुमारें सात आठ वाजण्याच्या सुमारास आम्हांस तेथून काढून क्लार्कच्या हपिसांत आणिलें. तेथला विधि आटपण्यास पक्के दोन तास लागले; प्रथम आमचें वजन करून नंतर शरीराची उंची, डोक्याचा परिघ

व पावलांची लांबी घेतली, व अंगावरील ठळक ठळक निशाण्या टिपल्या. पुढें तुरुंगाच्या नेटिव मेडिकल असिस्टणानें कोणास कांहीं स्पर्शरोग आहे किंवा नाहीं याचा तपास करून देवी काढल्या न काढल्याची चौकशी केली व आपल्या बुकांत सर्व माहिती लिहून घेतली. इतक्यांत गोरा डाक्तर आला; त्याबरोबर क्लार्कच्या अफिसांतून डाक्तराच्या अफिसांत आम्हांला नेलें. तेथें त्यानें सदरे काढवून देवी वगैरे काढल्या आहेत कीं नाहीं हें पाहिलें. तेथून क्लार्कच्या आफिसांत आम्ही पुन: परत आलों. पुढें हेडक्लार्कच्या आफिसांत थोडीबहुत चवकशी झाल्यावर, आम्हांस तुरुंगाच्या गोऱ्या सुपरिटेंडन्टापुढें नेऊन उभें केलें, व आमच्या लत्ताकपड्यांची यादी पहिल्या क्लार्कनें वाचिली. ती बरोबर आहे असें आम्ही सांगितल्यावर आम्हांला तेथून काढून हाटलीवर (Hard labour yard) नेलें. इतका प्रकार होईपर्यंत सुमारें अकरा वाजण्याचा बेत आला. नंतर सवीस परसाकडणें, तोंडधुणें घालून जेवायला नेलें. प्रत्येक कैद्याला अन्न घेण्यासाठीं एकेक लोखंडी टकोरें दिलेलें असतें. या पात्राची आकृति कशी असते म्हणाल तर आपल्या कढईसारखी असते, असें म्हणण्यास हरकत नाहीं; भेद इतकाच कीं कढईला कड्या असतात, त्या टकोऱ्याला नसतात. पहिल्या दिवशीं अन्न पुढें आल्याबरोबर त्याचा अमंगळ दर्प आम्हांस दु:सह वाटला, व तोंडांत दोन तीन शितें जाण्याबरोबर ओकारी आली. मग थोडेंसें पाणी पिऊन घेतल्यावर शिपायांनीं आम्हांस एका बराकींत कोंडून घातलें; तेथें आम्ही संध्याकाळचे चार वाजेपर्यंत पडून होतों. तुरुंगांतल्या बराकी सरासरीनें लोखंडी गज मारलेल्या धर्मशाळे-सारख्या असतात असें म्हणण्यास हरकत नाहीं. चार वाजल्यावर बाहेर काढून आम्हांस संध्याकाळचें जवण दिलें, व सहा वाजण्याच्या सुमारास बराकीच्या दुसऱ्या मजल्यावर निजण्याच्या कोठड्या आहेत, त्यांत कोंडून घातलें. ही पहिल्या दिवसाची हकीकत झाली, व हीच सगळ्या दिवसांची होय असें म्हटलें तरी चालेल. बिनमजुरी कैद्यास तुरुंगांत जेऊन बसण्याखेरीज दुसरें कांहीं एक काम नसतें. उद्योगांत गढलेल्या मनुष्यास दोन घटका स्वस्थ बसण्यास फुरसत केव्हां सांपडेल असें झालेलें असतें; पण आम्हांला तेथें काहींच उद्योग नसल्यामुळें दोन दिवसांत बसण्याचा कंटाळा आला. बाहेर असतां कामकाज आटोपून फिरावयास निघण्याची वेळ ती तुरुंगांत निजण्यासाठीं कोंडून घालण्याची वेळ असते. संध्या-काळचे पांच साडेपांच वाजल्यापासून दुसऱ्या दिवशीं सकाळीं सहा साडेसहा वाजेपर्यंत तेरा फुटांच्या चौरस खोलींत दोघां चौघांनीं निजून राहणें बरेंच कठीण आहे. प्रत्येक खोलींत रात्रीं लघवीस व शौचास जाण्यासाठीं एकेक लोखंडी कुंडी ठेविलेली असते. बराकी आणि खोल्या लोटून पुसून दररोज साफ केल्या जातात,

व कुंडया उचलून नेऊन त्या साफ करण्याचें, व साफ झाल्यावर त्या जागच्या जागीं परत आणून ठेवण्याचें काम भंग्यांकडेस असतें. हे भंगीही कैदीच असतात. तुरुंगांत गेल्याबरोबर शेंडी काढून टाकितात, त्यामुळें उवा वगैरेंचा त्रास होत नाहीं. पहिले पंचवीस दिवस आम्हांस पराकाष्ठेचे जड गेले. तुरुंगांतील अन्नाची रुचि येऊं लागून तें अंगवळणीं पडेपर्यंत फार त्रास झाला.

**पाकसिद्धि व जेवण :** इतर तुरुंगांत काय व्यवस्था असेल ती असो, पण डोंगरीच्या तुरुंगांत तरी जातीचा भेदाभेद नाहीं. आम्ही होतों तोंपर्यंत स्वयंपाक करण्याकडे आठ नऊ हिंदु कैद्यांची नेमणूक असे. बंबाने किंवा पोहऱ्यानें विहिरीचें पाणी ओढण्याचें काम एक किरिस्ताव, व दुसरा मुसलमान अशा दोघांकडे होतें. स्वयंपाकाला, भांडीं घासण्याला व कैद्यांचें परसाकडणें, तोंडधुणें वगैरेला लागणारें सर्व पाणी यांना पुरवावें लागत असे. जेवायला डोंगरीच्या तुरुंगांत सकाळीं भात आणि डाळ (आमटी) असतात, व संध्याकाळीं गव्हाची रोटी किंवा बाजरीची भाकरी आणि कसली तरी भाजी असते. आठवड्यांतून चार रोट्या आणि तीन भाकरी मिळतात. त्यांपैकीं रविवारच्या पोळीस आणि गुरुवारच्या भाकरीस थोडेंसें तूप चोपडलेलें असतें. सकाळीं भाताबरोबर खाण्यास एक दोन कांदेहि मिळतात. डाळीला व संध्याकाळच्या पातळ भाजीला लसणेची फोडणी असते. कांदा, लसूण खाणेची ज्यांना संवय नाहीं, त्यांची तुरुंगांत फार उपासमार होते, व त्याचमुळें १०१ दिवसांत टिळकांचें २४ पौंड आणि माझें १६ पौंड मांस नाहीसें झालें ! तुरुंगांत गेल्यावर पहिले कांहीं दिवस संध्याकाळीं कांद्या-बटाट्यांची पातळ भाजी मिळे; पण पुढें एकदां जो मुळ्यांचा पाला लागला त्यानें आमची बाहेर पडेपर्यंत पाठ पुरवली. ही भाजी इतकी खराब असते कीं, ती आम्हीं कधींच तोंडांत घातली नाहीं. सकाळच्या डाळीपैकीं कांहीं डाळ एका मडक्यांत राखून ठेऊन त्याबरोबर संध्याकाळच्या भाकऱ्या किंवा रोट्या खात असूं. तुरुंगांत गेल्याबद्दल आम्हांस कधींच वाईट वाटलें नाहीं. पण तेथलें अन्न पुढें आलें म्हणजे मात्र वाईट वाटे. १८७६ सालापूर्वी बिनमजूरीच्या कैद्यांस आपापलें जेवण हवें असल्यास बाहेरून आणविण्याची परवानगी असे, असें सांगतात; आमच्या वेळेस असें असतें तर आम्ही कदाचित् वजनानें एक दोन पौंड वाढून बाहेर पडलों असतों ! तुरुंगांतील धान्य हलक्या दराचें असतें इतकेंच नाहीं, तर अन्नही फार वाईट रीतीनें तयार करितात. तेथें विशेष खप म्हणजे झाडा बंद होण्याच्या औषधाचा असतो. आम्हांपैकी प्रत्येकास हगवणीची पाळी घ्यावी लागली !

**झोंप** : दररोज बारा किंवा तेरा तास झोंप घेण्यासाठीं एके ठिकाणीं कोंडून राहणें अत्यंत दुःसह आहे. नित्य उठून पांच सात तास गोष्टी तरी कुठल्या सांगाव्या, किंवा चर्चा करण्यास नवीन विषय तरी कोठले आणावेत. शिवाय रोजरोज त्याच मनुष्यांशीं बोलत बसण्याचा कंटाळा येतो, हें सर्वत्र अनुभवप्रसिद्ध आहे. आमचे आंथरण्यापांघरण्याचे हाल होते, असे नाही. तसेंच खोल्यांतून वाराही चांगला खेळत असे; पण उजेड नसल्यामुळें फार त्रास होई. सगळ्या तीन महिन्यांत आम्हीं चांदोबास एकदां किंवा दोनदां मोठ्या खटपटीनें गजांतून पाहिलें ! आठ दहा दिवस सुरवंटांमुळें फार बेजार झालों होतों. निजण्याच्या घोंगड्यांच्या पट्यांत सुरवंट चिरडले म्हणजे कशी मजा होते, हें सर्वांना ठाऊक आहेच. शिवाय अन्नांत मिरची फार पडत असल्यामुळें चौघांपैकीं दोघां तिघांस तरी परसाकडेला निदान एकेक वेळ व लघुशंकेस दोन तीन वेळां बसणें भाग पडे. इतकी घाण झाल्यावर तेरा फूट चौरस खोलींतील हवा, कितीही व्हेंटिलेशन असलें तरी कितपत स्वच्छ राहील, याचा तर्क करणें वाचकांवर सोंपवितों !

**व्यवसाय** : पहिल्या पंचवीस दिवसांत टकोरें घांसण्याशिवाय दुसरा कांहीं व्यवसाय नव्हता. पण तें काय बिचारें, लोखंडाचे असून दोन तीन दिवसांत रुप्यासारखें पांढरे सफेत झालें. पांच सांत दिवस लोटल्यावर तर एकसारखी मांडी ठोकून बसण्याचा इतका कंटाळा आला कीं, आम्हांस सक्त मजूरीची शिक्षा होती तरी आनंदानें दिवस गेला असता असें वाटूं लागलें ! पण हे सगळे मनांतील मांडे ! सुपरिंटेंडन्ट तरी कायद्याबाहेर बिनमजुरीच्या कैद्यांस काम कसें सांगणार ? मग एके दिवशीं आम्हीं फारच विनवणी केली, तेव्हां त्यानें आमच्याकडून एक लेखी अर्ज घेऊन आपल्या वरिष्ठाकडे पाठविला. जनरल सुपरिंटेंडन्ट ऑफ जेल्स डाक्तर **क्रूकशांक** यांनीं आम्हांवर जे उपकार केले ते आमच्यानें कधींही फिटणार नाहींत. अर्ज येऊन पोहोंचल्याबरोबर त्यांनीं सदय होऊन आम्हांस पुस्तकें वाचण्याची, व कागद, शाई वगैरे घेऊन भाषांतरें वगैरे करण्याची परवानगी दिली. त्यामुळें कारागृहवास म्हणून जो म्हणतात तो आम्हांला पहिल्या पंचवीस दिवसांनंतर फारसा भोंवला नाहीं. सकाळपासून संध्याकाळपर्यंत वाचण्यांत किंवा लिहिण्यांत वेळ जाई; व दिवसा मानसिक श्रम झाल्यामुळें रात्रीं चार पांच तास तरी चांगली झोंप लागे. पण पुढें पुढें जसजशीं मेंदूची आणि शरीराची शक्ति क्षीण होत चालली, तसतसें वाचण्यावर देखील मन लागेनासें झालें, व शेवटल्या आठ दिवसांत हवीं तितकीं पुस्तकें आणि हवे

तितके कागद जवळ असतांही मीं एक ओळ देखील वाचिली नाहीं किंवा एक टांक देखील ओढिला नाहीं.

**करमणूक :** आपआपसांत हळूहळू गोष्टी सांगण्याखेरीज, किंवा अकरा वाजल्यावर बराकींत कोंडून घातल्यावर तेथें फिरण्याखेरीज दुसरी कांहींही करमणूक नसे. टिळकांचा आणि माझा नाना तऱ्हेच्या विषयांवर वाद करण्यांत पुष्कळ वेळ जाई. कित्येकदां तर आम्हीं रात्रींच्या रात्री बोलत घालविल्याचें मला आठवतें. मी 'एम्. ए.' करितां व टिळक 'एल्एल्. बी.' करितां अभ्यास करण्यासाठीं कालेजांत राहिलों असतां सरकारी नोकरी न पत्करितां देशसेवेंत आयुष्य घालविण्याचा ज्या दिवशीं निश्चय केला त्या दिवसापासून आम्हीं जें जें बोललों चाललों होतों त्याची पुन: पुन: आठवण होऊन अनेक वेळां पुनरावृत्ति होत असे. अमुक गृहस्थाला थयांपमध्यें भेंटायाला गेलों असतां परत येतांना काळोखांत वाट चुकून बारावर दोन वाजण्याच्या सुमारास फिरतां फिरतां बंडावर कसे येऊन ठेपलों; शाळेच्या संबंधानें विष्णुशास्त्र्यांशीं बोलणें लावण्यास गांवांत गेलों असतां कालेजाला परत येतांना थंडीनें कितीतरी कुडकुडलों; वचन दिलें असतां शाळा आणि छापखाना काढला त्या वेळेस कोणकोणत्या लोकांनीं मागें घेतलें; असल्या फंदांत न पडणारे कोण कोण मनुष्य त्यांस घेरतां आले; आपले मूळचे हेतु कोणते, व ते कितपत सिद्धीस गेले आहेत; शास्त्री बोवांच्या अकालीं मृत्यूनें आपल्या उद्योगांस केवढा धक्का बसला; आम्हीं आरंभिलेलीं कामें आमच्या हयातींत, व आमच्या पाठीमागें कित्येक वर्षे अप्रतिहत चाललीं तर आमच्या देशस्थितीवर त्यांचा काय परिणाम होईल; या देशावर इंग्रजांचें राज्य झाल्यानें त्याचें कोण कोणत्या बाबतींत हित आणि अनहित होत आहे; लोकशिक्षण उत्तरोत्तर जारीनें पसरत गेलें तर हिंदुस्थानची भावी स्थिति काय होईल; नेटिव संस्थानांची सुधारणा होण्यास काय उपाय करावे; देशभाषा युनिव्हर्सिटींत आणण्याला कोणती युक्ती काढावी; शाळा आणि कालेज बांधण्यास पैसे कसे गोळा करावे; कोल्हापूर प्रकरणांत आपली चुकी किती, आणि आपणांस भोगावी लागत असलेली शिक्षा कितपत न्याय्य आहे; आपण या तऱ्हेनें येथें अडकून राहिल्यानें लोकांच्या मनावर काय परिणाम होईल; व आपल्या शाळेचें आणि छापखान्याचें किती नुकसान होईल; आणीबाणीच्या प्रसंगीं आपणांस कोण कोण मित्र उपयोगी पडले; व पुढें कोणा कोणाच्या मदतीवर आणि शब्दावर अवलंबून राहतां येईल; आतांप्रमाणें फिरून तुरुंगांत न येण्यासाठीं कोणत्या गोष्टींची खबरदारी ठेविली पाहिजे; फिरून तुरुंगांत यावें लागलें तरी ज्या गोष्टी केल्याच पाहिजेत अशा गोष्टी कोणत्या; वगैरे

नाहीं नाहीं त्या विषयांवर आमचा एकेक वेळ येवढया जोरानें वाद चाले कीं, आसपासचे शिपाई "हळू बोला, हळू बोला", असा इशारा करीत, व बोलतां बोलतां रात्र निघून जाई. याशिवाय मुंबईंतील किंवा पुण्यांतील मित्र भेटले आणि त्यांनीं कांहीं हकीकत कळविली, म्हणजे तिची वाटाघाट करण्यानेंही थोडी बहुत करमणूक होई. मधून मधून डांबीस कैद्यांना फटके देतांना ते पहाण्यासाठीं सर्वांना एकत्र बोलावीत, त्या वेळेस ते फटके पाहूनही थोडी बहुत सखेद करमणूक होई!

वरील हकीकत थोड्या फेरफारानें सक्त मजुरीच्या कैद्यांसही लागू करण्यासारखी आहे. सगळ्या कैद्यांस त्यांच्या निजण्याच्या जागेंतून सकाळीं सहा सव्वा सहा वाजतां बाहेर काढतात. हाटलींत (Hard labour yard) दहा शौचकूप आहेत; तेवढ्यांत दीडशेंपासून दोनशें कैद्यांचा विधी पंधरावीस मिनिटांत आटपण्याची मारामार पडते, म्हणून बहुतेक कैदी तें काम कुंडींतच सारून घेतात. यामुळें निजण्याच्या जागी सकाळच्या प्रहरीं बरीच घाण असते. सक्तमजुरीच्या कैद्यांना साध्या कैद्यांपेक्षा दररोज संध्याकाळी दोन औंस अधिक जाडीची भाकर किंवा रोटी मिळते. सक्तमजुरीच्या कैद्यांआधीं सकाळी अर्धा घंटा व संध्याकाळीं एक घंटा आम्हांला जेऊं घालीत. सुपरिंटेंडेन्ट यांनी मेहेरबानी करून आम्हांपैकी प्रत्येकास एकेक काळ्या मातीचा तांब्या दिला होता, त्यांमुळें आम्हांला जेवतांना पाणी पिण्यास सापडे; तसेंच दिवसां किंवा रात्रीं थोडेंबहुत पाणी जवळ भरून ठेवतां येई; सक्तमजुरीच्या कैद्यांस टकोऱ्याशिवाय दुसरें भांडें मिळत नाहीं, यामुळे त्यांना जेवतांना पाणी पिण्यास सांपडत नाहीं, व त्याबद्दल ते फारशी फिकीरही करीत नाहीत. जेवण झाल्यावर एके ठिकाणीं लोखंडाचे पोहरे आणि त्याच धातूच्या रुंद तोंडाच्या पंचपाञ्या किंवा टमरेलें ठेवलेलीं असतात, तीं घेऊन हवें तितकें पाणी एका दमासरशी पिऊन घेण्याची मोकळीक असते! काम करितां करितां, किंवा एखादे वेळेस रात्रीही तहान लागल्यास पाणी पिण्यास मिळण्याची सोय केलेली असते. मुसलमान, हिंदु, व किरिस्ताव यांच्या निरनिराळ्या रांगा करून अन्न वांटण्याची चाल आहे. पीठ आणि कणीक जोखून भाकरी व रोट्या केलेल्या असतात; भात, डाळ, व भाजी देण्याचीं ठरलेलीं मापाचीं भांडीं आहेत. रविवारीं सक्तमजुरीच्या कैद्यांस सकाळच्या झाडसारवणाखेरीज संध्याकाळपर्यंत दुसरें काम नसतें; या दिवशीं सगळ्या कैद्यांस संध्याकाळीं चार वाजल्याबरोबर जेऊं घालून पांच वाजण्याच्या आंत निजण्यासाठीं कोंडून घालतात. सक्तमजुरीच्या व साध्या कैद्यांस एके ठिकाणीं मिसळूं देत नाहीत. साडे सहापासून दहा, अकरापासून दोन, व

आडीचपासून पांच, एकूण साडे नऊ घंटे सक्तमजुरीवाल्यांना डोंगरीच्या तुरुंगांत काम करावें लागतें. दोन आणि अडीच यांच्या दरम्यान ह्या त्या कैद्याला विहिरीच्या पाण्यानें आंघोळ करून घेण्याची मोकळीक असते. प्रत्येक कैद्यास जरूर वाटेल तर महिना दीड महिन्यानें हजामत करून घेण्याची सोय असते. या कामासाठीं दोन वस्तरे आहेत ते दर महिन्याच्या पहिल्या तारखेच्या सुमारास लाऊन आणितात. पाठीमागें कामाचा त्रास नसल्यामुळें आम्हांला पाहिजे तर बाहेरच्याप्रमाणें आठव्या दिवशीं आरास करून घेतां येती; पण तेथला तो चतुर कैदी कारागीर, तें थंड खारें पाणी, ते दिव्य लोणकापी कट्टी वस्तरे वगैरे थाट पाहून स्मश्रू वाढू देणेंच आम्हांस बरें वाटे; शिवाय अंगांतील रक्त एकदां नाहींसें झाल्यावर त्या बिचारीची वाढच खुंटली !

तुरुंगांतील कैदीबायकांच्या संबंधानें मला फारशी माहिती देतां येणार नाहीं. कारण त्या अगदीं एकीकडे एका माडीवर ठेविल्या असतात. कोणी बायको तुरुंगांत येतांना तिच्या अंगावरचे पोर असलें तर तिला तें तिच्याबरोबर आंत आणूं देतात, व त्याच्या खाण्यापिण्याची सोई केलेली असते. तुरुंगांत बायको आली, म्हणजे तिचे केंस कापतात व कांकणें पिचवितात; तरी तुरुंगाचे कडक कायदे अपराधी बायकांचीं डोकीं केवळ संन्याशांचे असोले गोटेच होऊं देत नाहींत; निरपराधी बायकांस तसली विद्रूपता आणणें आमच्या सदय महर्षींच्या धर्माकडे सोपविलें आहे ! बायकांस नेसण्यास माफक लांबीरुंदीचें एकेक काळ्या खादीचें पातळ व त्याच कपड्याची एकेक चोळी असते; व पुरुषांप्रमाणें हीं वस्त्रें त्यांस दर आठवड्यास परटाकडून धुऊन मिळतात. बायकांना पुरुषांइतकेंच खाणें मिळतें असें वाटतें. ख्रिस्ती मडमा आल्यास त्यांस अंडीं, मांस, व ब्रेड वगैरे देतात म्हणून ऐकतों. आम्ही तेथें असतां एक मडम रस्त्यांत दारू पिऊन पडल्या-बद्दल दोन तीन वेळां आली ! बायकांतल्या बायकांत एक मोकद्दमीण केलेली असते. बायकांची व्यवस्था ठेवण्यासाठीं तीस रुपये पगारवाली एक झगेवाली बाई ठेविलेली आहे. बायकापुरुषांना परस्परांना मिळूं देत नाहींत. इतकेंच नाहीं, पण त्यांचें अन्योन्य दर्शनही होऊं देत नाहींत.

**तुरुंगांतील कामकाज :** मोठमोठाल्या सर्व तुरुंगांत नानातऱ्हेचे कारखाने चालतात हें सर्वांस महशूर आहेच; लार्ड रिपन यांच्या ठरावाप्रमाणें ते कधीं बंद होतील ते होवोत, पण अजून ते चालू आहेत. तथापि डोंगरीच्या तुरुंगांत कारखान्याचें काम मोठ्याशा झपाट्यानें चालत नाहीं. तो तुरुंग शुद्ध 'खबूतरखाना' आहे. त्यांत बहुतकरून मुंबईतील डांबीस भामटे व उचले लहान

लहान सजा देऊन अडकवून ठेविलेले असतात. ते कोणतेही उपयोगाचें काम करण्यासारखे नसतात. लांब लांब ठेपीच्या कैद्यांस त्याच शहरांत भायखळ्यावर दुसरा तुरुंग आहे त्यांत किंवा पुण्याठाण्यासारख्या दुसऱ्या एखाद्या मोठ्या तुरुंगांत पाठवितात. तथापि जे लहानसान कारखाने तेथें चालतात, ते नीट चालावे म्हणून दहापाच लांब ठेपीचे कैदी तेथें ठेवून घेतलेले असतात. डोंगरीच्या तुरुंगांत सगळ्यांत सोपें, पण मोठ्या जिकरीचें काम म्हटले म्हणजे सण खोलणें होय. व्यापारी लोक काथ्याची कुचकी जुनीं दोरखंडें आणून देतात तीं फोडून सोडविण्याचें काम येथें बऱ्याच झपाट्यानें चालतें. एक पौंड सण खोलण्यास अर्ध्या आण्यापासून एक आण्यापर्यंत मजूरी द्यावी लागते असें वाटतें. गलबतांच्या आणि आगबोटींच्या चिरा भरण्यास हा सण उपयोगीं पडतो, असें म्हणतात. या तुरुंगांत काथ्याच्या नानातऱ्हेच्या म्याट्स तयार होतात; तसेंच थोडेंबहुत सुतकामही होतें. टीवेल, निरनिराळ्या रंगांच्या सतरंज्या, कधीं कधीं साधे सुती गालिचे, टेबलावरचे कपडे, व कैद्यांच्या पेहरावास वगैरे लागणाऱ्या जाड खाद्या आणि कांबळपट्या येथें निघतात. नऊ कैद्यांकडे पीठ दळण्याचें काम असतें; नऊ मिळून तीन चक्क्या किंवा जातीं चालवितात. या जात्यांवर आमची नेमणूक झाली असती तर आम्हांस कदाचित् १०१ दिवसांतच 'राम' म्हणावें लागलें असतें! याशिवाय तुरुंगांत गरज असेल, व कैदी येईल त्यामानानें सुतारकाम, लव्हारकाम, परीटकाम, शिंपीकाम व कालड्याचें ठिगळकाम चालतें.

**तुरुंगांतील शिक्षा :** धणधकट सक्त मजूरीचा कैदी आला म्हणजे बहुतकरून त्याला गोळ्यांवर किंवा घाणीवर घालतात. गोळ्यांवर घालणें म्हणजे निरनिराळ्या वजनाचे तोफेचे गोळे असतात ते वरखाल (उपरनीचो) करायाला लावणें होय. "घाणी" म्हणून एक लांबच्या लांब वीस पंचवीस पाहिऱ्यांचें स्क्रूचे मोठें लांकडी चाक असते. तें फिरत राहण्यास त्यावर दहा बारा कैद्यांचा भार सतत पडावा लागतो. या चाकास कैदी लोक थट्टेनें 'मोहनाराणी' असें म्हणतात. आपआपसांत शिवीगाळ, भांडाभांडी वगैरे लहानसान अपराधांबद्दल घंटा दोनघंटे हातखोडा किंवा पायखोडा देण्याची चाल आहे. पण जे कोणी विशेष अवखळ किंवा मारामारीखोर असतात त्यांना भक्कम पायबिडी मिळते. कोणचीहि शिक्षा भोगीत असतां कोणी फारच ओरडूं लागला तर त्याला तोंडबिडी घालण्याचा परिपाठ आहे. एखादा कैदी फारच अनावर झाला तर त्याला एकपासून आठ दिवसपर्यंत एकांत आंधाऱ्या कोठडींत कोंडून ठेवितात. तो तेथें असतां त्याला भाताची कांजी खाऊं घालतात म्हणून त्या कोठडीस 'कांजी कोठडी' असे म्हणतात. या सर्व

शिक्षांनाही न जुमानणारा एखादा वस्ताद भेटतो; अशाची गुर्मी जिरविण्यास याला तीन लांकडांवर बांधून त्याच्या उघड्या कुल्ल्यावर दीड दोन डझनपर्यंत वेताचे फटके उडवावे लागतात. कधीं कधीं माजिस्ट्रेटानें दिलेली फटक्यांची शिक्षा कैदी तुरुंगांत आल्यावर तागाच्या गांठीदार नऊपदरी चाबकानें (Cat of nine tails) अमलांत आणली जाते. फटक्यांची कोणतीही शिक्षा देण्यापूर्वी गोऱ्या किंवा तो नसल्यास काळ्या डाक्तराची संमति घ्यावी लागते, व फटके देतांना बहुतकरून तुरुंगांत राहणारा नेटिव्ह मेडिकल अशिष्टण हजर असतो. तसेंच फटके देण्यापूर्वी सगळ्या कैद्यांस फटके देण्याच्या जागीं घांटेने बोलाऊन फटके देण्याचें कारण समजावून सांगण्याची चाल आहे.

**तुरुंगांतील अधिकारी :** मोकदम, साधे वार्डर, सरकारी वार्डर, शिपाई, हवलदार, जमादार, जेलर किंवा सुप्रिटेंडंट आणि डाक्तर हे तुरुंगांतील अधिकारी होत. यांपैकी पहिले तीन सक्तमजूरीच्या कैद्यांतून निवडलेले असतात. मोकदमाला स्वतः काम न करितां दुसऱ्याकडून तें करून घ्यावें लागतें. साध्या वार्डरास तांबडी टोपी व पट्टा असतो, व इतर कैद्यांपेक्षां त्याला थोडेंसें अधिक अन्न मिळतें. सरकारी वार्डराला पायभर पिवळ्या रंगाची तुमान, हातभर काळ्या रंगाचा सदरा, व तांबडी टोपी असते. बाहेरून हा कैद्यासारखा दिसत नाहीं. याच्याकडे कंत्राटदाराकडून रेशन वगैरे तोलून घेण्याचें महत्त्वाचें काम असतें, व हा चांगल्या रीतीनें वागून सुप्रिटेंडंटानें याची शिफारस केल्यास याला वर्षाला एक महिना या मानानें शिक्षेंत सूट मिळते असें सांगतात. बाकीचे पगारदार सरकारी नोकर असतात, सबब त्यांच्या संबंधानें विशेष लिहिण्याची गरज नाहीं. गोऱ्या सुप्रिटेंडंटाला तुरुंगांत बंगला बांधून दिलेला असतो त्यांत राहावें लागतें. गोरा डाक्तर रोज सकाळीं–संध्याकाळीं येऊन गेला म्हणजे बस्स होतें. नेटिव्ह मेडिकल अशिष्टण तुरुंगात नेहमीं राहणारा असतो.

**देखरेख :** नित्याची देखरेख सुप्रिटेंडाकडे असते; तो रोज सकाळीं चोहों-कडून फिरून येतो, व कैद्यांच्या तक्रारी ऐकून घेऊन त्यांचा इनसाफ करितो. कैदी बरोबर काम करिताहेत किंवा नाहीं, त्यांचें अन्न बरोबर रीतीनें दिलें जात आहे की नाहीं, रोटचा व भाकऱ्या बरोबर वजनाच्या केल्या आहेत की नाहींत, शिपाई लोक आपापलीं कामें (ड्यूटी) बरोबर करिताहेत कीं नाहींत, तुरुंगांत चोहोंकडे नीट स्वच्छता ठेविली आहे की नाही, वगैरे गोष्टी पाहण्याकरितां कधीं कधीं हाटलीत व तरळांत मिळून त्याच्या दोन किंवा तीन देखील खेपा होतात. सारांश, तुरुंगांतील व्यवस्थेच्या संबंधानें हरएक प्रकारची जबाबदारी सुप्रिटेंडाच्या माथ्यावर असते.

कैद्यांच्या आरोग्याची देखरेख करणें गोऱ्या डाक्तराकडे असतें. पोटदुखी-सारख्या सटरफटर दुखण्यांत मेडिकल अशिष्टण दवा देतो. रोज सकाळ-संध्याकाळ इस्पितळांतील कैदी बरदाशी औषधांची पेटी घेऊन येतात, आणि कैदी मागेल त्या रोगावर उदारपणें औषधें देत सुटतात. या पेटींत ठेवलेल्या बाटल्यांत शुद्ध मासलेवाईक दवा भरलेला असतो, तसला दवा इंग्लंडांतील मोठमोठ्या केमिस्टांच्या दुकानांत देखील पैदा व्हावयाचा नाहीं. "कासका दवा," "गर्मीका दवा," "झाडेका दवा." सारांश, पाहिजे त्या रोगाचा दवा या पेटींत हात घातल्याबरोबर बाहेर निघतो ! सगळ्यांत पहाण्यासारखी मंजा शनवारी असते; या दिवशी गोऱ्या डाक्तराची पहाणी झडते. सगळ्या कैद्यांना धुतलेला दरेस देऊन एका रांगेनें उभे करितात. मग डाक्तर साहेबांची स्वारी आल्याबरोबर सगळे कैदी माना खालीं घालून डाक्तराच्या तोंडाकडे न पाहतां आपापले खालचे ओठ उघडून उभे राहतात. नंतर लायनीच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत सर्वांच्या ओठाकडे पहात पहात साहेबांची स्वारी विद्युत् वेगानें निघून जाते, कारण त्यांस आणखी तुरुंगाच्या इमारतीचें अनामय आहे कीं नाहीं हें पाहावयाचें असतें. कांहींही म्हणा, इंग्रज लोकांना कर्तव्यकर्म करण्याची चांगली चाड असते. येवढा अफिसर खरा. पण स्वतः शौचकूपांत जाऊन ते स्वच्छ ठेविले आहेत किंवा नाहीं हें पहाण्यास देखील तो कचरत नसे. अन्नाचा शिधा बरोबर आहे कीं नाहीं, हें पहाण्याचें काम डाक्तराचें होय. एका वेळणींत मूठभर तांदूळ, मूठभर डाळ, दोन तीन मिरच्या, चिमुटभर धने वगैरे मसाला, दोन चिमट्या कणीक व बाजरीचें पीठ, पांचचार अमसलें, एक लसणीचा व एक साधा कांदा, एखादा बटाटा आणि थोडासा मुळ्याचा पाला इतकें सामान घालून तें एकदां डाक्तरच्या नजरेखालून पास करून आणविलें कीं त्या संबंधाची सुप्रिंटेंडाची सगळी जबाबदारी भागली. एखादा कैदी अत्यवस्थ आजारी झाला तर मात्र त्याची चांगली निगा केली जाते; त्या स्थितीत त्याला पथ्यपाणी बरें मिळतें, व गरज पडल्यास गोरा डाक्तर दोन तीन वेळां पाहण्यास येतो. तरी इतकें सांगणें जरूर आहे कीं, चांगल्या स्थितीच्या लोकांना तुरुंगांतील इस्पितळ म्हणजे या पृथ्वीवर अवतरलेल्या यमसदनाप्रमाणें वाटतें; आमच्यांपैकी वामनराव रानड्यांस एकदां आवेचा फार उपद्रव झाला होता म्हणून ते तिकडे गेले होते, पण चवथ्या पांचव्या दिवशींच मोठ्या संतोषानें आमच्यांत पुनः येऊन पडले ! नाना भिडे यांची काय दशा आहे ती ठाऊक नाहीं, कारण तुरुंगांत गेल्यानंतर सुमारें पंधरा दिवसांनीं त्यांस ठाण्यास पाठविलें.

सुप्रिंटेंड व डाक्तर यांखेरीज तुरुंगाची देखरेख करण्यास कांहीं व्हिजिटर लोक (प्रेक्षक) नेमिलेले आहेत, ते महिन्यांतून एखादे वेळेस फेरी मारून जातात. शिवाय मुंबईचा कलेक्टर, चीफ प्रेसिडेन्सी माजिस्ट्रेट, एक पाद्री वगैरे कांहीं लोकांची कमेटी असते तीही कधीं कधीं तुरुंगदर्शनास येते. कमीटीपुढें किंवा व्हिजिटरांपुढें कैद्यानें जेलच्या हव्या त्या अधिकाऱ्याविरुद्ध वाटेल ती कागाळी सांगावी असें कायद्यांत आहे. या प्रेक्षकांपैकीं कोणीही आला तरी त्याच्या बरोबर नेहमींचा सुप्रिंटेंड किंवा तुरुंगांतील दुसरा कोणी तरी अधिकारी असतोच; त्याच्या समोर गरीब बिचारा कैदी कागाळी सांगण्यास कितपत धजेल याचें अनुमान वाचकांनींच करावें. व्हिजिटरानें यावें व रांगेनें उभे केलेल्या कैद्यांस "कुच कंप्लेंट हाय" म्हणून विचारावें आणि चालतें व्हावें, असाच फार्स बहुशा उडतो !

**नानातऱ्हेचे कैदी** : तुरुंगात येणारे सर्वच कैदी चोरी, खून, खोटे कागद, विश्वासघात यांसारखे वाईट गुन्हे करून आलेले असतात असें नाही. एकादे वेळेस निरपराधी मनुष्याला शुष्क कारणावरून किंवा गुन्ह्याच्या संशयावरून तुरुंगांत जावें लागतें. वास्तविक पाहिलं तर शेंकडा तीस कैदी मात्र खरोखर गुन्हेगार सापडतील, बाकीच्या दोन तृतीयांशांत विलक्षण प्रकारची भेसळ असते. कित्येकांना बाहेर पोटाला मिळत नाहीं म्हणून ते कोणाची कांहीं तरी कुरापत काढून शिवीगाळ किंवा मारामारी करितात, आणि तुरुंगांत येऊन पडतात. कांहीं जण अज्ञानामुळें किंवा मूर्खपणामुळें कायद्याच्या तावडींत सांपडतात, व नसत्या अपराधाबद्दल त्यांच्यावर टकोरी झोडण्याचा प्रसंग येतो. कित्येक दुसऱ्याच्या नादीं लागून फसून येतात. कित्येक शुद्ध वेडे असतात, व शहाणे सरकारी अधिकारी नीट चौकशी न करितां त्यांना उचल कीं दे तुरुंगांत टाकून असें करितात. तुरुंग म्हणजे लोकांस असें वाटतें कीं एकत्र केलेल्या दुष्ट लोकांचें वसतिस्थान होय. त्याच्या भिंताडावरून आलेला वारा लागला तरी अपाय होण्याची भीति असते. पण ही भीति अगदीं निराधार आहे. लोकांनीं तुरुंगाचा विनाकारण येवढा बागुलबोवा करून ठेविला आहे. शिवाय लोक समजतात त्याप्रमाणें त्यांत मनुष्यजातीचा अत्यंत निंद्य भाग असतो असें मानिलें तरी त्याचा तिरस्कार करणें आपणांस योग्य नाहीं. लोक अपराध करितात याचें कारण त्यांना शिक्षण मिळत नाहीं हें होय. श्रीमंत व सुशिक्षित घराण्यांतील लोकांकडून फारसा गुन्हा होत नाहीं, हें निरनिराळ्या देशांतल्या तुरुंगांच्या रिपोर्टांवरून सिद्ध होतें. कोणत्याही देशांतील एकंदर तुरुंगांची आणि त्यांतील लोकांची संख्या कमी होत जाणें हें त्या देशाच्या वाढत्या सुधारणेचें चिन्ह होय.

लोकांनीं सुशिक्षित व सदाचरणी होऊन स्वत:चीं व सार्वजनिक कामें नेकीनें करावीं, आणि संसारवृक्षाच्या स्वादु फलांचा उपभोग घ्यावा, हाच ऐहिक सुधारणेचा मुख्य उद्देश होय. उच्च कुलांत जन्मास येणें हें कोणाच्या स्वाधीन नाहीं. अभिजनत्व ही बाह्योपाधीवर अवलंबून राहणारी साहजिक गोष्ट होय. ती ज्यास परिश्रमाशिवाय प्राप्त झाली त्यांना फुशारकी मारण्याचें कांहीं कारण नाहीं. मनुष्यतेला कलंक आणणारे अपराध ज्या देशांत घडून येत असतात, त्या देशांतील सुधारणा कितीही प्रबल झाली असली तरी तींत कांहीं हाशील नाहीं. सबब सर्व सदय, देशाभिमानी, सुशिक्षित, आणि श्रीमंत लोकांनीं अपराधी मनुष्यतेचा कंटाळा न करितां ती सद्‌गुणी करण्यासाठीं रात्रंदिवस झटलें पाहिजे. एकत्र असलेल्या घराण्यांत निघालेला दुर्गुणी मनुष्य ज्याप्रमाणें त्याच्या अवस्थतेला आणि बेअब्रूला कारण होतो, त्याप्रमाणें कोणत्याही देशांतील दुराचारी लोक त्या देशाच्या सार्वजनिक विपत्तीला आणि दुर्लौकिकाला कारण होतात; असो. आम्ही तुरुंगांत असतां तेथें कैद्यांचे जे तऱ्हेवाईक मासले आमच्या दृष्टीस पडले ते पाहून आम्हांला कित्येकदां पराकाष्ठेचें वाईट वाटे. एक वाणी आला होता त्यानें आल्या दिवसापासून शिरापुरीचा आणि विडयांचा नाद धरिला होता. त्याला हवी ती शिक्षा करून पाहिली पण त्यानें आपला नाद म्हणून सोडिला नाहीं. शेवटीं तो इतका खंगला कीं त्याला इस्पितळांत धाडणें भाग पडलें. दुसरा एक मुसलमान होता त्याला हवी ती शिक्षा केली तरी बोलायचा नाहीं आणि कोणतेंही काम करायचा नाही. दुसऱ्या एकाला काम करितां करितां घुरें येत असे; तें आलें म्हणजे त्याची जी स्थिति होई ती पाहून आम्हांला रडें कोसळे. कोणी एक पांच सात तुरुंगांचें पाणी पिऊन आलेला कैदी होतां, त्याने शुष्क कारणावरून आपल्या टकोऱ्यानें शिपायाचा कपाळमोक्ष केला, व त्या अपराधाबद्दल त्याला पंचवीस फटके दिले तरी त्याच्या डोळ्यांतून टिपूस देखील निघालें नाहीं ! दुसऱ्या एका गब्रूला फटके द्यावयाच्या लांकडांपासून खुलें केलें न केलें तों तो असें म्हणाला कीं " मागे...कशाला मारतां, पुढें.. हवें तितकें मारा !"

डेकोस्टा या नांवाच्या बिनमजूरी कैद्याची आणि आमची कांहीं दिवस गांठ पडली होती. तुरुंगांत आल्यापासून पहिल्या पंधरवडयांत त्यानें कोणाशीं चकार शब्द देखील काढिला नाहीं. रजिष्टर होतांना त्यानें एक दोन गुद्दे खाल्ले तेव्हा कारकुनास आपलें नांव सांगितलें. पहिल्या पंधरा दिवसांत आम्हीं हवी तितकी खटपट केली, पण त्यानें म्हणून कांहीं आपल्या तोंडाचें कुलूप काढिलें नाहीं. सगळे लोक याचें माथें फिरून तो पिसा झाला आहे असें समजत. आम्हीं

फारच जिकीरी केली तर तो एखादे इंग्रजी वाक्य बोले. संध्याकाळीं कैद्यांस निजण्याच्या खोलींत कोंडिलें म्हणजे त्यांना यथास्थितपणें नागवें करून त्यांची झडती घ्यावी, व त्यांना निजावयास द्यावयाचीं चिरगुटें झाडून द्यावीं अशी चाल आहे. डेकोस्टाची झडती घेतांना त्यालाहि इतरांप्रमाणें नागवें होऊन उठाबशा काढाव्या लागत. पुढें असें होऊं लागलें कीं, झडती घेणाऱ्या शिपायांत एक आनंदी स्वभावाचा हवलदार होता, त्यानें नांव काढिलें कीं आमच्या मुखस्तंभ डेकोस्टाला हसूं येई, व कांही दिवसांनीं उठाबशांची कल्पना त्याच्या मनांत आली कीं तो जोरानें हंसत सुटे, व कधीं कधीं त्याची ती हंसण्याची लहर दोन तासपर्यंत टिके. पुढें पुढें तो फारच मोठ्यानें हंसूं लागला, व एके दिवशीं सकाळीं राजश्रींची एकाएकीं कळी उमलली. पहिल्या प्रथम तो टिळकांशी बोलूं लागला व त्याच्या बोलण्यांत कोणत्याही प्रकारचा विसंगतपणा दिसला नाहीं. मीं एल्. एम्. अँण्ड एस्. ची परीक्षा दिली आहे, माझी माट्रीक्युलेशन परीक्षा ७२ त झाली. माझी स्वतःची डिस्पेनसरी (दवाखाना) नाहीं, रोग्यांना पहाण्यास जाण्यासाठी मी आपलें घर कधींच सोडीत नाहीं, जो मजकडे येईल त्यापासून मी १ रु. फी घेऊन औषध मात्र लिहून देतों, मी जात्या भिडस्त आणि लाजाळू आहे, आम्हां पोर्तुगीज लोकांत एकानें दुसऱ्याची ओळख पाडून दिल्याखेरीज कोणी कोणाशीं बोलणें सुरू करीत नाहीं, मीं अमकें वाचिलें आहे, तमकें केलें आहे, पुढें मागें मी यंव करणार, मी त्यंव करणार. याप्रमाणें त्यानें सुमारें दीड तास अस्खलित भाषण केलें; त्याच्या बोलण्यावरून निदान तो बराच बहुश्रुत असावा असें दिसलें. इतका प्रकार झाल्यावर आम्हांस स्वाभाविकपणें त्याच्याबद्दल वाईट वाटूं लागलें, व तो मौनव्रतस्थ असतां त्याला आम्हीं जें जें टाकून बोललों होतों, व जी जी थट्टा केली होती, त्याबद्दल त्याची क्षमा मागितली! वरील सगळें बोलणें टिळकांशीं झालें; नंतर त्यास मी जाऊन मिळालों. आम्हां दोघांशींही डेकोस्टा साहेब बराच वेळ नीट बोलले; पुढें एकाएकीं त्यास काय वाटलें कोण जाणे; त्यानें मला असा प्रश्न केला कीं, तुमच्या जवळ कोण बसला आहे हें तुम्हांला ठाऊक आहे? व माझ्याकडून उत्तर येण्याची वाट न पाहतां मी प्रिन्स आफ् वेल्स आहें, जान डेकोस्टा हे खोटें नांव घेऊन तुरुंगांच्या आंतील स्थितीचा प्रत्यक्ष अनुभव घेण्यासाठीं मी येथें आलों आहें; अशा प्रकारची निरनिराळीं नांवें घेऊन लोकांची विपत्ति पहाण्याकरितां मी अनेक ठिकाणीं फिरतों...(मला उद्देशून), तुमचा तोंडवळा मला चीनच्या बादशहाच्या तोंडवळ्यासारखा दिसतो; इतकेंच नाही; मी जसा प्रिन्स आफ् वेल्स, तसे तुम्हीही चीनचे बादशहाच असाल; कुणाला ठाऊक, तुम्ही कदाचित् अमेरिकेचे

प्रेसिडेंट असाल, माझी आई व्हीनस (शुक्र) होती; ती समुद्रांतून नग्न निघून आकाशांत जाऊन बसली ! याप्रमाणें बोलतां बोलतां आमच्या खुळ्या तत्त्ववेत्त्याची स्वारी जेव्हां बरळूं लागली तेव्हा आम्ही चपापलों, व आम्हांस अशी शंका आली कीं हे पंडित बहुतकरून एकविषयभ्रान्त (Monomaniac) असावेत ! दोन तीन दिवसांत आमची शंका पूर्णपणें निरस्त झाली. अनौरस मुलाला सरकारने ठरवून दिलेली पोटगी न देण्याबद्दल डेकोस्टाला एक महिन्याची साधी सजा दिली होती. नांवात काय ते सगळें सामर्थ्य आहे, कोणत्याही व्यक्तीचें नांव घेतलें की आपण ती व्यक्ति बनलों, व तिची सर्व सत्ता आपणास प्राप्त झाली, अशा प्रकारचा बुद्धिभ्रंश याच्या मेंदूत खिळून गेला होता. तो धर्म, नीति, वैद्यक वगैरे कठीण विषयांवर बराच वेळपर्यंत न अडतां बिनचुक इंग्रजी बोले, व मध्येंच लहर आली कीं, मी मुरारजी गोकुळदास होणार, मी गोकुळदास तेजपाळ, किंवा सर मंगळदास नथुभाई होणार, मी राथचाइल्ड किंवा लार्ड नेपीअर आफ् मागडाला याचें नांव घेणार, असा बरळूं लागे. एकदां त्यानें आम्हांस असें सांगितलें कीं माजिस्ट्रेटापुढे मी एक शब्द देखील बोललों नाहीं ! तो सुटला त्या दिवशीं त्यानें मोठ्या प्रेमानें व आदबीनें बोलल्या चालल्याबद्दल आमची क्षमा मागितली, व सगळ्यांशीं शेकह्यांड करून निघून गेला ! दुसरा एक निःशक्त वेडसर लंगडा भामटा फाणस चोरल्याबद्दल आला होता; त्याची महत्त्वाकांक्षा काय होती कीं, साधल्यास पोलिस सुप्रिटेंड गाडींत बसला असतां घोड्यांसकट त्याची गाडी लांबवावयाची ! या गृहस्थाची सुरत, याचें बोलणें, याचें दुडकी पळणें, व याच्या पराक्रमांचा इतिहास ऐकून आमचें हसतां हसतां पोट दुखूं लागे. दुसरा एक वेडगळ होता, तो "बाबा बाबा" म्हणून ज्याच्या त्याच्या पायां पडत सुटे. आठ दहा वर्षांच्या लांब ठेपीचे जे कैदी असतात, त्यांना तुरुंग म्हणजे आपल्या घराप्रमाणें वाटूं लागतो. इतर कैद्यांपेक्षा ते आपणांस प्रतिष्ठित समजतात, व त्यांच्याकडून त्यांना थोडाबहुत मानही मिळतो ! एक बगीवाला लहान लहान सजा घेऊन आम्ही असतां तीन वेळ आला; व त्यापूर्वी तो दहा पंधरादां आला असलाच पाहिजे, असें त्याच्या सांगण्यावरून निघालें. त्याचा अभिमान येवढाच असें कीं, आपणास ज्या शिक्षा मिळतात त्या दारू पिऊन छाकटेपणा करण्याबद्दल काय त्या मिळतात ! त्याचें म्हणणें असें असे कीं, मनुष्याने चोरी मात्र करूं नये, बाकी खायला न मिळालें तरी बेहत्तर आहे, पण ग्लास दोन ग्लास ब्रान्डी ही झोंकलीच पाहिजे, त्याशिवाय कोणाचे हातपाय चालायाचेच नाहींत ! असो. वरील तऱ्हे तऱ्हेच्या कैद्यांचे मासले सांगण्याचा हेतु इतकाच आहे कीं तुरुंगांत जो गेला तो

पक्का डांबीस असला पाहिजे असा जो लोकांचा खोटा समज झालेला आहे, तो थोडाबहुत तरी दूर व्हावा. त्याप्रमाणेंच न्याय करण्याचें काम ज्यांच्याकडे असतें त्यांनी असल्या माणसांच्या स्थितीविषयीं बारकाईनें चौकशी करून मग त्यांना शिक्षा कराव्या. तसेंच तुरुंगाचे जे अधिकारी असतात त्यांनींही असल्या लोकांच्या संबंधानें आपला कडकपणा थोडासा ढिला केला पाहिजे; कारण ज्याला ज्ञानच नाहीं, किंवा होऊं शकत नाहीं, त्याच्या शरीराला व्यर्थ पीडा देऊन काय फायदा होणार !

तुरुंगांत कोणताही अमली पदार्थ आणूं नये, किंवा त्याचें सेवन करूं नये असा तुरुंगाचा सक्त नियम आहे; दारू, गांजा वगैरे विशेष जालीम पेयद्रव्यें किंवा धूम्रद्रव्यें याचा रिघाव तेथें होत नाहीं, पण तमाखूबाई साता पाहऱ्यांतून थोडेंबहुत आपलें बोट शिरकविल्याशिवाय राहत नाहींतच! या वल्लीविषयीं मुंबईकडील हलक्या लोकांची जी आसक्ति झाली आहे ती सांगतां पुरवत नाहीं. तुरुंगांत प्रवेश करितांना समिध शेकून बाहेर आल्याखेरीज अग्निसिद्धि न करणारा असा धाराग्निवाला त्यांच्यांत मिळणें फार कठीण होय ! त्यांचें टपाल आणि दळणवळण कसें चालतें तें ईश्वर जाणे. दररोज थोड्याबहुत नव्या विड्या आणि काड्या आंत येतातच. विडी ओढण्याचें कांहीं अंशीं सुरक्षित स्थान शौचकूप होय. विडी ओढण्यासाठीं हे लोक इतके आतुर झालेले असतात कीं, खालच्या वेष्टणापर्यंत जळत आलेली विडी शौचकूपांतल्या घाणींत पडली असली तरी ते ती उचलून घेऊन तोंडाला लावण्यास मागें पुढें पहाणार नाहीत ! कडक सुप्रिटेंड असल्यास त्यानें पांच सात फटके दिले तरी पुरवले, पण विडी ही ओढलीच पाहिजे ! रोज संध्याकाळीं कैद्यांस निजण्यासाठीं कोंडून घालितांना त्यांची झडती घेतात असें सांगण्यांत आलें आहे. मनुष्य एकदां तुरुंगांत येऊन पडल्यावर दररोज त्याची झडती घेण्याचें प्रयोजन काय, अशी शंका कोणाच्याही मनांत सहज उत्पन्न होणार आहे. तिच्या निरसनार्थ एवढेंच सांगणें पुरे आहे कीं, कधीं कधीं एखाद्या अट्टल कैद्यापाशीं चव्वल पावला सांपडतो ! एका बाईची अशी गोष्ट सांगत कीं, तिचा माजिस्ट्रेटाच्या कचेरींत पोलिसानें झाडा घेतला त्यांत कांहींएक निष्पन्न झालें नाहीं; पण तीच बया शिक्षा होऊन तुरुंगांत आली, व तेथील सुप्रिटेंड मडमेनें तिचा झाडा घेतला तेव्हां सुरक्षित-स्थानीं ठेवलेल्या तीनशें रुपयांच्या नोटा निघाल्या ! ! त्याप्रमाणें आम्ही असतां एक अफीणबाज आला होता, त्याला नागवा करून इकडे तिकडे चाचपून पाहिलें तों कांहीं एक निघालें नाहीं; पण त्याला उठाबशा काढायाला लाविलें, तेव्हां अफूची एक लहानशी गोळी गुह्यस्थानांतून फट्‌दिशीं उडून पडली ! ! असल्या

कपींपुढें कांही इलाज नाहीं. अशांकडून उठाबशा काढविल्या, किंवा तोंड उघडून पाहिलें किंवा कानांचीं भोंकें चाचपलीं म्हणून कोणालाही वाईट वाटण्याची गरज नाहीं! लहान लहान पोरें व तरुण बाप्ये रात्रीं एका खोलींत कोंडण्याची मोठीच भीति असते!!!

तरळ (Trial Yard) म्हणून तुरुंगाचा एक भाग असतो, त्यांत शिक्षा होण्यापूर्वी आलेले कैदी ठेविले असतात. ज्यांना जामीन मिळत नाहीं, किंवा ज्यांच्या गुन्ह्याबद्दल कायद्याप्रमाणें जामीन घेतां येत नाहीं, माजिस्ट्रेटापुढे चौकशी होऊन खटला सेशन कमिट झाल्यावर ज्यांना जामिनावर सोडतां येत नाहीं, किंवा सेशनांत चौकशी होऊनही ज्यांची शिक्षा सांगितली गेली नाहीं, अशा प्रकारचे सर्व कैदी या भागांत असतात. बिनमजुरी कैद्यांप्रमाणें यांना कांहींएक काम नसतें. घरून पाहिजे तर आपलें अन्न आणविण्याची यांना मोकळीक असते; तसेंच कपड्यांपैकीं एक धोतर व एक बंडी वापरूं देतात. पण ज्यांना अन्न आणविण्याची सोय नसेल किंवा वापरण्याजोगे घरचे कपडे नसतील त्यांना तुरुंगाचा खाना आणि पेहराव मिळतात. डोंगरीच्या तुरुंगांतील तरळांतल्या (मुख्यत्वेंकरून दुसऱ्या मजल्यावरच्या) खोल्या हाटलीवरच्या खोल्यांपेक्षां मोठ्या असून त्यांत उजेडही पुष्कळ पडतो व वारा पुष्कळ चालतो, आणि त्या पूर्वपश्चिमाभिमुख असल्यामुळें त्यांच्या खिडक्यांतून वाळकेश्वराकडील देखावा दिसतो, व शुक्लपक्षांत गजांतून चांदणें आंत येतें, इतकेंच नाहीं तर चंद्रदर्शनही होतें. कांहीं दिवसपर्यंत आम्हांस हाटलीवरून काढून या कोठड्यांत घातलें होतें, पण एके दिवशीं आम्ही जेवाव-यास बसलों असतां सुप्रिंटेंड साहेबांची स्वारी आली, त्यासरशीं टकोरें एकीकडे सारून आम्ही उभे राहिलों नाहीं म्हणून साहेब मजकूर फारच खप्पा झाले व त्यांनीं आम्हांस हपिसांत नेऊन मी यंव करीन त्यंव करीन अशी बरीच ताकीद दिली, व दुसरे दिवशीं तेथून काढून आम्हांस पुनः हाटलीवर घातलें! तेथे आम्ही सुटेतोंपर्यंत होतों. आक्टोबरच्या पहिल्या आठवड्यांत डाक्तर क्रूकशांक हे तुरुंगाची पहाणी करण्यास आले होते, त्यावेळेस त्यांनीं आमच्या संबंधानें बरीच चौकशी केली, आमच्याशीं दोन गोड शब्द बोलले, व आम्हांला सगळ्या दिवसभर बराकींत कोंडून न घालतां कांहीं वेळ मोकळेपणीं इकडे तिकडे फिरूं द्यावें असें सुप्रिंटेंड साहेबांस सांगितलें; तेव्हांपासून सव्विसाव्या आक्टोबरपर्यंत सुप्रिंटेंड साहेबांनीं आम्हांला फारच ममतेनें वागविलें याबद्दल, व आम्ही तुरुंगांत गेल्यापासून सुटेपर्यंत कोणीही मित्र महत्त्वाच्या कामासाठीं भेटावयास कितीकदां जरी आले तरी त्यांनीं आम्हांस भेटूं दिलें, व त्यांच्याशीं स्वस्थपणें बोलूं दिलें,

तसेंच कामकाजाच्या संबंधानें जरूर पडे तेव्हां कोणत्याही प्रकारची चिसचिस किंवा जिकीर न करितां पत्रें लिहूं दिलीं, हव्या त्यावेळीं पाहिजे तीं पुस्तकें आंत आणूं दिलीं—या सगळ्यांबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों.

येथपर्यंत तुरुंगांतील साधारण शिस्त सांगितली; आतां तींत कोणते फेरफार करतां येतील, या दुसऱ्या मुद्याकडे वळण्यापूर्वी तुरुंगांतील सरकारी नोकर लोक व मुख्यत्वेंकरून सुप्रिटेंड यांनीं कसें वागावें, याविषयीं दोन शब्द लिहितों. तुरुंगांत येणारा प्रत्येक मनुष्य कांहीं तरी अपराध करून येतो, निदान न्यायाधीशाच्या नजरेनें तो अपराधी ठरला जातो म्हणून येथें येतो, हें उघड आहे. अपराधाबद्दल मनुष्याला तुरुंगांत पाठविण्यांत कायद्याचा हेतु इतकाच आहे कीं, केलेल्या दुष्कर्माबद्दल गुन्हेगाराला थोडेंबहुत दुःख भोगण्यास लागून तसलें वर्तन करण्याबद्दल त्याच्या अंतःकरणाची झालेली प्रवृत्ति नाहींशी करावी, व त्याला होणारी पीडा पाहून इतरांनीं तसले अपराध करूं नये. हा हेतु सिद्धीस नेण्यासाठीं कायदे करणारांस विचार करतां योग्य वाटल्या तशा शिक्षा सांगितल्या आहेत, व कैद्यांना कसें वागवावें याबद्दलचे नियम घालून दिले आहेत. त्या नियमान्वयें वर्तन करणें हें सर्व नोकरांचें कर्तव्यकर्म होय. रागाच्या झपाट्यांत, अधिकाराच्या तोऱ्यांत, किंवा जात्या दुष्ट स्वभावामुळें त्यांचें उल्लंघन करणें हा मोठा अपराध होय. मागें एके ठिकाणीं निर्दिष्ट केलेल्या कारणावरून असें दिसतें कीं, तुरुंगांतील कैदी कितीही आडदांड किंवा आडमूठ असले तरी कर्तव्य संभाळून त्यांना जितक्या ममतेनें वागवितां येईल तसें वागविणें हेंच मनुष्याच्या मनुष्य-पणाला योग्य होय. अशा प्रकारचे नोकर लोक डोंगरीच्या तुरुंगांत आहेत, व त्यांनीं आपलें कर्तव्य संभाळून आम्हांस आमच्या स्थितीबद्दल वाईट वाटूं न देण्याविषयीं वेळोवेळीं दोन गोड शब्द बोलून होईल तितकी खटपट केली, हें कळ-विण्यास आम्हांस आनंद वाटतो. शिपायापासून सुप्रिटेंडच्या खालच्या नोकरापर्यंत आम्हांस कधीं कोणीं एका अपशब्दानें सुद्धां दुखविलें नाहीं. आम्ही उचललेला पक्ष, त्यांत आम्हांस अपयश येण्याचीं कारणें, आमचे उद्देश व आमची स्थिति, आणि आम्हांस भोगण्यास लागलेल्या शिक्षेची न्याय्यता वगैरे गोष्टींचें ज्ञान महाराष्ट्र देशांतील सगळ्या लोकांस खडान् खडा झालें असल्यामुळें प्रत्यक्ष आमचे शत्रु जरी तुरुंगांतील नोकर असते तरी त्यांना देखील आम्हांला त्रास देववला नसता. मग ज्यांना आमच्याकडे वक्रदृष्टि करण्याचें कांहीं एक कारण नव्हतें, अशा उदासीन तिऱ्हाईत नोकरांना आम्हांस विनाकारण त्रास देण्याची बुद्धि कोठून होणार? सरकारी नेटिव नोकरांसच काय, पण कैदी लोकांना देखील आमची दुर्दशा पाहून वाईट वाटे, व ते फार हळहळत. असो. कैदी लोकांना

दुःखांत थोडें बहुत सुख होणें हें पुष्कळ अंशीं तुरुंगाच्या सुप्रिंटेंडावर अवलंबून असतें. तुरुंगांत म्हणून जो आला तो पक्का बदमाश असला पाहिजे; न्यायाधीशानें ज्या दिवशीं शिक्षा सांगितली त्या दिवशीं मनुष्यपणाच्या सर्व हक्कांस तो मुकला, व उभे छळून घेण्यास पात्र झाला; कैदी म्हणजे सुप्रिंटेंडाच्या राखणीस घातलेलीं गुरें, किंवा तावडींत दिलेले गुलाम होत, घेण्याची व त्यांना हवी ती शिक्षा देण्याचा त्याला अधिकार आहे; गुन्हा करून तुरुंगांत आलेल्या कैद्याच्या खाण्यापिण्याची किंवा प्रकृतीची विशेष काळजी घेण्याची गरज नाहीं, फक्त त्यांच्याकडून चोपून काम घेतलें म्हणजे झालें; तुरुंगाधिपतीची स्वारी येऊन उभी राहिल्याबरोबर टर्कीच्या सुलतानास त्याचे गुलाम जो मान देतात, व त्याच्या पुढें ज्या प्रकारची लीनता दाखवितात, तसला मान व तसली लीनता त्याच्या पुढें कैद्यांनीं दाखवावी; क्षुल्लक अपराधाबद्दल त्यांना दहा बारा तासांचा खोडा देणें जरूर आहे; कोणी थुंकला, कोणी खोकला तरी त्याला शिक्षा दिलीच पाहिजे —असल्या प्रकारचे अनुदारपणाचे व वेडगळपणाचे समज सुप्रिंटेंडाच्या मनांत वागतां कामा नयेत. कोणत्याही कारखान्याचा किंवा हापिसाचा जो हेड म्हणजे मुख्य अधिकारी असतो त्याच्या चांगुलपणावर खालच्या लोकांचें कल्याण-अकल्याण, व सुख-दुःख हीं अवलंबून असतात. तो हलक्या कानाचा, क्रूर, किंवा कवडीचुंबक असूं नये. त्याची दृष्टि उदार असून त्याचें वागणें दिलदारीचें असलें पाहिजे. नाहीं तर शुष्क कारणाबद्दल कर या शिपायाला रुपया दोन रुपये दंड, दे त्या शिपायाला किंवा कारकुनाला नोकरी-वरून पिटाळून, कांहीं कारण झालें न झालें तों कर त्याच्यावर खटला उभा, मागें पुढें न पहातां सूट ज्याच्या त्याच्या अंगावर खेकसत, थोड्या चुकीबद्दल जा वाघासारखा चवताळून, नाहीं तर उडव मेघासारखा शिव्यांचा कडकडाट,... असल्या हलकट वर्तनानें हाताखालचीं मनुष्यें अत्यंत कंटाळून जातात, व त्याच्यावर उलटून पडतां येण्याच्या प्रसंगाची वाट पहात असतात. बाकीच्या मुख्य हपिसराचें कसेंही असो; तुरुंगाच्या सुप्रिंटेंडानें अशा संबंधानें फारच काळजी घेतली पाहिजे. कारण तुरुंगांत जे कैदी येतात, त्यांपैकीं कांहीं जिवावर उदार झालेले असतात, व त्यांना निष्कारण त्रास दिल्यास एखादे वेळेस त्रास देणाराच्या प्राणावर घाला येऊन बेतण्याचा संभव असतो. कैद्यांना त्रास दिल्यामुळें त्यांच्या संतापाग्नीला आहुती पडलेल्या जेलरांचीं आणि सुप्रिंटेंडांची या देशांत आणि दुसऱ्या देशांत पुष्कळ उदाहरणें आहेत. दुसऱ्याला सुख देण्याची बुद्धि नसली तर नसली, पण स्वतःवर तरी दुःखाचा प्रसंग येऊं न देण्याविषयीं प्रत्येकानें खबरदारी ठेविली पाहिजे; तसें तो न करील तर तो आत्मवैरी किंवा आत्मघातकच समजला

पाहिजे. आम्ही डोंगरीस असतां भायखळयाच्या तुरुंगांतील कोणी एक इंग्रज कांहीं दिवसपर्यंत आमच्या तुरुंगाचा सुप्रिटेंड नेमिला होता, त्याला कैदी लोकांनीं आपला "मायबाप" म्हणावें असेंच त्याचें त्यांच्याशीं वर्तन होतें. त्याचें सौजन्य पाहून आम्हांस असा विस्मय होई कीं, अशा स्थितींत आमच्याशीं इतक्या सानुकंपसरलतेनें वागण्यासारखें याचें आम्ही काय केलें आहे ! पण जात्या जे सज्जन असतात त्यांची अशीच नैसर्गिक वृत्ति असते.

येवढा वेळ तुरुंगांत असलेल्या साधारण व्यवस्थेविषयीं जितकी माहिती देणें जरूर वाटलें तितकी दिली. आतां तींत कोणकोणते फेरफार करण्यासारखे आहेत, हें सांगावयाचें राहिलें. एकदा या मुद्यावर बरेंच लिहावें असें माझ्या मनांत होतें, पण आतां तो बेत फिरविला आहे, आणि या पुस्तकाचा हा भाग अगदीं थोडक्यांत आणण्याचें योजिलें आहे. कारण एक तर पहिला भाग वाटत होतें, त्यापेक्षां विशेष लांबला; आणि दुसरें कारण असें कीं आमच्या मनांत या संबंधानें सरकारास निराळेंच पत्र पाठवायाचें आहे. त्या पत्रांत या प्रकरणाचा खुलासेवार विचार करणार आहों. पत्र लिहिलें म्हणजे ते **मराठ्यांत** किंवा **केसरींत** छापून प्रसिद्ध करूं, म्हणजे त्यांतील मजकूर वाचकांना पहाण्यास सांपडेल. तुरुंगांतील कैद्यांचे हाल होण्यास एकूण कारणें तीन. १. तेथील शिक्षेचा कडकपणा; २. तेथील अन्नाचा नीरसपणा; आणि ३. तेथें नीत्युपदेशाचा अभाव.

लहानसान अपराधाबद्दल घटका दीड घटका पायखोडा किंवा हातखोडा देणें, याला कोणी वावगें म्हणणार नाहीं. पण एखाद्या मोठ्या अपराधाबद्दल रोज चार तासांप्रमाणें तीन किंवा चार दिवस हातखोडा देणें हें अगदीं अप्रशस्त होय. तसेंच फटक्यांची शिक्षा म्हणजे अतिशय जबर अपराधासाठीं राखून ठेविली पाहिजे. ती वरचेवर दिल्यानें तिची भीति नाहींशी होते इतकेंच नाहीं, तर वरचेवर मार खाल्ल्यानें कैदी लोचट व हट्टी होतात, आणि शिक्षा देणाराबद्दल त्याच्या मनांत तेढें बसून जातें. फटक्यांची शिक्षा वारंवार देणें जसें चांगलें नाहीं, त्याप्रमाणें कांजीकोठडीतही फार वेळ कोंडणें चांगलें नाहीं. या कोठडींत एकांत असतो इतकेंच नाहीं, पण उजेडही नसतो. उजेड हा मनुष्याच्या आरोग्याला अत्यंत आवश्यक आहे, हें सांगितलें पाहिजे असें नाहीं. अंधारांत किंवा सावलींत लावलेलीं झाडें जशीं खुरडतात, किंवा वाढत नाहींत, त्याप्रमाणें अंधारांत मनुष्याची स्थिति होते. कांजीकोठडीत घालतांना सशक्त असलेले कैदी बाहेर पडले तेव्हां निःशक्त आणि पिवळे धमक झालेले आम्हीं पाहिले. एका प्रकारें कांजीकोठडीची शिक्षा फटक्यांपेक्षांही भयंकर आहे असें म्हणण्यास

हरकत नाहीं. तिनें हालोहाल मनुष्याची शक्ति नाहींशी होते. आठ दिवसांत मनुष्य पालीसारखा पांढरा होऊन जातो. अशा रीतीनें एकदा क्षीणता आंगीं आली, व पुढें चांगलें अन्न मिळालें नाहीं, म्हणजे ती क्षीणता आंगांत खिळून जाऊन जन्मभर कैद्याचें मोठें नुकसान होण्याचा संभव असतो. दिवस अर्धा दिवस कांजीकोठडींत एखाद्याला कोंडून घातलें तर ती निराळी गोष्ट; पण एक आठवडापर्यंत कोंडून घालणें, हा शुद्ध वेडेपणा होय. मला असें वाटतें, कीं तुरुंगांतील बहुतेक अपराधांबद्दल एक वेळचें जेवण न देणें हीच बरी शिक्षा होईल. भुकेनें दांडगा मनुष्य जसा वळणीस येतो, तसा दुसऱ्या कशानेंही येत नाहीं. आपल्यांत म्हण आहे कीं "कोणाच्या पोटावर मारूं नये पाठीवर मारावें"; कारण, पोटाच्या शिक्षेनें मनुष्य तेव्हांच बेदम होतो, व मेटा-कुटीला येतो. कोणी असें म्हणतील कीं अन्न तोडल्यानें कैद्यांची शक्ति लवकर नाहींशी होणार आहे. माझें त्यांच्या आक्षेपावर असें उत्तर आहे कीं, तुरुंगांतलें खाणें कितीही वाईट असलें तरी आपल्या येथील सशक्त भिकारी जे असतात त्यांच्या अन्नापेक्षां वाईट नसतें. ज्याला दररोज कसदार व स्वच्छ अन्न खाण्याची संवय आहे, त्याची तुरुंगांत हालबेलंडी उडते हें खरें आहे; तथापि ज्यांना पोटभर भाकर बाहेर मिळण्याची मारामार पडते, त्यांना तुरुंगांतला वेडावांकडा भात आणि जाडीभरडी भाकर व जळजळीत कोरड्यास हींच पथ्यावर पडतात. पुष्कळ गरीब लोक तुरुंगांतून बाहेर पडतात, तेव्हां त्यांचें वजन शेर दीडशेरानें वाढलेलें असतें. चिरगूटपांघरुणाची, व खाण्यापिण्याची ज्यांना सुबत्ता आहे, त्यांचे तुरुंगांत हाल होऊन ते थोड्या दिवसांत हाडांचे सांगाडे बनतात हें जरी खरें आहे, तरी ज्या गरीब लोकांना ढुंगणाला लंगोटी, आंग टाकायला झोंपडें व भुकेला नाचण्याची ओलीकोरडी अर्धी भाकर देखील वेळच्या वेळीं मिळण्याचा वानवा असतो, अशा लोकांना आंगभर जाड खादीचे कपडे, निजण्याला तरट, एक किंवा दोन घोंगड्यांची पट्टी, राहण्याला हवाशीर स्वच्छ खोल्या, दोन्ही वेळांस मिळून सुमारे शेर ताजें अन्न इतक्या गोष्टी मिळाल्यास त्यांचें काय वावगें होणार आहे? ज्यांनीं मुंबईतील गिरण्यांत काम करणारीं पोरें पाहिलीं असतील किंवा ज्यांना मुंबईच्या मोठमोठ्या चाळींच्या मागच्या भागांत राहणाऱ्या मजूर लोकांचे हाल माहीत असतील, त्यांना तुरुंगांतील कैद्यांची स्थिति पाहून बिलकुल वाईट वाटणार नाहीं. तुरुंगांतल्याइतका स्वच्छपणा आमच्या इकडील राजे लोकांच्या राज-वाड्यांत देखील असेल किंवा नसेल याचा मला संशय आहे. तसेंच कित्येक लोक इतके दरिद्री असतात कीं, त्यांना दुखणेंबाणें आलें तर एक सुंठीचें कुडें घेण्या-

पुरती देखील ऐपत नसते. असले लोक तुरुंगात येऊन आजारी पडले तर त्यांच्यां मानानें त्यांना पहिल्या प्रतीचें औषधपाणी मिळतें, व बाहेर कधीं न होणारी जतन होते असें म्हणतां येईल. अशा अनेक कारणांवरून मला असें वाटतें कीं मधून मधून टकोऱ्याला हिस्का देणें यासारखी तुरुंगांत साधारण अपराधाला शिक्षा नाहीं. अन्नासाठीं तुरुंगांतील कैदी केवढ्या जिकिरीला आलेले असतात, याची लोकांस कल्पना देखील करतां येणार नाहीं. गहूं किंवा बाजरी दळण्यास लावलेले कैदी वार्डराचा आणि शिपायाचा डोळा चुकवून पिठाच्या फकाण्या मारितात, व वर गटागट पाणी पितात ! जाती ओढतां ओढतां आंगांतून एकसारख्या घामाच्या धारा चालल्या असल्यामुळें पाणी व पीठ त्यांस सहज पचून जातात. घांसायाला टाकलेल्या भांड्यांत भांडीं घासणारे एक शीत सुद्धा राहूं देत नाहींत ! एखादे वेळेस थोडा भात किंवा भाजी मागें राहिली तर त्यावर ज्या उड्या पडतात त्या सांगतां पुरवत नाहींत. आमच्या अन्नांपैकीं नित्य थोडें बहुत अन्न आम्हांस पुरून उरे; तें आपल्याला मिळावें म्हणून भंगी, न्हावी, व इतर कैदी हे परस्परांशीं हमरीतुमरीवर येऊन एकमेकांशीं शिवीगाळ किंवा मारामारी करण्याच्या बेतांत येत; त्यामुळें एकेक वेळ आम्हांला असें वाटे की, आपल्या उच्छिष्टामुळें असले तंटे वाढविण्यापेक्षां तें मोरींत ओतलें तर बरें ! भाजीचीं डेखें, कांद्यावरचीं जाड टरफलें, व शिजून निःसत्त्व झालेलीं असलें मोरींतून उचलून घेऊन गट्ट करितांना आम्हीं कित्येक कैद्यांस पाहिलें आहे ! ! असल्या दुष्काळ बुभुक्षितांना एक वेळ भाकर न देणें म्हणजे पंचवीस फटके मारल्यासारखें होईल, व कुल्ल्यांवर वेताच्या छड्या फोडून त्यांवर मिठाचें पाणी ओतल्यानें होणाऱ्या वेदना पहाण्याचें निष्ठुरत्व टाळितां येईल इतकेंच नाहीं, तर तसल्या कडक शिक्षेनें होणाऱ्या कामगिरीपेक्षां ही अधिक कामगिरी एका वेळच्या भाकरीला किंवा भाताला ताड्या दिल्याने होणार आहे !

तुरुंगाचें धान्य साधारण प्रतीचे लोक ज्या प्रकारचें धान्य खातात त्यापेक्षां विशेष कमकस आणि हलक्या दराचें असणार हें उघड आहे. पण त्यांतल्या त्यांत बरें वाईट पाहून घेणें हें जेलरावर किंवा सुप्रिटेंडावर अवलंबून आहे. एकदां आमच्या असें पहाण्यांत आलें कीं जे तांदूळ आमच्या नेहमींच्या सुप्रिटेंडाला वावगे दिसत नसत, तेच तांदूळ भायखळ्या तुरुंगांतून आलेल्या सुप्रिटेंडाच्या पसंतीस पडले नाहींत; व त्यानें मक्तेदाराकडून दुसरे बरे तांदूळ आणविले. मक्तेदारांच्या चढाओढीमुळें तुरुंगांतील कैद्यांचें अन्न इतकें भिकार झालें आहे कीं, त्यांच्या दोन्ही वेळच्या अन्नास आण्या दीड आण्यापेक्षां अधिक खर्च पडत असेल असेंवाटत नाहीं. एक औंस अडीच रुपये भार असतो; असले आठ

औंस भात, आठ औंस भाकर किंवा रोटी, पांच औंस डाळ, आणि पाण्या कांद्यांसकट आठ औंस कसली तरी भिकार भाजी—येवढ्या अन्नानें सकाळपासून संध्याकाळपर्यंत सक्त मजूरी करणाऱ्याचें पोट नीट कशानें भरणार? तशांतही तें निःसत्त्व असल्या कारणानें कैदी लोकांना फारच खा खा सुटते. पण इतकें आणि अशा प्रकारचें देखील अन्न ज्यांना बाहेर मिळत नाहीं, त्यांना येथें आल्यावर थोडें बहुत बाळसें यावें हें स्वाभाविक आहे! पण ज्यांचा नित्य चांगलें अन्न खाण्याचा परिपाठ असतो, त्यांना असल्या अन्नानें रोग जडून ते मरणाच्या दाराला येऊन बसतात, याबद्दल कांहीं तरी तोड काढणें जरूर आहे. कायद्याचें मुख्य तत्त्व असें आहे की, लहानापासून थोरापर्यंत, रावापासन रंकापर्यंत एकाच अपराधाबद्दल सर्वांस सारखी शिक्षा भोगण्यास लागावी; पण तुरुंगांत निरनिराळ्या प्रतीच्या कैद्यांस निरनिराळें किंवा कमी अधिक अन्न मिळत नसल्यामुळें एकास कमी व एकास अधिक असा त्रास भोगावा लागतो. यासाठीं पहिल्या प्रतीचे अमुक, दुसऱ्या प्रतीचे अमुक व तिसऱ्या प्रतीचे अमुक, असे कैद्यांचे तीन वर्ग करावेत. तिसऱ्या प्रतीच्या वर्गास जें अन्न द्यावयाचें तें सगळ्यांसच द्यावें; पण त्याशिवाय दुसऱ्या व पहिल्या प्रतीच्या वर्गांतील कैद्यांस शेर अर्धा शेर पुऱ्या, दूध, बिस्कुटें किंवा ब्रेड यांपैकीं एक मिळावें म्हणजे ते इतके खंगणार नाहींत. या फाजील अन्नाचा खर्च पाहिजे असल्यास ज्याचा त्याच्याकडून घ्यावा. ज्याला तो देतां न येईल त्यानें तिसऱ्या वर्गास मिळणाऱ्या अन्नानें आपली भूक भागवून घ्यावी. प्रस्तुत अमलांत असलेल्या तुरुंगाच्या नियमांप्रमाणें युरोपीअन कैद्यांना एक प्रकारचें व नेटिव कैद्यांना दुसऱ्या प्रकारचें अन्न असा भेदाभेद आहे, व एकाला फर्स्ट क्लास व दुसऱ्याला सेकंड क्लास रेशन म्हणतात म्हणून ऐकतों; असें असेल तर नेटिवांच्या खाण्यांतच तीन वर्ग करण्यास काय हरकत आहे? तशांतही खर्चाचा बोजा कैद्यावर घातला, व सरकारच्या पदराला खार लाऊं दिला नाही, म्हणजे त्यांना कोणत्याही प्रकारची कुरकुर करण्यास जागा राहिली नाहीं.

दुसरी आमची एक अशी समजूत आहे कीं तुरुंगांतील लोकांना जशा शिक्षा देतात, तसेंच थोडेंबहुत शिक्षण दिलें, किंवा नीत्युपदेश केला, तर त्यांच्या हातून होणाऱ्या अपराधांची संख्या कदाचित् कमी होईल. शरीरदण्डनानेंच कैद्यांस सुधारलें पाहिजे, त्याव्यतिरिक्त त्यांना सुधारण्यास दुसरा मार्ग नाहीं, असें जे समजतात, त्यांच्या विचारांत थोडीबहुत चूक आहे असें आम्हांस वाटतें. जोंपर्यंत कैद्यास अपराधानुरूप शिक्षा मिळत असते, तोंपर्यंत त्याला तिच्याबद्दल कुरकुर करतां येत नाहीं इतकेंच नाहीं, पण त्याला आपल्या मनाशीं देखील

शिक्षा देणाराला दोष लाविता येत नाही. पण हीच शिक्षा फाजील झाली, म्हणजे तो आपला अपराध विसरून जातो, व आपल्याला अन्यायानें शिक्षा झाली, येवढी गोष्ट त्याच्या मनाला एकसारखी टोचूं लागते, व तिच्याबद्दल कोणत्या रीतीनें सूड घेतां येईल याचा विचार त्याच्या मनांत घोळूं लागतो. अशा प्रकारचे एक दोन कैदी आमच्या पह्यण्यांत आले होते. आपल्या दुर्वर्तनानें समाजास पीडा करणारे जे आहेत त्यांना दंड केलाच पाहिजे हें उघड आहे, पण त्यांना जो दंड करावयाचा तो जरूर असेल तेवढाच असावा. समाजाचें स्वास्थ्य राहण्यास आवश्यक असणाऱ्या दंडाहून अधिक दण्ड त्यांना होऊं नये, व ते कैदेंत असतां त्यांच्या श्रमावर त्यांचा खर्च निघाला पाहिजे. काम करण्याचा आळस, व अज्ञान या दोन कारणांमुळें दुर्दैवी लोक अपराध करून जातात; तेव्हां त्यांनीं फिरून गुन्हा करून समाजाला पीडा करूं नये असा हेतु असेल तर तुरुंगांत असतां समाजाच्या खर्चानें त्यांस खाऊं घातल्यानें, व विनाकारण कडक शिक्षा भोगण्यास लाविल्यानें तो तडीस जाणार नाहीं. अशिक्षित देशांतील कायदे स्वाभाविकपणें कडक असतात; अर्धवट सुधारलेल्या लोकांना सुधारण्यास कडकच कायदे पाहिजेत. पण वारंवार असें होतें कीं, लोकांच्या सुधारणेच्या मानानें कायद्यांचा कडकपणा वाजवीपेक्षां फाजील असतो त्यामुळें सर्वांस इष्ट जी सुधारणा तिचा फैलाव होण्यास व्यत्यय येतो; यासाठीं ज्यांच्याकडे कायदे करण्याचें काम असेल त्यांनीं वेळोवेळीं देशस्थितीकडे लक्ष देऊन त्यांचा कडकपणा कमी अधिक केला पाहिजे. जे आळशी असतील त्यांना शिक्षा केल्यानें ते उद्यमी होतात असें नाहीं. आळसावर वस्ताद औषध उद्योग होय. यासाठीं आळसामुळें अपराध करण्याकडे ज्यांची प्रवृत्ति झाली असेल त्यांना तुरुंगांत असतां उद्योग करण्याची संवय लावली तरच ते बाहेर गेल्यावर पुन: अपराध करणार नाहींत, व समाजाला फिरून त्रासदायक होणार नाहीत. तसेंच अज्ञानामुळें जे तुरुंगांत आले असतील त्यांना तेथें असतां शिक्षण मिळालें पाहिजे. ज्यांना गरिबी व अज्ञान यांमुळें कोणताही धंदा शिकून त्यावर आपला चरितार्थ चालवितां येत नाहीं, व चोरीमारी करून पोट भरण्याची पाळी येते, त्यांना तुरुंगांत असतां कांहीं तरी धंदा शिकविणें जरूर आहे. तुरुंगांत जो कैदी अपराध करून येतो त्याच्याकडून तो अपराध पुन: होणार नाहीं, असा परिणाम तुरुंगांतील शिक्षेनें झाला पाहिजे. नाहीं तर जो कैदी येईल त्याला सरसट्टा दे फटके, नाहींतर घाल गोळ्यांवर किंवा घाणीवर—असें केल्यानें तो बाहेर पडतो तेव्हां पहिल्यापेक्षां गुन्हा करण्यास अधिक आतुर झालेला असतो. १०१ दिवसपर्यंत निरनिराळ्या तऱ्हेच्या कैद्यांशीं आमचें जें संघटन झालें, त्यावरून मला असें वाटतें कीं, सध्यां तुरुंगांत जी शिस्त चालू आहे, तींत

सुधारणा करण्यास बराच अवकाश आहे व अधिकाऱ्यांनीं हळूं हळूं ती करण्याचें मनावर घेतल्यास आतांपेक्षां अपराधसंख्या पुष्कळ कमी होईल यांत संशय नाही. ती सुधारणा कशा प्रकारची असावी, व कोणत्या रीतीनें करावी हें ज्यांना समजून घ्यावयाची इच्छा असेल त्यांनीं हर्बर्ट स्पेन्सर म्हणून इंग्लंडमध्यें सांप्रत प्रसिद्ध तत्त्ववेत्ता आहे, त्यानें अनेक विषयांवर स्फुट निबंध लिहिले आहेत, त्यांत कारागृहनीति (Prison-Ethics) म्हणून एक निबंध आहे तो वाचावा, अशी आमची शिफारस आहे. त्या निबंधांत या विषयावर पुष्कळ मनोरंजक माहिती दिली आहे, व जागेची सवड असती तर तिचा बराच भाग येथें घेतला असता; तथापि, तो निबंध किती मनोवेधक असला पाहिजे याचें वाचकांस थोडें तरी अनुमान करण्यास कांहीं आधार व्हावा म्हणून त्यांतील एक दोन अवतरणें घेतों.

"जेव्हां **एम्. ओबरमार** यास **म्युनिख्**च्या सरकारी तुरुंगाचा गव्हर्नर नेमिलें तेव्हां त्यांत ७०० पासून ८०० कैदी होते. त्यांना हुकूम मानणें म्हणून कसलें तें ठाऊक नव्हतें; आणि त्यांना हवी ती शिक्षा केली, किंवा पाहिजे तसला धाक दाखविला, तरी त्यांचा उच्छृंखलपणा आवरण्याची पंचाईत पडे. सगळ्या कैद्यांस एका साखळींत गोऊन तिला मधून मधून लोखंडाचीं वजनें लाविलीं होती तीं इतकीं जड होतीं कीं, त्यांपैकीं जे मोठे ताकदवाले होते त्यांना देखील तीं चालते वेळीं फरफटत नेण्याची मुष्कील पडे. त्यांच्यावर शंभर लष्करी शिपायांचा पाहारा होता; तो ते तुरुंगाच्या निरनिराळ्या दरवाज्यांपाशीं किंवा भिंतीभोवतीं उभें राहून करीत इतकेंच नाहीं, तर त्यांना काम करण्याच्या आणि निजण्याच्या पडव्यांतही राखण करावी लागत असे. येवढ्यानेंच नीट बंदोबस्त न राहतां एखादे वेळेस सगळे कैदी मिळून दंगा करतील, किंवा एखादा हुच्चभाई कोणावर चाल करून जाईल, तर तसें न व्हावें म्हणून ब्लडहौंड अवलादीचे पंचवीस तीस लचके तोडणारे कुत्रे शिपायांना मदत करण्यासाठीं सगळ्या वाटांवर आणि अंगणांत मोकळे सोडून दिलेले असत. सारांश, **एम्. ओबरमारचें** असें म्हणणें आहे कीं, ती बंदीशाला साक्षात् पिशाचवाड्यासारखी (Pandemonium) दिसत होती, व तिच्या खालीं सांपडलेल्या दहापांच बिघ्यांत अत्यंत दुष्ट मनोविकार, पराकाष्ठेचे दुष्ट दुर्गुण, आणि परम हृदयभेदक क्रौर्य हीं दृष्टीस पडत होतीं."

**एम्. ओबरमार** यानें ही कडकपणाची शिस्त हळू हळू ढिली केली; हलक्या हलक्या बिड्या घातल्या, व सरकार रुकार देतें, तर त्यानें त्या मुळींच काढून टाकल्या असत्या. सगळ्या कुत्र्यांना व बहुतेक पहारेकऱ्यांना फाटा दिला, आणि कैद्यांची भीति दूर होईल अशा रीतीनें त्यांना वागवण्याचा परिपाठ घातला.

मि. **बेलिक कार्क्रेन** हा तो तुरुंग पहाण्यास १८०२ त गेला होता, त्यावेळेस त्याच्या असें नजरेस आलें कीं "तुरुंगाचे सगळे दरवाजे अगदीं उघडे होते, व दारापाशीं पहाऱ्यावर कोणीही नव्हतें... कोणत्याच दाराला अडसर किंवा बोल्ट नव्हते. तर मग कैद्यांनीं फरारी होऊं नये म्हणून त्यांना अडकवून ठेवण्यासाठीं काय केलें होतें असें म्हणाल, तर एकेका दाराला साधें कुलूप लाऊन ठेविलें होतें, व त्याची देखील किल्ली पिरगळी नसल्यामुळे पाहिजे तर तें उघडून कैद्यांना बाहेर पडण्याची सवड होती... प्रत्येक कारखान्यावर कांहीं कांहीं चांगल्या वर्तणुकीचे कैदी देखरेख करण्यासाठीं नेमिले होते व एखाद्या कैद्यानें तुरुंगाचा कांहीं नियम मोडिला, व त्याच्या आसपासच्या गड्यांनीं त्याला सांगितलें कीं, 'बाबारे, असें करायाचें नाहीं,' तर त्यांचा शब्द त्यानें मोडिला असें फार थोडा वेळ घडे. तुरुंगाच्या भिंतीच्या आंत प्रत्येक प्रकारचा कारखाना चालू आहे. कैद्यांच्या टोळ्या करून त्यांच्याकडे निरनिराळ्या धंद्यांचीं हत्यारेंपात्यारें दिलेलीं असतात, त्यांनीं ते आपल्याला लागणारे कपडे करितात, आपल्या तुरुंगाच्या भिंती दुरुस्त ठेवतात, आपल्या बिड्या ओततात, व विक्रीसाठीं नाना तऱ्हेचे जिन्नस तयार करितात. या सर्वांचा असा उत्कृष्ट परिणाम झाला आहे कीं, प्रत्येक कैद्याचा खर्च त्याच्या उद्योगाच्या फळावर निघतो इतकेंच नाहीं, तर तो भागून जी बाकी रहाते ती त्यास बाहेर पडतांना मिळत असल्यामुळें तुरुंगांतून हात हालवीत घरीं जाण्याची त्यांना पाळी येत नाहीं. **मि. हास्किन्स** याचा 'स्पेनची प्रस्तुत स्थिति' (Spain as it is) म्हणून एक ग्रंथ आहे त्यावरून खालीं लिहिलेल्या गोष्टी सिद्ध होतील.

"तुरुंगांत कैदी आला म्हणजे प्रथम त्याला बिडी घालितात. पण त्यानें जेलराकडे अर्ज केला, आणि तो वावग्या रीतीनें वागत नसला, म्हणजे ती काढून टाकितात."

"तुरुंगांत एक हजार कैदी आहेत, परंतु त्यांचा बंदोबस्त ठेवण्यासाठीं तीन किंवा चार यांपेक्षां अधिक पहारेकरी माझ्या दृष्टीस पडले नाहींत. असें म्हणतात कीं, त्या ठिकाणीं दहा बारा जख्खड शिपाई आहेत, आणि दारेंबिरें इतकीं लुस्कान आहेत कीं तीं जातां जातां मोडून टाकतां येतील. सारांश, साधारण खासगी घरांना जितकी मजबुती असते, तितकीच मजबुती या तुरुंगांत आहे."

"कैदी तुरुंगांत आला म्हणजे त्याला असें विचारतात कीं, कायरे बाबा ! तुझ्या मनांत कोणतें काम करायाचें आहे किंवा कोणता धंदा शिकावयाचा आहे. येथें सुमारें ४० कारखाने चालतात. हुशार हुशार कोष्टी, लव्हार, चांभार,

बुरुड...वगैरे अनेक तऱ्हेचे धंदेवाले आहेत. याशिवाय येथें एक मोठा छापखानाही चालूं आहे."

"तुरुंगाच्या दुरुस्तीचें हरएक प्रकारचें काम कैदीच करितात. असे गरीब, असे सालस, आणि असे संतुष्ट कैदी मीं कधींच पाहिले नाहींत. उपयोगाच्या धंद्यांत रात्रंदिवस गढून गेल्यामुळें, व ममतेची वागवणूक असल्यामुळें, त्यांचीं तोंडें टवटवीत दिसतात... खेरीज त्यांच्या व्यायामाकरितां एक बगीचा करून त्यांत नारिंगाचीं वगैरे झाडें लाविलेलीं आहेत, तसेंच त्यांच्या करमणुकेसाठीं कोंबडयांचीं खुराडीं राखलीं असून नानाप्रकारचे पक्षीही बाळगलेले आहेत. परीटघाटावर कैदी आपले कपडे धुऊन काढतात; तसेंच एक दुकान आहे तेथें जाऊन त्यांना तमाखू वगैरे हलक्या चैनींच्या वस्तु विकत घेतां येतात; कारण, कैदी लोकांच्या श्रमावर जी मजूरी मिळते, तिचा एक हिस्सा त्यांना तुरुंगांतल्या तुरुंगांत, खर्चासाठीं देतात, दुसरा हिस्सा बाहेर जातांना त्यांच्या स्वाधीन करितात व बाकी दोन हिस्से सरकारांत घेतात, व तेवढयानें तुरुंगाचा खर्च भागतो."

वर लिहिल्याप्रमाणें इकडील तुरुंगांत व्यवस्था होईल तर लांब लांब ठेपीचे कैदी आंतल्या आंत गडप होणार नाहींत. इतकेंच नाहीं, तर ते बाहेर पडतील त्यावेळेस त्यांच्यापाशीं दोन पैसे सांठून कांहीं तरी धंदा करून उदर-निर्वाह करण्याची संवय त्यांना लागलेली असेल; व असें झाल्यानें ते तुरुंगांत फिरून जाणार नाहींत. डोंगरीच्या तुरुंगांतील सक्तमजूरीच्या कैद्यांना कामासाठीं शहरांत नेत नाहींत, यामुळें बहुतेक कैदी बिडीशिवाय असतात. एकादा दांडगे-श्वरच असला तर त्याला शृंखलाबद्ध करून ठेवणें जरूर पडतें, पण बाकीच्यांच्या पायांत वाळा मात्र असतो, आणि तोही अलीकडे झालेल्या नियमाप्रमाणें एकाहून अधिक वेळ जो आला असेल त्याच्या कपाळीं येतो. एकंदरीनें पहातां सध्यां आपल्या इकडील तुरुंगांत जी शिस्त आहे, तीप्रमाणें कैदी लोकांचे न पाहवण्या-सारखे व न सोसण्यासारखे हाल होतात असें नाहीं, पण तींत असें कांहींच नाहीं कीं ज्यांच्या योगानें अशिक्षित व आळशी लोकांची पापाचरणप्रवृत्ति नाहींशी होऊन ते कैदेंतून सुटल्यावर त्यांस प्रामाणिकपणानें एखादा धंदा करून आपला चरितार्थ चालविण्यास उत्तेजन येईल. डोंगरीवर असतां आम्हांला विशेष तिर-स्कार घाणीचा आणि गोळयांचा येई. कैद्यांना हा श्रम करायाला लाविल्यापासून एका कवडीचीही किफायत नसतां पांच पंचवीस माणसांना सकाळपासून संध्या-काळपर्यंत व्यर्थ कष्टविण्यांत ही शिक्षा शोधून काढणारांचा किंवा देणारांचा काय हेतु असेल तो असो. कैद्यांच्या वर्तनावर हिचा कांहीं बरा परिणाम होत

असेल असें म्हणावें तर तसेंही कांहीं नाहीं. कारण सूतकाम करणें, जमीन खोदणें, दळण दळणें, पाणी ओढणें, गोळे उचलणे किंवा घाणीवर चढणें हीं सगळीं कामें कैद्यांना एकसारखीं वाटतात. अंग मोडून काम करणाऱ्यांना चोहोंकडे सारखीच मेहनत पडते; जे चुकारतट्टू असतात त्यांना कांहीं करायाला लाविलें तरी ते त्यांतल्या त्यांत खेळल्याशिवाय राहत नाहींत; असें असतां या आंतबट्याच्या शिक्षेचा प्रघात कां चालू ठेवावा हें समजत नाहीं. तसेंच तुरुंगांत जो मनुष्य येतो त्याला जें काम येत असेल तेंच द्यावें, हें बरें. न्हाव्याला कोष्टयाचें किंवा कारकुनाला शिंप्याचें काम देण्यांत काय हशील आहे? कैद्याची प्रकृति बिघडूं न देतां त्याच्याकडून होईल तितकें काम करून घेण्यास कांहीं हरकत नाहीं. पण त्याला जें काम येत असेल तेंच पाहिजे तर त्याच्या कडून बाहेरच्या पेक्षां अधिक करून घ्यावें; असें केल्यानें त्याला विनाकारण त्रास पडणार नाहीं इतकेंच नाहीं, पण सरकारालाही फायदा होणार आहे. होतां होईल तों प्रत्येक तुरुंगाचा खर्च त्यांतील कैद्यांच्या श्रमाच्या किंमतीवर भागला पाहिजे. त्यांच्या चरितार्थासाठीं लोकांना आपल्या प्राप्तीचा कांहीं भाग द्यावा लागणें म्हणजे गुन्ह्याला उत्तेजन देण्यासारखें होय. गुन्हेगारांना तुरुंगांत टाकण्याचा हेतु इतकाच कीं, ते ज्या समाजांत असतात त्याला त्यांच्या कडून त्रास न व्हावा. तो त्रास टाळण्यापुरतेंच त्यांचें स्वातंत्र्य नाहीसें करणें योग्य आहे. ज्यांनीं फारच थोर अपराध केले असतील त्यांना ताळ्यावर आणण्यासाठीं कांहीं वेळ कडक शिक्षा करावी लागेल, व कित्येकांना फांशींही चढवावें लागतील, हें खरें आहे, पण येवढ्यावरून ज्याला त्याला घाणीवर घालणें, गोळे उचलायला लावणें, कांजी कोठडींत कोंडून घालणें, किंवा हातखोडा अथवा पायखोडा देणें, याची जरूर आहे असें वाटत नाहीं. आमची अशी पक्की खातरी आहे कीं तुरुंगावरचे अधिकारी कैद्यांशीं रोज दोन गोड शब्द बोलतील, व आठा दिवसांतून एकदोन वेळ त्यांना नीत्युपदेश करतील, तर त्यांच्या मनावर चांगला परिणाम खचित होईल. ज्यांना वाचतां येत असेल त्यांनीं आपापलें ठरीव काम केलें म्हणजे ते मागतील तीं पुस्तकें त्यांस वाचण्यास द्यावीं, व रात्रीं त्यांस दिवा द्यावा. कोणी सुशिक्षित कैदी आला असेल तर त्याच्याकडून बाकीच्यांस चार नीतीच्या गोष्टी सांगवाव्या किंवा चांगलीं पुस्तकें वाचवावीं; जेलर किंवा सुप्रिंटेंड यांनींच दर रविवारीं दोन बोधाचे विचार सांगितले तर फारच बरें होणार आहे; पण तसें जमत नसल्यास एकादा उपदेशक दर आठवड्यास बाहेरून आणण्यास कांहीं हरकत नाहीं. या संबंधानें आम्हांला पुष्कळच लिहावयाचें आहे, पण पुस्तकाचीं पानें म्हणतां म्हणतां वाढत चाललीं, म्हणून येथेंच मुक्काम करणें जरूर आहे.

खेरीज आम्हीं कितीही सूचना केल्या तरी त्या सरकारच्या कानावर कशा पोहों-चणार ! कोणतीही गोष्ट फिरतां फिरतां आफिशीअल मार्गानें त्यांच्या सट्टयांत येईल तेव्हां तिच्याकडे त्यांचें लक्ष ओढवणार; बाकी सगळा आक्रोश अरण्यरुदिता-प्रमाणेंच असतो. ज्यांच्याकडे तुरुंगाचे नियम घालण्याचा अधिकार आहे त्यांनीं ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं अपराध्यांस दंड करण्यानें त्यांचें व समाजाचें कल्याण व्हावें हें इष्ट असेल तर तुरुंगांतील शिस्त अशी पाहिजे की त्यांत कितीही दुष्ट मनुष्य आला तरी त्याला असें वाटूं नये कीं येथें आल्यानें आपणांस याउपर नेकीनें व भलेपणानें दिवस काढण्याची आशा राहिली नाहीं. तुरुंगांचा खर्च, त्यांतील कैद्यांच्या श्रमानें चालला पाहिजे इतकेंच नाहीं, पण ते बाहेर पडतांना त्यांच्यापाशीं दोन पैसे असून पुढें चांगल्या रीतीनें वागण्याचा त्यांचा निश्चय झालेला असला पाहिजे. अशा प्रकारची तुरुंगांची व्यवस्था ज्या दिवशीं होईल त्या दिवशीं बरीच समाजसुधारणा झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

मूळ संकेताप्रमाणें येथपर्यंत या पुस्तकाचे दोन भाग आटपले. आतां अवांतर विचार या सदराखाली चार ओळी लिहून वाचकांची रजा घेतों. कोल्हापूर प्रकरणाच्या संबंधानें अनेक लोकांचे अनेक तर्क झाले आहेत. कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, हा खटला पुण्यास चालता तर याचा निराळाच परिणाम झाला असता, दुसऱ्या कांहीं लोकांचें असें मत आहे कीं या खटल्यांतील जूरींत सगळे किंवा निम्मेपेक्षां अधिक नेटिव लोक असते तर त्यांनीं वर्तमानपत्रकर्त्यांस निरपराधी ठरविलें असतें. तिसऱ्या एका पंथांचे लोक आहेत त्यांना असें वाटत आहे कीं, पत्रकर्त्यांस पैशाचें पाठबळ नव्हतें म्हणून ते बुडाले. कोणाची अशी कल्पना आहे कीं या कामांत आम्हाला सरकारच प्रतिकूळ असल्यामुळें आम्हांला अपयश आलें; कोणाची समजूत अशी आहे कीं आम्ही अखेरीस क्षमा मागितली ही फार वाईट गोष्ट केली व कित्येकांस तर आम्हांस शिक्षा झाली ती ठीक झाली असें वाटत असेल. यांपैकीं कोणाचें म्हणणें खरें, किंवा कोणाचें खोटें, अथवा कोणाच्याच म्हणण्यांत कांहीं हांशील नाहीं, याचा निश्चय करणें आम्ही आपल्यावर घेत नाहीं. पोलिस कोर्टांत आणि हायकोर्टांत लोकांच्या पुढें बऱ्याच गोष्टी आल्या आहेत, व जो तो आपापल्या समजुतीप्रमाणें आम्हांस किंवा इतरांस बरें वाईट म्हणत आहे. आमचें म्हणणें असें होतें कीं हें कोल्हापूर प्रकरण कोणत्या तरी न्यायासनापुढें यावें, तें आमच्या इच्छेप्रमाणें एकदाचें आलें. तसें झाल्यावर त्याठिकाणीं न्याय करण्यास बसलेल्या न्यायाधीशाच्या आणि जूरीच्या नजरेला जी गोष्ट आली तीच योग्य व मान्य असें घेतलें पाहिजे. कारण असें न केलें तर कोणत्याही कज्जाचा कोठेंच निकाल लागावयाचा नाहीं.

आतां जज्जानें आणि जूरीनें केलेला निकाल सर्वांसच संमत पडेल असें नाहीं. थोडा बहुत मतभेद हा होणारच, व तो होणें हें स्वाभाविक आहे. तथापि सरकारानें ज्यांच्याकडे कोणत्याही गोष्टीचा निवाडा करण्याचा पूर्ण अखत्यार दिला, त्यांच्या विचाराला जें आलें तेंच आनंदानें मान्य करणें हेंच प्रत्येक सुशिक्षित, सुजाण, व धर्मतत्त्वज्ञाचें कर्तव्यकर्म आहे. साक्रेटिसाला असें पक्कें ठाऊक होतें कीं मला जी शिक्षा होत आहे ती अगदीं अन्याय्य आहे; तरी त्याच्या न्यायाधीशांच्या नजरेला जी गोष्ट आली ती त्यानें संतोषानें मान्य केली. मनुष्य ज्या अर्थी सर्वज्ञ नाहीं, त्या अर्थी त्याच्या हरएक कृत्यांत चूक होण्याचा संभव आहे. साक्रेतिसावर आणलेल्या आरोपांची चौकशी करण्यास दहा पांच लोक बसले होते असें नाहीं. आथेन्सच्या प्रजासत्ताक राज्यांतील लोकांच्या बहुमतानें तो दोषी ठरला, व त्याला विषप्राशन करावें लागलें ! पण कालांतरानें त्याच्या संबंधानें येवढें मतांतर झालें कीं तो भला ठरून त्याचे पांच सहाशें न्यायाधीश अगदीं चुकले अशी लोकांची खात्री झाली, व आतांपर्यंत सर्व सुधारलेल्या राष्ट्रांचा तसाच ग्रह आहे. "सत्यमेव जयते" हा पूर्वापार चालत आलेला जो सिद्धांत आहे, त्याची पूर्तता होण्यास बराच काळ लागतो. कारण सत्यांत म्हणजे कांहीं नैसर्गिक सामर्थ्य आहे, असें नाहीं; असें असतें तर त्याला तत्काळ यश येतें. कधींना कधीं तरी त्याचा पगडा बसतो याचें कारण इतकेंच आहे की सत्यावलंबन हें बहुतेकांचें फायदेशीर आहे. या बहुतेकांचें ज्यावेळेस प्राबल्य होतें, त्यावेळेस सत्याचा जय होतो; उलट पक्ष प्रबल असतो तोंपर्यंत सत्य दडपून राहतें. आतां साक्रेतिसाच्या आणि आमच्या युगांत जमीन-अस्मानाचें अंतर पडलें आहे, व राज्यपद्धति, न्याय वगैरेंच्या संबंधानें लोकांच्या आचार-विचारांत पुष्कळच तफावत पडली आहे, व सत्य-असत्य विवेचनाचा कांटा अधिक सूक्ष्म होत चालला आहे, हें समंजस वाचकांस सांगायाला पाहिजे असें नाहीं. असो. जगातील न्यायपद्धती बुद्धिबळांच्या खेळासारखी आहे. प्रतिपक्षाच्या शहांत न येतां आपण त्याला शह देणें आणि अखेरीस मात करणें हें ज्याच्या त्याच्या कल्पनेवर, अनुभवावर, बुद्धिसामर्थ्यावर व इतर उपकरणांवर अवलंबून असतें. यांपैकीं कांहीं कमी पडलें तरी दुसऱ्या पक्षाचा उत्कर्ष होण्याचा संभव असतो. जो ज्या बाजूला असतो त्याला तीच बरोबर वाटणें हा मनुष्याचा स्वाभाविक मनोधर्म आहे, व त्याला अनुसरून त्याचें वर्तन चाललेलें असतें. फ्रान्सचा राजा चवदावा ल्यूई यानें प्रजेवर इतका जुलूम केला कीं त्याच्या पाठीमागें दोन पिढ्यांनीं फ्रान्सांत जबरदस्त राज्यक्रांति होऊन प्रजासत्ताक राज्याची स्थापना झाली; पण ल्युईला असें कधीं वाटलें नाहीं कीं माझ्या आचरणानें माझ्या

प्रजेस त्रास होत आहे. ल्युईसारखेंच इंग्लंडाच्या दुसऱ्या जेम्स राजाचें वर्तन होतें. हे राजश्री राज्यासनास मुकले तरी यांना आपलें करणें वाईट दिसलें नाहीं. येवढें खरें आहे कीं कोणताही पक्ष असो, तो जेथपर्यंत अधिकारारूढ असतो, तेथपर्यंत त्याच्या चुकीच्या करण्याला देखील कोणी नांवें ठेवण्यास धजत नाहीं, कारण तसें केल्यानें त्याच्या कडून दण्ड होण्याचा संभव असतो. आनंदी–राघोबांनीं राज्यलोभासाठीं सख्ख्या पुतण्याला मारेकऱ्यांच्या स्वाधीन केलें; पण तुम्हीं केलेलें कृत्य अत्यंत निंद्य होय, व याला देहांत प्रायश्चित्ताखेरीज दुसरें प्रायश्चित्त नाहीं, असें खडखडीत तोंडावर सांगण्यास धजणारा सगळ्या पेशवाईंत एक रामशास्त्री मात्र होता! अधिकाऱ्याला आड येणारानें हातांत शिर घेऊन मरण्यास तयार असलें पाहिजे. अन्याय करणारे अधिकारी मरून जाऊन पिढ्या दोन पिढ्या गेल्यावर त्यांच्या वर्तनाची चर्चा करणें सोपें असून विनधोक्याचें आहे. सखारामबापूसारख्या हट्टी वृद्ध कपीला स्वपक्षाला वळवून घेण्यासाठीं नानांनीं गंगाबाईस अत्यंत अश्लाघ्य युक्ती सांगितली, नानांचें आणि गंगाबाईचें बळकट सूत होतें, नानांच्या जाचामुळें सवाई माधवरावांनीं माडीवरून उडी टाकली, वगैरे ऐतिहासिक गोष्टी आतां आम्ही खुशालपणें बोलतों, व न भितां त्यांच्याविषयीं वादविवाद करितों. पण मनांत आल्याबरोबर पाहिजे त्याला तापल्या तोफेवर बांधून मारण्याचें सामर्थ्य जोंपर्यंत नानाच्या मनगटात होतें तोंपर्यंत अमुक अमुक प्रकारचें तुमचें वर्तन अयोग्य आहे असा त्यांच्यापुढें चकारशब्द देखील काढण्याची कोणाची छाती नव्हती. उलट त्याच्या वागणुकीची तारीफच होत असे. शिंदे, होळकर, गायकवाड, सावंत, भोसले, सचीव, प्रतिनिधी, कागलकर, पटवर्धन वगैरे घराण्यांतील जुन्या पुरुषांच्या वर्तनाविषयीं ग्रांट डफ साहेबानें आपल्या इतिहासांत जशी चर्चा केली आहे तशी चर्चा या घराण्यांतील प्रस्तुत पुरुषांविषयीं आम्ही करूं म्हटलें तर आमचें कसें चालेल? कोणी एखादा निर्भीड धटिंगण हवें तें बोलत सुटला तर त्याला असले विचार तोंडावाटें बाहेर काढतां येणार नाहींत असें नाहीं; पण असें करितांना त्यानें आपल्या जिवावर उदार झालें पाहिजे. जिवाची परवा न करितां जगाचें कल्याण करण्याच्या मिषानें असें करण्यांत प्रतिष्ठा मानणारे ग्यालिलीओ, क्रानमर, रामशास्त्री यांसारखे वेडे पीर कोठें कोठें असतात, पण निःसीम संसारचतुर जो आहे तो अशांचें अनुकरण कधींही करणार नाहीं! अधिकाऱ्याला आड जाण्यानें जसें कोणाचेंही कल्याण होणें नाहीं, तसेंच सरकाराला विरोध करणाऱ्यानेंही आपल्या संसारसुखावर तिळांजळी सोडावा. कारण सरकार म्हणजे अधिकारी-समुच्चय यापेक्षां दुसरें कांहीं नाहीं. अज्ञान गरीब लोकांना सरकाराचा मोठा

बागुलबोवा वाटत असतो, पण ज्यांनीं 'सरकार आणि प्रजा' या विषयावर थोडाबहुत विचार केला आहे त्यांना असें पक्कें ठाऊक असतें कीं व्यक्तिविशेष अधिकाऱ्याला ज्याप्रमाणें अहंकार, लोभ, सौजन्य, मैत्री, आपलेपणा, परकेपणा, वगैरे बऱ्यावाईट मनोवृत्ती असतात, त्याप्रमाणें अधिकारीसमुच्चयरूप जें सरकार त्यालाही असतात, भेद इतकाच कीं व्यक्तिविशेष अधिकारी हट्टास पेटल्यानें कोणाचेंही नफा-नुकसान जितकें करूं शकतो त्यापेक्षां सरकाराला अधिक करतां येतें. बाकी सरकारानें अमक्याला चांगलें म्हटलें, आणि तमक्याला वाईट म्हटलें म्हणून तो तसा होतो हें थोडेंच आहे. अनेकदां असें होतें कीं सरकार आणि प्रजा यांच्या नफानुकसानीचा परस्परांशीं अत्यंत विरोध असल्यामुळें अती नीच पुरुषाला हातीं धरून सरकाराला त्याचा बडेजाव करावा लागतो. ब्रह्मघ्न त्रिंबकजीसाठीं बाजीनें पाजीपणा करून आपल्या या राष्ट्राच्या स्वातंत्र्याची राळ केली, हें सर्वांस विदित आहेच. ज्याप्रमाणें प्रासादिक कवि आपल्या कल्पनावैचित्र्यामुळें शुष्क पदार्थाला देखील नसतें माहात्म्य आणून देतात, त्याप्रमाणें सरकारही अगदी हलकट मनुष्याला नसता थोरपणा देऊं शकतें. ज्याप्रमाणें स्विफ्टसारख्यानें केरसुणीचें वर्णन केलें तर तें देखील लोकांस मनोरम होईल असें स्टेलास वाटलें, त्याप्रमाणें सरकारनें ज्ञानशून्य पशूस जरी अधिकारावर नेमून त्याची पाठराखणी केली तरी त्याचाही लोकांना मोठा बाऊ वाटणार आहे. मागें एका रोमन बादशहानें अधिकाराच्या जोरावर आपल्या छिनाल बायकोस सेनेट सभेकडून देवी म्हणविलें आणि आपल्या विवाहाचा वर्षदिवस तरुणतरुणींनीं पतिव्रतेच्या स्थंडिलापुढें अगरु जाळून साजरा करावा असा ठराव केला !* सरकारी सत्तेचें सामार्थ्य केवढें आहे हें पहाण्यास इतकें

* Faustina, the daughter of Pius and the wife of Marcus, has been as much celebrated for her gallantries as for her beauty...Marcus was the only man in the empire who seemed ignorant or insensible of the irregularities of Faustina...He promoted several of her lovers to posts of honour and profit, and during a connection of thirty years, invariably gave her proofs of the most tender confidence, and a respect which ended not with her life...The obsequious Senate, at his earnest request, declared her a goddess. She was represented in her temples, with the attributes of Juno, Venus and Ceres; and it was decreed, that, on the day of their nuptials, the youth of either sex should pay their vows before the altar of their chaste patroness.

*The Decline and Fall of the Roman Empire, Vol. I, Chap. IV.*

दूर जायला पाहिजे असें नाहीं. आपल्या येथील कायदे करणाऱ्या मंडळींत मधून मधून कशा प्रकारच्या इसमांची नेमणूक होते, हें लक्षांत आणा म्हणजे झालें. तात्पर्य काय कीं सरकार म्हणून जरी स्वर्गीय वस्तु नाहीं, व सरकारचे सर्व अधिकार सरकाराला लोकांपासून प्राप्त झालेले असतात, तरी ते फार दिवस त्याच्याकडे असल्यानें तें त्याच्याच जोरावर लोकांशीं शिरजोरपणा करूं लागतें, व त्यांना आपलें गुलाम करून टाकण्याचा प्रयत्न करितें; असें झालें म्हणजे लोकांत पिढीजात कांहीं तरतरी असल्यास ते औदासीन्यनिद्रेंतून जागे होतात, आणि अरेराव झालेल्या सरकाराला दोन समजुतीच्या गोष्टी सांगून वळणावर आणितात. अशा प्रकारचे लोक ज्या देशांत नसतात त्या देशचें सरकार प्रजेचे किती हाल करील याचा नेम नसतो. सरकार जुलमी, आणि प्रजा मुग्ध असल्यानें थोड्या वेळांत उभयतां लयास जातात. आपल्या हक्कांच्या संरक्षणासाठीं अधिकाऱ्यांशीं किंवा सरकाराशीं जे भांडण घालतात त्यांना त्या भांडणांत यश मिळण्याची आशा नसते. सारांश काय कीं सरकार व प्रजा यांतील युद्धप्रसंग एका पक्षास साधक आणि दुसऱ्या पक्षास बाधक असा असतो. तशांत ज्या ठिकाणीं परदेशस्थ सरकार असतें, व तें एखाद्याचा न्याय करण्याच्या भरीं पडतें, त्यावेळेस त्याच्याशीं सामना करण्यास उभे राहणाऱ्यानें फारच मजबुती केलीं पाहिजे. आपलें सरकार असें विलक्षण आहे कीं अगोदर कोणाला कांहीं माहिती द्यावयाचें नाहीं, व कोणीं कांहीं गैर माहितीमुळें चुकीचा मजकूर लिहिला कीं कर त्याचा पुरावा म्हणून लागलें हात धुऊन त्याच्या पाठीला ! वास्तविक पहातां ज्या गोष्टीशीं लोकांचा निकट संबंध असतो, त्या संबंधाची हर एक प्रकारची माहिती सरकारानें आपण होऊन वेळेच्या वेळेस लोकांस द्यावी, व त्यांच्या खोट्या समजुती दूर कराव्या. अमेरिकेंतील सरकार सरकारी ग्याझेटांतून अशा प्रकारची माहिती वारंवार प्रजेस देतें असें ऐकिवात आहे. आपल्यापैकीं कोणास थेट सरकाराशीं किंवा त्याच्या एखाद्या अधिकाऱ्याशीं यशाच्या आशेनें कोडतात तंटा घालायचा असल्यास त्यांनीं पुढें लिहिलेल्या गोष्टींबद्दल मुख्यत्वेंकरून खबरदारी ठेवावी. (१) बरेंच मोठें डबोलें हातांत पाहिजे. पैशासारखी दुसरी मजेदार वस्तु जगांत नाहीं. हा वाटोळा असल्यामुळें एका फ्रेंच ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें विशेष घर्षणाशिवाय पाहिजे त्या ठिकाणीं याचा सहज प्रवेश होतो. पाहिजे तो किंवा ती वश करण्यास याच्यासारखा दुसरा पंचाक्षरी मिळणें कठीण. "मूकं करोति वाचालं, पंगुं लंघयते गिरिम्; यत्कृपा तमहं वंदे, परमानंदमाधवम्" या पद्यांत माधवाच्या ठिकाणीं रूपक

असें पाठांतर केलें असतां पैशाच्या सामर्थ्याचें खरें वर्णन होणार आहे; अथवा असलें पाठांतर करण्याचीही जरूर नाहीं; कारण माधव हा लक्ष्मीपती आहे, तेव्हां माधव याचाच अर्थ रुपया असा केला म्हणजे झालें ! ज्यानें कशाचें तोंड खुलें केलें त्याला कशाचीही वाण नाहीं; म्हणूनच कवीनें कोठेंसें म्हटलें आहे—

**धनैर्निष्कुलीनाः कुलीना भवन्ति**
**धनैरापदं मानवा निस्तरन्ति ।**
**धनेभ्यः परो बान्धवो नास्ति लोके**
**धनान्यर्जयध्वं धनान्यर्जयध्वम् ॥**

ज्याला विपुल द्रव्याची अनुकूलता असेल त्याला जगाच्या प्रस्तुत स्थितींत खऱ्याचें खोटें आणि खोटयाचें खरें करण्यास फारसा त्रास पडणार नाहीं. द्रव्य-विहीनांचे मनोरथ मात्र गतभर्तृकांच्या स्तनाप्रमाणें जागच्या जागीं विकास आणि लय पावतात. (२) कागदाची सामुग्री. खटला उभा राहण्यापूर्वी जो जो म्हणून महत्त्वाचा कागद असेल तो हातांत घेऊन ठेवला पाहिजे. अस्सल मिळाला तर फारच चांगलें झालें; तो दुष्प्राप्य असेल तर त्यांची हुबेहूब नक्कल तरी पाहिजेच पाहिजे. तशांत तिच्यावर एखाद्या जबाबदार कामगाराची निशाणी घेऊन ठेवता आल्यास बरेंच काम होईल. अमुक अमुक कागद मीं स्वतः पाहिले आहेत, किंवा अमुक अमुक माझ्या मित्राकडून किंवा अमक्या तमक्या भल्या मनुष्याकडून मला हव्या त्या वेळेस मिळण्याचा संभव आहे असें म्हणत कोणाच्याही हवाल्यावर बसलें कीं काम हुकलें म्हणून समजावें. उपयोगाला येणारें चिटोरें चिटोरें वेळेपूर्वी काबीज करून ठेविलें पाहिजे. एकदां गडबड सुरू झाली म्हणजे अगदीं साधीं चिटोरीं दुष्प्राप्य होतात, व कधीं कधीं तर मोठ्या मोठ्या सुरक्षित जाग्यांतून तीं अंतर्धान पावतात हें सर्वांनीं ध्यानांत धरावें. (३) सहीनिशी लेखी जबान्या घेऊन ठेवणें. हा माझा बाप, ही माझी बायको, ही माझी आई, हा माझा सासरा, हा माझा जिवलग मित्र, हे श्रीमंत, हे गरीब, हे राजश्री, हे भले, हे सालस, हे काय कोर्टापुढें पाहिजे त्या वेळेस हजर राहून त्यांना माहित आहे तें कोणाची मुर्वत न ठेवितां सांगतील, तेव्हां यांच्या सहीसुद्धां यांची अगोदर लेखी जबानी घेऊन ठेवण्याची कांहीं एक आवश्यकता नाहीं, अशा दिमतीवर कोणत्याही कार्यहितेच्छूनें बसूं नये. प्रेम, विश्वास वगैरे चटसारें एकीकडे ठेऊन पक्कें नास्तिक बनावें, व जगांतील हरएक मनुष्य जबरा लफंगा आहे असें मानून आपल्या उपयोगाचें जें म्हणून त्याला ठाऊक असेल त्याचें त्याच्याकडून टांचण करवावें, व त्यावर त्याची सही घ्यावी; आणि असलीं सगळीं टांचणें वेळ येईपर्यंत एखाद्या मजबूत लोखंडी

पेटींत घालून ठेवावीं ! (४) वकीलांचें मत. कोणतेंही काम हातीं धरण्यापूर्वी त्यांतील सर्व कागद पत्र एखाद्या कायदेवाल्या भटास दाखवावे; व त्यांवर त्याचें लेखी मत घेऊन ठेवावें. या कृत्यास जो भट पहावयाचा तो चांगला धोरणवाला घनपाठी दशग्रंथी वैदिक असून जिकडे तिकडे वाखाणलेला असावा. त्याला असें म्हणावें की, बाबारे, दीडशेंच्या ठिकाणी दोनशें घे, पण जें मत द्यावयाचें तें नीट आपलें पोथीपुस्तक पाहून दे. असें केल्यानें प्रथम थोडासा खर्च झाला असें वाटेल खरें, पण पुरावा कशा प्रकारचा पाहिजे, किती कमी आहे, व बाकीचा कसा मिळवावा वगैरेचें ज्ञान आधीं झाल्यानें पुढचा पुष्कळ त्रास चुकतो, व एकंदरीनें नफा होतो. (५) किरकोळ तयारी. जागोजाग कुशल बातमीदार पाहिजेत. त्यांनीं रात्रंदिवस जिकडे तिकडे घिरट्या घालीत असावें. कोणाची कोठें काय खटपट चालली आहे, समाजांत लोक काय बोलतात, प्रतिपक्ष्याकडील कशी काय तयारी आहे वगैरे गोष्टी नीट रीतीनें टेहळून गुपचिपपणें वेळच्या वेळीं वर्दी देणाऱ्या विश्वासूक बातमीदारांशिवाय धामधुमीच्या वेळेस कामाचा चांगला जम बसत नाहीं. तसेंच दहापांच तरी मोठमोठ्या यूरोपिअन लोकांच्या ओळखी असाव्या, म्हणजे त्यांच्याकडून त्यांच्या समाजांत आणि ऑफीशीअल वर्गांत जी चर्चा चालली असेल ती कळते, व तदनुसार नवीन वळणें बांधण्यास ठीक पडतें. याशिवाय प्रत्येक समाजांत मध्यस्थ म्हणून एका जातीचे प्राणी आहेत. त्यांच्या मदतीनें एखादे वेळेस बेमालूम रीतीनें कामगिरी उरकतां येते. म्हणून यांजपैकीं एक दोघे आंगाखालीं राखून ठेवले असले तर बरें. सारांश काय की, मास्तर, डाक्तर, बालिष्टर, कोणी का असेना; जो जो म्हणून प्रसंगीं उपयोगी पडण्यासारखा असेल त्याला बगलेंत मारून ठेवावा. दुसरी एक महत्त्वाची सूचना करावयाची अगदींच विसरलों ती ही कीं, "शिववंदनकामांहीं वंदावा प्रथम देव नंदी न !" या न्यायानें प्रत्येक मोठ्या देवालयांतील आणि गृहमठांतील द्वारपालांच्या आंगावर एकेक तुकडा टाकून ठेवलेला असला म्हणजे महादेवापर्यंत प्रवेश होण्यास बिलकुल अडचण पडत नाहीं !

असो. येथपर्यंत कोठें कंटाळवाणा, कोठें थट्टेचा व कोठें गंभीर मजकूर लिहिण्यांत आला आहे, तो कितपत मान्य होईल तो होवो.

आतां वाचकांचा निरोप घेण्यापूर्वी हें कोल्हापूर प्रकरण उभें राहिल्यापासून त्याचा निकाल होई तोंपर्यंत ज्या ज्या देशबंधूंनी व मित्रांनी सहाय्य केलें त्यांचे आभार मानणें येवढें मात्र राहिलें आहे. वर्तमानपत्रें काढून पुरें एक वर्ष झालें न झालें तों आम्हांवर एक दोन बिकट प्रसंग येऊन गेले, व त्यांतून आम्ही निभावलों, हें केवळ अनेक ममताळू मित्रांच्या मदतीमुळें झालें हें आम्ही प्रांजलपणें कबूल

करतों. पोलिस कोर्टांत फिर्याद लागल्या बरोबर **मराठा–केसरीचे** दिवस भरले असें कित्येकांस वाटूं लागलें; पुढें शास्त्रीबोवांचा अकाली मृत्यु झाला; मग तर कांहीं पुसूंच नका. त्या ऐन दु:खाच्या आणि आणीबाणीच्या प्रसंगीं जिकडे तिकडे सर्वजण असें म्हणूं लागले कीं आतां ही मंडळी रसातळास गेली म्हणून समजा ! असो, आम्ही असें समजतों कीं, येवढ्या थोड्या काळांत आम्हांवर जीं दोन तीन संकटें येऊन गेलीं, व ज्यांतून आम्ही फुटाफूट झाल्याशिवाय जसेच्या तसे बाहेर पडलों, त्यांवरून आमच्या देशबंधूंची येवढी तरी खात्री होईल की देशसेवेचें दंभ माजवून कोठें तरी सोयीवार नोकरी मिळेंपर्यंत चार पैसे मिळविण्यांत गुंतलेले हे लोक नाहींत, तर यापेक्षां थोडेंसें कठीण काम आंगावर घेऊन तें निश्चयानें तडीस नेण्याचा यांचा निर्धार झालेला आहे. या प्रकरणांत आमच्या माना आडकल्या गेल्यामुळें अनेक मित्रमंडळीस जे दीर्घ श्रम झाले, त्यांबद्दल पूर्ण उतराई आमच्यानें कधींही होववणार नाहीं. आमचा सगळा भरंवसा आमच्या मुंबईच्या व पुण्याच्या विद्यालयीन मित्रांवर होता हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. यांची मदत नसती तर लोकांनीं भाकित केल्याप्रमाणें **मराठा–केसरी** कधींच निजधामास गेले असते. जणूं काय दोन्ही कॉलिजांनीं आमच्या बरोबर शेवटपर्यंत काळजी वाहण्यास, आणि कारागृहांत सुद्धां आमचा समाचार घेण्यास हे दोन दक्ष प्रतिनिधीच नेमून दिले आहेत कीं काय असें आम्हांस आमच्या दोन मित्रांच्या सप्रेम वर्तनावरून वाटे ! या खेरीज कोणाला पैशासाठीं, कोणाला सल्लामसलतीसाठीं, कोणाला दुसऱ्या कांही गोष्टींसाठीं, असें आम्हीं अनेकांस अनेक तऱ्हांनीं शिणविलें, याबद्दल आम्हांस फार वाईट वाटत आहे. एकदां आम्हांस असें वाटतें कीं आमच्या हातून बरीच देशसेवा झाल्यावर आमच्यावर लोकांस त्रास देण्याचें प्रसंग येते तर बरें होतें. शिक्षा होऊन आम्ही तुरुंगांत गेल्यावरही आमचें बरें होण्याविषयीं आमच्या हितचिंतकांनीं उपाय करणें सोडिलें नाहीं. वर्ड्‌स्‌वर्थ, मंडलिकप्रभृति मंडळींच्या अर्जाला एकीकडे झुगारून देऊन सरकारनें आम्हांला दहा पांच दिवसांची सूट दिली नाहीं यामुळें आमचें मोठेंसें नुकसान झालें असें नाहीं; पण अशा प्रसंगीं दया आणि सौजन्य दाखवून कोल्हापूर प्रकरणाच्या संबंधानें आपण अगदीं निष्पक्षपाती आणि उदासीन आहों, असा लोकांचा ग्रह करून सोडण्याचा व त्यांच्या मनांतील कुत्सित संशय काढून टाकण्याचा जो अमोलिक प्रसंग आला होता तो सरकारानें विनाकारण घालविला ! असो, झालें तें झालें; गत गोष्टींबद्दल खेद करण्यांत हांशील नाहीं. इतउत्तर आमची येवढीच उमेद आहे कीं, सकल महाराष्ट्रीयांनीं आम्हांवर जी प्रीति दाखविली

आणि आम्हांस जो सन्मान दिला त्या प्रीतीला आणि त्या सन्मानाला आम्ही वास्तविक पात्र आहों असें केव्हां तरी आम्हांस दाखवितां आलें म्हणजे आम्ही कृतकृत्य झालों. हें महत्कृत्य आमच्या हातून निर्विघ्नपणें शेवटास जाण्यासाठीं आमचे जे खरे मित्र आहेत ते आम्हांस वेळोवेळीं आमचे प्रमाद दाखवोत, व सदुपदेश करोत; तसेंच आम्हीं आरंभिलेल्या उद्योगांत जर कांहीं प्रशंसनीय भाग असला तर त्याचा चोहोंकडे विस्तार होऊन या महाराष्ट्र भूमीच्या उदरीं --

**स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि**
**आराधनाय लोकानां मुञ्चतो नास्ति मे व्यथा**

असें मानणारे पुत्र निपजोत !



# विकारविलसित

अथवा

शेक्स्पीअरकृत हॅम्लेट नाटकाचें भाषांतर

---


लेखक

**गोपाळ गणेश आगरकर**, एम्. ए.



आर्यभूषण छापखाना, पुणें

सन १८८३

किंमत १ रुपया

# प्रस्तावना

अलीकडे लोकांस वाचनाची अभिरुचि लागल्यामुळें नवीन नवीन पुस्तकें तयार होऊं लागलीं आहेत, व नवीन पुस्तकें तयार होऊं लागल्यामुळें वाचनाची अभिरुचि वाढत चालली आहे. वाचनाची अभिरुचि लागणें आणि पुस्तकें तयार होणें या दोहोंचा अन्योन्य कार्यकारणसंबंध आहे. पहिलें दुसऱ्यास आणि दुसरें पहिल्यास नेहमीं सहायभूत असतें. आतां अमुक एक प्रकारचींच पुस्तकें तयार व्हावीं, व दुसऱ्या प्रकारचीं होऊं नयेत, हें लोकांच्या आवडीनावडीवर व गरजेवर अवलंबून असतें. बाजारांत ज्या मालाचा विशेष खप तो माल उत्पन्न करण्याकडे लोकांचें विशेष लक्ष; ज्याला गिऱ्हाईक नाहीं तो उत्पन्न करण्याची कोणी पर्वा करीत नाहीं हें स्वाभाविक आहे. कोणी झाला तरी त्याला आपल्या श्रमाचें फळ हें पाहिजेच; म्हणून ज्या पुस्तकापासून पुस्तककर्त्यास अर्थप्राप्ति होण्याचा संभव नाहीं अशीं पुस्तकें जन्मास येत नाहींत यांत नवल कोणतें? प्रस्तुत कालीं मोठमोठ्या हुद्द्याच्या नोकऱ्या व मोठमोठे किताब हे राजविद्या शिकल्यानेंच प्राप्त होणारे असल्यामुळें महाराष्ट्र भाषेंत कठिण शास्त्रीय विषयांवर नवीन पुस्तकें करण्याकडे किंवा झालेलीं वाचण्याकडे पुष्कळांचें पूर्ण दुर्लक्ष असतें. आतां वास्तविक रीतीनें पाहिलें तर यांत कांहीं वावगें नाहीं; कारण, ज्याला ज्या गोष्टीपासून फायदा नाहीं त्यानें ती कशासाठीं करावी? अर्थात् करूं नये, व कोणी करीतही नाहीं; आणि म्हणूनच सध्यां जीं पुस्तकें बाहेर येतात त्यांपैकीं फारच थोड्यांत राजकीय किंवा शास्त्रीय विषयांचें विवरण असतें. शेंकडा निदान पाऊणशें तरी केवळ मनोरंजनासाठीं लिहिलेलीं असतात. त्यांतही कादंबऱ्यांला आणि नाटकांला विशेष दर! निदान इतरांपेक्षां तरी अधिक! तशांत **आर्योद्धारकवाल्यांनीं** आणि **संगीतवाल्यांनीं** नाटकप्रयोग पाहण्याची चटक लावून दिल्यामुळें म्हणतां म्हणतां दोन–चार नाटकें छापून प्रसिद्ध झालीं व आणखीही होतील! असो; हें सर्व येथें सांगण्याचें कारण येवढेंच कीं, गतवर्षीं कोल्हापूर–प्रकरणास सुरुवात होऊन पैशाची चणचण झाली, त्या वेळेस आपलें आपल्यास कांहीं साहाय्य करतां आलें तर पहावें व तें करण्यास एखादें नाटक लिहिण्याखेरीज सुलभतर उपाय दिसेना, म्हणून १८८२ च्या एप्रिल महिन्यांत प्रस्तुत

पुस्तकास मी आरंभ केला, व ऑगस्ट महिन्यांत डोंगरीवर असतां तें तडीस नेलें. पुस्तककर्त्याच्या मनाला जी शांतता असावी ती गेल्या वर्षाच्या पहिल्या नऊ महिन्यांत माझ्या मनाला न मिळाल्यामुळें हें पुस्तक माझ्या हातून जितकें वठेल असें मला वाटत होतें तितकें वठलें नाहीं हें माझें मीच कबूल करितों. शिवाय, हें भाषांतर अशा अडचणींत करण्यांत असा हेतु नव्हता कीं, तें तावडतोब छापून त्यापासून पैसा उत्पन्न करावा; तर **आर्योद्धारक** मंडळीकडून त्याचे चार–दोन प्रयोग करवून त्यांचें जें उत्पन्न होईल तें केसरी–फंडाकडे लावावें असा होता. यामुळें भाषांतर करण्यास हवा तितका वेळ मिळाला नाहीं; इतकेंच नाहीं तर, परक्या भाषेंतील नाटकांचीं भाषांतरें कोणत्या रीतीनें करावीं याविषयीं माझीं जीं मतें आहेत व ज्यांच्यासंबंधानें मी पुढें लिहिणार आहे, तीं माझीं मला हवीं तशीं अंमलांत आणतां आलीं नाहींत. या कारणानें व भाषांतर करीत असतां ज्या पुस्तकांची मदत पाहिजे होती तीं न मिळाल्यानें फार त्रास पडला. कोणतेंही पुस्तक लिहीत असतां जीं साधनें पाहिजेत तीं अनुकूल असल्यानें तें जसें उतरतें तसें तें मागून कांहीं केलें तरी उतरत नाहीं, हें सर्वांस विश्रुत आहेच; तथापि तें छापूं लागण्यापूर्वीं माझ्यानें जितकें दुरुस्त करवलें तितकें मीं केलें आहे. या कामांत आमचे मित्र रा. रा. नारायण गोपाळ फाटक, बी. ए., एल्‌एल्. बी. यांनीं मला अंतःकरणपूर्वक पुष्कळ साहाय्य दिलें त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें. तसेंच रा. म. शि. गोळे, बी. ए.; रा. वा. शि. आपटे, एम्. ए; रा. वा. बा. केळकर, बी. ए.; व रा. बा. गं. टिळक, बी. ए., एल्‌एल्. बी., यांनीं वेळोवेळीं ज्या सूचना केल्या त्यांबद्दल मी त्यांचाही आभारी आहें.

मराठी भाषेच्या शुद्धलेखनाचे नियम अद्यापि व्हावे तसे कायमचे झाले नसल्यामुळें व या पुस्तकाचीं शेवटचीं प्रुफें वेळोवेळीं निरनिराळ्या हातून गेलीं असल्यामुळें यांतील शुद्धलेखनास कांहीं धरबंद नाहीं असें वाचकांस वाटण्याचा संभव आहे. पण याबद्दल ते मला दोष न देतां भाषेच्या अपूर्ण व्याकरणाला जबाबदार धरतील अशी आशा आहे. 'कांहीं', 'वस्त्रें', 'मीं पराक्रम केला' अशा ठिकाणीं अनुस्वार देण्यास कोणी चुकतो असें नाहीं; पण 'वेडावांकडा', 'धांवला', 'ठोंकणें', 'तुझ्यावांचून' अशा ठिकाणच्या अनुस्वारांविषयीं पुष्कळ मतभेद आहेत, व त्यामुळें या पुस्तकांत निरनिराळ्या वादग्रस्त ठिकाणीं निरनिराळें शुद्धलेखन आढळण्यांत येईल. तसेंच कित्येक ठिकाणीं अगदीं अक्षरशः भाषांतर करण्याचा प्रयत्न केला असल्यामुळें दूरान्वय झाला असेल व वाक्यें इंग्रजी वाक्यांच्या डौलावर गेलीं असतील; तथापि त्यांना दुर्बोधत्व न येऊं देण्याविषयीं माझ्याकडून होईल तितकी खटपट केली आहे. शेक्स्पीअरसारख्याच्या

अत्यंत कठिण नाटकाचें भाषांतर करणें किती दुरापास्त आहे हें ज्यांना स्वानुभवावरून ठाऊक असेल ते असल्या क्षुल्लक प्रमादाबद्दल फारसा दोष लावणार नाहींत अशी उमेद आहे. याशिवाय आणखी एक किरकोळ गोष्ट सांगणें जरूर आहे, ती ही कीं, आपली महाराष्ट्र भाषा अद्यापि बाल्यावस्थेंत असल्यामुळें तींत नानातऱ्हेचे मनोधर्म, मनोव्यापार व तदनुरोधी बाह्य क्रिया व्यक्त करण्याजोगे शब्द नसल्यामुळें, कित्येक ठिकाणीं साधारण शब्दांस विशिष्ट अर्थ द्यावा लागला आहे, व कित्येक ठिकाणीं त्यांचा अर्थ विस्तृत करावा लागला आहे. सारांश, ज्यांना या संबंधानें या पुस्तकाचें निःपक्षपाती गुणदोषविवेचन करायाचें असेल त्यांनीं ' जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे ' ही गोष्ट लक्षांत ठेवून व शेक्स्पीअरच्या या किंवा दुसऱ्या एखाद्या नाटकांतील कठिणशा पाना दोन पानांचें भाषांतर करून पहावें, व तें करितांना किती अडचणी येतात याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन मग माझ्या पुस्तकास जो दोष देणें असेल तो द्यावा, इतकेंच माझें सांगणें आहे.

आतां यापेक्षां अधिक महत्त्वाच्या विषयाकडे वळूं. माझ्या मतें शेक्स्पीअरसारख्याच्या नाटकाचें भाषांतर करणारानें होतां होईल तों तें मूळाला धरून करावें. शेक्स्पीअरचें अनुपमेय बुद्धिवैचित्र्य, शेक्स्पीअरची असामान्य कल्पनाशक्ति, शेक्स्पीअरचें अद्वितीय वर्णनचातुर्य, शेक्स्पीअरचें अवर्णनीय अनेकप्रकृतिज्ञान यांविषयीं ज्याला आपल्या वाचकांस परिचय करून द्यावयाचा असेल, त्यानें त्याच्या नाटकांची हवी तशी फाडाफाड केल्यानें त्याचा हेतु कसा तडीस जाईल ? तारा नाटकावर कै. विष्णुशास्त्री यांनीं जो अभिप्राय दिला आहे त्यांतील दोन-तीन मुद्दे प्रत्येक भाषांतरकर्त्यानें विशेष ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. त्यांत त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, ज्यानें देशकालमानानुरोधास्तव किंवा मराठी रीतरिवाजास्तव शेक्स्पीअरच्या नाटकांत सढळ हातानें फेरफार करून आपलें पुस्तक केलें आहे, त्याचें पुस्तक सामान्य वाचकांस कळण्यास अवघड पडणार नाहीं हें खरें, पण तसल्या पुस्तकापासून मराठींतून इंग्रजी भाषांतर करूं इच्छिणारास किंवा शेक्स्पीअरच्या अलौकिक कवित्वगुणाचें ज्ञान करून घेऊं इच्छिणारास कांहीं एक फायदा नाहीं. माझें असें म्हणणें आहे कीं, ज्यांना शेक्स्पीअरच्या नाटकांतर्गत पाश्चिमात्य लोकांचें विलक्षण रीतरिवाज आपल्या ग्रंथांत आणणें अप्रशस्त वाटत असेल, किंवा आणले असता ते वाचकांस नापसंत होऊन पुस्तकें अंगावर पडण्याची भीति असेल, त्यांनीं परस्परविरोधी असे इंग्रजी-मराठी विचार एकत्र करून ' गंगाजम्नी ' पुस्तक त्यांच्या गळ्यांत बांधण्यापेक्षा, धमक असल्यास शेक्स्पीअरच्या नाटकांतील फक्त कथानक मात्र घेऊन आरंभापासून शेवटपर्यंत नवीन नाटक लिहून सादर करावें हें बरें.

कितीही खबरदारी ठेविली तरी गोळकी भाषांतरांत केवढी असंबद्धता होऊन जाते हें शास्त्रीबुवांनी '**तारा**' नाटकावरील आपल्या अभिप्रायांत स्पष्टपणें दाखविलें आहे, म्हणून तें येथें फिरून सांगत बसत नाहीं. (**निबंधमाला**, अंक ६०, पृष्ठ २२–२४ पहा.) मूळास धरून भाषांतर न करण्यास कदाचित् हीं दोन कारणें असतील. पहिलें, इंग्रजी शब्दास मराठी शब्द शोधून काढण्याची मारामार, व तसें करण्यापासून होणारा त्रास; दुसरें, अश्रुतपूर्व आणि म्हणून लोकांस अप्रिय होणाऱ्या परकीय रीतीचें वर्णन केल्यानें येणारें दूषण. "शेक्स्-पीअरच्या अमुक नाटकावरून मराठी पद्धतीस जुळेल अशा रीतीनें हें भाषांतर केलें आहे." असा शेरा एकदा प्रस्तावनेंत ठोकून दिला की मग मूळ ग्रंथांत हवा तसा गोंधळ घालावा! कोठें कांहीं लागेना; मराठी रीतीस जुळत नाहीं, द्या सोडून! चांगला मराठी शब्द मिळत नाहीं; मराठी रीतीस जुळत नाहीं, द्या सोडून! वाक्याचा अर्थ लागेना; मराठी रीतीस जुळत नाहीं, द्या सोडून! याप्रमाणें मराठी रुढीशीं परकीय भाषेतील ग्रंथांची गांठ घालावयाची असें ठरवून टाकलें म्हणजे अर्थाबिर्थाच्या तावडींतून सुटण्यास पुष्कळ पळवाटा ठेवतां येतात. पण ज्याला असल्या वाटा ठेवल्याशिवाय गत्यंतर नाहीं त्यानें तसलीं पुस्तकें भाषांतरास घेऊंच नयेत असें मला वाटतें. दुसऱ्या कारणाच्या संबंधानें आतां विशेष लिहिण्याची गरजच राहिली नाहीं. '**अथेल्लो**' नाटकाचें भाषांतर मूळास धरून केलेलें आहे, व **आर्योद्धारक** मंडळीनें नुसतीं नांवें फिरवून तें अनेकदां पुण्याच्या चवचाल प्रेक्षकांपुढें करून दाखवून शाबासकी मिळविली आहे. तेव्हां पाश्चिमात्य रीतरिवाज आपल्या रंगभूमीवर आणल्यानें ते लोकांस अप्रिय होतील, किंवा त्यांना त्यांची किळस येईल, या मतास इतःपर हट्टवादी लोकांच्या मेंदूशिवाय दुसरा थारा राहिला नाहीं. '**अथेल्लो**' नाटकाप्रमाणें '**टेंपेस्ट**' नाटक नांवें बदलून रंगभूमीवर आणिलें तर त्याचा प्रयोगही लोकप्रिय होईल अशी माझी खात्री आहे. हेंही असो. या प्रश्नाला दुसरी दिशा आहे ती अशीः आम्ही ज्या त्या नाटकासंबंधानें 'आपले रीतरिवाज', 'मराठी रुढि', 'मराठी रीति', व 'देशकालमानानुरोध' घेऊन बसलों तर दुसऱ्यांची रीति, व दुसरे देशकालमानानुरोध हे आम्हांस कसे समजणार? शेक्स्पीअर जर वेडेपणानें या रीतीनें 'आपलेपणा'चा हट्ट धरून बसता तर आज त्याचा जो लौकिक आहे तो कधींच न होता. त्याच्या विश्वव्यापी प्रचंड कल्पनाशक्तीला इंग्लंडचेचसे काय, युरोपांतील अर्वाचीन व प्राचीन राष्ट्रांतील रीतरिवाज आणि मनुष्यप्रकृति पुरे होईनात, तेव्हां त्यानें नवीन कल्पनासृष्टि निर्माण केली,

याबद्दल त्याची कृति ढळढळीत साक्ष देत आहे.[1] आपल्याच्यानें नानातऱ्हेच्या मनुष्यांच्या अंतःकरणांतील मनोविकारांचें आविष्करण करवत नाहीं तें नाहीच; पण या आंग्लभौम सकलकविकुलशिरोमणीनें जें अमूल्य आविष्करण केलें आहे त्याचें भाषांतरद्वारां होईल तितकें खरें स्वरूप प्रकट होऊं न देणें म्हणजे —

**तातस्य कूपोऽयमिति ब्रुवाणाः क्षारं जलं कापुरुषाः पिबन्ति ।।**

असला मूर्खपणा करणें होय.[2] शेक्स्पीअरचें लिहिणें एकदेशीय बिलकुल नाहीं. तें तसें असतें तर त्याला 'अनंतबुद्धि', 'जगत्कवि', 'सर्वकालीन कवि', 'सहस्रात्मा' अशी विशेषणें कधींच मिळतीं ना; तें तसें असतें तर सगळ्या यूरोपीय राष्ट्रांचा तो इतका प्यारा होता ना; तें तसें असतें तर गेटी, श्लेजेल, जरव्हायनस, कोलरिज, डौडन, गिझो इत्यादि जगद्विख्यात जर्मन, इंग्लिश व फ्रेंच कवींच्या, तत्त्ववेत्यांच्या आणि इतिहासकारांच्या प्रीतीस पात्र होता ना; ते तसें असतें तर त्याचे ग्रंथ लावण्यांत आपलें समग्र आयुष्य घालविणारा कोणीच निघता ना; आणि तें तसें असतें तर त्या पाश्चिमात्य सूर्याचा प्रकाश सृष्टिनियमाचें अतिक्रमण करून पूर्व दिशेकडे कधींच येता ना! आजपर्यंत आमचें जें नुकसान झालें आहे तें हरएक प्रकरणांत हट्टानें 'आपलेपणा'स चिकटून राहिल्यानें झालें आहे. धर्मसंबंधीं, राज्यसंबंधीं, व्यवहारसंबंधीं इतर लोकांचे काय विचार आहेत याचा विचार केल्याशिवाय आपले दुराग्रह कसे जाणार? आमच्या राष्ट्राची उन्नति व्हावी म्हणून आम्ही रात्रंदिवस धडपडतों आहों; पण उन्नति होण्याचीं जीं खरीं साधनें आहेत त्यांचा कंटाळा केल्यानें आमचा इष्ट हेतु कधीं तरी पूर्ण होईल काय? विशेषतः व्यवहारसंबंधीं दुराग्रहांचा लवकर लय व्हावा असा हेतु असल्यास तो शेवटास नेण्यास शेक्स्पीअर-सारख्याच्या नानाविध नाट्यकृतींचा लोकांस परिचय करून देणें, व त्यांच्यापुढें तिचे प्रयोग करून दाखविणें यापेक्षां सुगमतर साधन तें कोणतें? आपल्याहून भिन्न आचारांचें चित्र नाटकरूपानें वारंवार आपल्या डोळ्यांपुढें आल्यानें आपल्या विचारांतील एकदेशीयता काढून टाकून सर्वांस सुखकर असा आचार

---

1. "Each change of many-coloured life he drew,
 Exhausted worlds, and then imagined new."
 Johnson

2. "What other anatomist of the human heart has reached his hidden core, and laid bare all the strength and weakness of our mysterious nature as he has done?"
Prof. Craik's *English Literature and Language*.

स्थापण्यास किती सुलभ जाईल हें थोडा विचार केल्यानें ध्यानांत येणार आहे. शिवाय, ज्यांना आम्ही आपले रीतरिवाज म्हणून म्हणतों ते कोणते समजायचे ? आठ–दहा वर्षांच्या पोरांना लग्नशृंखला घालणें, तरुण गतभर्तृका ऋतुमती झाल्याबरोबर त्यांना विकेशा करून चतुर्थाश्रम देणें, कोकीदार किंवा कंगणीदार पगडी घालणें, मुकटा किंवा पीतांबर नेसून जेवायास बसणें, पोटरीला आणि मांडीला खोल करकोचा पडेल असा चोळणा घालणें, कागद लावून चोळघा आणि आंगरखा चढविणें, नवऱ्यानें बायकोचें नांव न घेणें —हे आणि अशा प्रकारचे जे रीतरिवाज तेच आपले रीतरिवाज असें ज्यांना वाटत असेल, व यांतल्या यांत जो गुरफुटून राहिला तोच भला, असा ज्यांचा समज असेल, ते '**अथेल्लो**', '**लीअर**', '**रोमीओ आणि जुलिअट**' या नाटकांच्या वाऱ्यास उभें न राहतील तर न राहोत, पण ज्या नाटकगृहांत 'मृच्छकटिक', 'मुद्राराक्षस', 'मालती-माधव' किंवा 'शाकुंतल' यांपैकीं एखाद्याचा प्रयोग चालला आहे त्यांतही त्यांनीं पाय घालतां कामा नये ! आम्ही आपले रीतरिवाज सोडीत नाहीं असें म्हणणाऱ्यांपैकीं शेंकडा नव्याण्णव शुद्ध ढोंगी असतात, व बाकीचे विचारशून्य असतात. ज्यांना आमचे रीतरिवाज सुटले नाहींत असें वाटत असेल त्यांनीं आपल्या देशाची शें–दोनशें वर्षांपूर्वींची स्थिति आणि आतांची स्थिति यांची तुलना करून पहावी, म्हणजे तावडतोब त्यांचे डोळे उघडतील, व आपलें बोलणें हट्टाचें आणि चुकीचें आहे हें त्यांस कळून येईल. कालांतरानें स्थित्यंतर होतें, व स्थित्यंतराबरोबर आचारविचारांतर झालेंच पाहिजे. तेव्हां जी गोष्ट आपणास नकोशी वाटत असली तरी आपल्या नकळत होऊन जाते तिला विरोध करणें म्हणजे आपल्या मनाला आणि शरीराला विनाकारण त्रास करून घेणें होय. यासाठीं ज्या नाटकांत किंवा कादंबऱ्यांत आमच्या रीतरिवाजांचें किंवा रीती-भातींचें वर्णन केलें असेल त्याच चांगल्या असा ज्यांचा दुराग्रह झाला असेल त्यांनीं आपली दुराग्रहबुद्धि टाकण्याचा होईल तितका यत्न करावा हें योग्य आहे. विचारानें क्षुद्र बुद्धि निरस्त होऊन मन विस्तृत झालें, आणि "वसुधैव कुटुंबकम्" अशी वृत्ति त्यांत उत्पन्न झाली म्हणजे जो आनंद होतो तो कांहीं अनिर्वाच्य असतो. असें नसतें तर कालिदास–भवभूत्यादि महाकवींचा लौकिक सगळ्या जगभर पसरता काय ? असें नसतें तर सतरा–अठरा भाषांत '**अभिज्ञान शाकुंतला**'चें भाषांतर होतें काय ? असें नसतें तर 'हिंदुस्थानचा शेक्सपीअर' या पदवीस कालिदास चढता काय ? असें नसतें तर जगत्प्रसिद्ध शार्मण्यकवि गेटी "आलक्ष्य दंतमुकुलान्" हा श्लोक वाचून आनंदांत डुलत राहता काय ? असें नसतें तर वुइल्सन्सारखा सहृदय रसिक "या नाटकांत (**उत्तरराम-**

चरितांत) कित्येक अशा कल्पना आहेत कीं तसल्या मी पृथ्वीवरील दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राच्या ग्रंथांत पहिल्या नाहींत" असें म्हणता काय? सारांश हाच कीं, कारनेल, मोलीअर, डान्टी, श्लेजेल, गेटी, मिल्टन्, शेक्सपीअर, कालिदास व भवभूति यांसारखे जे महाकवि आहेत त्यांचा प्रतिभाविहंग उंच उड्डाण करून अव्याहत गतीनें आकाशपंथीं हव्या तेवढ्या भराऱ्या मारूं लागला म्हणजे त्याच्या खालून राष्ट्रेंच्या राष्ट्रें आणि खंडेंच्या खंडें निघून जातात! असले कवि विवक्षित देशाकडे किंवा देशाचारांकडे लक्ष न देतां मनुष्यजातीच्या ज्या अगाध मनोवृत्ति आहेत त्यांत वस्ताद पाणवुड्याप्रमाणें बुडी मारून तळीं काय आहे तें पाहण्यासाठीं झटत असतात! म्हणून कोणत्याही महाकवीच्या कृतीचें भाषांतर करतांना होईल तेवढ्या श्रमानें तींत ढवळाढवळ न करण्याचा प्रयत्न करावा.

आतां आणखी एका महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करावयाचा आहे. तो हा कीं, कादंबऱ्यांत किंवा नाटकांत जी भाषा घालावयाची ती सर्वत्र शुद्ध असावी, कीं पात्रानुरोधानें शुद्धाशुद्ध असावी? पहिल्या प्रश्नापेक्षां यासंबंधानें विशेष मतभेद असण्याचा संभव आहे. पुष्कळांचें असें म्हणणें आहे कीं, ज्या अर्थीं नाटक हें संसाराचें हुबेहूब चित्र आहे त्या अर्थीं त्यांत जीं पात्रें येतात त्यांच्या योग्यतेनुरूप त्यांची भाषा असावी. एखाद्या लंगोट्याच्या तोंडीं शुद्ध भाषण घालणें म्हणजे गाढवावर भरजरी खोगीर चढविण्यासारखें होय. या म्हणण्यांत थोडेंबहुत तथ्य आहे, नाहीं असें माझें म्हणणें नाहीं. पण पात्रानुरोधानें चांगली–वाईट भाषा घालल्यानें एकंदरींत नफ्यापेक्षां नुकसान फार होतें. एक तर ज्या कुळवाड्यांचें वेडेंवांकडें भाषण आपण घालतों ते मुळींच अशिक्षित असल्यामुळें त्यांस तुम्ही कोणत्याही रीतीनें बोलविलें तरी ते त्याबद्दल अत्यंत उदासीन असणार. तुम्ही त्यांच्या तोंडांत एखाद्या शास्त्र्याची प्रौढ भाषा घातलीत तरी ते तुमच्याशीं भांडायला येतील असें नाहीं. दुसरें, महाराष्ट्र देश बराच विस्तीर्ण असल्यामुळें त्यांत एकाच प्रकारची कुळवाडी बोली आहे असें नाहीं. कोंकणपट्टी, नागपूर प्रांत, वऱ्हाड प्रांत, खानदेश आणि पुणें प्रांत यांपैकीं प्रत्येकांतील कुळवाड्यांची किंवा स्त्रियांची बोली दुसऱ्याहून भिन्न आहे. तेव्हां पुस्तकांत जी कुळवाडी बोली घालावयाची ती कोणत्या कुळवाड्यांची? पुणें प्रांतांतील कुळवाडी विशेष सुधारलेले आहेत म्हणून त्यांची घालायाची कीं काय? किंवा पुणें हें महाराष्ट्र भाषेचें माहेरघर, म्हणून येथील पुस्तककर्त्यांस जी रुचेल ती घालावयाची? बरें, पुण्याच्या ग्रंथकारांनीं अमुक एक म्हणून पसंत केली, पण बाकीच्या ठिकाणच्या लोकांनी त्यांचा हुकूम तोडून दुसरीच घातली तर त्यांना पुण्याचे ग्रंथकार काय

शासन करणार ? मनोरंजन हा जर नाटकाचा मूळ उद्देश असेल, व तें करणें त्यांत घातलेल्या भाषेवर बहुतेक अंशीं अवलंबून असेल तर जो ज्या प्रांतांत राहणारा असेल तो त्या प्रांतांतील बायकांचें आणि शूद्र लोकांचें बोलणें आपल्या पुस्तकांत घालील, किंवा पुण्याकडे वाचणारांची संख्या विशेष आहे असें त्याच्या नजरेस आल्यास आपल्या फायद्यासाठी इकडील शूद्र लोकांच्या भाषेचें अध्ययन करून ती घालील ! आतां प्रश्न असा आहे कीं, बायकांचें आणि शूद्रांचें वेडें-वांकडें बोलणें घातल्यानें आनंद होतो की विरस होतो आणि नाटक हें संसाराचें किंवा मनुष्यकृतीचें हुबेहूब चित्र आहे कीं काय ? पुण्याकडील शूद्र लोक कितीही सुधारलेले असले तरी त्यांचें बोलणें इतर ठिकाणच्या अडाणी लोकांच्या बोलण्या-प्रमाणेंच स्थलपरत्वें आणि कालपरत्वें फिरणारें आहे. त्याला अद्यापि कोणत्याही प्रकारचें स्थैर्य आलें नसल्यामुळें तें अमुक तऱ्हेनेंच लिहावें आणि अमुक तऱ्हेनें लिहूं नये याबद्दल नियम करतां येत नाहींत, आणि यद्यपि एखाद्यानें ते केले तरी ते कोणीही पाळणार नाहीं. पुण्याच्या बायकांचें बोलणें चांगलें असें कल्पून ' मौजेच्या चार घटका 'कर्त्यानें तें आपल्या पुस्तकांत घातलें आहे. रा. शंकर मोरो व रा. नारायण बापूजी कानिटकर यांना त्यांच्या मनाप्रमाणें जें बरें दिसलें तें त्यांनी घातलें आहे. सारांश, असल्या प्रकारचीं वेडींवाकडीं बोलणीं ज्या पुस्तकांतून घातलीं आहेत त्यांपैकीं एकाचा दुसऱ्याशीं मेळ म्हणून पटायाचा नाहीं ! आणि असें होतें यांत कांहीं आश्चर्य नाहीं. कारण, एक तर वर सांगितल्याप्रमाणें या अज्ञान लोकांच्या बोलीला म्हणण्यासारखी स्थिरता आलेली नाहीं, व ती कशी बोलतात हें समजून घेण्याचा पुस्तककर्ते प्रयत्न करीत नाहींत. टेबलापुढें खुर्ची मांडून बसावें आणि हव्या त्या बायकोला आणि कुळवाड्याला हवें तसें बोलवावें ! गांवांत इकडे तिकडे फिरतांना कुळवाड्यांचे जे चार शब्द कानांवर पडतात त्यांवरून हे आपल्या पुस्तकांतील बोली रचणार ! बायकांच्या बोलण्याच्या संबंधानेंही बहुतेक असाच आनंद असतो ! आमच्या समाजात निरनिराळीं स्त्री-पुरुषें वारंवार एकत्र होत नसल्यामुळें स्त्रियांची बोली शिकण्याची मुख्य शाळा म्हणजे घर. हें तरी सामान्यतः ज्याचें त्यालाच उपयोगी. यांतील हेडमास्तरीण आई किंवा बायको ! नाहीं म्हणायाला लग्नमुंजींत स्त्रियांचा मेळा एकत्र झाल्यावर आणखी एका तऱ्हेचीं व्याख्यानें श्रवण करण्याचा प्रसंग असतो खरा ! या रीतीनें पढून तयार झालेला पंडित बायकांचें बोलणें हुबेहूब उठवून देत असेल यांत कांहीं संशय नाहीं ! कित्येक तर या कामांत आपणांस मोठे निष्णात म्हणवितात. पण ज्यांना त्यांच्या तुटपुंज्या ज्ञानाची परीक्षा करायाची असेल त्यांनी असल्या प्रकारचें एखादें पुस्तक घ्यावें आणि तें दोन-तीन बायका

जमवून त्यांच्यापुढें वाचून दाखवावें, आणि 'तुम्ही असेंच बोलतां ना' असा प्रश्न त्यांना केल्यावर त्या काय उत्तर देतात तें ऐकावें म्हणजे झालें! विशेषेंकरून कुळवाडी बोली लिहिणारांची फार फजिती होते. 'छूं' व 'कूं' हे शब्द लावून ज्याप्रमाणें कित्येकांना गुजराती किंवा हिंदुस्थानी भाषा बोलण्याची सोपी हिकमत सांपडलेली असते, त्याप्रमाणेंच यांनाही पाहिजे तो शुद्ध ब्राम्हणी शब्द घेऊन अपभ्रंशानें त्याला कुळवाडी कसें बनवावें याची किल्ली सांपडलेली असते! हे भाषाकर्ते अशी भाषा लिहितात कीं, साधारण वाचकांस ती लवकर वाचतां येत नाहीं व समजत नाहीं! मला असें वाटतें कीं, भाषेच्या संबंधानें असलें हेंद्रें वागडणें बिलकुल कामाचें नाहीं. आपण जें लिहितों त्याचा हेतु असा असतो कीं, तें अनेकांनीं वाचून त्यांना आनंद व्हावा. जें लिहिणें वाचतां वाचतां समजत नाहीं किंवा जें सर्व ठिकाणच्या लोकांस सारखें समजण्याजोगें नसतें तें एकदेशीय होतें, व तें तसें नसतें तर त्यापासून जितक्या लोकांना जेवढा आनंद होण्याचा संभव असतो, तितक्यांना तेवढा होत नाहीं; व असें झाल्यानें पुस्तककर्त्याचा मूळ हेतु पूर्ण होत नाहीं. ज्यांना आपलीं पुस्तकें फार लोकांनीं वाचावीं व तीं फार दिवस टिकावीं असें वाटत असेल, त्यांनीं कोणत्याही पात्रासाठीं वेडीवाकडी भाषा घालण्याच्या भरीस पडूं नये. ज्याप्रमाणें ओबडधोबड हत्यारांनीं नकशीदार काम करितां येत नाहीं, त्याप्रमाणें चांगलें विचार वाईट भाषेंत व्यक्त करितां येत नाहींत. रानवट आणि गांवढळ बोलणें पुस्तकांत वारंवार घालणें म्हणजे व्याकरण आणि भाषा-शुद्धि यांच्या सुधारणेला दृढ व्यत्यय आणण्यासारखें होय. स्त्रिया आणि शूद्र आज तारखेला शुद्ध मराठी बोलत नाहींत हें खरें; पण त्यांना सुशिक्षण मिळून त्यांनीं पुढें–मागें शुद्ध बोलूं लागावें अशी आपली इच्छा आहे, व ती पूर्ण होण्या-साठीं शहरांतून आणि खेड्यापाड्यांतून मुलींसाठीं आणि हरएक जातीच्या मुलांसाठीं शाळा घालण्याचा क्रम सुरू आहे. या सर्व खटपटीचा अर्थ असा आहे कीं, कालांतरानें सर्वांस सुशिक्षण मिळून विद्यासंपादनापासून होणारे फायदे तर व्हावेच, पण त्यांच्याबरोबर सर्वांची लिहिण्याची आणि बोलण्याची भाषाहि एक व्हावी. पृथ्वीवरील सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत एक भाषा होईल तर फार हित होईल असा विचार मनांत येऊन ही गोष्ट सिद्धीस जाण्यास काय उपाय करावे, या विषयाकडे अनेक तत्त्ववेत्त्यांचें लक्ष लागलें आहे, हें पुष्कळांच्या ऐकण्यांत आलेंच असेल. ही बहुतेक अंशीं अशक्य गोष्ट शक्य अशी वाटूं लागण्यास देखील हजार–पांचशें वर्षें लागतील, मग ती प्रत्यक्ष घडून येण्यास किती वर्षें लागतील याचा आज मुळींच तर्क करितां येत नाहीं. म्हणून तसल्या अवाढव्य फंदांत आज आपणांस पडण्याची गरज नाहीं. तथापि हिंदुस्थानासाठीं, निदान आपल्या

महाराष्ट्र देशासाठीं, एक भाषा करणें इष्ट आहे आणि साध्य आहे, व ही इष्ट आणि साध्य गोष्ट लवकर तडीस जाण्यासाठीं सर्व छापील पुस्तकांत सर्वांनीं व्याकरणशुद्ध अशी एक प्रकारची भाषा लिहिण्याचा प्रघात पाडिला पाहिजे. आतां कोणी असें म्हणतील कीं, रंगभूमीवर एखादा कुळवाडी व्याकरणशुद्ध मराठी भाषा बोलूं लागला तर रसभंग होणार आहे; तर या आक्षेपावर माझें असें उत्तर आहे कीं, पुस्तकांत व्याकरणशुद्ध भाषा असली म्हणून नाटकगृहांत हलक्या पात्रांनीं ती तशीच उठविली पाहिजे असें नाहीं. पुस्तकांत शुद्ध भाषा असूनही बोलतांना श्रोत्यांस ती कर्णकटु न होण्यापुरते फेरफार पाहिजे त्या पात्रास, निदान नाटकाध्यापकास तरी करितां येणार आहेत. कित्येक इंग्रजी कादंबऱ्यांत व नाटकांत हलकीं भाषणें घालण्याचा प्रचार आहे, नाहीसा नाहीं. पण इंग्लिश ग्रंथकारांच्या चांगल्या गुणांबरोबर वाईट गुणांचें अनुकरण आपण कशासाठीं करावें ? शिवाय शेक्स्पीअरसारख्या ज्या मोठ्या ग्रंथकारांना आपले ग्रंथ चिरकाळ टिकावे अशी इच्छा असते, ते तरी निदान आपल्या ग्रंथांत असली हलकीं भाषणें घातलींच तर फारच थोड्या ठिकाणीं घालतात, हें त्यांच्या ग्रंथावलोकनावरून प्रत्ययास येणार आहे. तसेंच नाटक हें सृष्टीचें किंवा मनुष्याच्या आचरणाचें हुबेहूब चित्र आहे हें म्हणणेंही खोटें आहे. सर्वत्र महाकवींनीं नाटकांत गद्यपद्यात्मक भाषणें लिहिलीं आहेत. पण मनुष्यामनुष्यांचा व्यवहार गात चालत नाहीं हें आपण प्रति दिवशीं पहातों. तेव्हां नाटकादर्शांत मनुष्याच्या आचरणाचें हुबेहूब प्रतिबिंब पडलेलें असतें या म्हणण्याचें निरर्थकत्व या एका मुद्यावरूनच बरेंच सिद्ध होतें. तसेंच, नाटकांत मनोवृत्तीचें जें वर्णन असतें तें नेहमीं सत्याहून अधिक असतें. अतिशयोक्ति ही नाटकांतील रसाचा आत्मा आहे. थोडीबहुत अतिशयोक्ति केल्याखेरीज नाटकांत अलंकार घालतां येणार नाहींत किंवा कोणताही रस उत्पन्न करितां येणार नाहीं. म्हणून, नाटक हे सृष्टीचें आणि मनुष्याच्या आचरणाचें यथार्थ चित्र आहे असें समजून वेडीवांकडी भाषा लिहिण्यास प्रवृत्त होणें म्हणजे फारच मोठा प्रमाद करणें होय. या आणि अशा अनेक कारणांवरून व्यवहारांत मनुष्यें बोलतात तशी भाषा पुस्तकांत घालणें हें अगदीं अप्रशस्त आहे अशी माझी समजूत आहे.

प्रस्तुत भाषांतर अगदीं वरील नियमांबरहुकूम उतरलें आहे असें नाहीं. हे नियम सुटल्याचीं त्यांत कांहीं स्थळें सांपडतील. हें पुस्तक करण्याचा मुख्य हेतु पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्याचा प्रयोग करण्याचा असल्यामुळें नांवें फिरवूनच भाषांतर करण्यास आरंभ केला. पुढें, मीं प्रथम दिलेलीं नांवें कित्येक मित्रांस बरीं न वाटल्यामुळें त्यांनीं दुसरीं सुचविलीं व तीं घालतांना मोठी खबरदारी

ठेविली होती, तरी एक-दोन ठिकाणीं पहिलींच राहिलीं आहेत. कित्येकांचें असें म्हणणें पडलें कीं, ज्या ठिकाणीं मूळांत गाण्याजोगी पद्यें आहेत त्या ठिकाणी भाषांतरांतही तसलीं पद्यें करून घालावीं. ही सूचना मला बरी वाटली; परंतु कवितादेवीचा वरदकर तर राहिलाच, पण करांगुली सुद्धां मस्तकावर नसल्यामुळें ज्यास ती अत्यंत प्रसन्न असे आमचे मित्र रा. शंकर मोरो रानडे, बी. ए. यांची आराधना केली. त्यांच्याकडे त्याबद्दल पत्र पाठवितांच त्यांनीं तीं मेहेरबानीनें करून दिलीं याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. या पद्यांत ग्रीक व रोमन पुराणांतील देवादिकांचीं नांवें न घालता आपल्या इकडील पुराणांतील नांवें घातलीं आहेत. कांहीं ठिकाणीं शब्दश्लेषांचें किंवा अर्थश्लेषांचें भाषांतर नीट होईना म्हणून वाक्य दोन वाक्यें सोडलीं आहेत. हे आणि यासारखे दुसरे किरकोळ फरक केले आहेत, नाहींत असें नाहीं. तरी कोणत्याही महत्त्वाच्या ठिकाणीं शेक्स्पीअरला काडीयेवढें सुद्धां दुखवलेलें नाहीं. मूळांतल्याप्रमाणेंच भाषांतरांतही भुजंगानें राजास ठार मारून चंद्रसेनाच्या आईशीं म्हणजे आपल्या भावजयेशीं लग्न लाविलें आहे; तसेंच, राजाच्या प्रेताबरोबर राणीला स्मशानांत नेण्यास किंवा चंद्रसेनाचें आणि तीव्रजवाचें द्वंद्व चाललें असतां शेक्स्पीअरच्या जीवावर तिला दारू पाजण्यास मला कांहीं एक भीती वाटली नाहीं.

येथपर्यंत भाषांतरासंबंधानें ठोकळ विचार झाला. आतां खुद्द शेक्स्पीअर आणि त्याचें प्रस्तुत नाटक यांविषयीं दोन शब्द लिहावयाचे आहेत. शेक्स्पीअर मोठाच कवि खरा, कदाचित् त्याच्या तोडीचा दुसरा नाटककार नसेलही; पण येवढ्यावरून त्याची कृति अमानुष आहे, किंवा तींत दोषाचा लेश म्हणून कोठेंही नाहीं, असें आमच्यानें म्हणवत नाहीं. शेक्स्पीअरचे कांहीं निस्सीम भक्त आहेत त्यांना त्याच्या नाटकांत दूष्यस्थळ म्हणून कांहीं दिसत नाहीं. त्याची पद्यरचना, त्याचें शब्दलालित्य, त्याचें कथानक आणि संविधानक, त्याचें स्वभाववर्णन हीं सारीं त्यांच्या मतें निर्दोष आहेत, इतकेंच नाहीं, केवळ अद्वितीय आहेत. आम्हांस असें वाटतें कीं, शेक्स्पीअर हा कांहीं ईश्वरांश नव्हता; व इतर ग्रंथकारांप्रमाणें त्याच्या ग्रंथांतही पुष्कळ प्रमादस्थलें आहेत. चंद्राच्या भव्य तेजामुळें त्यांतील शशांक लोपून जातो, म्हणून त्यावर तो नाहीं हें म्हणणें जसें प्रशस्त होणार नाहीं, त्याप्रमाणेंच शेक्स्पीअरच्या गुणांपुढें दोष दिपून जातात, म्हणून ते त्यांत मुळींच नाहींत हें म्हणणेंही बरोबर होणार नाहीं. त्याच्या गुणानुरूप त्याची स्तुति आणि त्याच्या दोषानुरूप त्याची निंदा ही करण्यास निदान पराकाष्ठेचा स्पष्ट व स्पष्टवक्ता म्हातारा जान्सन् तरी भ्याला नाहीं. शेक्स्पीअरचीं नाटकें इतकीं सरस खरीं, व त्याला त्यांपासून बरीच

द्रव्यप्राप्तिही झाली, पण त्याचा अलीकडे जो येवढा लौकिक झाला आहे त्याला मुख्य कारण ग्यारिक. ग्यारिक म्हणून जान्सन्च्या वेळेस अतिप्रसिद्ध नट होऊन गेला. त्याच्या अनुकरणीय अभिनयामुळें शेक्सपीअरचें बुद्धिवैचित्र्य लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आलें, व शें–दीडशें वर्षे हा कोहिनूर आपल्या हेळसांड-पणामुळें किंवा मूर्खपणामुळें उकिरड्यांत पडून राहिला होता असें त्यांस वाटलें. मग मागल्या उपेक्षेबद्दल जणों काय प्रायश्चित्त घेण्यासाठीच त्यांनीं असला जबरदस्त स्तुतिपाठ करण्यास आरंभ केला की, तेव्हांपासून आतांपर्यंत त्याचा ओघ एकसारखा वाढत चालला आहे, व त्याच्या तीव्र धारेपुढें प्रतिकूल टीकाकारांचें कांहीं चालत नाहीं. आम्हां पूर्वात्यांस दूरत्वामुळें तिच्या सपाट्यांत सांपडण्याची फारशी भीति नाहीं, आणि म्हणून आमच्या हातून त्याच्या नाटकांचें विशेष निष्पक्षपाती गुणदोषविवेचन होण्याचा संभव आहे. अगोदर शेक्स्पीअर हा कोणी प्रासादिक किंवा दैवी पुरुष होता असें आम्हांस वाटत नाहीं. त्याचीं नाटकें त्याच्या पूर्वींच्या आणि त्याच्या मागाहून झालेल्या नाटककारांपेक्षां चांगलीं होण्यास जीं कारणें झालीं तीं त्या वेळचा इंग्लंडचा इतिहास वाचला असतां तेव्हांच ध्यानांत येणार आहेत. इंग्लंडांत 'आव्हन' नदीच्या काठीं 'स्ट्राटफर्ड' म्हणून एक गांव आहे, त्या ठिकाणीं १५६४ त वुइलियम् शेक्स्पीअर याचा जन्म झाला. त्याच्या लहानपणच्या सांगण्यासारख्या गोष्टी प्रसिद्ध नसल्यामुळें त्या येथें देतां येत नाहींत. इतकें मात्र खात्रीनें ठाऊक आहे कीं, त्याच्या गरीब आईबापांनीं त्याला त्या खेड्याच्या शाळेंत घालून त्याच्याकडून तेथें होण्यासारखीं दोन अक्षरें करविलीं होतीं. स्ट्राटफर्ड ज्या तालुक्यांत किंवा कौंटींत आहे, त्यांतच 'बरबेज' म्हणून कोणी त्या वेळचा वाखाणलेला नट होता. त्याच्याबरोबर विसावें वर्षी शेक्स्पीअर हा लंडनास गेला, आणि तेथें, 'ब्लाकफायर' नांवाचें एक नाटकगृह होतें त्याच्या भागीदारांपैकीं बारावा भागीदार झाला. पुढे याच भागीदार मंडळीनें 'ग्लोब' नांवाचें नाटकगृह विकत घेतलें, व त्यांत ती उन्हाळ्यांत खेळ करीत असे. शेक्स्पीअर हा स्वतः नटाचें काम करी, व आपल्या आणि दुसऱ्या नाटककारमंडळीस नाटकें लिहून देई. त्या वेळेस नाटककारमंडळ्या चांगल्या चांगल्या नाटककारांपासून त्यांचीं नाटकें विकत घेत, व रंगभूमीवर त्यांचे प्रयोग करून दाखवून त्यांवर पैसे कमावीत. शेक्स्पीअर याला यामुळें दोन तऱ्हेनें पैसे मिळत. एक, तो स्वतःच नाटकांत सोंग घेई म्हणून, व दुसरी, तो नाटकें लिही म्हणून. सगळा जन्म नाटकांत घालवावा असा शेक्स्पीअरचा हेतु नव्हता; तर तरुणपणांत दहा पंधरा वर्षे हरहुन्नर करून चार पैसे कमवावे, व मग आपल्या गांवीं परत जाऊन

तेथें जमीनजुमला विकत घ्यावा, व घरदार करून वृद्धापकाळ सुखांत आणि प्रतिष्ठेंत घालवावा असा होता. व त्याप्रमाणें त्यानें केलें. थोडचा वर्षांत त्याला पुष्कळ पैसे मिळाले, व पूर्वीच्या संकेताप्रमाणें त्यानें त्या पैशांवर स्ट्राटफर्ड येथें जमिनी व घरें खरेदी केलीं आणि मरायच्या अगोदर तेथें तो स्वस्थपणें कांहीं वर्षे जाऊन राहिला. निःसंशयपणें शेक्स्पीअरचीं अशीं पसतीस नाटकें आहेत; चौदा आनंदपर्यवसायी, अकरा शोकपर्यवसायी, व दहा ऐतिहासिक. शेक्स्पीअरच्या आनंदपर्यवसायी नाटकांत शेवट गोड असतो येवढचावरून त्यांना तें नांव द्यावयाचें; बाकी त्यांपैकीं पुष्कळ नाटकांत करुणा उत्पन्न करणारे प्रवेश आहेत, व कित्येकांची संविधानकें तर अशीं आहेत कीं, त्यांवरून हीं नाटकें शोकपरिणामी असतील असें वाटतें. शेक्स्पीअर येवढा बुद्धिमान् खरा, व त्या एकटयानें ३५ नाटकें लिहिलीं ही तारीफ करण्याजोगी गोष्ट खरी; पण या ३५ पैकीं चौतिसांच्या मूळ गोष्टी त्यानें दुसऱ्या पुस्तकांतून घेतल्या आहेत, हा एक मुद्दा ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. त्यानें असें केलें म्हणून आम्ही त्याची कमी योग्यता समजतों असें नाहीं; कारण, दुसऱ्या पुस्तकांतून मूळ गोष्ट घेतली तरी तींत हवे तसे फेरफार करून ती चित्तवेधक करण्यास लहानसान बुद्धि लागते असें नाहीं; तथापि पहिल्यापासूनच नवा पाया रचून त्यावर इमारत चढविणें, व दुसऱ्या कोणी घातलेल्या पायाची दागदुजी करून घेऊन त्यावर इमारत चढविणें, यांत थोडें अंतर आहे. असो; शेक्स्पीअरनें पसतीस नाटकें लिहिलीं व त्यांवर त्याला पुष्कळ द्रव्य संपादितां आलें, यावरून त्या वेळेस नाटकें लिहिण्यास अनुकूल अशी देशस्थिति आली होती, व लोकांस नाटकें वाचण्याची आणि त्यांचे प्रयोग पहाण्याची अभिरुचि लागली होती, या दोन गोष्टी सिद्ध होतात. कोणत्याहि देशांत मोठा मनुष्य जन्मास येतो तो एकाएकीं आकाशांतून पडतो असें नाहीं. तो आणि त्यासारखे दुसरे मोठे मनुष्य उत्पन्न होण्याचा त्या देशाला काळच आलेला असतो. इलिझाबेथच्या कारकीर्दीत शेक्स्पीअरशिवाय दुसरे अनेक मोठे लोक जन्मास आले. स्पेन्सर, राले, जानसन, बेकन, बरले व हूकर हीं समकालीन नांवें ध्यानांत ठेविलीं असतां शेक्स्पीअरच्या विलक्षण कल्पनाशक्तीविषयी इतका अचंबा वाटणार नाही. नुसत्या बुद्धिसामर्थ्याचीच तुलना करावयाची असेल तर बेकनची बुद्धि शेक्स्पीअरपेक्षां कांकणभर अधिक येईल असें आम्हांस वाटतें. पण असल्या तुलनेंत पडण्यांत कांहीं अर्थ नाहीं, म्हणून ती दिशाच आम्हीं अजीबात सोडून देतों. आमचें इतकेंच म्हणणें आहे कीं, ज्या जमिनींत शेक्स्पीअर जन्मास आला, त्या जमिनींत त्या वेळेस त्यासारखे मोठे पुरुष निपजण्याजोगी

उत्पत्तितत्त्वें एकत्र झाली होती. असें नसतें तर वर सांगितलेली विद्वन्मणिपरंपरा उदयास आली नसती. पंधराव्या शतकांत सर्व युरोपभर जी धर्मक्रांति झाली, तिच्या योगानें यूरोपांतील सर्व राष्ट्रांची स्थिति अगदीं बदलून गेली असें म्हणण्यास हरकत नाहीं. इग्लंडांत धर्मक्रांति होऊन राज्यक्रांतिही झाली. इंग्लंडांतील इतिहासांत ज्यांना 'गुलाबाच्या लढाया' असें म्हणतात, त्यांत इंग्लंडांतील मोठमोठ्या घराण्यांचा फडशा होऊन पंधराव्या शतकाच्या अखेरीस अनियंत्रित राजघराणें स्थापित झालें. या घराण्यांतील बहुतेक राजे फार प्रबल होऊन गेले. प्रबल राजांच्या कारकीर्दींत बुद्धिमान् पुरुष उदयास येतात हें सर्वांस ठाऊक आहे. इलिझाबेथ इच्या अमदानींत इंग्लंडचा दरारा सर्व यूरोपांत ठाम बसून गेला होता. स्पेनच्या 'अजिक्य' आरमाराचा फडशा उडवून दिल्यानें त्या वेळच्या इंग्लिश लोकांस केवढें स्फुरण आणि केवढी वीरश्री आली असेल, याची खरी कल्पना इतिहासज्ञास मात्र करतां येणार आहे. यूरोपांत प्राटेस्टंट लोकांचा छळ झाल्याची बातमी लागली कीं त्यांचा कैवार घेऊन लढाई करण्यास इलिझाबेथ राणी सदा तयार असे, यामुळें युरोपांतील क्याथलिक राष्ट्रें तिला चळचळां कांपत, व आपापल्या राज्यांतील प्राटेस्टंट प्रजेला न्यायानें आणि दयेनें वागवीत ! मेरीच्या राज्यांत पोपचें फार प्रस्थ माजलें होतें; इलिझाबेथ सिंहासनारूढ होतांच तिनें पोपचा संबंध तोडून टाकला, व इंग्लंडच्या धर्मप्रकरणांत तो कधींहि हात घालणार नाहीं असा बंदोबस्त केला ! स्कॉटलंडच्या राणीनें कांहीं गडबड केल्यावरून तिला सतरा-अठरा वर्षें कैदेंत ठेवून अखेरीस तिचा शिरच्छेद केला ! पृथ्वीप्रदक्षिणा करण्यासाठीं शूर खलाशांच्या हातीं मोठमोठीं जहाजें देऊन त्यांना निरनिराळ्या दिशांस पाठविलें, व हिंदुस्थानाशीं व्यापार करण्याकरितां पहिली ईस्ट इंडिया कंपनी स्थापिली. या आणि अशा अनेक गोष्टींवरून वाचकांच्या हें लक्षांत येईल कीं, इंग्लंडच्या इतिहासाचा हा काळ पराकाष्ठेच्या चंचलतेचा असल्यामुळें नाटककारास आपल्या नाटकांत गुंफितां येण्याजोग्या पुष्कळ गोष्टी त्याच्या डोळ्यापुढें घडत असतील यांत संशय नाहीं. व मोठमोठ्या गोष्टी नित्यश: कानावर येत असल्या किंवा डोळ्यापुढें घडत असल्या, म्हणजे त्यांचें मनोवेधक वर्णन हातून सहज होऊन जातें हें कोणीही कबूल करील. शेक्स्पीअरच्या पूर्वी इंग्लंडांत मोठे लोक झाले नाहींत यांत कांहीं आश्चर्य नाहीं; कारण, तसले लोक होण्यास जी स्थिति लागते ती स्थिती इंग्लंडला किंवा यूरोपांतील दुसऱ्या कोणत्याही देशाला आली नव्हती. युरोपखंडाच्या इतिहासांत ज्यांना 'मध्ययुगें' असें म्हणतात, त्या युगांत युरोपांतील सगळ्या समाजांची स्थिति अत्यंत शोच्य होती. अज्ञान, पापाचरण, धर्मभोळेपणा, धर्माधिकाऱ्यांची लूट, विषयसुखाविषयीं अत्यंत

उदासीनता वगैरे गोष्टींमुळें सगळें यूरोपखंड एका प्रकारच्या झोंपेंत घोरत पडलें होतें असें म्हणण्यास हरकत नाही. स्वर्गाच्या दाराच्या किल्ल्या धर्माधिकाऱ्यांपाशीं; त्यांच्या मध्यस्थीखेरीज ईश्वरप्राप्ति किंवा मुक्ति नाहीं; पापांचें क्षालन होण्यासाठीं भटजीबोवांच्या हातावर दक्षणा सोडली म्हणजे पुरें आहे; प्रपंचांत मन घालणें म्हणजे मोक्षपदाचा अव्हेर करून नरकवास प्राप्त होण्याची तयारी करणें; विषयसुखाचा अभिलाष हा साऱ्या पापांचें आणि दुःखांचें मूळ; प्रखर शरीरदंडनाशिवाय आत्म्याची शुद्धि होणें नाहीं; आपली ऐहिक वसति क्षणभंगुर व यातनामय आहे, व ऐहिक सुखापासून सुखाचा भास मात्र होतो; खरें सुख व खरी शांति स्वर्गांत; संसारसुखाचा तिटकारा करून गुरूपासनेंत किंवा ईश्वरभजनांत कालक्रमण करणें हा आयुष्य घालविण्याचा उत्तम मार्ग; मित्रत्व, बंधुत्व, पितापुत्रत्व वगैरे मिथ्या मायापाश होत; यांत सांपडलेला मनुष्य परलोकास मुकतो, व त्याला दुर्गति प्राप्त होते; 'पदार्थशास्त्र' म्हणतात तें कांहीं नाहीं, सगळा किमयेचा आणि जादुगिरीचा खेळ आहे; सूर्यचंद्रांच्या गतीचा निर्णय कोणास करतां येणार नाहीं किंवा ताऱ्यांचें अंतर कोणाच्यानें निघणार नाही; हे विषय मनुष्याच्या बुद्धीच्या पलीकडे आहेत; सारांश, वैराग्यासारखी दुसरी चीज नाहीं अशी त्या वेळच्या लोकांची पक्की समजूत होती, व त्यामुळें त्यांच्या हातून कांहीं एक होत नसे. ल्यूथरकृत धर्मक्रांतीमुळें जें मन्वंतर झालें त्यांत या वेडेपणाच्या कल्पना अगदी राहिल्या नाहीत. ईश्वरापाशीं वशीला लावण्यास मध्यस्थांची किंवा प्रतिनिधींची आवश्यकता नाहीं; संसारसुखाची इच्छा केल्यानें किंवा तें प्राप्त होण्याचा उद्योग केल्यानें परमेश्वराला राग येण्याचा संभव नाहीं; विषयवासना तृप्त करणें हें पाप नाहीं; शरीर आणि मन हीं मनुष्याच्या अस्तित्वाचीं दोन अवश्य अंगें होत, यासाठीं या दोहोंपैकीं कोणाचीच उपेक्षा करणें हितावह नाहीं; आचार व विचार यांचीं पारडीं समतोल असलीं पाहिजेत; यांमधील कांटा कोणत्याही एकाकडे जरी विशेष कलला तरी त्यापासून मनुष्याचें नुकसान होतें; अनेकगुणात्मक बाह्यसृष्टि परमेश्वरानें मनुष्याच्या उपभोगासाठीं केली आहे, यासाठीं तिचा कंटाळा करणें म्हणजें त्याचा अपमान करणें होय; जड सृष्टीच्या किंवा मनःसृष्टीच्या अस्तित्वाचीं गूढ कारणें मनुष्याच्या आकलनशक्तीच्या बाहेर आहेत, यासाठीं त्यानें त्यांचा शोध लावण्याचे व्यर्थ श्रम करूं नयेत; परमेश्वराच्या अतर्क्य गुणांचा आणि करणीचा स्पष्ट बोध कोणत्याही जीवाला कधींच व्हावयाचा नाहीं, तथापि त्याच्या अगाध कर्तृत्वाचीं चिन्हें हरघडीस दृष्टिगोचर आहेत, एवढ्यावरच समाधान मानून त्याचें चिंतन करावें, त्याला शरण जावें, व त्यानें आपल्या सुखासाठीं जीं अनेक साधनें निर्माण करून

ठेविली आहेत, त्यांसाठीं कृतज्ञतापूर्वक त्यांचें भजन करावें; क्रोध, अहंकार, ममता, विषयवासना इत्यादि मनोविकार विचाराधीन असले म्हणजे मनुष्याचें त्यांपासून कल्याणच होतें; शत्रुद्वेष, बंधुप्रीति, आप्तप्रेम, पितृवात्सल्य इत्यादि गुणांनीं इहलोकीं मनुष्याला सुखप्राप्ति होते; आपलें व दुसऱ्याचें ऐहिक आणि पारमार्थिक कल्याण चिंतणें आणि करणें हाच मनुष्याचा सनातन धर्म; सद्विचार आणि नीति यांचें अवलंबन करून वर्तन ठेविलें असतां इहलोकींच परलोकींच्या सुखाचा अनुभव होऊं लागतो; दुर्लौकिकासारखें दुष्ट मरण नाहीं; सुलौकिका-सारखें अमरत्व नाहीं; आत्मोन्नतीहून श्रेष्ठ असें मनुष्यास दुसरें कर्तव्यकर्म नाहीं; —या आणि अशा अनेक विचारांचा प्रसार झाल्यामुळें ज्या त्या राष्ट्रांत उद्योग, संपत्ति, विद्या, देशाभिमान हीं तत्काल उत्कर्षास पावलीं. मुख्यत्वेंकरून इंग्लंडांत असल्या विचारांच्या प्रसारामुळें लोकांचें फार हित झालें. एक वेळ बाह्य सुखांचें सरसत्व अनुभवास आल्यावर मग काय विचारतां ? शेक्स्पीअरनें एक दिशा धरली तर बेकननें दुसरी, हूकरनें तिसरी, रालेनें चौथी, आणि बरलेनें पांचवी, याप्रमाणें चार चौघांनीं चोहोंकडून उचल केल्याबरोबर सुधारणेचें काम झपाटयानें चालूं लागलें, व थोडया वेळांत मनुष्याच्या ज्ञानवृक्षाच्या अनेक शाखा पुष्पांनीं आणि फलांनीं ओथंबून गेल्या. एका ग्रंथकारानें तर असें लिहिलें आहे कीं, रात्रीचा तिमिर निघून जाऊन पृथ्वीवर सूर्याचे कल्याणप्रद रश्मि येऊन पोहोंचले म्हणजे ती जशी रमणीय, प्रफुल्लित, आणि सुखी दिसते, त्याप्रमाणें ‘मध्ययुगां’तील अज्ञानतिमिर निरस्त झाल्याबरोबर अर्वाचीन विचारप्रकाशांत युरोपांतील सर्व राष्ट्रें उद्योगी आणि आनंदी दिसूं लागलीं. हें सर्व येथें सांगण्याचें प्रयोजन इतकेंच कीं, शेक्स्पीअर हा जरी महाकवि खरा, तरी तो केवळ स्वर्गातून मृत्युलोकावर उतरला, व त्यानें जें केलें आहे तें अमानुष आहे, असें मानावयाचें नाहीं. शेक्स्पीअरनें आपल्या विलक्षण बुद्धिसामर्थ्यानें व अचाट कल्पनाशक्तीनें मनुष्यमात्रावर जे उपकार करून ठेविले आहेत, त्यांबद्दल त्याला कोणी हवा तितका करभार देवो, त्यासाठीं आमचें कांहीं एक म्हणणें नाहीं. आमचें इतकेंच म्हणणें आहे कीं, शेक्स्पीअरबरोबर नाटयकलेची परमावधि होऊन गेली असें समजून आतां तिची अधिक उन्नति करण्याचें काम सोडतां कामा नये. “कालोऽ-ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी” अशी स्थिति असल्यामुळें शेक्स्पीअरच्या तोडीचेचसे काय, पण त्याहून श्रेष्ठ कवि उत्पन्न होण्याचा संभव आहे. यासाठीं ज्याच्या नशीबीं असेल त्यानें त्याच्या अलौकिक नाटयरसाचें बुद्धिविकासक आणि शांतिप्रद पान तर यथेच्छ करावेंच, पण जमल्यास त्याच्या गुणदोषांचें विवेचनही करावें; कारण, त्यापासून अनेक फायदे आहेत. मागल्या कवींचे दोष

दृष्टोत्पत्तीस आल्यानें पुढल्या कवींना ते टाळणें सुलभ होतें हा तर गुणदोष-विवेचनापासून होणारा एक फायदा आहेच; पण याहीपेक्षां विशेष महत्त्वाचा फायदा कोणता म्हणाल तर असल्या विवेचनानें कवीचें खरें हृद्गत सर्वांग कळूं लागतें. कवीचें हृद्गत यथास्थित कळून क्षणभर वाचकाचें आणि त्याचें तादात्म्य झाल्याखेरीज कवितेपासून होणारा अत्यानंद त्याच्या अंतःकरणास होणार नाहीं. नाटकाचा प्रयोग चांगला वठला असला तर तो पाहण्यानें नाटकाचें पुस्तक वाचण्यापेक्षां एक प्रकारें अधिक समाधान होतें खरें, पण एक प्रकारें मोठें नुकसानही होतें. नाटक वाचतांना विचार करण्यास फुरसत सांपडते, यामुळें अनेक पात्रांच्या भाषणांचा परस्परसंबंध लावतां येतो, व ज्या ठिकाणीं कवीनें विशेष बहार केली असेल त्या ठिकाणीं थोडा वेळ थबकून राहून त्याच कल्पनेवर पुनः पुनः विचार करून सुखानुभव द्विगुणित किंवा त्रिगुणित करतां येतो. प्रयोग पाहण्यास बसल्यावर अशा प्रकारचा सुखानुभव घेण्यास अवकाश कोठला? एक पात्र डोळ्यांआड झालें नाहीं तोंच दुसरें येऊन पुढें उभें राहतें, व मनावर एक प्रकारचे संस्कार स्पष्ट उमटताहेत नाहींत तों दुसरे येऊन ठेपतात. यामुळें एकच गर्दी होऊन जाऊन कोणत्याच रसाचा पूर्ण अनुभव होत नाहीं. शिवाय, एखादे वेळेस कवीची वाणी तंद्री लागली म्हणजे पहिल्यापासूनच तो अशा वेगानें भराऱ्या मारूं लागतो कीं, पुढें पुढें त्याचा वेग त्यालाच आवरेनासा होतो. मनाच्या अशा स्थितींत लिहिलेल्या नाटकाचा हवा तसा प्रयोग कोणत्याही नटाच्या हातून वठायाचा नाहीं! 'उत्तररामचरित', 'किंग लीयर', 'हॅम्लेट' या नाटकांत कवींनीं पहिल्या पहिल्या अंकांतच प्रधानरसाची पंचमापासून सुरुवात केल्यामुळें पुढें पुढें त्यांच्याबरोबर वर वर चढण्यास मन मात्र टिकतें! 'किंग लीअर'सारख्या नाटकांत 'लीअर' होणाऱ्या मनुष्याचा गळा पहिल्या दुसऱ्या अंकांतच फुटून गेल्यावर तो पुढें काय रडणार? व शेवटच्या तीन अंकांत कवीनें जी कमाल करून सोडिली आहे तिचें अनुकरण कसें करणार? ज्या नाटकांत कवींनीं पात्रांच्या मनोवृत्तींना पहिल्यापासूनच उच्छृंखल सोडून दिलें आहे, तीं नाटकें बाह्य रंगभूमीवर आणण्यासाठीं नव्हत, व तेथें तीं आणल्यानें त्यांचा विरस मात्र होतो. असल्या नाटकांचे प्रयोग मानसिक रंगभूमीवर व्हावयाचे. या रंगभूमीवर जीं पात्रें येतात जातात तीं कोणत्याही काळचीं, कोणत्याही देशचीं, कोणत्याही पंथाचीं किंवा रीतरिवाजाचीं असली तरी त्यांपासून काडीयेवढा रसभंग न होता त्यांच्याशीं तादात्म्य करून घेण्यास मनाला पुरेसा अवकाश सांपडतो, व अशा रीतीनें तें तदाकार होऊन गेल्यावर त्यास ज्या

अवर्णनीय सुखाचा अनुभव होत असतो त्याचें शब्दांनी कोण वर्णन करूं शकणार आहे ?

याप्रमाणें महाकवींच्या कृति वाचल्यापासून आनंद होतो हें सर्व सहृदयांस अवगत आहेच. अशा प्रकारच्या आनंदाचा अंशमात्र तरी भाषांतरद्वारा मराठी वाचकांस द्यावा अशा हेतूनें हें पुस्तक मीं प्रसिद्ध केलें आहे. आजपर्यंत शेक्स्पीअरच्या नाटकांची जीं भाषांतरें झाली आहेत त्यांपैकीं कोणत्याही भाषांतरांत मूळ नाटकांतील संविधानक, कथानक किंवा पात्रें यांवर विशेष टीका केली आहे असें आढळत नाहीं. अशा टीकेनें अपरिचित वाचकांस परक्या भाषेंतील नाटकांचें रहस्य समजण्यास बरेंच साहाय्य होण्याचा संभव असतो. म्हणून मी 'विकारविलसिता 'वर दोन शब्द लिहिण्याची परवानगी घेतों. या नाटकावर मोठमोठ्या इंग्लिश, फ्रेंच व जर्मन टीकाकारांनीं भलीं भलीं लठ्ठ व्हाल्युमें लिहून सोडिलीं आहेत; त्यामुळें माझ्यासारख्याला एखादें नवीन मत काढण्यास सवड राहिली आहे असें नाहीं. पण वारंवार होतें काय कीं, एका टीकाकाराचें एक मत आपणांस ग्राह्य झालें तर दुसरें होत नाहीं. यामुळें ज्याला त्याला आपापल्या समजुतीप्रमाणें आरंभापासून शेवटपर्यंत सबंध निराळी टीका करावी लागते. असो; 'विकारविलसित ' शेक्स्पीअरनें लिहिलें त्या वेळेस त्याची बुद्धि परिपक्व झाली असावी असें स्पष्ट दिसतें. या नाटकांत कवीचें विशेष लक्ष त्याच्या बाह्य स्वरूपाकडे नाहीं. यमकें आणि प्रास बरोबर जुळले आहेत कीं नाहींत, संविधानकाचा पूर्वापार संबंध यथास्थित बसला आहे कीं नाहीं, पात्रांची भाषणें प्रसंगानुरूप आणि जेथल्या तेथें आहेत कीं नाहींत, प्रवेशांची व अंकांची जुळणी बरोबर झाली आहे कीं नाही वगैरे नाटकाच्या बाह्य अंगांविषयी या वेळेस कवि बेफिकीर झाल्यासारखा दिसतो. 'विकारविलसितां 'त तो आपल्या कल्पनाशक्तीच्या दोऱ्या अधिक ढिल्या सोडून तिला भरधांव टाकीत आहे व मधून मधून तिजवर प्रतोदाचे तीक्ष्ण प्रहार करीत आहे असें दिसतें. माझ्या मतें शेक्स्पीअरचे विशेष तारीफ करण्याजोगे दोन गुण आहेत. त्यानें जी प्रकृति हातीं धरली तिच्या अंतःकरणातील अत्यंत गूढ विचार सगळेच्या सगळे बाहेर यायाचे; एक देखील चुकुनमाकून राहायाचा नाहीं, असें विलक्षण अंतःकरणग्राहित्व त्याच्या अंगी होतें. तसेंच 'सहस्रात्मा ' हें नांव त्यालाच योग्य आहे. कारण, त्याच्यायेवढें अनेकप्रकृतिज्ञान दुसऱ्या कोणत्याही कवींत आजपर्यंत दिसून आलेलें नाहीं. रोमीओ, लीअर, अथेल्लो, सीझर आणि हॅम्लेट हे नायक एकाच कवीनें निर्माण केले असावेत, किंवा जूलिएट, रीगन, कार्डीलिया, डेस्डेमोना आणि आफीलिआ या तरुणांगना एकाच कल्पनेंतून निघाल्या असाव्यात, ही

परम आश्चर्याची गोष्ट नव्हे का ? आमच्या इकडील कवि दशरसांच्या पाशांत अगदीं जखडून गेल्यामुळें स्वभाववैचित्र्यवर्णन हा गुण त्यांच्यांत अत्यंत दुर्मिळ झाला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. चारुदत्त व वसंतसेना, दुष्यन्त व शकुंतला, राम व सीता, माधव व मालती, या नायकनायिकांच्या युगुलांत म्हणण्यासारखें प्रकृतिवैचित्र्य काय आहे ? शक्सपीअरला या गुणांत अजिक्यपत्र देण्यास कांहीं हरकत नाहीं असें वाटतें. 'विकारविलसितां'तील नायक जो चंद्रसेन त्याच्या मुखांत घातलेल्या भाषणांवरून विषयसुखासक्ति, विचार-माहात्म्य, नीत्यवलंबन, कर्तव्याकर्तव्य, यमयातना, पिशाचयोनि, पुनर्जन्म यांसारख्या मोठमोठ्या विषयांवर कवीचे काय विचार असावेत, यांचें अनुमान करतां येणार आहे. या नाटकाचें संविधानक केवळ निर्दोष आहे, किंवा यांतील पात्रांचीं एकूण एक भाषणें मुख्य नाटकीय वस्तूला आवश्यक आहेत असें माझ्यानें म्हणवत नाहीं. तीव्रजवानें चंद्रसेनाच्या प्रेमावर मल्लिकेला दिलेलें व्याख्यान, शालेयाचा तीव्रजवास उपदेश, चंद्रसेनाचीं मद्यप्राशनावर आणि नाटकप्रयोगांवर लांबलचक व्याख्यानें, खेळांतील राजाचें निश्चयाच्या दृढतेवरचें चऱ्हाट, व भुजंगाची बुद्धिचांचल्यावरची कंटाळवाणी लांबण मुळींच नसती किंवा थोडी आखूड असती, तर नाटक फिक्कें पडलें असतें असें नाहीं. कवीची काय आणि इतरांची काय, अनेकदां अशी स्थिति होते कीं, लिहूं लागलें म्हणजे कल्पनेमागें कल्पना सुचत जाऊन म्हणतां म्हणतां हातच्या कामास अनावश्यक असें लांबच्या लांब चऱ्हाट वळलें जातें, आणि मग त्याचा लोभ सुटेनासा झाल्यामुळें ते तें घुसडून देण्यास मागें पुढें पहात नाहींत. असलीं लांबलचक भाषणें वाचतांना कांहीं वाटत नाहीं, पण प्रयोग पाहतांना तीं निरुपयोगी व कित्येक वेळां रसनाशक आहेत असें तेव्हांच दिसून येतें. ज्यांना शेक्सपीअरचा एक शब्द देखील वावगा दिसत नाहीं असे कांहीं भगत आहेत, त्यांच्या तोंडाला लागून कांहीं फायदा नाहीं. पण एका समंजस टीकाकाराचें देखील असें म्हणणें आहे कीं, चंद्रसेनाचें वय निदान तीस वर्षांचें असावें. हें कशावरून, तर खेळांतील राजानें आपल्या राणीस असें म्हटलें आहे कीं, आपला विवाह होऊन तीस वर्षें झालीं. या एका वाक्यावर दोन तीन जर्मन व कांहीं इंग्लिश टीकाकारांनीं जो व्यूह रचून दिला आहे तो कांहीं पुसूंच नये. चंद्रसेन तीस वर्षांचा होईपर्यंत अविवाहित कसा राहिला ? त्या वेळेस कॉलेजांत जाणारे विद्यार्थी तीस वर्षांचे असत कीं काय ? चंद्रसेन तीस वर्षांचा असल्यास त्याची आई निदान पंचेचाळीस किंवा पन्नास वर्षांची असेल असें मानिलेंच पाहिजे. पंचेचाळीस वर्षांच्या म्हातारीनें कामातुर होऊन आपल्या दिराशीं लग्न लावावें, किंवा त्याला तरी या वयांत

तिच्या सौंदर्याचा मोह पडून ती त्याचा जीव की प्राण होऊन जावी, हें कितपत शक्य आहे? शालेय, तीव्रजव, राजा, राणी, प्रियाल, जुंग, व भृंग वारंवार त्याला 'तरुण' म्हणतात हें कसें? वगैरे अडचणींची शंका देखील वरील टीकाकारांस कशी आली नाही कोण जाणें? शेक्स्पीअरच्या वेळीं इंग्लंडांत लग्नें फार लवकर होत. त्याचें स्वतःचें लग्न अठराव्या वर्षी होऊन एकविसाव्या वर्षी एक मुलगा आणि दोन मुली अशीं त्याला तीन अपत्यें होतीं! तसेंच, शेक्स्पीअरच्या दुसऱ्या नाटकांवरून हें स्पष्ट दिसून येतें कीं, लग्नें लहानपणीं झाल्यामुळें स्त्री-पुरुषांना चाळिशी उलटली न उलटली तों वार्धक्य येई. अशा अनेक कारणांवरून मला असें वाटतें कीं, चंद्रसेनाचें वय फार झालें तर १८-२० पर्यंत असेल. तो या वयाचा असावा असें मानिलें म्हणजे सगळ्या नाटकाचा मेळ कसा तेव्हांच बसतो. मंगलापूरच्या विद्यालयांत ज्यानें पांच-चार वर्षे घालविलीं आहेत; न्याय, अन्याय, नीति, अनीति, सत्य, असत्य वगैरे विषयांवरील व्याख्यानें आणि वादविवाद हीं ज्याच्या डोक्यांत अद्यापि घोळत आहेत; विद्यालया-कडील ज्याला ओढा अजून सुटला नाहीं; ज्याला जगांतील लबाडयांचा, दुष्ट-पणाचा, कृतघ्नपणाचा, आणि क्रूरपणाचा अनुभव मुळींच आला नाहीं; ज्याला पुरुष म्हणून तेवढे आपल्या बापासारखे सद्‌गुणी व स्त्रिया म्हणून तेवढ्या आपल्या आईसारख्या पतिव्रता वाटत आहेत; जुंग व भृंग यांसारखे बाहेरून मैत्री दाखवून आंतून गळा कापणारे मनुष्य ज्याच्या पाहाण्यांत आले नाहींत; तीव्रजवासारख्या शाब्दिक व फक्कड शूराशीं, किंवा शालेयासारख्या प्रतिष्ठेखोर, अक्कलशून्य, बाचाळ व लुडबुड्या म्हाताऱ्याशीं ज्याची गांठ कधींही पडली नाहीं; मल्लिकेसारख्या रूपसंपन्न, सुशील मुली कपटी व भेकड असतील अशी ज्याला कल्पना सुद्धां नाहीं; ज्याला मनुष्याची सुंदर आकृति व बुद्धि, आणि रमणीय बाह्य सृष्टि पाहून अत्यंत कौतुक व आनंद होत आहे, अशाविषयीं मल्लिकेनें—"दृष्टि राजपुरुषाची, वाणी पंडिताची, छाती शिपायाची—या सुंदर राष्ट्राचा सगळा जीव आणि सगळी शोभा-व्यवहार आणि आचार यांत अनुकरण करण्यासाठीं ज्यानें त्यानें आपल्यापुढें ठेविलेला कित्ता, व सर्वांचें चित्त आकर्ष-णारा लोहचुंबक—" असे उद्‌गार काढावे, हें किती योग्य आहे! व अशा तरुण, सद्‌गुणी, विद्वान, शूर, आनंदी व विचारशील राजपुत्राला चुलत्याचीं आणि आईचीं राक्षसी कृत्यें समजल्याबरोबर—"हे कठोर मांस आपोआप झडून जाईल, किंवा याचें पाणी पाणी होईल तर किती बरें होईल! अथवा, शास्त्रकर्त्यांनीं आत्महत्या सदोष मानिली नसती तरी फार बरें झालें असतें! नको, नको हा जीव परमेश्वरा! या जगांतल्या वस्तूनूवस्तूचा मला वीट आला आहे व कांहीं

एक नकोसें झालें आहे! धिक्कार असो, धिक्कार असो या जगाला!" असें वाटावें, हें किती स्वाभाविक आहे! समंधाच्या सांगण्यावरून, व नाटकांतल्या नाटकावरून आपल्या चुलत्यानेंच आपल्या बापाचा खून केला अशी चंद्रसेनाची पक्की खातरी झाली असतां त्याच्यानें आपल्या चुलत्याचा वध करवेना, यावरून गेटीचें असें म्हणणें आहे कीं, चंद्रसेनाच्या बुद्धींत अनिश्चय फार होता, व भित्र्या आणि अनिश्चयी मनुष्यावर मनुष्यवध करून सूड घेण्यासारख्या प्रचंड व अघोर कृत्याचा भार पडला असतां त्याची स्थिति कशी होते, हें या नाटकांत शेक्स्पीअरच्या मनांत दाखवावयाचें होतें, असें ध्यानांत ठेविल्यास सगळें संविधानक कसें तेव्हांच जुळलेलें दिसतें. लहान कुंडीत मोठें झाड लावलें असतां त्याचा विस्तार तींत न राहून जशी ती दुभंगते, त्याप्रमाणें चंद्रसेनाच्या मनाची स्थिति झाली.* कोलरिज याचें असें म्हणणें आहे कीं, विचार आणि विकार यांपैकीं चंद्रसेनाच्या मनावर विचाराचें विशेष प्राबल्य असल्यामुळें त्याच्या हातून योजिलेलें काम होत नसे.[1] अतिशय विचारासक्तीमुळें चंद्रसेनाच्या हातून काम वठत नसे असें म्हणावें, तर त्यानें खोटा खलिता कसा केला, चांच्यांशीं लढण्यासाठीं तो सगळ्यांत पुढें कसा सरसावला, प्रियाल नको नको म्हणत असतां तीव्रजवाशीं ढाल-तलवार खेळण्यास तयार कसा झाला वगैरे शंकांचा चांगलासा खुलासा होत नाहीं. मला असें वाटतें कीं, चंद्रसेन यास सुशिक्षण मिळालें असल्यामुळें, व ज्या त्या कृत्यापासून चांगले परिणाम कोणते होतील व वाईट कोणते होतील, याचा विचार करण्याची त्याला पराकाष्ठेची स्वाभाविक हौस असल्यामुळें, कोणतेंहि काम अगदीं निकरावर येऊन ठेपल्याशिवाय त्याच्यानें उरकत नसे, हेंच त्याच्या वर्तनाचें मुख्य बीज होय.[2] आईचें जारकर्म आणि बापाचा खून पाहून

---

* "To me," wrote Goethe, "it is clear that Shakespeare meant... to represent the effects of a great action laid upon a soul unfit for the performance of it. In this view the whole piece seems to be composed. There is an oak tree planted in a costly jar, which should have borne pleasant flowers in its bosom; the roots expand, the jar is shivered."

1. In Hamlet we see "a great, an almost enormous intellectual activity, and a proportionate aversion to real action consequent upon it."

2. "The whole," wrote Schlegel, "is intended to show that a calculating consideration, which exhausts all the relations and possible consequences of a deed, must cripple the power of acting."

ज्याला जगाचा इतका वीट आला की, त्यासरशीं आत्महत्या करून घेऊन त्यांतून निघून जावें असें वाटलें, त्याच्या हातून चुलत्याचा खून होईना हें कांहीं नवल नाहीं. ज्याला ज्या पापाचा अतिशय तिटकारा त्याच्या हातून तें सहसा घडत नाहीं, हें सर्वांस ठाऊक आहे. त्यामुळें राजा प्रार्थना करीत असतां त्याचा खून केल्याचा दोष चंद्रसेनाच्या डोक्यावर न लादतां जेव्हां तीव्रजव आणि राजा या दोघांनीं कपटानें त्याचाच जीव घेण्याचा बेत केला, तेव्हा त्यांचें कपट त्यांच्यावर उलटून पाडून ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं नायकाच्या हातून त्यांचा शेवट करविला यांत कवीचें अद्‌भुत संविधानघटनाचातुर्य दिसतें, एवढेंच नाही तर, निरनिराळ्या मनुष्यस्वभावांचें त्याला किती सूक्ष्म आणि यथार्थ ज्ञान होतें हेंहि दिसून येतें.

दुसऱ्या एका मुद्द्यासंबंधानें टीकाकारांत अनेक वर्षे असा वाद चालला होता कीं, चंद्रसेनानें वेडाचें मिष केलें होतें किंवा तो खरोखरीच वेडा झाला होता ? अशा प्रकारचा मतभेद कशामुळें झाला असेल तो ईश्वर जाणे. मला तर असें वाटतें कीं, चंद्रसेन खरोखरी वेडा असेल असा संशय येण्यास या नाटकांत तिळमात्र सुद्धां आधार नाहीं. आतां कोणी असें म्हणतील कीं, केसरीकर्त्याला राजेलोकांच्या वेडेपणाची काडीएवढी देखील पारख नाहीं ! माझें त्यावर येवढेंच उत्तर आहे कीं, चंद्रसेनाच्या वेडेपणाची चौकशी करण्याची जिम्मा तिकडील कांहीं प्रसिद्ध डाक्तरांनीं आपल्या अंगावर घेतली होती, पण अखेरीस त्यांनीं देखील हात टेकले ! कारण, चंद्रसेनाला त्याच्या आईबापांपासून काढून एखाद्या सुस्थळीं चांगल्या डाक्तरलोकांच्या नजरेखालीं ठेवलें तर तो बरा होईल असें जरी त्यांना वाटलें, तरी शेवटपर्यंत 'वेड' म्हणजे काय हें त्यांना सांगवेना, तेव्हां ते त्या अजागळ कारभाऱ्याप्रमाणें —

"खऱ्या वेडेपणाची व्याख्या करणें म्हणजे वेड्याला वेडा म्हणणें."

असें भकूं लागले ! कदाचित् इकडील एक-दोन रथी महारथी 'वेडे' डाक्तर तिकडे नेले असते तर त्यांनीं चंद्रसेनाच्या वेडाचा पत्ता लावून दिला असता ! निदान नगरासारख्या एखाद्या शुष्क ठिकाणीं त्याला येवढें तरी सुचविलें असतें ! असो; असल्या विनोदांत कांहीं हंशील नाहीं. पहिल्या अंकाच्या पांचव्या प्रवेशांत चंद्रसेन प्रियालास असें म्हणतो—

"येथून पुढें कांहीं कारणास्तव मला वेड्याचें सोंग घ्यावें लागणार आहे, तेव्हां मी जाणून बुजून पाहिजे तसा भकेन, पाहिजे तें बोलेन, हवा तसा बडबडेन किंवा वागेन. अशा प्रसंगीं तुम्हाला फार खबरदारीनें वागलें पाहिजे."

पुढें, अंक तीन, प्रवेश ४, यांत तो राणीस असें म्हणतो —

"भ्रम ! तुझ्या माझ्यांत तूं काय भेद पाहिलास ? तुझ्याप्रमाणें माझी नाडी शांत आहे, व तुझ्याइतकेच तिचेही ठोके पडत आहेत. मी बोललों तें सारें बरळणें असें समजूं नको. पाहिजे असलें तर प्रतीतीसाठीं मला सांग म्हणजे झालेलें सगळें बोलणें पुनः बोलून दाखवितों; वेड्याच्यानें तसें होईल काय ? कधीं नाहीं. आई, तुला माझी एवढी प्रार्थना आहे कीं, आपले दुष्ट अपराध लपविण्यासाठीं माझें सारें बोलणें भ्रांतिष्टपणाचें असें तूं समजूं नको."

याहून आणखी पुरावा तो काय पाहिजे ? चंद्रसेनानें हें वेडेपणाचें ढोंग इतक्यासाठींच केलें होतें कीं, एखादे वेळेस रागाच्या झपाट्यांत आपल्या तोंडून जे शब्द पडतील त्यांपासून आपल्या शत्रूंस आपल्या विचारांचा मागमूस लागूं नये, व आपल्याला तर जिकडे तिकडे फिरण्यास सापडून कोणाचे काय बेत चालतात ते ऐकण्यास सांपडावे ! एकदां महाशंख शालेयाला देखील असें वाटलें कीं, या वेडेपणांत 'कांही शिस्त ' आहे. पुढें पुढें राजालासुद्धां हें ढोंग आहे असा बळकट संशय आल्यावरून त्यानें चंद्रसेनाला श्वेतद्वीपाला पाठविलें. चंद्रसेन वेडा नव्हता हें सिद्ध करणें म्हणजे त्याचें प्रत्येक भाषण घेऊन तें शहाणपणाचें आहे असें दाखविणें होय. स्थलसंकोचास्तव तसें येथें करितां येत नाहीं, त्याला माझा नाइलाज आहे. वाचकांनीं हें पुस्तक वाचल्यावर आपल्याशींच असा विचार करावा कीं, ज्यानें आपल्या मर्मभेदी वाक्शल्यांनीं राजा, राणी, जंग, भृंग, श्वपति, मल्लिका व शालेय यांस रडकुंडीस आणलें, तो वेडा असता तर त्याच्यानें असें झालें असतें काय ? पहिल्या अंकापासून शेवटपर्यंत चंद्रसेनाच्या तोंडांत जीं भाषणें घातलीं आहेत त्यांवरून, व प्रियालापाशीं त्याच्या अंत:करणांतील जे उद्गार निघाले आहेत त्यांवरून, तो वेडा होता किंवा त्याच्या बुद्धीला अणुमात्र भ्रम झाला होता, अशी कल्पना देखील माझ्यानें करवत नाहीं. या सर्वांपेक्षां एक महत्त्वाचा विचार हा आहे कीं, ज्या नाटकांत शेक्स्पीअरनें इतक्या परिश्रमानें मनुष्याच्या नानाविध मनोविकारांचें अत्युत्कृष्ट चित्र काढलें आहे, त्याचा नायक त्यानें एक वेडा राजपुत्र करावा असें मुळींच संभवत नाहीं.

मूळ गोष्टींत तीव्रजव आणि मल्लिका हीं पात्रें नाहींत. तर मग हीं कवीनें कशासाठीं निर्माण केलीं असावीं ? अर्थात् आपल्या नायकाचें तेज विशेष पडावें म्हणून. ज्याप्रमाणें हीण धातूचें कोंदण करून त्यांत हिरा बसविला म्हणजे त्याची विशेष शोभा दिसते त्याप्रमाणें चंद्रसेनाच्या गुणांचें महत्त्व ठळठळीत रीतीनें वाचकांच्या लक्षांत येण्यासाठीं त्याहून अगदीं भिन्न अशीं हीं दोन पात्रें त्यानें

कल्पिलीं. तीव्रजवाच्या शूरपणाच्या आणि ममतेच्या बल्गना मात्र ऐकून घ्याव्या. मल्लिकेचें वेड पाहून किंवा तिच्या मरणाची वार्ता ऐकून त्यानें शाब्दिक आक्रोशापलीकडे कांहीं केलें नाहीं. शालेयाला मारल्याबद्दल चंद्रसेनाचा सूड घेण्यांत तरी त्यानें थोडा खरा पराक्रम दाखवावयाचा होता ! पण ज्याच्या अंगांत तो मुळींच नाहीं, तो तो दाखवील कोठून ! तेव्हां त्यानें आणि राजानें चंद्रसेनाला विष घालून मारण्याची मसलत केली ती ठीकच केली. चंद्रसेनाचा कृत्रिम भ्रम, त्याचें सौजन्य, त्याची उदारता आणि त्याचा निष्कटपणा, यांपुढें मल्लिकेचे गुण कसे दिपून जातात व अवगुण किती निंद्य दिसतात, हें वाचकांच्या लक्षांत सहज येणार आहे. अक्कलशून्य, प्रतिष्ठेखोर व वाचाल शालेयाच्या सांगण्याप्रमाणें हेरपणा न पत्करितां ती चंद्रसेनास दृढ आश्वासन देती व त्यावरील आपलें प्रेम ढळूं न देती तर "स्त्रीजात तेवढी बेहराम" असे निर्वाणीचे शब्द त्याच्या तोंडून येते ना व आईच्या दुर्वर्तनामुळें भडकलेला त्याचा संतापाग्नि त्याच्या मनाचा आणि शरीराचा इतका दाह करता ना ! प्रियालाचें खरें प्रेम चंद्रसेनावर होतें; पण रात्रंदिवस "स्वामिसेवक" हा भाव त्याच्या अंतःकरणांत असल्यामुळें चंद्रसेनाला दटावण्यास किंवा अमुक गोष्ट तुम्ही करूंच नका, असें निक्षून सांगण्यास त्याचें धैर्य होत नसे. यावरून येवढें स्पष्ट दिसून येईल कीं, दुय्यम प्रतीच्या पात्रांच्या कोणत्याहि गुणाचें तेज चंद्रसेनाच्या गुणापुढें पडूं नये, याविषयीं शेक्स्पीअरनें फार काळजी घेतली आहे. एकंदरीनें हें नाटक या कवीच्या उत्तम नाटकांपैकीं एक आहे किंवा सर्वांत उत्तम आहे याचा निर्णय करणें कठीण आहे. तो निर्णय होईपर्यंत पुढें दिलेलें जरव्हायनसचें मत सर्वांनीं स्वीकारण्याजोगें आहे. "शेक्स्पीअरच्या इतर नाटकांपेक्षां या नाटकाची मूळ गोष्ट फारच वेडीविद्री असून त्यानें तिच्या आधारावर असलें शोकपर्यवसायी नाटक निर्माण केलें कीं, जेथें जेथें या कवीचें नाव निघतें तेथें तेथें या नाटकाचें प्रथम स्मरण होतें. या नाटकांत शेक्स्पीअरच्या नाट्यकलेच्या आणि बुद्धीच्या परस्परविरोधी गुणांचा एकत्र संनिवेश झाल्यासारखा दिसतो, व या नाटकाइतकें दुसऱ्या कोणत्याहि नाटकांत शेक्स्पीअरचें 'स्वत्व' (कृतिवैशिष्ट्य) दृष्ट होत नसूनहि तें अत्यंत लोकप्रिय आणि अकृत्रिम झालें आहे. प्रत्यहीं घडणाऱ्या गोष्टी याला आधारभूत असल्यामुळें हें (सांसारिक) गहन ज्ञानाचें आणि नैपुण्याचें भांडार होऊन बसलें आहे, व चवथ्या हेनरीच्या खालोखाल याच नाटकांत शेक्स्पीअरचें वर्तन आणि स्वभाव यांविषयीं अतिशय स्पष्ट माहिती मिळते."

तीव्रजव, शालेय, मल्लिका व प्रियाल यांच्यासंबंधानें माझ्या मनांत पुष्कळ लिहावयाचें होतें. पण बोलतां बोलतां ही प्रस्तावना फार वाढत

चालल्यामुळें व दमा अधिक होऊन तो शरीराला व मनाला पीडा करूं लागल्यामुळें येथेंच थांबणें भाग पडत आहे. नाटकासारख्या विषयाकडे माझ्या मनाची स्वाभाविक प्रवृत्ति नाहीं; व तें तिकडे लाविल्यानें त्याच्यापासून मला व दुसऱ्यांना विशेष फायदा होईलसें वाटत नाहीं. तथापि प्रसंगविशेषीं या मनोरंजक विषयाकडे मी थोडा वेळ आनंदानें वळेन.

पुणें, २९ । ६ । १८८३. **गोपाळ गणेश आगरकर**



# नाटकांतील पात्रें, देश व शहरें

## पात्रें

| | |
|---|---|
| **भुजंग, बलभद्र** देशाचा राजा ... ... ... | (Claudius) |
| **चंद्रसेन,** पहिल्या राजाचा मुलगा व हल्लींच्या राजाचा पुतण्या ... ... ... | (Hamlet) |
| **शालेय,** खाजगी कारभारी ... ... ... | (Polonius) |
| **प्रियाल, चंद्रसेनाचा** मित्र ... ... ... | (Horatio) |
| **तीव्रजव, शालेयाचा** मुलगा ... ... ... | (Laertes) |
| **मेघवाहन,** } दरबारी लोक | (Voltimand) |
| **पाशक,** } दरबारी लोक | (Cornelius) |
| **जुंग,** } दरबारी लोक | (Rosencrantz) |
| **भृंग,** } दरबारी लोक | (Guildenstern) |
| **श्वपति** } दरबारी लोक | (Osric) |
| **वत्सनाभ,** } अधिकारी | (Marcellus) |
| **पिंगलक,** } अधिकारी | (Bernardo) |
| **ताम्रचूड,** एक शिपाई ... ... ... | (Francisco) |
| **वंजुल, शालेयाचा** नोकर ... ... ... | (Reynaldo) |
| **मकरंद, प्लवंगचा** राजा ... ... ... | (Fortinbras) |
| **मदनिका, बलभद्राची** राणी आणि **चंद्रसेनाची** आई ... ... ... | (Gertrude) |
| **मल्लिका, शालेयाची** मुलगी ... ... ... | (Ophelia) |
| **सर्वंजय, रोमकपत्तनचा** बादशहा ... ... ... | (Caesar) |
| **वीरशर्मा, सर्वंजयाचा** प्रतिस्पर्धी ... ... ... | (Brutus) |
| **चंद्रसेनाच्या** बापाचा **समंध** | |

एक गृहस्थ, कारटा, नाटकवाले, तांडेल, श्वेतद्वीपचे वकील, कुलीन गृहस्थ व स्त्रिया, अधिकारी, शिपाई, जासूद व चाकर लोक.

## देश

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| बलभद्र | ... | ... | ... | ... | (Denmark) |
| उत्ताल | ... | ... | ... | ... | (France) |
| सागरान्त | ... | ... | ... | ... | (Italy) |
| श्वेतद्वीप | ... | ... | ... | ... | (England) |
| पोलोम | ... | ... | ... | ... | (Poland) |
| बशार्ण | ... | ... | ... | ... | (Greece) |
| प्लवंग | ... | ... | ... | ... | (Norway) |

## शहरें

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| कुंजपूर | ... | ... | ... | ... | (Elsinore) |
| हेमकूट | ... | ... | ... | ... | (Paris) |
| रोमकपत्तन | ... | ... | ... | ... | (Rome) |
| मंगलापूर | ... | ... | ... | ... | (Wittenberg) |

## स्थल—कुंजपूर

वरील नांवांपैकी कांहीं सार्थ आहेत हें नाटक वाचल्यावर वाचकांच्या लक्षांत येणार आहे.



# विकारविलसित

## अंक पहिला

### प्रवेश १ ला

स्थल—कुंजपूर किल्ल्यापुढचा सपाट प्रदेश.

[**ताम्रचूड** पहाऱ्यावर असतां **पिंगलक** प्रवेश करितो.]

**पिंगलक** : कोण तो तिकडे ?

**ताम्रचूड** : थांब, आधीं तूंच कोण आहेस तें मला सांग.

**पिंगलक** : राजाला उदंड आयुष्य असो !

**ताम्रचूड** : कोण, पिंगलक ?

**पिंगलक** : हो, मी तो.

**ताम्रचूड** : तूं अगदीं घंट्याबरोबर आलास बोवा.

**पिंगलक** : अरे, आतां बाराचा ठोका पडला; तूं नीज जा कसा.

**ताम्रचूड** : येऊन वेळच्या वेळीं सोडविलेंस, याबद्दल देव तुझें भलें करो. कोण थंडीचा कडाका ! मला हिंव भरून आलें आहे !

**पिंगलक** : पहारा करीत असतां कांहीं कमी अधिक तुझ्या पाहण्यांत आलें नाहीं ना ?

**ताम्रचूड** : छे, छे, चिटपांखरूंदेखील जाग्यावरून हाललें नाहीं.

**पिंगलक** : ठीक आहे; राम राम, माझ्या पाठीमागून प्रियाल आणि वत्सनाभ यांचा पहारा आहे, यासाठीं तुला ते कोठें भेटले तर त्यांना इकडे लवकर धाडून दे.

**ताम्रचूड** : अरे, ते आलेसे वाटतात;

[**प्रियाल** आणि **वत्सनाभ** प्रवेश करितात.]

उभे रहा; उभे रहा; कोण रे ते ?

**प्रियाल** : देशाचे हितचिंतक.

**वत्सनाभ** : आणि राजाची रयत.

**ताम्रचूड** : राम राम, गड्यांनो, राम राम !

**वत्सनाभ** : भल्या शिपाया, भेटलास बरें झालें. तुझ्याकडून पहारा कोणीं घेतला ?

**ताम्रचूड** : पिंगलकानें. गड्यांनों, हा राम राम घ्या, आणि मला जाऊं द्या.

[ताम्रचूड जातो.]

**वत्सनाभ** : ए पिंगलका, ए पिंगलका, ओ दे की रे.

**पिंगलक** : कोण रे तो ? प्रियाल काय रे ?

**प्रियाल** : तोच म्हणायचा.

**पिंगलक** : प्रियाला, आलास फार छान झालें; वत्सनाभा, तूं तर बहार केलीस !

**वत्सनाभ** : का रे, आज रात्रीं आणखी तो दृष्टीस पडला का रे ?

**पिंगलक** : मी तर बोवा कांहीं एक पाहिलें नाहीं.

**वत्सनाभ** : प्रियाल असें म्हणतो कीं त्यांत कांहीं हंशील नाही. ती शुद्ध कल्पनेची बाधा आहे. आपण तर तें भयंकर रूप दोनदां पाहिलें; पण याचा कोठें त्यांत भरंवसा बसतो आहे ? मग मला असें वाटलें कीं, या राजश्रींची प्रत्यक्षच खात्री करावी. आणि म्हणून मी त्याला आपल्याबरोबर आज रात्रीं काय होतें तें पाहण्याकरितां घेऊन आलों. ते बोवा आज दृष्टीस पडले तर आमचे डोळे खरे ठरून हाही त्याच्याशीं कांही बोलेल.

**प्रियाल** : अं हः, तो दृष्टीस पडावयाचा नाहीं.

**पिंगलक** : पण जरा खालीं तर बसाल ? का रे प्रियाला, आम्ही दोघांनीं दोन रात्रीं त्या समंधाला प्रत्यक्ष पाहिला असून तूं तिकडे अगदी कानच देत नाहींस याचा अर्थ काय ?

**प्रियाल** : बरें, बसूं या; पिंगलका, बोल; तुझें काय म्हणणें आहे तें बाहेर पडूं दे.

**पिंगलक** : काल रात्रीं तर असें झालें. तो पाहिलास ना तो ध्रुवाच्या पश्चिमेकडला तारा क्षितिजापासून वर येऊन आतां चमकतो आहे, तेथें चमकूं लागला, एकाचा ठोका पडला, इतक्यांत गालवाच्या आणि माझ्या —

**वत्सनाभ** : गप्प बस ! गप्प बस ! तो पाहा तिकडे आलासा वाटतो !

[समंध प्रवेश करितो.] .

**पिंगलक** : अरे, असला पेहराव आमचे मागले महाराज करीत असत !

**वत्सनाभ** : प्रियाला, तूं बडा पंडित आहेस; आतां त्याच्याशी दोन शब्द बोल पाहूं.

**पिंगलक** : तो मागल्या महाराजांसारखा दिसत नाहीं काय ? प्रियाला, तूं पाहा बरें.

**प्रियाल** : अरे, फारच सारखा. आपल्याला तर बोवा भीतीनें आणि आश्चर्यानें कांपरें भरूं लागलें !

**पिंगलक** : त्याच्याशीं बोललें पाहिजे.

**वत्सनाभ** : प्रियाला, आतां बोल कीं त्याच्याशी !

**प्रियाल** : अरे, तूं कोण आहेस तें सांग. बलभद्रदेशचे महाराज जिवंत असतां जो सुंदर पेहराव करून कधीं कधीं बाहेर पडत, तो पेहराव करून अशा शिपायाच्या बाण्यानें या किल्ल्याच्या आसमंतात रात्रींचा संचार करणारा तूं कोण आहेस ? तुला देवाची शपथ आहे; बोल.

**वत्सनाभ** : अरे, तो रागावला.

**पिंगलक** : पाहा, पाहा; तो निघून चालला.

**प्रियाल** : अरे थांब, अरे थांब; तुला शपथ आहे; बोलल्याशिवाय जाऊं नकोस.

[समंध नाहींसा होतो.]

**वत्सनाभ** : तो गेला; तो कुठला बोलायला ?

**पिंगलक** : आतां कसें काय, प्रियाला ? आपली पांचावर धारण बसून आपण अगदीं पांढरे पडलांत ! कसें काय बोवा ? ही केवळ कल्पनेची बाधा आहे कीं त्यापेक्षां अधिक आहे ? आतां आपलें कसें काय मत आहे ?

**प्रियाल** : साक्षात् देव उतरला तरी असल्या गोष्टी प्रत्यक्ष अनुभवाला येऊन डोळयाची खात्री झाल्याशिवाय त्यांत मी कधींही भरंवसा ठेवणार नाहीं.

**वत्सनाभ** : तो महाराजांसारखा नाहीं काय ?

**प्रियाल** : तूं जितका तुझ्यासारखा आहेस, तितका तो महाराजांसारखा आहे. काय सांगावें; प्लवंगदेशच्या महत्वाकांक्षी मकरंद राजावर महाराज स्वारी करून गेले, त्या वेळेस त्यांनीं जें चिलखत घातलें होतें, तें अगदीं अस्से होतें. तसेंच, एकदां रागाच्या आवेशांत पोलोमच्या राजाला रथावरून खालीं ओढून त्यांनीं धूळ चारिली, त्या वेळेस अशीच क्रुद्ध मुद्रा केली होती. काय विलक्षण प्रकार हा !

**वत्सनाभ :** याप्रमाणेंच गेल्या दोन रात्रीं या भयाण वेळेच्या सुमारास आम्ही पहारा करीत असतां शिपायासारखीं टप्‌टप् पावलें टाकीत तो आमच्या पुढून निघून गेला.

**प्रियाल :** त्यावर काय तर्क बसवावा हें मला अगदीं सुचेनासें झालें आहे. पण माझ्या मृत्पिंडबुद्धीला असें वाटतें की, आमच्या राज्याला पुढें मागे मोठा अपाय घडणार आहे.

**वत्सनाभ :** बरें, आतां खालीं बसा, आणि मी विचारतों या प्रश्नाचें उत्तर कोणी तरी मला सांगा. अलीकडे जेथें तेथें जबरदस्त पहारे ठेवून लोकांस रात्रीं फिरूं न देण्याचा हुकूम झाला आहे याचा अर्थ काय? दररोज तोफा ओतण्याचें काम झपाट्यानें चाललें आहे तें कशासाठीं? सुतारांना जबरीनें धरून आणून गलबतें करण्यास लावण्याचा धडाका सुरू आहे, व त्यांना आठ दिवसांतून एक दिवस देखील सुट्टी देत नाहींत, हें काय म्हणून? अशी अहोरात्र मारामार करून काय करण्याचा बेत आहे? तुमच्यापैकीं आहे कोणाला यांतलें इंगित ठाऊक?

**प्रियाल :** मला तें थोडेंसें माहीत आहे; निदान लोकवार्ता तरी अशी आहे. तुला ठाऊक असेल कीं, पूर्वीं एकदा प्लवंगदेशच्या माजी राजांत आणि आतांच तूं ज्याची प्रतिमा पाहिलीस त्या आमच्या महाराजांत अभिमानामुळें तंट्याचें कारण उपस्थित होऊन दोघांचें द्वंद्व झालें; त्यांत प्लवंगच्या राजाला आमच्या महाराजांनीं परलोकास पाठविलें. द्वंद्वास उभें राहण्यापूर्वीं दोघांत असा ठराव झाला होता कीं, प्लवंगाधिपति हरला तर त्यानें आपल्या सर्व जमिनी बलभद्राधिपतीस द्याव्या. बलभद्राधिपति हरला तर त्यानें आपल्या अर्ध्या जमिनी प्लवंगाधिपतीस द्याव्या. सुदैवानें द्वंद्वाचा परिणाम आमच्या महाराजांस अनुकूल झाला; व द्वंद्वयुद्धाच्या ठरावाप्रमाणें त्याच्या सर्व जमिनी आमच्या महाराजांकडे आल्या. प्लवंगाधिपतीच्या मागें त्याचा नुकताच वयांत आलेला मकरंद नांवाचा मुलगा आहे, त्याचा स्वभाव उल्लू, हट्टी आणि पराकाष्ठेचा छांदिष्ट आहे. त्याच्या बापाकडून आमच्याकडे आलेल्या जमिनी त्याच्या मनांत रात्रंदिवस डांचत आहेत. बलभद्र आणि प्लवंग यांच्या सीमेवरील अन्नान्नदशेस आलेल्या दरवडेखोर आणि लुटारू लोकांस दंगेधोपे आणि बंडें करण्यास फूस देणारा तरी तोच. त्याचा असा हेतु आहे कीं, या साहसी दांडगेश्वर लोकांच्या साहाय्यानें आमच्या राज्यावर स्वारी करावी, आणि आम्हांस चोहोंकडून घेरून पेंचांत पाडावें, व आमच्याकडून आपल्या जमिनी परत घ्याव्या. तेव्हां आतां चहूंकडे

देशांत जी धामधूम दृष्टीस पडते ती हें विघ्न टाळण्यासाठीं होय. निदान या अचाट तयारीचें आणि गडबडीचें मला तरी दुसरें कारण ठाऊक नाहीं.

**पिंगलक :** मला देखील तेंच कारण असेलसें वाटतें. अशा प्रसंगीं आमच्या गतमहाराजांचें पिशाच शिपायाचा वेश धारण करून आम्ही पहारा करीत असतां आमच्या पुढून निघून जातें हें ठीकच; कारण प्लवंग आणि बलभद्र यांत आजपर्यंत ज्या लढाया झाल्या त्यांना कारण हेंच व आतां होणारीला तरी हेंच.

**प्रियाल :** मनाला उद्विग्नता उत्पन्न करण्यास अगदीं स्वल्प कारण पुरें आहे. रोमकपट्टणाच्या ऐन सद्दीच्या आणि भरभराटीच्या दिवसांत महापराक्रमी राजा सर्वंजय घातकी मित्रांच्या कट्यारीला बळी पडण्यापूर्वीं तेथील थडग्यांतले मुडदे नाहींसे झाले, आणि चादरीनें गुंडाळलेलीं प्रेतें कर्कश किंकाळ्या मारून रस्त्यांत वावरूं लागलीं ! तसेंच, विस्तवाच्या लोळांप्रमाणें ज्यांचीं शेंपटें, अशीं प्रचंड शेंडेनक्षत्रें, रक्ताचें दहिंवर आणि सूर्यांत विलक्षण कल्होळ हीं दिसून लोकांचीं धाबीं गडबडून गेलीं. अमृतस्रावी आणि सागरक्षोभी जो चंद्र तो तर ग्रहणांनीं इतका बेजार होऊन गेला कीं, आतां हा अगदीं मालवतो आणि याच्या उदयाची पुनः आशा राहिली नाहीं अशी सर्वांस भीती उत्पन्न झाली. तशा प्रकारचे अरिष्टसूचक उत्पात आमच्या देशांत होऊं लागले आहेत, व पृथ्वीवर आणि आकाशांत घडून आलेल्या अनर्थांवरून आमच्या देशाच्या आणि लोकांच्या डोक्यावर कांहीं तरी विलक्षण कहर येऊन ठेपला आहे असें वाटतें.

[**समंध** पुनः प्रवेश करितो.]

अरे, पण हो, हळू; पाहा पाहा, तो तिकडे पुनः आल्यासारखा दिसतो ! काय होईल तें होवो, आतां मी त्याला आडवतोंच ! थांब, पिशाचा. तुला कोणताही ध्वनि करतां येत असेल किंवा तूं एकादी भाषा जाणत असशील तर माझ्याशी बोल. ज्याच्या योगानें तुला आराम पडून मला भूषण होईल असें कांहीं चांगलें काम करावयाचें असेल तर सांग; कांहीं इष्ट हेतु अपूर्ण राहिला असल्यास कळूं दे; तुझ्या राष्ट्राचें भाकीत तुला समजलें असल्यास तें मला कळीव, म्हणजे तें टाळण्याचा वेळच्या वेळीं उपाय करूं. किंवा जिवंत असतां अन्यायानें दडपलेला पैसा जमिनींत कोठें पुरून ठेविला होतास, त्यावर मरतांना वासना राहिल्यामुळें, लोक सांगतात त्याप्रमाणें, समंध होऊन त्याच्या पाठीमागें भटकतो आहेस किंवा काय आहे तें सांग. (कोंबडा आरवतो.) थांब; हालूं नको. वत्सनाभा, पकड त्याला.

**वत्सनाभ** : टोंचूं का त्याला हा भाला ?

**प्रियाल** : तो उभा नाहीं राहिला तर टोंचच.

**पिंगलक** : तो तिकडे गेला.

**प्रियाल** : अरे, ए, हा इकडे आला !

[**समंध** जातो.]

**वत्सनाभ** : तो गेला ! असल्या भव्य आकृतीशीं आपण मारामारी करण्याचा घाट घातला हें चांगलें केलें नाहीं. भुतें म्हणजे हवेसारखीं अभेद्य; त्यांच्यावर आमच्या फुसक्या घावांचें काय चालणार आहे ? उलट आमचा मात्र खोडसाळपणा दिसणार !

**पिंगलक** : कोंबडा आरवला तेव्हां तो बोलायच्या बेतांत होता.

**प्रियाल** : त्याच्या शब्दाबरोबर मात्र तो एखाद्या गुन्हेगारासारखा पळत सुटला. मी असें ऐकत होतों कीं, सूर्योदयाच्या सुमारास कोंबडा आरवूं लागला कीं आपआपल्या जागा सोडून भटकत फिरणारीं भुतें जेथल्या तेथें परत येऊन लपून बसतात. आज त्या गोष्टीचा मला प्रत्यक्ष अनुभव आला.

**वत्सनाभ** : कोंबडा आरवल्यावरोबर तो एकदम नाहींसा झाला. कोणी असें म्हणतात कीं, निरभ्र आणि प्रशांत अशा पौष मासाच्या शुक्ल पक्षांत कोंबडा रात्रभर आरवतो; त्यामुळें भुतांखेतांची बाहेर पडण्याची छाती होत नाहीं; ताऱ्यावर तारे सडकत नाहींत; करणी करून परी मारूं शकत नाहींत; व चेटक्यांचें चेटूक चालत नाहीं.

**प्रियाल** : हो, मींही असेंच ऐकलें आहे; आणि माझाही त्यावर थोडा-बहुत भरंवसा आहे. पण हें पाहा, अरुणोदय होऊन दिशा फांकल्या आणि पूर्वे-कडील क्षितिजापासून भगवान् सूर्यनारायणाचें रक्तबिंब वर येऊन त्याच्या रक्तकांतीनें पर्वतांचीं शिखरें नाहल्यासारखीं झालीं आहेत. याकरितां पहारा आटपून किल्ल्यांत जाऊं या, आणि माझें ऐकशील तर, झालेली हकीकत आपल्या तरुण चंद्रसेनास सांगूं या. तो समंध त्याच्याशीं बोलेल. प्रेमाखातर म्हण किंवा कर्तव्य म्हणून म्हण, ही गोष्ट त्याच्यापासून आपण लपवून ठेवतां कामा नये.

**वत्सनाभ** : चला, त्याला सांगू या. आज तो स्वस्थपणें कुठें भेटेल तें मला ठाऊक आहे.

[सगळे निघून जातात.]

## प्रवेश २ रा

स्थळ : कुंजपूर राजवाड्यांतील एक दिवाणखाना.

(**राजा, राणी, चंद्रसेन, शालेय, तीव्रजव, मेघवाहन,** सरदार लोक आणि हुजरे प्रवेश करितात.)

**राजा :** सरदार हो, आमच्या अंतःकरणाला चटका लावून आमचा प्रिय बंधु परलोकवासी झाला, त्याची स्मृति अद्यापि जागृत असल्यामुळें आम्हांलाचसा काय पण सगळ्या राष्ट्राला अत्यंत खेद होत आहे, तथापि जन्मास म्हणून जो प्राणी आला त्याच्या पाठीमागें मरण हें लागलेंच आहे असा विचार करून, दुःखाचा परिहार करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ज्यांच्यावर राज्याचा जबरदस्त भार आहे त्यांनीं तरी प्रजेच्या सांत्वनासाठीं शोकाकुल राहून उपयोग नाहीं. प्रजाकल्याण हा राजांचा शास्त्रप्रणीत धर्म होय. तदनुसार वर्तन करण्यासाठीं त्यांनीं सर्व दुःख गिळून टाकिलें पाहिजे. हा राज्यशकट एकट्यानेंच ओढणें फार कठीण आहे. म्हणून या आमच्या भातृजायेला आज आम्ही गृहिणीपदाप्रत चढवितों. इतउत्तर ही तुमची राज्ञी व बलाढ्य राष्ट्राची अर्धस्वामिनी. आजच हा सोहळा घडवून आणणें भाग पडल्यामुळें हृदयसंपुटांत आनंद व खेद यांचें समतोलन होऊन मनाची जी शोचनीय अवस्था झाली आहे ती सांगतां पुरवत नाहीं. भ्रातृवियोगामुळें एका नेत्रानें दुःखाश्रु; पत्नीपाणिग्रहणामुळें दुसऱ्यानें आनंदाश्रु ! एकीकडे श्राद्धक्रिया; दुसरीकडे विवाहोत्सव ! हें सुखदुःखाचें अश्रुतपूर्व संमिश्रण आम्ही आपल्याच बुद्धीनें केलें आहे असें नाहीं. याला आपल्यासारख्या बुद्धिवान् पोक्त आणि समंजस पुरुषांचें अनुमोदन आहेच.

असो; अलीकडे प्लवंगदेशच्या राजपुत्र मकरंदानें जो प्रकार चालविला आहे तो तुमच्या ऐकण्यांत आलाच असेल. आमचा बंधु वारल्यापासून त्याला असें वाटूं लागलें आहे कीं, आमच्या राज्यांत फुटाफूट होऊन त्यांत कांहीं जीव नाहींसा झाला आहे. या भ्रांतीनें बेफाम होऊन त्याजकडून आम्हांस निरोपावर निरोप येत आहेत कीं, तुमच्या भावाकडे गेलेल्या आमच्या जमिनी आम्हांस परत द्या. आतां तुम्हांस माहीत असेल कीं, या जमिनी आमच्या शूर बंधूनें द्वंद्वांत त्याच्या बापाला जिंकून मिळविल्या होत्या; यासाठीं द्वंद्वयुद्धाच्या ठरावाप्रमाणें त्याचा त्यांजवर कोणत्याही प्रकारचा हक्क राहिलेला नाहीं. हें एक याच्यासंबंधानें झालें.

आतां आमच्यासंबंधानें प्रस्तुत एकत्र जमण्याचें कारण सांगितलें म्हणजे काम उरकलें. तुम्हांला ठाऊक असेल कीं, मकरंदाचा चुलता म्हातारपणामुळें अगदीं थकून जाऊन त्याचें जमिनीस तोंड टेकलें आहे. त्याच्या पुतण्याची वागणूक

त्याच्या कानावरसुद्धां येत नाही. पण मकरंदानें हे जे ढंग चालविले आहेत ते सगळे आपल्या काकाच्या दौलतीच्या आणि शिपायांच्या जोरावर; आणि म्हणून त्यास आम्ही या पत्रांत असें लिहिलें आहे कीं, तुम्ही आपल्या पुतण्याचे चाळे न थांबवाल तर त्याबद्दल तुम्हांस जाब द्यावा लागेल. (सेवकांकडे पाहून) तेव्हां हें पत्र घेऊन प्लवंगास जा. त्याचा खुलासा करण्यास लागेल त्यापेक्षां अधिक मजकूर बोलूं नका. विलंब न लावतां निघा, आणि काम फत्ते करून लवकर परत या.

**मेघवाहन**
**पाशक** } –महाराजांच्या हुकुमास सेवकांची तयारी आहे.

**राजा** : तिची आम्हांस कधींच शंका आली नाहीं. या तर मग आतां.

[**मेघवाहन** आणि **पाशक** जातात.]

तीव्रजवा, आतां तुझें काय मागणें आहे तें सांग. याबद्दल भद्रदेशांतील पाहिजे त्या मनुष्यावर त्याला झेंपण्याजोगा शब्द टाक, तो म्हणून त्याला खालीं पडूं देणार नाहीं. तुला हवीशी वाटून मला देववणार नाहीं व तुला मागवणार नाहीं अशी कोणती वस्तु आहे ? तुला पाहिजे असेल तें माग.

**तीव्रजव** : भाग्यशाली प्रभो, मेहेरबानी करून दासाला उत्तालाला परत जाण्याची आज्ञा द्यावी. महाराजांचा राज्याभिषेक पाहण्यासाठीं मी बलभद्रास आनंदानें आलों खरा; पण आतां तो समारंभ होऊन बरेच दिवस झाले; व माझें मन आणि कामें हीं उत्तालांत गुंतून राहिलीं आहेत. याकरितां तिकडे परत जाण्यास आज्ञा मिळण्याची स्वामिचरणापाशीं विनंति करीत आहें.

**राजा** : तुझ्या बापानें तुला जाण्यास रुकार दिला काय ? शालेया, तुमचें कसें काय म्हणणें आहे ?

**शालेय** : मी जातों जातों म्हणून त्यानें एकसारखी माझी पाठ पुरविली. सरते शेवटीं निरुपाय होऊन मी त्याला एकदांचा ‘ जा ’ म्हटलें. खावंदांसही अशी सविनय विनंती आहे कीं त्यांनींहि याला संमति द्यावी.

**राजा** : बरें आहे तर मग; तीव्रजवा, तुझ्या सोईला पडेल त्या वेळेस निघण्याची तयारी कर. आतां आमच्या चंद्रसेनाचें काय म्हणणें आहे तें ऐकूं.

**चंद्रसेन** : (एकीकडे) काका आहेस म्हणून एक कानाच अधिक; नाहीं तर पक्का काक होतास.

**राजा** : चंद्रसेना, अजूनही तुझी मुखश्री खिन्न आणि म्लान कां बरें ?

**चंद्रसेन** : नाहीं काका; मला खिन्न असण्याचें कांहीं कारण नाहीं. मी आनंदांत आहें.

**राणी** : बाळा, आता खेद करणें सोड, आणि या बलभद्राच्या अनाथ प्रजे-कडे करुणार्द्र दृष्टीनें पाहा. तूंच असा शोक करीत बसलास तर त्या बिचारीनें कोणाकडे पाहावें ? कितीहि शोक केलास तरी तुझे वडील आतां परत येणार आहेत काय ? अश्रूंनीं जमीन भिजविलीस तरी ती त्यांना थोडीच परत आणणार आहे ! मरण हें ज्याच्या त्याच्या पाठीस लागलेंच आहे. जन्म आणि मृत्यु यांची शुद्ध सांगड आहे. हें रहाटगाडगें अक्षय चालायाचेंच.

**चंद्रसेन** : खरें आहे आईसाहेब, आपण म्हणतां तें अक्षरशः खरें !

**राणी** : हें जर तूं कबूल करतोस, तर मग असा कष्टी कां दिसतोस ?

**चंद्रसेन** : हो दिसतों खरा; पण दिसतों तरी कां ? खरोखरीच मी कष्टी आहें. जवळचा आप्त गेला म्हणजे सुतक धरणें, अंगरखा–पागोटें न घालणें, कोणी भेटावयास आला कीं तोंडाला पदर लावून दीर्घ श्वास टाकणें, डोळ्यांतून भरपूर अश्रू काढणें, मागच्या गोष्टी आठवून रडूं लागणें, गेलेल्याचे पुनः पुनः गुण गात बसणें, सारांश अंगव्यापार, शब्द आणि मुद्रा यांवरून आपणांस अत्यंत दुःख झालें आहे असें दाखविणें, ही जगाची रूढि आहे. इच्यावरून माझ्या दुःखाची खरी कल्पना कशी येणार ? पोटांत दुःखाचा लवलेश नसतांही मनुष्याला असलें सोंग आणतां येईल. पण माझ्या अंतःकरणांत जी कालवाकालव होत आहे ती असल्या बतावणीच्या पलीकडे आहे. तिचा अनुभव माझा मलाच.

**राजा** : चंद्रसेना, बापासाठीं तुला असें दुःख व्हावें, हें तुझ्या पराकाष्ठेच्या प्रेमळ स्वभावाला फारच योग्य आहे. पण तूंच असा विचार कर की, तुझा बाप गेला ही कांहीं मोठी अपूर्व गोष्ट झाली नाहीं; तुझ्या बापाच्या बापाची तीच गति; त्या बापाच्या बापाची फिरून तीच वाट. सारांश, एकानें मरावें आणि मागें राहील त्यानें कांहीं वेळ शोक करावा ही चालच आहे. पण कोणी कोणाविषयींही एकसारखा हेका धरून बसणें हें निव्वळ वेडेपण होय. धीराच्या पुरुषाला तें अगदीं शोभत नाहीं. शिवाय, प्राणी जातात ते परमेश्वराच्या आज्ञेवरून; तेव्हां ते गेल्याबद्दल विशेष खेद करणें म्हणजे परमेश्वराच्या योजकतेला दोष देण्या-सारखें आहे. जो या जगांत आला तो येथून परता गेलाच पाहिजे, या गोष्टीचा प्रत्यय दर घडीला आपणांला येत असतां, व अगदीं अडाणी मनुष्याला देखील ही गोष्ट पुरतेपणीं ठाऊक असतां, असल्या अनिवार्य आणि अपरिहार्य गोष्टीच्या संबंधानें मन घट्ट करून शोक न आवरणें, यानें शोक करणाराचें अंतःकरण अधीर,

मन मृदु, आणि बुद्धि अपक्व आणि आकुंचित, येवढें मात्र दिसून येतें. "आज आजा गेला, उद्यां काका गेला, परवां मामा गेला, याप्रमाणें जो आला तो गेलाच पाहिजे." अशा प्रकारची ओरड जगाच्या रहाटीचा विचार आमच्या कानांशी नित्य करीत असतां, आम्ही वेड्यासारखें रडत बसणें म्हणजे आपल्या मूर्खपणानें गेल्या जिवाला शिणविणें, आणि जगदीशाच्या करणीस नांव ठेवणें यासारखें होय. याकरितां तुला आमचें असें सांगणें आहे कीं, हा निरर्थक शोक पुरे कर, आणि आम्हांला पितृस्थानीं आजपासून मान. आम्हीं तुला कांहीं कमी करीत नाहीं. आमच्या राज्याचा आणि दौलतीचा तूं सर्वस्वीं मालक आहेस हें आम्ही आपल्या सर्व सरदारांना आणि प्रजेला विदित केलें आहे. आम्हांला तरी मूल कोठें आहे ? आमचा पुतण्या, आमचा मुलगा, आमचें सर्व कांहीं तूं आहेस. मंगलापूरच्या शाळेला परत जाण्याचा जो तुझा विचार आहे तो मात्र आम्हाला बिलकुल आवडत नाहीं; आणि म्हणून आमचें तुला फिरून फिरून असें सांगणें आहे कीं, तूं येथें आमच्या डोळ्यासमोर राहण्याचा निश्चय कर; आम्हांला वारंवार तुझ्याकडे पाहिल्यावांचून कसें चैन पडेल ?

**राणी** : चंद्रसेना, तुझ्या आईचा तरी शब्द खालीं पाडूं नको; बाळा, मंगलापुराला जाण्याचा हेका सोड; येवढी जोड मी तुझ्यापासून मागून घेतें.

**चंद्रसेन** : आई, होतां होईल तो तुझा शब्द मोडणार नाहीं.

**राजा** : वा: चंद्रसेना, फार चांगलें उत्तर दिलेंस. तूं आणि आम्ही कुंजपुरांत आनंदानें राहूं. (राणीस) मदनिके, चल आतां. चंद्रसेनानें आपण होऊन येथें राहण्याचें कबूल केलें हें ऐकून मला फार समाधान वाटलें. याच्या या 'हो' नें आम्हांलाचसा काय, पण कुंजपुरांतील एकूणएक मनुष्यांना आनंद होईल. उठा, चला आतां.

[**चंद्रसेना**खेरीज सगळे निघून जातात.]

**चंद्रसेन** : काय करावें ? हें कठोर मांस आपोआप झडून जाईल, किंवा याचें पाणी पाणी होईल तर किती बरें होईल ! अथवा शास्त्रकर्त्यांनीं आत्महत्या सदोष मानिली नसती तरी फार बरें झालें असतें ! नको, नको हा जीव परमेश्वरा ! या जगांतल्या वस्तूनवस्तूचा मला वीट आला आहे व कांहीं एक नकोसें झालें आहे ! धिक्कार असो, धिक्कार असो या जगाला ! जिच्यावर वारंवार हात न फिरल्यामुळें जिकडे तिकडे हवें तसें रान माजून तें बियाला आलें आहे अशा बागेप्रमाणें हें जग मला भासूं लागलें आहे ! जात्या अमंगळ आणि घाणेरड्या चिजेखेरीज दुसरी चीजच यांत नाहीं असें वाटतें ! त्याचा

असा परिणाम व्हावा ना ! मरून दोन महिने काय ते झाले ! छे, दोन तरी कुठले ? दोहोंपेक्षां कमीच ! आ, हा ! असा सर्वोत्कृष्ट राजा ! तो भास्कर कोणीकडे आणि हा काजवा कोणीकडे ! आईवर तरी त्याची कोण ममता असे ! प्रेमानें वेडावून जाऊन एकेकदां त्यानें असें म्हणावें कीं, "वा मारुता, अशा तीव्र वेगानें वाहूं नको; त्यामुळें माझ्या प्रियेचे ओठ आणि अंग फुटून तिला वेदना होतात." शिव शिव ! कोण ममता ही ! आणि अशीनें त्या हिऱ्याला सोडून या कोळशाच्या गळ्याला मिठ्या माराव्या ! काय म्हणावें या कामवासनेला ! नवऱ्याच्या मरणानें ती समूळ विझावी का दुप्पट जोरानें पेटावी ! आणि हा सगळा निंद्य प्रकार एका महिन्याच्या आंत ! असो, कशाला त्याचा विचार — स्त्रीजात म्हणून तेवढी सारी बेहराम ! — एक महिना झाला असेल नसेल, हें हेंच लुगडें नेसून मोठ्यानें आक्रोश करीत माझ्या बापाला स्मशानांत पोहोंचविण्यास ती गेली — हो हो; हीच, ती हीच ! देवा, सद्सद्विचार ज्याला नाहीं अशा पशूनें देखील थोडे अधिक दिवस जाऊं दिले असते ! माझ्या चुलत्याशीं, माझ्या बापाच्या भावाशीं पाट लावणारी तीच ही ! येवढी घाई करण्यांत इनें त्याचें काय पाहिलें ईश्वर जाणे ! एका महिन्याच्या आंत ! त्या चांडाळणीच्या डोळ्यांतील तें कपटाचें पाणीदेखील पुरतें वाळलें नाहीं तोंच तिनें लग्न लाविलें ! नवऱ्याच्या भावाशीं — सख्ख्या दिराशीं राजरोस जारकर्म करण्यास सांपडावें म्हणून ही अधमपणाची घाई ! हें चांगलें नाहीं. आणि याचा परिणामही चांगला होणें नाहीं. पण करायचें काय ? आंतल्या आंत चूर होऊन मेलें पाहिजे. तोंडावाटें एक ब्र काढण्याची सोय नाही.

[**प्रियाल, वत्सनाभ** आणि **पिंगलक** प्रवेश करितात.]

**प्रियाल :** महाराजांचा जयजयकार असो.

**चंद्रसेन :** तुम्ही सगळे खुशाल आहां, हें पासून मला बरें वाटतें. प्रियाला— अथवा मी चुकत तर नाहीं ना ?

**प्रियाल :** नाहीं महाराज, आपण बरोबर आहां. मीच तो आपला गरीब नोकर प्रियाल.

**चंद्रसेन :** प्रिय मित्रा, आजपासून तूं आपल्याला नोकर म्हणत जाऊं नको. मीं तें नांव बदलून ठेविलें आहे. बरें प्रियाला, वत्सनाभा, मंगलापुराहून येथे रे कां आलांत ?

**वत्सनाभ :** महाराज, धनीसाहेब—

**चंद्रसेन :** वत्सनाभा, तूं भेटलास यामुळें मला फार संतोष झाला. पण मित्रा, मंगलापुराला तूं कां सोडिलेंस तें सांग.

**प्रियाल** : महाराज, आलों फिरत फिरत झालें.

**चंद्रसेन** : तुझ्या वैऱ्यानें देखील अशी गोष्ट सांगितली तरी तीं मी ऐकणार नाही. तूं होऊन आपल्याविषयीं अशा गप्पा ठोकूं लागलास तर त्या कोण ऐकेल ? उगीच भटकत फिरणारा मनुष्य तूं आहेस काय ? तूं या कुंज-पुरास कशासाठीं आलास ? मित्रा, तूं परत जाण्यापूर्वीं तुमची-आमची एकवार पंगत व्हावयाची आहे, बरें का ?

**प्रियाल** : महाराज, मी आपल्या वडिलांची और्ध्वदेहिक क्रिया पाहण्यास आलों.

**चंद्रसेन** : मित्रा, मला असें फसवूं नको. खरेंच सांग, माझ्या आईचा लग्नसमारंभ पाहण्यास तूं आला नाहीस बरें ?

**प्रियाल** : महाराज, माझ्या मतें त्या कामांत फार घाई झाली.

**चंद्रसेन** : वेड्या, घाई कसची ? कामांत काम उरकून खर्च वांचविला ! श्राद्धाचे ब्राह्मण लग्नाला आणि लग्नाचे श्राद्धाला ! साटेंलोटें केलें नि काय ? प्रियाला, काय सांगूं ? तसले दिवस या डोळ्यांनीं पाहण्यापेक्षां मुळींच मी जन्माला आलों नसतों किंवा आधींच मरून गेलों तर फार बरें होतें. माझे बाबा, काय सांगूं, डोळ्यांपुढून हालत नाहींत.

**प्रियाल** : कोठून महाराज ?

**चंद्रसेन** : अरे, अंतःकरणांतून; ज्ञानचक्षूंपुढून प्रियाला.

**प्रियाल** : महाराज, मीं मात्र त्यांना एकदां पाहिलें. असा चांगला राजा विरळा असेल.

**चंद्रसेन** : तें कशाला नांव घेतोस ? एकंदरीनें असा मनुष्य मिळणें नाहीं.

**प्रियाल** : महाराज, मी त्यांना काल रात्रीं पाहिलें.

**चंद्रसेन** : पाहिलेंस ? अरे कोणाला ?

**प्रियाल** : महाराज, आपल्या वडिलांना.

**चंद्रसेन** : माझ्या बापाला !

**प्रियाल** : महाराज, क्षणभर आश्चर्य करणें एकीकडे ठेवून या दोघांसमक्ष मीं जो चमत्कार पाहिला तो मी सांगत आहें, तिकडे लक्ष द्या.

**चंद्रसेन** : सांग, सांग, आधीं सांग कसा.

**प्रियाल** : हे दोघेजण पहारा करीत असतां गेल्या दोन रात्रीं ऐन मध्यान्हींच्या सुमारास असा प्रकार घडला.—आपल्या वडिलांसारखी एक भव्य

आकृति, शिपायाचा पेहराव करून मोठ्या थाटानें धबधब पावलें टाकीत यांच्यापासून एका हातावरून गेली. तिला पाहतांच भयानें यांची अगदी गाळण होऊन जाऊन बोबडी वळली, व तोंडें काळीं पडलीं. तिसऱ्या दिवशीं मला एकीकडे नेऊन त्यांनीं ही गोष्ट मजपाशीं सांगितली. मी त्याच दिवशीं आपल्या मनाची खात्री करून घेण्याकरितां तेथें गेलों. जिकडे तिकडे सामसूम होऊन बाराचा टोका पडल्याबरोबर एका दिशेकडून धबधब असा बारीक शब्द येऊं लागला. बोलतां बोलतां थेट त्यांनीं सांगितल्यासारखी आकृति आमच्याकडे येतांना दिसली. आपल्या वडिलांना मी चांगल्या रीतीनें जाणत असल्यामुळें ती जवळ आल्याबरोबर मीं त्यांना ओळखिलें. या दोन हातांत तरी कांहीं फरक असेल, पण त्या —

**चंद्रसेन** : पण हें सर्व झालें कोठें ?

**वत्सनाभ** : महाराज, किल्ल्यासमोरच्या सपाट मैदानावर आम्ही पहारा करीत होतों तेथें.

**चंद्रसेन** : तूं तिच्याशीं बोलला नाहींस काय ?

**प्रियाल** : महाराज, मीं आपल्याकडून खटपट केली; पण तिनें कांहीं एक उत्तर दिलें नाहीं. परंतु एकदां मात्र तिनें डोकें वर केलें, आणि अशा प्रकारची हालचाल केली कीं, त्यावरून ही बोलतेच कीं काय असा भास झाला. पण इतक्यांत सकाळचा कोंबडा मोठ्यानें आरवला; त्याच्या शब्दाबरोबर ती घाईनें चालती झाली आणि म्हणतां म्हणतां दिसेनाशी झाली.

**चंद्रसेन** : हा मोठाच चमत्कार !

**प्रियाल** : आणि तो सर्व खरा आहे अशी आमच्या दिलाची बालंबाल खात्री झाली, म्हणून तो महाराजांच्या चरणापाशीं सांगण्यासाठीं ताबडतोब निघून आलों.

**चंद्रसेन** : मित्रांनों, तें सगळें खरें; पण तें ऐकल्यापासून माझ्या मनाची जी स्थिति झाली आहे ती तुम्हाला काय सांगूं ?—अरे, आज रात्रीं तुमचा पहारा आहे काय ?

**वत्सनाभ** }
**पिंगलक** } — आहे महाराज.

**चंद्रसेन** : काय म्हटलेंत, ती हत्यारबंद होती काय ?

**वत्सनाभ** }
**पिंगलक** } — होय महाराज.

**चंद्रसेन** : नखशिखान्त ?

**वत्सनाभ**
**पिंगलक** } — महाराज, डोक्यापासून पायापर्यंत.

**चंद्रसेन** : तुम्ही तिचा चेहरा पाहिला नाहीं काय ?

**प्रियाल** : हो हो महाराज, तिनें तोंडावरचा बुरखा वर केला होता.

**चंद्रसेन** : ती रागांत दिसली काय ?

**प्रियाल** : तिची चर्या रागावल्यापेक्षां दुःखीच दिसत होती.

**चंद्रसेन** : पांढरी कीं तांबडी ?

**प्रियाल** : छे, फारच पांढरी.

**चंद्रसेन** : आणि तिनें तुझ्यावर डोळे लावले होते काय ?

**प्रियाल** : एकसारखे.

**चंद्रसेन** : मी तेथें असतों तर फार बरें झालें असतें.

**प्रियाल** : आपणांस फारच अचंबा वाटला असता.

**चंद्रसेन** : असें झालें असतें खरें; बहुतकरून असेंच झालें असतें. ती फार वेळ होती का ?

**प्रियाल** : सुमारें शंभर अंक म्हणेपर्यंत.

**वत्सनाभ**
**पिंगलक** } —नाहीं, नाहीं, त्यापेक्षा अधिक.

**प्रियाल** : निदान मी पाहिली त्या वेळेस तरी नाहीं.

**चंद्रसेन** : मी आज रात्री जागत बसणार. कदाचित् ती पुनः आज रात्रीं येईल.

**प्रियाल** : ती येईलच, हें मी खात्रीनें सांगतों.

**चंद्रसेन** : खरोखर ती माझ्या बापाची आकृति असेल तर साक्षात् यमानें जरी सांगितलें कीं तूं तिच्याशीं बोलूं नकोस, तरी देखील मी बोलण्याला सोडणार नाहीं. आतां माझी तुम्हांला येवढीच विनंती आहे कीं, अद्यापपावेतों ही गोष्ट तुम्ही कोठें फोडली नसल्यास ती तुमच्या तोंडांतल्या तोंडांत राहूं द्या; आणि आज रात्रीं जें जें घडेल तें निमूटपणीं पाहा; पण बाहेर जाऊं देऊं नका. त्याबद्दल मी तुमचे उपकार फेडीन. चला आतां. आज रात्रीं अकरापासून बाराच्या आंत मी मैदानांत तुम्हांपाशीं येऊन दाखल होतों.

**सर्वजण** : महाराजांच्या सेवेला तयार आहों. घेतों तर मग आता महाराजांचा निरोप.

**चंद्रसेन** : कांहीं काळजी करूं नका. या बरें.

[**चंद्रसेना**खेरीज सगळे निघून जातात.]

**चंद्रसेन** : हत्यारबंद माझ्या बापाचें पिशाच ! हें कांहीं ठीक दिसत नाहीं. कांहीं दगा असेल कीं काय अशी मला भीति वाटते. आतांच राव असती तर किती मजा झाली असती ! जिवा, आतां व्यर्थ कां धडपडतोस ? ती येईपर्यंत निमूटपणें वाट पहा.

## प्रवेश ३ रा

स्थल--शालेयाच्या वाड्यांतील एक दिवाणखाना.

[**तीव्रजव** आणि **मल्लिका** प्रवेश करितात.]

**तीव्रजव** : माझें सामानसुमान पुढें गलबतावर जाऊन चढलें. आता मला निरोप दे. ताई, तुला एक सांगून ठेवितों, सध्यां वारा अनुकूल आहे व समुद्रावरही कोठें गडबड नाही. याकरितां मी गेलों कीं आपली निजून राहूं नको; वरचेवर पत्रबित्र धाडीत जा.

**मल्लिका** : दादा, असा काय संशय घ्यावा ?

**तीव्रजव** : ताई, तुला आणखी एक पोटांतील गोष्ट सांगून ठेवितों, ती ध्यानांत धर. तुला असें वाटूं लागलें आहे कीं, चंद्रसेनाचें प्रेम माझ्यावर दृढ बसलें आहे. पण हा तुला भ्रम आहे. तारुण्याच्या भरांत तरुणांनीं तरुणीवर प्रेम दाखविणें हें साहजिक आहे. कित्येक कुलांत तर अशा रीतीनें वागण्याची चालच पडून गेली आहे. पण असल्या क्षणिक प्रेमांत कांहीं स्थिरता असते असें समजूं नको. वसंत ऋतु आला म्हणजे ज्या त्या झाडास कोवळी कोवळी पालवी फुटून तें नाजूक आणि आल्हादकारक दिसतें. पण त्याची ती रमणीयता महिना दोन महिने टिकणारी असते. वयांत येऊन मदनाचा शर लागूं लागला कीं, जी रुपवती स्त्री दृष्टिगोचर होईल ती माझी प्राणवल्लभा असें तरुण पुरुषाला वाटूं लागतें. अशा स्थितींत त्यानें ठेविलेलें प्रेम अत्यंत मधुर असतें; पण पराकाष्ठेचें चंचल; त्यांत दृढतेचा अंश देखील असत नाहीं. तर असल्या क्षणिक प्रेमगंधाला मोहून जाऊं नको, एवढेंच सांगणें आहे.

**मल्लिका** : दादा, त्याची तूं काळजी करूं नको.

**तीव्रजव** : चंद्रसेनाच्या प्रेमाचा विचार सुद्धां पुनः मनांत आणूं नको. कारण तूं असें पाहा कीं, मनुष्याच्या मनोवृत्तीचे व्यापार कांहीं अढळ असत नाहींत. त्याचा अनुभव जसजसा वाढत जातो, तसतसा त्यांत तो बदल करितो. रात्रभर कमलोदरांत राहून बुभुक्षित झालेला मधुकर प्रातःकालीं पहिल्याप्रथम

जी मंजरी दृष्टीस पडेल तीच उत्तम मानून तिच्याशीं बराच वेळ रमतो. थोडेंसें मधुपान होऊन तृषा शांत झाल्यावर ती त्याला बरी वाटेनाशी होते; मग चालला दुसरीवर; मग तिसरीवर, मग, चौथीवर— याप्रमाणें तो कितीकांवर उतरेल त्याचा नेम नाहीं. पुढलीवर गेला की, मागलीचा विसर. त्यासारखी तरुणाची स्थिति आहे. नवीन नवीन धनसंपन्न, कुलसंपन्न, गुणसंपन्न, रूपसंपन्न प्रिया नजरेपुढें येऊं लागल्या म्हणजे पहिल्यांची आठवणही राहत नाहीं. दुसरी अशी गोष्ट आहे कीं, चंद्रसेनाची तुझ्यावर खरी प्रीति आहे असें मानिलें, तरी त्याला आपल्या मनाप्रमाणें कोठें लग्न करितां येणार आहे ? तो या बलाढ्य राज्याचा पुढें–मागें राजा होणार. तेव्हां त्याचा विवाह होणें तो राजकारणास पटेल अशा तऱ्हेनें झाला पाहिजे, व त्याला सगळ्या राष्ट्राचें संमत असलें पाहिजे. राजे लोकांना आपली आवडनावड एकीकडे ठेवून राष्ट्रास हितकारक असा संबंध करावा लागतो. चंद्रसेनाचें कुल केवढें ? राजघराण्यापुढें आम्हां गरिबांचा काय पाड ? त्याच्या–तुझ्या लग्नाला लोक कधींही अनुमोदन देणार नाहीत. बरें, इतकें असूनही तो असें म्हणूं लागला कीं, मल्लिके, तुझ्यावर माझें दृढ प्रेम आहे, तर चारचौघांत त्याला तें जितकें दाखवितां येईल तितकेंच आहे असें मान. त्याच्या-पलीकडे आपल्या मनाची धांव जाऊं देऊं नको. नाहीं तर पाहा, भाबडे पोरी, त्याच्या मधुर शब्दांच्या जाळ्यांत सापडून बापाच्या निष्कलंक कुलाला आणि आपल्या कुमारीपणाला बट्टा येण्याजोगें काम करशील ! नाहीं नाहीं त्या थापा देऊन आपला मतलब साधला म्हणजे तो दुष्यन्ताप्रमाणें तुला तोंडघशीं देईल, याचा नीट विचार कर. कांहीं झालें तरी वासनाधीन होऊन मन उच्छृंखल होऊं देऊं नको. तरुण आणि रूपसंपन्न मुलींनीं फार जपून वागलें पाहिजे. मित हास्य, मित भाषण, मित संघट्टण, सारांश त्यांचें सगळें मित असलें पाहिजे. चांगल्यांना सुद्धां लोकापवादानें सोडिलें नाहीं. एखादे वेळेस कळी उमलली नाहीं तोंच तिला किडा लागलेला असतो. या तारुण्यकुसुमाला कोण केव्हां पीडा करील याचा भरवसा नाहीं; यासाठीं, ताई, सावध राहा; भिऊन चालशील तर बचावशील. तारुण्याची उसळी फार जबरदस्त आहे. म्हणून पुनः एकदां सांगतों कीं, ताई, संभाळ, बेसावध असूं नको.

**मल्लिका** : दादा, या तुझ्या सदुपदेशाची मी आपल्या मनाशीं पक्की गांठ घालून ठेवीन. पण असें मात्र करूं नको कीं, एखाद्या भोंदू साधूप्रमाणें लोकांना ब्रह्मज्ञानाच्या लांबलचक अवघड बाता सांगून आपण मात्र मन मानेल तशी चैनबाजी आणि उधळपट्टी करावयाची.

**तीव्रजव** : छे, छे, माझ्याविषयीं बिलकुल भीति बाळगूं नको. बरें, आतां फार वेळ बोलत बसलों; जाऊं तर मग ? पण बाबाच इकडे आलेसे वाटतें.

[**शालेय** प्रवेश करितो.]

बाबाही येथेंच भेटले ही फार बहार झाली! दोघांचा आशीर्वाद मिळाल्यावर कशाची वाण ?

**शालेय** : अरे, अजून तूं येथेंच का ? काय म्हणावें तुला ? नीघ नीघ लवकर. असा अनुकूल वारा सुटला असून तूं आपला येथेंच ! हा माझा तुझ्या डोकीवर हात, तुला कांहीं एक कमी पडायाचें नाहीं. मात्र एवढे दोन शब्द मी सांगतों हे कधींही विसरूं नको. आपल्या मनांतले विचार बोलत सुटूं नये, व कांहीं मनांत आलें कीं, तें करूं लागू नये. कोणाशीहि झाली तरी घसट ठेवावी, पण अतिप्रसंग करूं नये. एक–दोनच मित्र का होईनात, पण त्यांच्या लायकी-विषयीं मनाची पूर्ण खात्री झाली म्हणजे त्यांच्या जिवास जीव देण्यास तयार असावें; पण ज्या त्या उपटसुंबळघाला दे मेजवान्या आणि घाल गिळायाला, असें करूं नये. अगोदर तंट्यांत पडूं नये, आणि एकदां पडल्यावर प्रतिपक्ष्याला चांगलाच हात दाखविल्याशिवाय राहूं नये. पाहिजे त्याला कान द्यावा, पण शब्द मात्र अगदीं मोजक्यांना. ज्याचें त्याचें व्यंग काढून घ्यावें, पण 'अमुक असाच' म्हणून ग्रह करून टाकूं नये. आयाप्रमाणें खर्चाचा थाट ठेवावा, पण उगीच पैसा उधळीत सुटूं नये. पोशाख हव्या तितक्या मोलाचा असावा, पण भडकीचा असूं नये. कारण पुष्कळ वेळां पोशाखावरूनच मनुष्याची किंमत होते. आणि उत्तालांतील मोठ्या पदवीचे लोक तर या कामांत भारी खर्चिक आणि चौकस आहेत. कोणाचें कर्ज काढूं नये, आणि कोणाला कर्ज देऊं नये. कारण उसनवार दिलेल्या पैशाचा वारंवार असा परिणाम होतो की, पैशाचा पैसा जाऊन वर आणखी मित्र तुटतो; आणि उसनें घेण्यानें काटकसरीची संवय मोडते. सर्वांत ही गोष्ट लक्षांत ठेव कीं, कांहीं झालें तरी आपण आपला सरळ मार्ग सोडायाचा नाहीं, आणि अशा नेमानें चाललास म्हणजे दुसऱ्याचें वांकडें तुझ्या हातून व्हावयाचेंच नाहीं. आतां माझ्या आशीर्वादानें तुला कांहीं एक कमी पडायाचें नाहीं. जा.

**तीव्रजव** : येऊं बाबा ? (पायावर डोकें ठेवतो.)

**शालेय** : जा आतां. या वेळेस अमृतसिद्धियोग आहे. नीघ, नीघ. चाकर-माणसें वाट पाहात उभीं आहेत.

**तीव्रजव** : ताई, येतो बरें. मीं तुला जें जें सांगितले आहे तें पक्कें ध्यानांत ठेव.

**मल्लिका** : त्याची तुला शंका नको; मात्र तूं संभाळ म्हणजे झालें.

**तीव्रजव** : येतो.

( **तीव्रजव** निघून जातो. )

**शालेय** : मल्लिके, तीव्रजवानें तुला काय ग सांगून ठेविलें आहे ?

**मल्लिका** : सांगितलें आहेन् चंद्रसेनाविषयीं दोन शब्द.

**शालेय** : आं, बरी आठवण झाली. अलीकडे माझ्या कानावर असें आलें आहे कीं, तो तुझ्याकडे नित्य नित्य येत असतो, व तूंही त्याची वारंवार एकीकडे गांठ घेण्यास ना म्हणत नाहींस. हें खरें असेल तर मी खचितच तुला सांगून ठेवतों कीं, तूं माझी पोर असून तुला कसें वागावें हें कळत नाहीं. कसलीं ग खलबतें करीत असतां ? सांग मला काय खरें आहे तें.

**मल्लिका** : बाबा, माझ्यावर त्याचें प्रेम बसलें आहे; आणि अलीकडे माझ्याशीं लग्न लावण्याचें त्यानें बोलणें लाविलें आहे.

**शालेय** : प्रेम म्हणतेस ? अं:, तूं अजून कच्ची पोर आहेस. अशा कामाचा तुला अद्यापि अनुभव नाहीं. तो म्हणतो तें तूं खरें मानतेस का ?

**मल्लिका** : काय मानावें हें मला समजत नाहीं.

**शालेय** : बरें, तुला नाहीं समजत तर मी सांगतों. तूं अजून लहान आहेस हें ध्यानांत ठेव. तुझ्यावर जें प्रेम आहे म्हणून तो म्हणतो आहे तें खरें नाणें नाहीं. आजपासून तूं त्याच्याशीं बेतानें नाहीं वागलीस तर एखादे दिवशीं माझ्या पदरीं मूर्खपणा आणशील.

**मल्लिका** : बाबा, फिरून फिरून माझी विनवणी करून त्यानें माझी खातरी केली आहे. त्याच्या बोलण्याची शंका घेणें मला बरोबर दिसत नाहीं. खरोखरींच त्याचें प्रेम माझ्यावर जडलें आहे.

**शालेय** : खरोखरी जडलें आहे म्हणतेस ? केवळ मूर्ख आहेस.

**मल्लिका** : काय सांगूं, बाबा ? त्यानें शपथा आणा देखील घेतल्या आहेत. मला सोडून दुसरीवर त्याचें मन जाणार नाहीं, अशी माझी पक्की खात्री आहे.

**शालेय** : अरेरे, रानांतील पांखरांना धरण्याकरितां पसरलेल्या जाळ्या-प्रमाणें यानें इला अगदीं घेरून टाकलें आहे ! अंत:करणांत विषयवासना प्रबल झाली म्हणजे कोणीं कांहीं सांगितलें तरी मन त्याच्यावर विश्वास ठेवण्यास

तेव्हांच तयार होतें. मल्लिके, चंद्रसेनाच्या या वाचालतेंत कांहीं हाशील नाहीं. ती शुद्ध फोल आहे. कितीहि खटपट केली तरी तींतून गुंजभर देखील सत्त्व निष्पन्न होणार नाहीं. तूं त्याच्या बोलण्याच्या भपक्यावर जाऊं नको. आजपासून त्याच्या दृष्टीस फारशी पडूं नको, आणि—तो आला कीं चालली त्याच्याशीं एकान्त करायला—हे आतां सोडून दे. चंद्रसेन अजून अजाण तरुण पोर आहे, हें ध्यानांत ठेव. तो थोडा मोठा झाला कीं, तुझ्यापेक्षां मोठमोठ्या कुळांतल्या शेंकडों मुलींच्या त्याच्यावर उड्या पडतील. सारांश, मल्लिके, त्याच्या वचनावर भरवसा ठेवूं नको. त्याचें तें सगळें पैठणी प्रेम आहे. त्याचा रंग पक्का नाहीं. चार दिवस गेले कीं, तो फिक्का पडणार. त्याच्या भपकेदारपणावर जाऊं नको; जाशील तर ठार बुडशील. इतका पडदा तरी कशाला—तुला स्पष्टपणें सांगून ठेवतों कीं, येथून पुढें चंद्रसेनाशीं बोलायाला-चालायाला किंवा एकीकडे कसलाही बेत करायाला मी तुला संधि सांपडूं देणार नाहीं. मी सांगत आहें त्याप्रमाणें तुला वागलें पाहिजे. खबरदार हूं चूं करशील तर.

**मल्लिका** : बाबा, मी आपल्या शब्दाबाहेर कधींही पाऊल टाकणार नाहीं.

[निघून जातात.]

## प्रवेश ४ था

**स्थल**—किल्ल्यासमोरचें सपाटीचें मैदान.

[ **चंद्रसेन, प्रियाल** आणि **वत्सनाभ** प्रवेश करितात. ]

**चंद्रसेन** : हवा काय अंगाला झोंबत आहे ! फारच थंडीचा कडाका बोवा !

**प्रियाल** : असल्या थंडीनें झाडाची कळीन्‌कळी जळून जाईल आणि पांखरें बधिर होऊन पडतील असें वाटतें.

**चंद्रसेन** : किती वाजले असतील बरें !

**प्रियाल** : मला वाटतें, बाराला थोडा अवकाश आहे.

**वत्सनाभ** : छे, बारा वाजून गेले सुद्धां.

**प्रियाल** : खरें कीं काय ? मीं नाहीं ऐकलें. तर मग त्या समंधाची नित्याची यायची वेळ झाली. (पडद्याच्या आंत वाद्यांचा आणि तोफांचा आवाज होतो.) महाराज, हें काय प्रकरण आहे ?

**चंद्रसेन** : प्रियाला, हा आमच्या काकाच्या मेजवानीचा धडाका उडत आहे. आज किती हांडे पालथे होणार आहेत कोण जाणें ! अलीकडे यासंबंधानें बेताल काम झालें आहे. ऐकलासना धांगडधिंगा ?

**प्रियाल** : अशा प्रसंगीं असें करण्याची चालच पडली आहे कीं काय ?

**चंद्रसेन** : चाल म्हणतोस ? असेल बापडी. मी इथला राहणारा, आणि येथल्या एकूण एक चालीरीती मला माहीत. पण अशा प्रकाराला कोणीं कधीं नांवाजलें आहे, असें मला नाहीं ठाऊक. हा बेसुमार दारू पिण्याचा जो प्रघात आमच्या लोकांत पडूं लागला आहे, त्यानें दुसऱ्या राष्ट्रांत आमची नाचक्की मात्र होत आहे. तीं आम्हांला दारूबाज असें म्हणतात, आणि आमच्या मोठे-पणाला न शोभणारीं अशी नांवें ठेवितात. आणि खरोखरच, आजपर्यंत मोठमोठे पराक्रम करून आमच्या पूर्वजांनीं संपादिलेलें जें निष्कलंक यश त्याला हे बेशरम लोक आपल्या दुर्गुणांनीं कालिमा आणीत आहेत. असें नाहीं का वारंवार होत कीं, एखाद्या मनुष्याला जन्मापासूनच कांहीं वाईट खोड असल्यामुळें किंवा कळूं लागल्यावर दुसऱ्याच्या संगतीनें तो वाईट नादास लागल्यामुळें त्याच्या चांगल्या गुणावर सपशेल पाणी पडून, तो अगदीं कवडीच्या मोलाचा होतो. दुर्दैवानें कोण केव्हां व्यसनाच्या फेऱ्यांत सांपडेल हें सांगता येत नाहीं. पण त्याची एकदां छाप बसली कीं, विचाराचें कांहीं न चालतां सगळ्या गुणांची माती होते. मनुष्य कितीही सद्‌गुणी आणि अव्वल असला म्हणून काय झालें ? एकदां व्यसनाच्या झपाट्यांत सांपडला कीं ठार बुडाला म्हणून समजावें. दारूच्या एका पेल्याचा असा पराक्रम आहे कीं, क्षणांत तो जन्माच्या पुण्याईचा नाश करून लोकांकडून ' छी थू ' करून घेण्याचा प्रसंग आणील.

[ **समंध** प्रवेश करितो. ]

**प्रियाल** : महाराज, महाराज, तो पाहा आला !

**चंद्रसेन** : मनुष्यांचें कल्याण चिंतणारे सर्व देव आणि गंधर्व आमचें संरक्षण करोत ! हे समंधा, जन्मांतरीं केलेल्या पुण्यसंचयामुळें उत्तम गतीला पावलेला तूं महात्मा अस, किंवा पापाचरणानें पिशाचयोनीला गेलेला अधमात्मा अस; देवाज्ञेनें मनुष्यमात्राचें हित करण्यासाठीं स्वर्गाहून अवतरलेला अस, किंवा त्यांच्या-वर दुःखाचे डोंगर कोसळण्याकरितां पातालांतून वर चढलेला अस; तुझे विचार दुष्ट असोत किंवा परोपकाराकडे लागलेले असोत; तूं असा वेश धरून आला आहेस कीं, तुझ्याशीं बोलल्याखेरीज माझ्यानें राहवत नाहीं. मी तुला माझ्या

बापाच्या नांवानें हाका मारितों त्याला 'ओ' म्हण, आणि संशयानें व्याकुल झालेल्या माझ्या अंत:करणाला दुभंगू देऊं नको. हे बाबा, हे बलभद्राधिपते, तुझें प्राणोत्क्रमण झाल्यावर तुझ्या अस्थि समाधींत संस्कारयुक्त पुरल्या असतां तिच्या मुखावरील प्रचंड शिला एकीकडे झुगारून देऊन तूं बाहेर कशासाठीं पडलास ? एकदां तूं जीवलोक सोडून गेला असतां शिपायाच्या वेषानें पुन: पृथ्वीवर फिरूं लागलास याचा अर्थ काय ? मध्यरात्री मेघाच्छादित चंद्राच्या अंधुक प्रकाशांत मैदानांत सचार करून आम्हांस भीति उत्पन्न करितोस, हें कशासाठी ? ज्या आमचें ज्ञान आणि विचार प्रस्तुत जन्माच्या पलीकडे जात नाहींत, त्या आम्हांला भ्रांतींत आणि गोंधळांत कशासाठीं पाडतोस ? आमच्या अकला तर अगदीं गुंग होऊन गेल्या; आमच्या मती थकल्या. सांग, सांग, तूं असें कां करतोस तें सांग.

**प्रियाल** : पाहा, पाहा; तो तुम्हांला एकीकडे बोलावीत आहे असें दिसतें; जणूं काय त्याच्या मनांत तुम्हांला कांहीं सांगावयाचें आहे.

**वत्सनाभ** : तो तुम्हांला मोठ्या नम्रतेनें एका बाजूला बोलावीत आहे, पण तुम्ही जाऊं नका.

**प्रियाल** : छे, छे, जातां नाहींच कामा.

**चंद्रसेन** : तो बोलत नाहीं तर मी त्याच्या पाठीमागून जाईन.

**प्रियाल** : नका, महाराज.

**चंद्रसेन** : कशासाठीं बरें ? मला कोठें माझ्या शरिराची पर्वा आहे ? मी त्याला कसपटाप्रमाणें मानितों. आणि माझ्या आत्म्याविषयीं म्हणशील तर तो अविनाशी आहे. त्याला हा समंध काय करणार आहे ? तो पाहा मला आणखी बोलावूं लागला; —मी त्याच्या पाठीमागून जातों.

**प्रियाल** : महाराज, असा वेडेपणा करूं नका. या समंधाच्या नादीं काय लागतां ? हा डोंगर पाहिलांत ना, किती उंच आहे ? त्याचा तुटलेला पायथ्याचा कडा समुद्रावर आला आहे. त्यावर चढून खालीं समुद्राकडे पाहिलें तर एखाद्याला घेरी यायाची. त्या पाहा त्याच्या पायथ्याशीं लाटा कशा आपटताहेत ! या समंधानें त्यावर तुम्हांला घुलवीत घुलवीत नेलें, आणि तेथें गेल्यावर त्यानें एखादें अक्राळविक्राळ रूप धारण केलें तर तुमची बोबडी वळून जाईल व तुम्हांला कांहीं सुचेनासें होईल याचा विचार करा आणि जाणूनबुजून संकटांत पडूं नका.

**चंद्रसेन** : अरे, तो अजून मला बोलावतो आहे—

**वत्सनाभ** : महाराज, आम्ही तुम्हांला जाऊं देणार नाहीं.

[हात धरतात]

**चंद्रसेन** : सोडा रे तुम्ही आपले हात.

**प्रियाल** : महाराज, आमचें ऐका, आम्ही तुम्हांला जाऊं देणार नाहीं.

**चंद्रसेन** : तुम्ही असा अडथळा करूं नका. माझ्या आंगाचा संताप झाला आहे; मी असल्या शंभर समंधांना दाद द्यायाचा नाहीं.

[**समंध** बोलावतो.]

अरे, अजून तो बोलावतो आहे; (संतापून जाऊन) मित्रांनो, सोडा माझा हात.

[त्यांच्यापासून आपला हात हिसकून घेऊन]

आतां जो मला अडवील त्याचा मी मुडदाच पाडीन; —मी सांगतों, बऱ्या गोष्टीनें तुम्ही येथून चालते व्हा; —चल, समंधा, चल; हा मी तुझ्या पाठोपाठ आलों.

[**समंध** आणि **चंद्रसेन** निघून जातात.]

**प्रियाल** : वत्सनाभा, हा अगदीं बेफाम झाला आहे.

**वत्सनाभ** : चल, चल त्याच्या पाठीमागें; अशा कामांत त्याचें ऐकून उपयोग नाहीं.

**प्रियाल** : चलाच तर मग—याचा काय परिणाम होणार आहे कोण जाणे ?

**वत्सनाभ** : या बलभद्र राष्ट्रांत कांहीं तरी जबरदस्त बिघाड झाला आहे.

**प्रियाल** : परमेश्वर त्याला नीट थराला लावणार आहे.

**वत्सनाभ** : बोलत बसून फायदा नाहीं; चला त्याच्या पाठीमागें जाऊं या.

[निघून जातात.]

——

## प्रवेश ५ वा

**स्थल**—सपाट मैदानाचा दूरचा प्रदेश.

[**चंद्रसेन** आणि **समंध** प्रवेश करितात.]

**चंद्रसेन** : आतां तूं मला कोठें नेणार ? बोल; मी पुढें येणार नाहीं.

**समंध** : ऐक तर.

**चंद्रसेन** : ऐकतो.

**समंध** : हा पाहा वेळ अगदीं थोडा राहिला आहे. तेवढ्यांत तुला जें सांगावयाचें आहे तें सांगून फिरून त्या गंधकाच्या होरपळणाऱ्या जाळांत मला जाऊन रडलें पाहिजे.

**चंद्रसेन** : अरेरे, काय हे हाल !

**समंध** : माझ्यासाठीं हळहळण्याचा हा प्रसंग नव्हे. मी जें गुह्य सांगणार आहें तिकडे नीट लक्ष दे.

**चंद्रसेन** : बोल, मला तें दिलेंच पाहिजे.

**समंध** : मी सांगितल्यावर त्याचा सूडही तुला घेतलाच पाहिजे.

**चंद्रसेन** : काय ?

**समंध** : मी तुझ्या बापाचा समंध जन्मांतरीं केलेलीं पापें जळून खाक होऊन जाईपर्यंत दिवसां कांहीं न खातां बिस्तवांत गढून असावें व रात्रीं बाहेर पडावें अशी मला शिक्षा झाली आहे ! या पिशाचयोनीतील यमयातना काय काय म्हणून सांगूं ! अनवाणी तापल्या तव्यावरून तर चालवितात; पाण्यांतून, कांटयांतून, फोपाटयांतून फरफरां ओढीत नेतात, इंगळासारख्या लाल झालेल्या लोखंडाच्या खांबाला मिठया मारिवतात. पाठीला मिठाचें पाणी लावून कोरडे ओढतात. आणि तिचें धिरडें होऊन त्यांतून रक्ताच्या चिपळया उडूं लागल्या म्हणजे त्यावर उकळी फुटलेले तेल ओततात. लिदींत पुरतात, विष्ठा कालवितात. नाहीं त्याचें कुजलेलें मूत पाजतात, आणि दोनदोनशें कोस ज्याचा वास करणारा दुर्गंध जातो असें घाणेरडया जनावरांचें सडकें मांस खाऊं घालतात. वास्तविक आम्हांस ज्या अन्य यातना सोसाव्या लागतात, त्यांपुढें तर या कांहींच नाहींत. त्यांपैकीं एक–दोन मासलेवाईक सांगतां येत्या तर त्या ऐकल्याबरोबर तुझ्या काळिजांत चर्र होऊन भीतीनें तुझें कोंवळें रक्त जेथल्या तेथें गोंठून गेलें असतें. डोळयांचीं बुबुळें पिचून जाऊन त्यांच्या खाचा झाल्या असत्या, शेंडीची गांठ तट्‌कन् तुटून जाऊन साळुंकीच्या कांटयाप्रमाणें एकेक केस ताठ उभा राहिला असता. परंतु या कारागृहांतील एक गोष्ट देखील मांसशरीरी मनुष्याच्या कानावर जातां कामा नये, अशी आम्हांस सक्त ताकीद आहे ! असो, आजपर्यंत तूं आपल्या बापावर कधीं प्रीति केली असलीस तर मी जे सांगत आहें त्याच्याकडे चांगलें लक्ष दे.

**चंद्रसेन** : हे देवा !

**समंध** : त्याच्या अत्यंत घोर आणि अत्यंत दुष्ट खुनाबद्दल सूड घे.

**चंद्रसेन** : खून ?

**समंध** : अरे, कसलाहि खून असला तरी वाईटच; पण हा खून अत्यत घोर आणि राक्षसी आहे !

**चंद्रसेन** : लवकर सांग तो मला, म्हणजे ज्या अधमाधमानें तो केला असेल त्याच्यावर विजेच्या वेगानें जाऊन त्याच्या नरडीचा घोंट घेतों.

**समंध** : या तुझ्या बोलण्यावरून तुझ्या हातून कांहीं होईलसें वाटतें. ही कामगिरी तुझ्या हातून झाली नाहीं तर तुला मी आपल्या पोटचा समजणार नाहीं. असो, चंद्रसेना. आतां ऐक. त्या चोरानें अशी कंडी पसरून दिली आहे कीं, मी आपल्या बागेत निजलों असतां साप चावून मेलों; निदान सगळ्या बलभद्राच्या लोकांचा तरी माझ्या मरणासंबंधानें असा खोटा समज झाला आहे. परंतु ज्या सर्पानें तुझ्या बापाचा जीव घेतला तो सर्प सध्यां बलभद्राच्या गादीचा मालक आहे.

**चंद्रसेन** : तरी मला वाटलेंच ! —काका !

**समंध** : त्या नीतिपराङ्मुख कपटपटू जाराधम नरपशूनें माझ्या सत्यव्रत आणि सद्गुणी राणीस आपल्या कौटिल्यानें आणि वाक्चातुर्यानें जारकर्म करण्यास प्रवृत्त केलें,—चंद्रसेना, असें नीचकर्म तिच्यानें करवलें तरी कसें ? विवाहसमयीं वाहिलेल्या "नातिचरामि नातिचरामि" या शपथेचें कधींच ज्यानें उल्लंघन केलें नाहीं अशा मला सोडून मजपेक्षां प्रत्येक गुणांत शंभरपटीनें कमी अशा त्या नीचाला ती भाळली यांत तिनें त्याचें काय पाहिलें ? परंतु खरी जी साध्वी आहे तिच्या पातिव्रत्याचा भंग करण्यास साक्षात् इंद्र जरी आला तरी त्याच्यानें तें जसें ढवळणार नाहीं, त्याप्रमाणें स्वभावत: जारकर्माकडे जिची प्रवृत्ति, अशीचा गंधर्वाशीं जरी विवाह झाला असला तरी ती स्वर्गांत देखील व्यभिचार केल्याशिवाय राहणार नाहीं. पण थांब, थांब, मला अरुणोदय झाल्याचा वास आल्यासारखें वाटतें. आतां मला आपलें बोलणें आटपतें घेऊं दे. नित्याप्रमाणें मी आपल्या बागेंत निजलों असतां तुझा दुष्ट काका एका कुपींत कांहीं विषारी वेलींचा रस घेऊन आला, आणि मला गाढ निद्रा लागली आहे असें पाहून तें कालकूट द्रव्य त्यानें माझ्या कानांत ओतलें. थोडा वेळ झाला नाहीं तों तें माझ्या सर्वांगांत भिनलें, आणि ज्याप्रमाणें तापलेल्या दुधांत ताकाचा शितोडा टाकल्याबरोबर तें तत्काळ नासून जाऊन त्याच्या गठळ्या बनतात, त्याप्रमाणें विषानें माझें स्वच्छ रक्त जागच्या जागी गोठून जाऊन त्याच्या गांठी झाल्या आणि माझ्या एकूण एक शिरेंतला चिवटपणा नाहीसा होऊन आंग ताठरलें आणि त्यावरील नेहमीच्या तुळतुळीत कातड्याला चिरा पडून त्यावर एक घाणेरडा पापोद्रा आला.

याप्रमाणें मी निजलों असतां माझ्या भावाच्या हातानें मी आपल्या

जीविताला, राज्याला आणि राणीला अंतरलों. अरे, मरतेंसमयीं पापक्षालनासाठीं तीर्थोदक घेण्याला देखील त्यानें मला अवकाश मिळूं दिला नाहीं ! हरएक वस्तू जेथल्या तेथें टाकून मला जावें लागलें. किती घोर कृत्य हें ? केवढी निर्घृण महत्त्वाकांक्षा ? कोण राक्षसी कामवासना ? तूं खरोखरीच माझ्या बीजाचा असशील तर बलभद्राच्या राजशय्येवर असा निंद्य व्यभिचार होऊं देणार नाहींस. इतकें झालें तरी चंद्रसेना, तुला एक गोष्ट सांगून ठेवतों ती ही कीं, तूं आपल्या आईचा सूड घेण्यासाठीं कांहीं एक करूं नको. तिचें मन तिला खाऊन खाऊन ती मरू दे. तूं तिच्यावर आपला हात उचलूं नको. घेतों तर मग आतां मी तुझा निरोप. काजव्यांचा प्रकाश फिक्का दिसूं लागला यावरून सूर्य क्षितिजाच्या निकट आला आहे यांत संशय नाहीं. ईश्वर तुझें कल्याण करो; जातों. मला विसरूं नको.

[**समंध** जातो.]

**चंद्रसेन :** हे आकाशस्थ, पातालस्थ, आणि भूतलस्थ अनंत जीवांनो, काय अनर्थ हा !—हृदया, असें कातर होऊं नको; थोडा धीर धर. स्नायूंनो, एका क्षणांत असे जीर्ण आणि दुर्बल होऊं नका; क्षणभर मला सांवरून धरा. तुला विसरूं नको ? गरीब पिशाचा, हें डोकें जाग्यावर आहे तोंपर्यंत तुला विसरेन काय ? तुझी आठवण ठेवूं ? लहानपणापासून अभ्यासानें आणि परिश्रमानें या मेंदूंत सांठविलेली एकूण एक गोष्ट काढून टाकून तुला जागा करीन ! कोण क्रूर हडळी ही ! केवढा अधम निर्लज्ज दुष्ट चाण्डाळ हा ! वरून गोगलगाई-सारखी गरीबी दाखवून पोटात लोक रामोशी कसे असतात हें आज चांगलें प्रत्ययास आलें. निदान बलभद्र देशांत तरी अशा चोरांची वाण नाहीं. काका-साहेब, ठीक आहे. काय तें ? "देव कल्याण करो, मला विसरूं नको" ? हं ! ही शपथ घेतों. घेणारच घेणार.

**प्रियाल :** (आंत) महाराज, महाराज —
**वत्सनाभ :** (आंत) चंद्रसेन महाराज —
**प्रियाल :** (आंत) देवा, त्यांना सुरक्षित ठेव !
**चंद्रसेन :** तथास्तु !
**वत्सनाभ :** (आंत) हो, हो, हो, महाराज.
**चंद्रसेन :** हो, हो, लो, तो, पांखरांनो या, या, या.

[**प्रियाल** आणि **वत्सनाभ** प्रवेश करितात]

**वत्सनाभ :** कसें काय आहे महाराज ?

**प्रियाल** : कशी काय वार्ता आहे, महाराज ?

**चंद्रसेन** : अरे, फारच आश्चर्यकारक.

**प्रियाल** : महाराज, कृपा करून ती सांगा.

**चंद्रसेन** : छे, तुम्ही ती फोडाल—

**प्रियाल** : देवाशपथ मी नाहीं फोडायाचा.

**वत्सनाभ** : मी देखील नाहीं महाराज.

**चंद्रसेन** : काय, सांगूं म्हणतां ? —अरे, असें होईलसें कोणाला स्वप्नांत तरी वाटलें होतें काय ? पण बाबांनो, तुम्ही गुप्त ठेवाल काय ?

**प्रियाल** : देवाशपथ महाराज, ठेवूं.

**चंद्रसेन** : आमच्या काकासारखा या पृथ्वीवर दुसरा चाण्डाळ नसेल.

**प्रियाल** : महाराज, हें सांगायला थडग्यांतून समंध उठून यायला नको कांहीं.

**चंद्रसेन** : हां, ठीक बोललांत. तुमचें म्हणणें बरोबर आहे. झालें तर मग आतां. अधिक बोलण्याची गरजच उरली नाहीं. घेतों तर मग तुमची रजा. तुम्ही आपल्या वाटेनें जा आणि आपला उद्योग करा; मी आपल्या वाटेनें जाऊन मी आपला विचार पाहतों. ठीक आहे, जातों तर मग.

**प्रियाल** : महाराज, असें रागाचें बोलणें बोलूं नका.

**चंद्रसेन** : माझ्या बोलण्याचा तुम्हांला राग आला होय ? गरीबाला क्षमा करा. हात जोडून, मनापासून माफी मागतों.

**प्रियाल** : राग कशाचा महाराज ?

**चंद्रसेन** : कां नाहीं ? आहे; खरोखरीच रागवायाला कारण आहे. असो; या समंधाची आणि माझी गांठ पडल्यापासून जो प्रकार झाला, त्याची तुम्हांला वाटेल तशी कल्पना करा. आतां विद्वान्, शूर, आणि विश्वासू मित्रांनो, तुम्हांला पदर पसरून येवढेंच मागणें आहे कीं, आज रात्रीं जें जें तुम्हीं पाहिलें आहे, तें बाहेर फोडूं नका.

**वत्सनाभ**, **प्रियाल** }— महाराज, आमच्या हातून तसें व्हायाचें नाहीं.

**चंद्रसेन** : तसें नुसतें म्हणून चालायाचें नाहीं. शपथ वहा.

**वत्सनाभ**, **प्रियाल** }— नाहीं, नाहीं, महाराज.

**चंद्रसेन** : द्या माझ्या तरवारीवर हात.

**समंध** : (खालीं) शपथ द्या.

**चंद्रसेन :** (समंधास) अरे, तूं, तूं आलास का इकडे ? जबरदस्त वाट-काढ्या आहेस रे. (मित्रांस) व्हा तर मग माझ्या तरवारीची अशी शपथ कीं, आज आम्हीं जें पाहिलें आहे तें कोठेंही सांगणार नाहीं.

**समंध :** (खालीं) शपथ व्हा.

**वत्सनाभ**
**प्रियाल** } — वाहिली महाराज.

**चंद्रसेन :** तरवारीची शपथ व्हा.

**समंध :** (खालीं) तरवारीची शपथ व्हा.

**प्रियाल :** काय चमत्कार हा !

**चंद्रसेन :** प्रियाला, या पृथ्वीच्या पाठीवर व साऱ्या ब्रह्मांडामध्यें अशा कित्येक वस्तू आहेत कीं, त्या तुमच्या तत्त्वज्ञानाला स्वप्नांतही आढळणार नाहींत. पण त्यांचें असो—आजपर्यंत ज्याप्रमाणें तुम्ही मजवर लोभ ठेवून वागत आहांत त्याप्रमाणें आजही मजसाठीं येवढी गोष्ट करा. येथून पुढें कांहीं कारणास्तव मला वेडाचें सोंग घ्यावें लागणार आहे. तेव्हां मी जाणूनबुजून पाहिजे तसा भकेन, पाहिजे तें बोलेन, हवा तसा बडबडेन किंवा वागेन. अशा प्रसंगीं तुम्हांला फार खबरदारीनें वागलें पाहिजे. नाहीं तरी एखाद्या वेळेस "हो हो, आहे आम्हांला ठाऊक; आमच्या मनांत आलें तर करूंच करूं; आम्हांला सांगावेंसें मात्र वाटलें पाहिजे,—अथवा अशा प्रकारचे वेडे असतात, पण—" अशी संदिग्ध आणि द्वैधी भाषणें बोलून माझा सगळा व्यूह ढासळून टाकाल. तर असें न करण्याविषयीं फार जपा. आम्ही असें करणार नाहीं अशी व्हा तर मग शपथ.

**समंध :** (खालीं) शपथ घ्या.

**चंद्रसेन :** हे त्रस्त समंधा, शांत राहा ! मित्रहो, कृपा करून येवढा माझ्यावर उपकार करा. या उपकाराबद्दल हा तुमचा मित्र चंद्रसेन कितीही गरीब असला तरी त्याबद्दल तुमची उतराई करण्यास असमर्थ नाहीं. चला तर मग आतां बरोबरच जाऊं या. आणखी एकवार सांगतों, मेहरबानी करून तोंड मात्र संभाळा. दिवस कठिण आले आहेत; मला सुचिन्ह दिसत नाहीं. काय दुष्ट द्वेष हा ! आणि त्याबद्दल सूड घेणें माझ्या कपाळीं यावें ना ! असो, चला बरोबरच जाऊं या.

[सगळे निघून जातात.]

७



# अंक दुसरा

## प्रवेश १ ला



**स्थल**—शालेयाच्या वाड्यांतील एक दिवाणखाना.

[**शालेय** आणि **वंजुल** प्रवेश करितात.]

**शालेय** : हे पैसे आणि या हुंड्या त्याला दे.

**वंजुल** : होय महाराज.

**शालेय** : वंजुला, हें पाहा, त्याची भेट घेण्यापूर्वी तो कसा काय वागतो याची चौकशी करशील तर फार बरें होईल.

**वंजुल** : माझ्या मनांत तसेंच होतें महाराज.

**शालेय** : प्रथम आपल्या इकडचे कोण कोण लोक तेथें आहेत, राहतात कोठें, कसे राहतात, काय खर्च करितात, कोणत्या प्रकारच्या मंडळींत वागतात वगैरे गोष्टींचा तपास कर. या रीतीनें वरवर चौकशी करून त्याचा तपास लागला म्हणजे त्यांच्यापासूनच त्याच्याविषयीं बारीक माहिती काढून घ्यावी. ती काढतांना थोडी बस्तादगिरी केली पाहिजे. असें म्हणावें कीं, त्याच्याविषयीं मला उगीच उडत उडत माहिती आहे. तो नाहीं पण त्याचा बाप आणि त्याचे मित्र आणि थोडा बहुत तो देखील ओळखीचा आहे.—आलें ना कसें बोलायचें तें ध्यानांत ?

**वंजुल** : त्याविषयीं काळजी करूं नका.

**शालेय** : थोडा बहुत तो देखील—ध्यानांत ठेव—तो चांगल्या ओळखीचा आहे असें नाहीं म्हणायचें. परंतु "मी समजतों आहें तोच तो असेल तर तो पराकाष्ठेचा उनाड आहे व त्याला नाटकाचा छंद लागला आहे असें मला ठाऊक आहे." असें म्हणतांना फारच खबरदारी ठेविली पाहिजे. तो ज्या व्यसनाच्या नादीं लागला आहे असें तूं म्हणशील तें व्यसन त्याच्या किंवा माझ्या नांवाला फारसें बट्टा लावणारें नसलें पाहिजे, या गोष्टीकडे विशेष लक्ष दे. साधारण

रीतीनें स्वतंत्रपणें राहणाऱ्या तरुण लोकांना जीं व्यसनें जडतात, त्यांपैकीं एखादें ठोकून दे म्हणजे झालें.

**बंजुल** : उदाहरणार्थ जुगार—

**शालेय** : हो, जुगार, किंवा दारू पिणें, किंवा दांडपट्टा. थोडक्यांत सांगतों, खोट्या शपथा, मारामारी किंवा रंडीबाजी, इतका गेलास तरी हरकत नाहीं.

**बंजुल** : रंडीबाजी म्हणून कसें चालेल महाराज? तिनें त्यांच्या नावाला बट्टा लागणार आहे.

**शालेय** : हो, तेंही खरें. बंजुला, त्यांत धोरण इतकेंच ठेवायचें कीं, जशी वेळ पडेल तशी गप्प झोंकायची. अमुकच बोल असें मी तुला कसें सांगूं? तो बाहेरख्याली आहे असें पाहिजे तर नको म्हणूं. सारांश काय कीं, हूड तरुण मुलें दुसऱ्या ठिकाणीं ठेविलीं, व त्यांच्यावर देखरेख ठेवण्यास कोणी नसलें म्हणजे स्वभावतः ज्या खोड्या त्यांस लागतात, त्यांपैकीं एखादी पुढें करावयाची; आहे काय आणि नाहीं काय?

**बंजुल** : परंतु हे पाहा महाराज,—

**शालेय** : आतां तूं म्हणशील कीं, असें कशासाठीं करायचें?

**बंजुल** : हो, तें सांगाल तर बरें होईल.

**शालेय** : असली कोटी लढविण्याचें कारण इतकेंच कीं, सहज दगड टाकून तो कसा काय वागतो आहे याचा तपास निघाला पाहिजे तर खुबी. तूं ज्यांच्यापाशीं असें बोलशील त्यानें जर त्याला कधीं एखाद्या वाईट कामांत पडतांना पाहिलें असेल तर तो लागलेंच तुला असें म्हणेल;—"रावसाहेब"—किंवा साधारणपणें त्या देशांत परक्याला हाक मारण्याचा जो रिवाज असेल त्याप्रमाणें हाक मारून—

**बंजुल** : ठीक, ठीक.

**शालेय** : मग तो असें म्हणेल, हं, कसें बरें? काय रे मी आतां म्हणत होतों तें? तुझें देव भले करो; मी कायसेंसें म्हणायाच्या बेतांत होतों; काय रे, आमचें घोडें कुठें थबकलें?

**बंजुल** : तो लागलेंच तुला म्हणेल;—"रावसाहेब" वगैरे येथें.

**शालेय** : "तो लागलेंच तुला असें म्हणेल" येथें का? ठीक; जुळलें आतां. तो तुला असें म्हणेल—"तो गृहस्थ ना? तो मला पक्का ठाऊक आहे.

त्याला मी काल का परवां कोठेंसें पाहिलें. त्या वेळेस राजश्री मोठ्या गर्दींत होते. पेला झोंकून जुगारखान्यांत किंवा तालीमखान्यांत जात होते कीं काय तें मी नीट पाहिलें नाहीं. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें त्या इष्कबाज गड्यानें अलीकडे एक मापुक पांखरूं ठेविलें आहे म्हणून ऐकतों. खरें काय असेल तें ईश्वर जाणें." आलें ना आतां कसें बोलायाचें तें तुझ्या ध्यानांत ? त्यांत कोटी एवढीच कीं, थोडें खोटें बोलून पुष्कळ खरें काढून घ्यावयाचें. जगांत अशी युक्ति लढविल्याशिवाय तथ्य बाहेर पडत नाहीं. बाबा, कांट्यानें कांटा आणि पिळानें पीळ काढला पाहिजे. अनुभवाशिवाय असलें शहाणपण येत नाहीं. त्याला पुष्कळ टक्केटोणपे खावे लागतात. असो; मीं जें जें तुला सांगितलें आहे तेवढ्यावरून तूं तरी आमच्या मुलाची परीक्षा करून ये, मग पुढें पाहू. पाहा, समजलास ना माझा मतलब ? नाहीं तर पुनः समजून घे.

**वंजुल** : नको नको महाराज, तो मला चांगला समजला आहे.

**शालेय** : बरें तर मग, जा आतां. जपून जा बरें.

**वंजुल** : ठीक आहे, महाराज.

**शालेय** : हें पाहा त्याचा झोंक पाहून त्याप्रमाणें वाग.

**वंजुल** : हें काय सांगायाला पाहिजे ?

**शालेय** : त्याला म्हणावें सतारीचा नाद सोडूं नको.

**वंजुल** : होय, महाराज.

[ **वंजुल** निघून जातो व **मल्लिका** प्रवेश करिते.]

**शालेय** : मल्लिके, बरी भेटलीस. कसें काय आहे ?

**मल्लिका** : बाबा, बाबा, हें चांगलें का त्याचें लक्षण ? मला तर बाई फार भीति वाटूं लागली आहे.

**शालेय** : अग, झालें काय ?

**मल्लिका** : बाबा, हें बघा, मीं आपल्या दिवाणखान्यांत कशिदा काढीत होतें. इतक्यांत दारापाशीं कोणाची चाहूल झाल्यासारखें वाटलें म्हणून जागची उठून दाराशीं आलें. तों हिरमुसलेला चंद्रसेन दृष्टीस पडला. आंगरख्याचे बंद सुटलेले, नाही डोक्याला पागोटें, नेसायाचें धोतर आपले पायांत अडखळतेंच आहे, तोंड अगदी फिक्कें पडून गेलें आहें, चालतांना गुडघ्याला गुडघा लागतोच आहे—अशी त्याची ती खिन्न आणि भयाण मुद्रा पाहुन मला तर बाई रडूं येऊं लागलें. आणि असें वाटलें कीं, याच्या पाठीमागें कोणी ब्रह्मराक्षस लागल्यामुळें तर हा धान्यासाठीं असा अस्ताव्यस्त होऊन भटकत नसेल ना ?

**शालेय** : मल्लिके, तुझ्यासाठीं तर असा वेडावला नाहीं ना ?

**मल्लिका** : ( लाजल्यासारखें करून ) इश्श, मला काय ठाऊक बाई ? काय सांगावें ? असेल, तसें असेल कदाचित्.

**शालेय** : तो तुला म्हणाला तरी काय ?

**मल्लिका** : म्हणणें कसलें आणि काय कसलें ? तो माझ्या दिवाणखान्याकडे येत आहे असे पाहिल्यावर मीं आंत गेलें; तोहि पाठोपाठ आंत शिरला, आणि माझ्यापाशीं आला. मी चपापून जराशीं मागें सरलें. तो घाबरल्यासारखा होऊन क्षणभर जेथल्या तेथें थबकला. मग पुन: धैर्य केल्यासारखें करून मजजवळ आला, आणि माझें मनगट एका हातानें घट्ट धरून कांहीं वेळपर्यंत माझ्या तोंडाकडे एकसारखी टक लावून न्याहाळीत उभा राहिला. मग तीन वेळ खालीं-वर पाहिल्यावर त्यानें एक दुःखाचा असा मोठा सुस्कारा टाकिला कीं, त्यासरशीं त्याचें पंचप्राण अगदीं गोळा झाल्यासारखे झाले. असा प्रकार झाल्यावर त्यानें माझें मनगट सोडिलें आणि माझ्याकडे पाहात पाहात तो दाराबाहेर पडला.

**शालेय** : चल माझ्याबरोबर; आपण राजाकडे जाऊं या. यालाच म्हणतात प्रेमातिरेक. ही कामवासना एकदां प्रबल झाली म्हणजे काय अनर्थ करील याचा नेम नाहीं. मनुष्याला जर्जर करणारे जे षड्रिपु मानिले आहेत त्यांपैकीं अत्यंत प्रखर हा काम होय. मला फार वाईट वाटतें — अग पण तूं त्याला लागण्यासारखें कांहीं बोलली नाहींस ना ?

**मल्लिका** : छेः, तें कांहीं नाहीं. बाबा, पण तुम्हीं सांगितल्याप्रमाणें त्याजकडून आलेलीं पत्रें परत लाविलीं, आणि त्यानें पुष्कळ खटपट केली पण त्याला भेटलें म्हणून नाहीं.

**शालेय** : त्यानेंच तो भ्रमिष्टासारखा झाला आहे. शिव शिव ! मी त्याची गोष्ट तुझ्यापाशीं मुळींच काढली नसती तर बरें झालें असतें ! पण त्या वेळेस मला असें वाटलें कीं, तो तुला भुलथापी देऊन शेवटीं तोंडघशीं पाडील. धिक्कार असो त्या शंकेखोरपणाला ! आम्हां म्हातारड्यांना जेथें तेथें शंका घेतल्याशिवाय राहावयाचेंच नाहीं. जसा तरुण लोकांच्या हातून सारासार विचार व्हावयाचा नाहीं, तसा म्हाताऱ्यांच्या हातून धाडसपणा व्हावयाचा नाहीं. असो, झालें तें झालें. चल, आतां राजाकडे जाऊं, आणि ही हकीकत त्याच्या कानावर घालूं. हें मन्मथप्रकरण त्याच्यापाशीं उघडपणें सांगण्यानें तो रागावला तरी बेहेत्तर आहे. पण तें त्याच्यापासून लपवून ठेविलें आणि पुढें-मागें तें त्याच्या नजरेला आलें म्हणजे फार वाईट परिणाम होणार आहे.

[निघून जातात.]

## प्रवेश २ रा

स्थळ—किल्ल्यांतील एक दिवाणखाना.

[ राजा, राणी, जुंग, भृंग, आणि नोकरलोक प्रवेश करितात. ]

राजा : मित्र हो, तुम्ही आलांत हें पाहून आम्हांस फार समाधान वाटत आहे. कांहीं नडीचें काम आल्यामुळें तुम्हांला इतक्या घाईनें बोलावणें पाठविलें. अलीकडे चंद्रसेनाच्या प्रकृतींत थोडासा बदल झाला आहे हें तुमच्या कानावर आलेंच असेल. निदान आम्हांस तरी असें वाटतें; कारण त्याच्या पूर्वीच्या व आतांच्या अन्तर्बाह्य वर्तनांत बिलकुल मेळ राहिला नाहीं. त्याला आपल्या बापाचा जो निदिध्यास लागला आहे त्यामुळेंच तो असा बावरल्यासारखा झाला असावा. आम्ही पुष्कळ विचार करून पाहिला, पण बापाच्या वेडाखेरीज त्याच्या बुद्धिभ्रंशाला दुसरें कारण दिसत नाहीं. म्हणून आमचें तुम्हांला असें सांगणें आहे कीं, चंद्रसेन आणि तुम्ही बरोबर वाढलेले, त्याच्या स्वभावाची तुम्हांला चांगली अटकळ, यासाठीं तुम्ही कांहीं दिवस राजवाड्यांत येऊन राहा, आणि त्याला कसल्या तरी नादाला लावून त्याच्या दुःखाचा विसर पाडा. न जाणों, रात्रंदिवस त्याच्या बरोबर असल्यानें तो जें कांहीं बोलेल-चालेल त्यापासून तुम्हांला त्याच्या अस्थिरतेचें खरें कारण काढून घेतां येईल व तें आम्हांला कळल्यानें कदाचित् आमच्या हातून त्याचा परिहार होण्याजोगा असेल.

राणी : हें पाहा, तो पुनः पुन्हा तुमच्या आठवणी काढतो, आणि तुमच्याविषयीं मजजवळ तो पुष्कळ बोलला आहे. त्यावरून मला असें वाटतें कीं, तुमच्यापरतें विशेष आवडतें दुसरें त्याला कांहीं नाहीं. यासाठीं कृपा करून आमच्यापाशीं कांहीं दिवस येऊन राहाल, आणि याची भकलेली प्रकृति ताळ्यावर आणल्याचें श्रेय घ्याल तर राजकुलाला शोभेल अशा रीतीनें आम्ही तुमचे उपकार फेडूं.

जुंग : राणीसाहेब, आम्ही दोघेही आपल्या उभयतांच्या चरणाचे दास आहों. जो हुकूम होईल तो आम्हांस शिरसावंद्य आहे. आईसाहेब, कृपा असें आपण काय म्हणतां ? हुकूम असें म्हणा.

भृंग : राणीसाहेब, आम्हांकडून होईल ती सेवा करण्यास आम्ही हात जोडून उभें आहों, दासांकडून चाकरी करून घेण्याची मेहेरबानी व्हावी म्हणजे झालें.

**राणी** : ही तुमची मधुर वाणी ऐकून मला अत्यंत संतोष होत आहे. कृपा करा, आणि आतांच्या आतां माझ्या चंद्रसेनाची गांठ घ्या. जा रे कोणी तरी, चंद्रसेन असेल तेथें यांना घेऊन जा.

**भृंग** : परमेश्वर करो, आणि आमच्या सान्निध्यामुळें चंद्रसेनाच्या प्रकृतींत उतार पडून ती ताळ्यावर येवो.

**राणी** : देव करो आणि तुमच्या तोंडांत साखर पडो.

[जुंग, भृंग आणि कांहीं नोकर निघून जातात.]

[ **शालेय** प्रवेश करितो. ]

**शालेय** : सरकार, प्लवंगाला धाडलेले वकील आपलें काम फत्ते करून परत आले आहेत.

**राजा** : तुम्ही आपले नेहमीं आनंदाची खबर आणणारे खरे !

**शालेय** : आहे आपला सरकारच्या पायांच्या कृपेनें ! महाराज, मी आपल्याला खात्रीनें सांगतों कीं, नृपसेवा ही मी आपल्या प्राणाइतकें प्यारें कर्तव्य समजतों, आणि प्रसंगविशेषीं एखादी शक्कल काढण्यांत हें डोकें किती वस्ताद आहे हें प्रभूंना विदित आहेच. असो, सरकारापाशीं येवढेंच सांगावयाचें आहे कीं, गादीच्या या वृद्ध व अनुभवी चाकरानें चंद्रसेनाच्या वेडेपणाचें इंगित शोधून काढिलें आहे. आणि त्याची त्याबद्दल अशी खातरी आहे कीं, तें खरें नसल्यास तो ही पिकलेली मिशी उतरून ठेवील.

**राजा** : बोला, बोला, तें लवकर; आम्ही तें ऐकण्यासाठीं अत्यंत उत्कंठित झालों आहों.

**शालेय** : महाराज, प्रथम वकिलांना आत बोलावून त्यांचें म्हणणें ऐकून घ्या. मागून मी आपली हकीकत सांगेन, म्हणजे दुधांत साखर टाकल्यासारखें होईल.

**राजा** : तुम्हीच जाऊन त्यांना आंत घेऊन या.

[ **शालेय** जातो. ]

प्रिये, आतां तो काय सांगत होता तें ऐकलेंस ना ? चंद्रसेनाच्या खुळेपणाचें निदान शोधून काढलें आहे, असें तो म्हणतो.

**राणी** : मला वाटतें, त्याबद्दल त्याला फारसें चातुर्य खर्च करावें लागलें असेल असें नाही. तें अगदीं उघड उघड आहे. वडिलाचा मृत्यु आणि आमचा घाईचा विवाह यांखेरीज दुसरें निदान तें तो काय करणार आहे ?

[**मेघवाहन** आणि **पाशक** यांना घेऊन **शालेय** पुनः प्रवेश करितो.]

**राजा** : बरें बरें, तो काय म्हणतो तें आपण लवकरच पाहूं— मित्र हो, यशस्वी होऊन लवकर परत आलांत हें फार नामी झालें. मेघवाहना, आमचा प्लवंगाधिपति काय म्हणाला तें सांग पाहूं.

**मेघवाहन** : आपल्या मनांत होतें त्याप्रमाणें सर्व झालें. प्लवंगाधिपतीची आणि आमची भेट झाल्यावर आम्ही त्याला कच्ची हकीकत कळविली. त्याबरोबर आपल्या पुतण्याच्या खटपटीचें खरें स्वरूप त्याच्या लक्षांत आलें. त्याला असें वाटत होतें कीं, पोलोमावर स्वारी करण्याकरितां त्यानें तयारी चालविली आहे. पण आमच्याकडून खरी स्थिति समजतांच त्याची लबाडी त्याच्या लक्षांत आली, आणि आपण वयोवृद्ध होऊन आजारीपणामुळें अंथरुणास खिळून गेलों, त्यामुळें त्यानें असे खेळ चालविले आहेत असें त्याच्या लक्षांत आलें. मग त्यानें मकरंदास सांगून पाठविलें कीं, बलभद्राशीं वाद करण्याचा नाद तुम्ही सोडून द्या; तसें न कराल तर तुमचें कल्याण होणार नाहीं. चुलत्याकडून असा खरमरीत निरोप आल्याबरोबर मकरंदानें आम्हांवर स्वारी करण्याचा बेत सोडिला, आणि बलभद्राधिपतीशीं मी कधींही वैर करणार नाहीं, अशी आपल्या काकापाशीं त्यानें शपथ वाहिली. त्यामुळें प्लवंगाधिपतीला फार संतोष झाला, आणि त्यानें आपल्या पुतण्याला वर्षाची तीन लाखांची नेमणूक करून दिली, आणि आमच्याशीं लढाई करण्याकरितां शिकवून तयार केलेले लोक घेऊन पोलोमावर चालून जा असें त्यास सांगितलें. व आमच्या मुलखांतून तिकडे जाण्याचा परवाना मिळण्यासाठीं आपणाकडे ही थैली दिली आहे. (थैली देतो.) या थैलींत परवान्याच्या सर्व शर्ती लिहिल्या आहेत, व त्या सर्व आपल्याला फारच अनुकूल आहेत.

**राजा** : झालें तें फार चांगलें झालें. आतां फुरसतीअंतीं ही थैली आम्ही वाचून पाहूं, आणि त्यांतील शर्तींचा विचार करून प्लवंगाधिपतीला उलट थैली पाठवूं. तुम्ही ही कामगिरी फार छानदार रीतीनें बजाविल्याबद्दल आम्ही तुमचे फार आभारी आहों. जा, तुम्ही स्वस्थपणें कांहीं दिवस विश्रांति घ्या. आज रात्रीं वाड्यांत जेवायाला यायचें बरें. यावें तर मग आतां.

[**मेघवाहक** आणि **पाशक** मुजरा करून निघून जातात.]

**शालेय** : या कामाचा शेवट चांगलाच झाला. असो; प्रभो, स्वामिनी, राजा म्हणजे काय, कर्तव्यकर्म म्हणजे काय, दिवस म्हणजे दिवस, रात्र म्हणजे रात्र, आणि वेळ म्हणजे वेळ, या गोष्टींचें उद्‌घाटन करीत बसणें म्हणजे दिवस रात्र आणि वेळ यांचा दुरुपयोग करणें होय. अल्पतेनें वाणीला स्वारस्य येतें व विस्तारानें ती कंटाळवाणी होते; यासाठीं मला जें सांगावयाचें आहे तें मी

थोडक्यांत सांगतों. आपला मुलगा वेडा नाहीं का झाला ? मी तरी त्याला वेडा म्हणतों; कारण, खऱ्या वेडेपणाची व्याख्या करणें म्हणजे वेड्याला वेडा म्हणणें याशिवाय दुसरें काय आहे ? परंतु जाऊं दे तें.

**राणी** : असले आढेवेढे नकोत; जें बोलावयाचें असेल तें सरळ बोला.

**शालेय** : बाईसाहेब, मी आढेवेढे कधींच घेत नाहीं. तो वेडा आहे हें खरें आहे. हें ख़रें असावें ही दुःखाची गोष्ट होय. आणि दुःखाची गोष्ट ही कीं, तें खरें आहे. अशा तऱ्हेनें बोलणें हें चांगलें नाहीं व आपणांस तें रुचत नाहीं म्हणून तें सोडून देतों; पण आपणांस असें घेऊन चाललें पाहिजे कीं तो वेडा आहे. तो वेडा आहे इतकें मानिलें म्हणजे बाकी राहिलें काय, कीं अशा कार्याला काय कारण झालें असावें, किंवा या भ्रंशाला काय कारण झालें असावें ? या दुष्ट परिणामाला कांहीं तरी कारण असलेंच पाहिजे. तात्पर्य काय कीं, कार्याचें कारण काढायाचें राहिलें आहे. असो; मला एक मुलगी आहे. तिजवर माझी सत्ता चालत आहे तोंपर्यंत माझीच म्हटली तरी काय हरकत आहे ? तिनें कन्या-धर्माला स्मरून माझ्या आज्ञेप्रमाणें हें पत्र माझ्यापाशीं दिलें. हें पहा आणि काय तो तर्क करा.

"सततहृत्करंडकनिवासिनि, मदात्मार्चिते, अद्वितीय
लावण्यखाणी, स्वर्गांगने, दिव्य मल्लिके"—

हें लिहिणें कांहीं चांगलें नाहीं; खरोखरीच चांगलें नाहीं; "लावण्यखाणी" हा समास तर अगदीं बेढब दिसतो. जाऊं दे, ही टीका करण्याची वेळ नव्हे. बाकीचें पत्र तुमच्याकडून ऐकविलें पाहिजे. हें ऐका :—

"तुझ्या निर्मळ आणि विशुद्ध अंतःकरणात—"

**राणी** : हें चंद्रसेनाकडून आलें काय ?

**शालेय** : बाईसाहेब, अंमळ धीर धरा. आहे त्याच्या बाहेर एक अक्षर वाचीत नाहीं:—

"स्वर्गस्थ तारे तेजोमय आहेत किंवा नाहींत याची शंका घे; आकाशपंथानें भगवान् उष्णदीधिति भ्रमण करितो कीं नाहीं याची शंका घे; साक्षात् सत्यमूर्ति नेहमीं सत्य सांगेल कीं नाहीं याची शंका घे; पण तुझ्यावर माझें अढळ प्रेम आहे कीं नाहीं याची शंका कधींही घेऊं नको. प्रिये मल्लिके, पद्यें जुळेनात, म्हणून हा गद्यात्मक लेख लिहिला आहे. तुझ्याकडे मन लागून गेल्यामुळें ऱ्हस्व-दीर्घ

पहाणें मुश्केनासें झालें आहे. असो, या कुडींत प्राण आहे तोंपर्यंत हा चंद्रसेन तुजवर एकनिष्ठेनें प्रेम ठेवील असें अभिवचन देऊन हें पत्र पुरें करितों."

हे पत्र माझ्या मुलीनें माझ्या सांगण्यावरून मजपाशीं आणून दिलें. इतकेंच नाहीं, तर वेळोवेळीं संधि साधून तो जें जें म्हणून तिजपाशीं येऊन बोलला तें सर्व तिनें मला सांगितलें आहे.

**राजा** : बरें, चंद्रसेनाविषयी तिचें मन कसें काय आहे ?

**शालेय** : माझ्याविषयी आपला समज कसा आहे ?

**राजा** : आम्हांला असें वाटतें कीं, तुम्ही विश्वासूक आणि इमानी मनुष्य आहांत.

**शालेय** : येवढें महाराजांच्या नजरेस येवो म्हणजे झालें. चंद्रसेनाचें मन मल्लिकेवर बसलें आहे हें तिनें सांगण्यापूर्वीच मला कळलें होतें. तरी तिच्याकडून ती गोष्ट बाहेर पडेपर्यंत मी कांहीं एक बोललों नाहीं. पण असें समजा कीं, प्रत्यक्ष तिच्याकडून या उत्कट प्रेमाची गोष्ट मला कळल्यावरही मी घुम्यासारखा स्वस्थ बसलों असतों, तर मजबद्दल धनीसाहेब, आपणांस किंवा राणीसाहेब, आपणांस काय वाटलें असतें ? पण मीं तसें केलें नाहीं. मला ती गोष्ट कळतांच मी एकसारखा उद्योगाला लागलों. माझ्या मुलीला जवळ बोलावून आणून मीं असें सांगितलें कीं, मल्लिके, चंद्रसेन हा राजपुत्र असल्यानें आपल्या आहाराबाहेर आहे. तूं त्याचा अभिलाष धरूं नको. त्याचें–तुझें लग्न कधींही जमायाचें नाहीं. याकरितां तूं याउप्पर घरांतल्या घरांत असत जा. फारशी त्याच्या दृष्टीस पडत जाऊं नको. आणि त्यानें कांहीं चीज पाठवून दिली तर ती परत धाडून दे. याप्रमाणें माझ्याकडून सूचना मिळतांच तिनें तात्काळ उचलली आणि ती तदनुसार वागूं लागली. इकडे चंद्रसेनाची निराशा होऊन प्रथम तो उदास झाल्यासारखा झाला; मग त्यानें अन्न टाकलें; पुढें त्याला झोंप लागेनाशी झाली. शेवटीं त्याच्या अंगीं क्षीणता आली. क्षीणता आल्यावर भारदस्तपणा नाहींसा झाला. याप्रमाणें उत्तरोत्तर तो वेडेपणाच्या स्थितीला येऊन ठेपला. आतां या शोचनीय अवस्थेंत त्याला किती दिवस राहावें लागणार आहे कोण जाणें. आपल्या भरतानेंही कामीजनांची अशीच स्थिति वर्णिली आहे:—

**अप्राप्तरतिभोगस्य नवस्त्रीरागजन्मनः ।**
**दश स्थानानि कामस्य काममन्तर्विसर्पतः ।।**
**अभिलाषोऽत्र प्रथमे द्वितीये चिंतनं तथा ।**

अनुस्मृतिस्तृतीये च चतुर्थे गुणकीर्तनम् ॥
उद्वेगः पञ्चमे ज्ञेयो विलापः षष्ठ उच्यते ।
उन्मादः सप्तमे प्रोक्ता भवेद्व्याधिस्तथाऽष्टमे ॥
नवमे जडता प्रोक्ता दशमे मरणं भवेत् ॥ इति ॥

**राजा** : (राणीस) तुला हेंच कारण असेलसें वाटतें काय ?

**राणी** : तेंच असेल; बहुशा तेंच असेल.

**शालेय** : तसें नको; अमुक एक गोष्ट अशी आहे असें मीं म्हटलें असतां तीं तशी प्रत्ययास आली नाहीं असें कधीं झालें असल्यास तसें मला कळूं द्या. मला तरी तें समजायाला पाहिजेच आहे.

**राजा** : आपल्या तर स्मरणांत नाहीं.

**शालेय** : तसें नाहीं झालें तर हें याच्यापासून (डोक्याला आणि खांद्याला बोट दाखवून) उतरून देईन. सर्व गोष्टींची अनुकूलता मात्र पाहिजे; मग सत्य सप्तपातालाच्या पलीकडे जरी लपवून ठेविलें असलें तरी तें हुडकून काढीन.

**राजा** : बरें, आतां याची पुढें वाट काय करावी ?

**शालेय** : तो या सज्जावर कधीं कधीं कित्येक तासपर्यंत फिरत असतो हें आपणांला ठाऊक असेल.

**राणी** : हो, तो फिरतो खरा.

**शालेय** : अशा रीतीनें एकादे वेळेस तो फिरत असतां मल्लिकेला सहज येथें धाडून द्यावें, आणि आपण आड राहून त्याचें काय बोलणें–चालणें होते तें पहावें आणि असें केल्यावर तो तिच्यामुळे वेडावून गेला आहे असें जर आपल्या नजरेस नाहीं आलें तर त्या क्षणीं लेखणी ठेवून नांगर धरीन.

**राजा** : बरें, तें करून पाहूं.

**राणी** : तो पाहिलांत ना, तो तिकडे खिन्न होऊन कायसेंसें वाचीत येत आहे ?

[**चंद्रसेन** वाचीत प्रवेश करितो.]

**शालेय** : उठा उठा, महाराज, कृपा करून आपण क्षणभर आड व्हा. मी आतांच्या आताच त्याला बोलावून पहातों. येवढें माझें म्हणणें ऐकून घ्यावें.

[**राजा–राणी** आणि नोकरलोक जातात.]

कसें काय चाललें आहे महाराज ?

**चंद्रसेन** : परमेश्वराच्या कृपेनें बरेंच आहे.

**शालेय** : महाराज, आपण मला ओळखलेंत का ?

**चंद्रसेन** : हो हो, हें काय सांगावें ? आपण मासेविक्ये आहां.

**शालेय** : मी नव्हें महाराज.

**चंद्रसेन** : तर मग तुम्ही प्रामाणिक मनुष्य असतां तर बरें होतें.

**शालेय** : प्रामाणिक, महाराज ?

**चंद्रसेन** : हो, हो, प्रामाणिक. हें जग इतकें पाजी झालें आहे कीं, दहा हजारांत एक प्रामाणिक मनुष्य भेटण्याची मारामार पडूं लागली आहे.

**शालेय** : खरें आहे आपलें म्हणणें, महाराज.

**चंद्रसेन** : मरून सडत पडलेल्या कुत्र्याचें सूर्यकिरणांनीं चुंबन केलें म्हणजे त्यांत आळ्या होतात, म्हणून हलकट स्त्रीच्या चुंबनानें —कां हो, तुम्हाला एक मुलगी आहे ना ?

**शालेय** : होय, आहे महाराज.

**चंद्रसेन** : तर मग तिला सूर्यकिरण दाखवूं नका. नाहीं तर पटकन जड व्हावयाचें ! तसें होणें चांगलें आहे; पण, —पहा बोवा आपला विचार—

**शालेय** : याचा अर्थ काय महाराज ? (एकीकडे) अजून ती याच्या मनात घोळते आहे. तरी प्रथम त्यानें मला ओळखिलें नाहीं. मला तो मासेविक्या म्हणाला. हा अगदींच बहकून गेला आहे. यालाच कशाला दोष लावायाला पाहिजे ? या वयांत माझी देखील कामज्वरानें अशीच अवस्था झाली होती. आणखी एकदां त्याच्याशीं बोलून पहातों. (उघड) महाराज, आपण काय वाचतां आहां ?

**चंद्रसेन** : शब्द ! शब्द ! शब्द !

**शालेय** : महाराज, त्यांत मतलब काय आहे ?

**चंद्रसेन** : कोणांत ?

**शालेय** : महाराज, मी म्हणतों कीं जो कागद आपण वाचीत आहां, त्यांत काय मजकूर लिहिला आहे ?

**चंद्रसेन** : चहाड्या, आणि दुसरें काय ? ज्या टीकाखोर पाजी मनुष्यानें हें लिहिलें आहे, तो असें म्हणतो कीं, म्हाताऱ्या लोकांची दाढी पांढरी होऊन गेलेली असते; त्यांच्या तोंडावर सुरकुत्या पडलेल्या असतात; त्यांच्या पिचक्या डोळ्यांतून पिवळा विकट डिंक निघत असतो, व त्यांची मति भ्रष्ट झाल्यामुळें घरीं त्यांना कोणी पुसत नाहीं. म्हणून ते भारी बटबट करितात. मला वाटतें कीं, लिहिणारानें थेरड्यांची ही तसबीर बरोबर उठवून दिली आहे; आणि खरें

पुसाल तर तसेंच माझेंहि मत आहे. आतां आपल्याविषयीं मला असें वाटतें कीं, खेकडयासारखें आपण मागें सरूं शकतां तर माझ्यासारखे तरुण खुषीनें बनला असतां.

**शालेय** : (एकीकडे) हें वेड तर खरेंच; पण यांत कांहीं शिस्त आहे. (मोठ्यानें) महाराज, बाहेर हवा खायाला चलतां का ?

**चंद्रसेन** : थडग्यांत माती खायाला चलतों.

**शालेय** : महाराज, असलें बोलणें चांगलें नाहीं. असली अभद्र भाषणें बोलूं नये. (एकीकडे) एखादे वेळेस हा कशी मार्मिक उत्तरें देतो ! खूळ लागलें म्हणून काय झालें ? खुळेपणांतच एकेकदां अशा कोटया सुचतात कीं, शहाण्यानें हवी तितकी खटपट केली तरी त्या सुचायाच्या नाहींत. आतां याला येथेंच सोडून जातों, आणि मल्लिकेची आणि याची गांठ पडण्याचा कांहीं उपाय करितों. (मोठ्यानें) धनीसाहेब, आपली रजा घेतों.

**चंद्रसेन** : जिवाखेरीज काय पाहिजे तें घ्या. आपण येथून केव्हां टळाल याचीच वाट पाहतों आहे !

**शालेय** : असें काय बोलतां, महाराज ? आपण चिरकाल सुखी राहावें हेंच देवापाशीं मागणें आहे !

**चंद्रसेन** : (एकीकडे) कोण थेरडयाची कटकट ही !

[**जुंग** आणि **भृंग** प्रवेश करितात.]

**शालेय** : तुम्ही चंद्रसेनमहाराजांच्या शोधांत आहां ना ? ते, ते पहा तिकडे बसले आहेत.

**जुंग** : आपली फार मेहेरबानी झाली ! देव तुमचें भलें करो !

[**शालेय** निघून जातो.]

**भृंग** : महाराज !

**जुंग** : सरकार !

**चंद्रसेन** : मित्र हो, तुमचें कसें काय चाललें आहे ! का रे भृंगा, ए जुंगा, कशी काय हालहवाल आहे !

**जुंग** : गरिबांचें काय घेऊन बसलां आहांत, महाराज ?

**भृंग** : लक्ष्मीची आम्हांवर फाजील कृपा नाहीं यांतच आम्ही आपणांस सुखी मानतों.

**चंद्रसेन** : तिची अगदींच अवकृपा नाहीं यांतही तुम्हांस आपणाला सुखी मानून घेतलें पाहिजे !

**जुंग** : हो, तेंही खरें.

**चंद्रसेन** : तर मग ज्या अर्थी लक्ष्मीनें तुम्हांस डोक्यावर घेतलें नाहीं, व ती तुम्हांला पायानें एकीकडे सारीतही नाहीं, त्या अर्थी तिनें आपल्या मध्याशीं म्हणजे कमरेशीं तुम्हांला धरिलें आहे असें झालें ! यापेक्षां तुम्हांला तरी आणखी काय पाहिजे !

**भृंग** : आम्ही तिचे दास आहों.

**चंद्रसेन** : तुमच्याकडे तिनें मोठी नाजूक कामगिरी सोंपविली आहे. तेव्हां तुम्ही तिचे मोठे लाडके चाकर दिसतां ! बरें असो, कसें काय वर्तमान आहे ?

**जुंग** : लोक आपापलें कर्तव्य नीट बजावीत असल्यामुळें सर्वत्र अबादानी आहे महाराज.

**चंद्रसेन** : तर मग प्रलयकाल जवळ आला म्हणायचा ! लबाडा, अशा गप्पा मारूं नको ! मी तुला विचारतों याचें उत्तर दे. राजश्री, आपण नशिबाचें काय घोडें मारिलें होतें कीं त्याबद्दल त्यानें तुम्हांला या तुरुंगांत पाठविलें !

**भृंग** : तुरुंग, महाराज !

**चंद्रसेन** : हो हो तुरुंग; बलभद्र अलीकडे जंगी तुरुंग झाला आहे.

**जुंग** : असें असेल तर, महाराज, बलभद्रावरच आपला एवढा कटाक्ष कशासाठीं ? आपण म्हणतां त्या रीतीनें सगळें जग कां नाहीं तुरुंग होणार ?

**चंद्रसेन** : हो हो, तें आहेच तसें. या जगाच्या तुरुंगांत नाहीं तसलीं अंबारें, बळदें, भुयारें, लादण्या, काळ्या कोठड्या, अंधारीं तळघरें आहेत. त्यांपैकीं बलभद्र हें वाईटांतलें वाईट.

**जुंग** : आम्हांला नाहीं तसें वाटत, महाराज.

**चंद्रसेन** : तुम्हांला तसें नाहीं वाटत तर कसलेंही वाटतां कामा नये. कारण या जगांत अमुक एक गोष्ट स्वभावसिद्ध वाईट किंवा अमुक चांगली असा निर्बंध करितां येत नाहीं. जो भेद दिसतो तो सगळा बुद्धीचा खेळ. निदान मला तरी हा बलभद्र तुरुंगासारखा वाटूं लागला आहे.

**जुंग** : आपल्या महत्त्वाकांक्षेमुळें तो आपणांस असा वाटतो. हा एवढासा बलभद्र देश आणि आपलें महत्त्वाकांक्षी अंतःकरण या दोघांचें पटत नाहीं हें ठीकच आहे.

**चंद्रसेन** : छे, छे, तें कांहीं नाहीं. मला अलीकडे वाईट स्वप्नें पडूं लागलीं आहेत, तीं न पडतीं तर उंबरांतल्या किड्याप्रमाणें उंबराएवढ्या जागेंत

समाधान मानून राहिलों असतों, व सगळ्या ब्रह्मांडाचा आपणांस स्वामी समजलों असतों.

**भृंग** : हं, हं, आतां ठीक जुळलें. आपणांस वाईट स्वप्नें पडतात ना? खरेंच, जें मनीं वसें तें स्वप्नीं दिसे. मोठेपणाचा विचार आपल्या मनांत घोळूं लागल्यापासून आपणांस हीं स्वप्नें पडूं लागलीं असतील. पण आपणांस सांगून ठेवतों कीं, मोठेपणाचा हृद्रोग लावून घेणें म्हणजे स्वप्नांत पाहिलेल्या गोष्टींच्या मागें लागण्यासारखें होय.

**चंद्रसेन** : अरे, स्वप्नेंच जर मुळीं झूट, तर त्यांत पाहिलेल्या वस्तूंच्या नादीं कोण लागेल ?

**जुंग** : माझें म्हणणें तरी तेंच आहे, आणि म्हणूनच मला असें वाटतें कीं, मोठेपणाचा नाद स्वप्नाच्या नादापेक्षांही अधिक भिकार होय.

**चंद्रसेन** : तर मग तुमच्या न्यायशास्त्राप्रमाणें मोठमोठे राजे, नामांकित वीर ही सगळी भिकार मंडळी ! अरे, पण वाड्यांत चलतां का ? हा तंटा येथें तुटेलसें मला वाटत नाहीं !

**जुंग** / **भृंग** } आपण निघालां कीं, आपल्या पाठीमागें आम्ही आहोंच.

**चंद्रसेन** : नकोरे बाबांनो तुम्ही माझ्या पाठीमागें ! अलीकडे माझ्या पाठींशी असले नोकर लागले आहेत कीं, त्यांच्यामुळें माझी चांदीच उडत आहे. पण गड्या, तुला मैत्रीच्या नात्यानें विचारतों, तुम्ही येथें कशासाठीं आलांत ?

**जुंग** : तुम्हांला भेटायाला महाराज; दुसरें कांहीं कारण नाहीं.

**चंद्रसेन** : या तुमच्या उपकाराची फेड करण्यास मजपाशी कांहीं नाहीं, इतका मी भिकारी झालों आहें. तरी एक गोष्ट मजपाशीं आहे. ती मजपासून माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत कोणीही घेऊं शकणार नाहीं. तुमच्या प्रेमा-बद्दल मी तुमचा अत्यंत आभारी आहें. पण तुम्हांला वास्तविक पुसतों, तुम्ही जें आलांत तें अगदीं आपल्या आपण आलांत ? तुम्हांला कोणांकडून कांहीं एक सूचना आली नव्हती ? हें पहा, माझ्याशीं अशी लबाडी करूं नका; खरें काय असेल तें बोला.

**भृंग** : आतां आपल्यापुढें काय बोलावें, महाराज ?

**चंद्रसेन** : कां ? येवढ्या पंचायतींत कां पडतां ? मनास वाटेल तें बोला. तुम्ही येथें यावें म्हणून तुम्हांला निरोप गेला नव्हता बरें ? अरे, तुम्ही लपवाल

किती ? तुम्ही आपल्याकडून लपविण्याची खूप खटपट करीत आहां; पण ती लबाडी साधते आहे कोठें ? तुमची उतरलेली चर्याच खऱ्याची साक्ष देत आहे. का, तुम्हांला आईनें आणि काकानें निघून येण्याबद्दल निरोप पाठविला नव्हता ?

**जुंग** : कशासाठीं महाराज ?

**चंद्रसेन** : मला शिकविण्यासाठीं. तें असो; पण तुम्हांला माझ्या गळ्याची शपथ आहे, मी तुम्हांला विचारीत आहें त्या प्रश्नाचें सरळ उत्तर द्या. आईनें आणि काकानें निघून येण्याबद्दल तुम्हांला सूचना केली होती किंवा नाहीं ?

**जुंग** : (एकीकडे भृंगास) कसें काय उत्तर द्यायचें, बोवा ?

**चंद्रसेन** : (एकीकडे) बरें आहे, बच्चाजीनों; तुम्ही इतके आढेवेढे घेतलेत तरी गबरूने खरा प्रकार तर ताडलाच ! (मोठ्यानें) हें पहा, मजबद्दल जर तुम्हांला कांही वाटत असेल तर अशी आळंटाळं करूं नका. खरें काय तें बाहेर पडू द्या.

**भृंग** : येण्याबद्दल महाराज, आम्हांस सूचना आली होती खरी.

**चंद्रसेन** : मी सांगतों तुम्हांस कशासाठीं बोलाविलें तें. कारण मीच तें हेरलें म्हणजे तुमचा त्रास चुकला, आणि राजा-राणीनें तुम्हांवर जो भरंवसा टाकिला आहे, त्याला पंखही फुटायला नकोत ! काय कारण झालें असेल तें असो, मला अलीकडे कशांतही आनंद वाटेनासा झाला आहे; ज्या त्या गोष्टीचा कंटाळा; कोठें जायला नको, कोठें यायला नको; फार काय सांगूं, रम्य असे नद्यांचे प्रवाह आणि पर्वतांचीं शिखरें यांनीं शोभणारा हा बलभद्र देश निर्जन आणि शुष्क अशा अरण्याप्रमाणें भासत आहे, व देदीप्यमान तारकारत्नांनीं खचित असा हा तेजोमय खगोलार्ध निस्तेज वाटत आहे, व सर्व पृथ्वीसभोंवती पर्यटन करून वनस्पति आणि प्राणी यांना संतोष उत्पन्न करणारा हा मंद सुगंध वायु रोगजनक व दुर्गंधि अशा बाष्पसंचयासारखा लागत आहे ! सारांश, या घटकेस माझ्या स्थूल शरीराची व मनाची जी शोचनीय स्थिति झाली आहे ती सांगतां पुरवत नाही. आ, हा ! मनुष्य ही किती अमोलिक चीज आहे ! म्हण आहे—"नर करणी करे तो नरका नारायण हो जाय." त्याच्या बुद्धीची केवढी प्रौढी ! त्याच्या कल्पना कोण अचाट ! आकृति काय, चलनवलनादि व्यापार काय ! सगळेंच मनोरम आणि आश्चर्योत्पादक ! बोलणें-चालणें गंधर्वासारखें ! ग्राहकशक्ति साक्षात् ईश्वरासारखी ! सारांश, ब्रह्मदेवानें जी अनंत सृष्टि निर्माण केली तिचा हा सर्वोत्कृष्ट मासला होय ! आणि असें आहे तरी, पंचमहाभूतांच्या एकीकृत या सारतत्त्वाकडे पाहून मला कांहीच आल्हाद होत नाहीं ! मनुष्य-

जातींत स्वभावनिर्मित भेद दोन, स्त्री आणि पुरुष; पण यांपैकी एकाकडे देखील पाहून माझें समाधान होत नाहीं. आतां तुम्ही हंसतां आहां यावरून हें तुम्हांला खोटें वाटत असल्यास माझा नाइलाज आहे.

**जुंग** : छे, छे, असला विचार माझ्या मनांत मुळीच आला नाहीं.

**चंद्रसेन** : तर मग मी जेव्हां म्हणालों कीं, 'मनुष्याकडे पाहून मला आल्हाद होत नाहीं,' त्या वेळेस तूं कां रे हंसलास ?

**जुंग** : महाराज, माझ्या मनांत असा विचार आला कीं, जर 'मनुष्याकडे पाहून आपणांला आल्हाद होईनासा झाला आहे, तर नाटककारांना आपण कसला आश्रय देणार ? आम्हांला ते वाटेंत भेटले, व आपल्या पायांची दोन दिवस सेवा करण्यासाठीं ते इकडेच येत आहेत.

**चंद्रसेन** : अरे, ही कोठली मंडळी ?

**जुंग** : आपण जिला नेहमीं वाखाणीत असां, व दुःखपर्यवसायी प्रयोग करण्यांत जिनें चांगलें नांव मिळविलें आहे अशी ही येथलीच मंडळी.

**चंद्रसेन** : ही मंडळी यंदां बाहेर कशासाठीं पडली ? म्हटलें म्हणजे लौकिक आणि फायदा ही दोन्हींही त्यांना येथें मिळावीं तशीं मिळत होतीं.

**जुंग** : मला वाटतें नाटकांत अलीकडे जी एक नवीन टूम निघाली आहे, त्यामुळें त्यांना बाहेर जावें लागलें असेल.

**चंद्रसेन** : मी मागें येथें असतां त्यांचा जो लौकिक असे तसाच अजूनही आहे काय ? पूर्वींप्रमाणें त्यांच्या खेळाला आतांशा गर्दी होत असते का ?

**जुंग** : नाहीं; पूर्वींसारखी तर खचितच नाहीं.

**चंद्रसेन** : असें कां बरें झालें ? यांना गंज चढला वाटतें ?

**जुंग** : छे, तसें कांहीं नाहीं; तांबेरा चढूं न देण्याविषयीं ते आपल्याकडून होईल तितकी खटपट करीत असतात. पण अलीकडे संगीताचे जिकडे तिकडे खूळ माजलें आहे ! बारा-बारा पंधरा-पंधरा वर्षांचीं दिखाऊ पोरें रंगभूमीवर येऊन त्यांनीं तोंड उघडलें की झाली टाळ्यांला सुरुवात ! सूर-बेसूर पाहतो कोण ? श्राव्यापेक्षां दृश्य काव्याचेंच वेड फार माजलें आहे ! ज्या नाटकगृहांत पहावें त्यांत असल्या चटोर पोरांच्या संगीताची झंगड झडत असते.

**चंद्रसेन** : असल्या मुलांना संभाळतो कोण ? त्यांचा चरितार्थ चालतो कसा ? घर सोडून तीं बाहेर पडतात कशीं ? घरांतून त्यांना बाहेर काढतो कोण ? एकदां आवाज फुटल्यावर त्यांचे पोट कसें चालणार ? दाढी-मिशी येऊन

चेहऱ्यावरचें मार्दव नाहींसें झालें म्हणजे त्यांना कोण विचारणार ? पोरपणांतील हूड स्वभावामुळें त्यांना आतां कांहीं वाटत नाहीं. खायाला चमचमीत अन्न, वापरायला इष्कीची जाकिटें, नेसायाला रेशीमकाठीं धोतरें, हातांत एखादें कडें, मानेवर पडणारा घेरा, हवें तिकडे भटकण्याची मोकळीक, आणि कार्यसाधू, आपमतलबी, लंपट झालेल्या हलकट लोकांची अहोरात्र संगति !! कां नाहीं पोरांना भुरळ पडणार ? दोन दिवस तोंडावर पाणी असतें तोंपर्यंत चावट लोक अज्ञान पोरांना नादीं लावितात, आणि आपल्या कामास तीं निरुपयोगी झालीं म्हणजे त्यांना फशीं पाडतात, ही मोठी शरमेची गोष्ट आहे. अशा रीतीनें वेडावलेलीं पुष्कळ पोरें पुढें पश्चात्ताप करितांना मीं पाहिलीं आहेत.

**जुंग** : या प्रश्नाला दुसरीही एक दिशा आहे. दोन्ही पक्षांकडे थोडेंबहुत चांगलेवाईटपण आहेच आहे. आज किती दिवस या प्रश्नाची वाटाघाट चालू आहे. एकदां तर दोघांचे दोन तट बनून अन्योन्यसंग्रामाची सिद्धता झाल्याची वार्ता होती.

**चंद्रसेन** : हा प्रकार खरा आहे का ?

**भृंग** : हें काय सांगावें ? दुसरीं कामें टाकून शहाणे लोक या कामाकडे आपल्या बुद्धीचा खर्च करूं लागले आहेत.

**चंद्रसेन** : पण बिघडणारीं पोरें या वादापासून आपलें कांहीं हित करून घेत आहेत काय ?

[ आंत तुताऱ्यांचा ध्वनि होतो. ]

**भृंग** : हे नाटकवाले आले वाटतें.

**चंद्रसेन** : मित्र हो, तुम्ही येथें आलांत, हें फार चांगलें केलेंत. त्याबद्दल मी शिरस्त्याप्रमाणें तुमचे आभार मानितों. पण तुम्हांला येवढें सांगून ठेवतों कीं, आमचे चुलतबाप आणि चुलतआई हीं मात्र चुकलीं.

**भृंग** : कशांत महाराज ?

**चंद्रसेन** : मी तर तऱ्हेवाईक वेडाच, पण वारा फिरला कीं शिडांचीं तोंडें कशीं फिरतात, हें मला चांगलें कळतें.

[ **शालेय** प्रवेश करितो. ]

**शालेय** : गृहस्थ हो, ठीक आहे ना ?

**चंद्रसेन** : भृंगा, ऐकलेंस ना ? जुंगा, तूं देखील ? त्या बुढ्ढ्या बाळाची बाळंतीं अजून सुटलीं नाहींत !

**जंग** : सुदैवानें तीं पुनः लपेटून घेण्याचा त्याला काळ आला आहे, मग तो कां कमी करील ? कारण वार्धक्य म्हणजे बाल्यावस्थाच कीं नाहीं !

**चंद्रसेन** : तुम्ही उगीच ऐकून ठेवा, तो मला नाटकवाले आल्याची खबर द्यायला येत आहे हें पहा—( **शालेयाला** उद्देशून ) तुम्ही सकाळीं सोमवारीं आले म्हणतां काय ? हो हो, बरोबर आहे, तेव्हांच; तेव्हांच.

**शालेय** : महाराज, तुम्हांला एक वर्तमान सांगावयाचें आहे.

**चंद्रसेन** : महाराज, तुम्हांला एक वर्तमान सांगावयाचें आहे. कलावतींत चित्रवर्ण नाटक करीत असे तेव्हां—

**शालेय** : महाराज, नाटकवाले येथें आले आहेत.

**चंद्रसेन** : अगदीं झूट; पक्की लबाडी.

**शालेय** : नाहीं महाराज, आपल्या गळ्याशपथ.

**चंद्रसेन** : आमच्या गळ्याची तुम्हांला पर्वा आहेच, हें आम्हांला ठाऊक आहे.

**शालेय** : असली अद्वितीय नाटककार मंडळी आपण कोठें पाहिली नाहीं. आनंदपर्यवसायी, शोकपर्यवसायी, ऐतिहासिक, सृष्टिविषयक–आनंदपर्यवसायी, ऐतिहासिक, सृष्टिविषयक, शोकपर्यवसायी—ऐतिहासिक, शोकपर्यवसायी–आनंद-पर्यवसायी–ऐतिहासिक—सृष्टिविषयक, अविभक्त प्रवेश, किंवा अखंड कविता . . . सारांश नाटकाचा पाहिजे तो प्रकार घ्या; त्यांत या मंडळीचें अगदीं हातखण्डें काम; स्वाऱ्या कधीं कोणाला हार जाणार नाहींत. कालिदासाच्या वाणीचें सुरस मार्दव आणि भवभूतीच्या वाणीचें मधुर काठिण्य यांना एकसारखें वठवितां येतें.

**चंद्रसेन** : त्या म्हाताऱ्या कण्वाजवळ केवढी बरें अलौकिक चीज होती ?

**शालेय** : काय ती महाराज ?

**चंद्रसेन** : कां बरें ? त्याला एक सुंदर रूपवती कन्या नव्हती का ? जिच्यावर त्याचें अत्यंत प्रेम असे.

**शालेय** : ( एकीकडे ) अजून याच्या मनांतून मल्लिकेचा विचार गेला नाहीं.

**चंद्रसेन** : कां बुढ्ढेबोवा. मीं म्हटलें तें बरोबर नाहीं का ?

**शालेय** : मला मुलगी आहे म्हणून मला आपण वृद्ध कण्वाची उपमा दिलीत. आहे मुलगी ती कबूल केलीच पाहिजे.

**चंद्रसेन** : त्याची काय गरज आहे ?

**शालेय** : तर मग महाराज, कशाची आहे ?

**चंद्रसेन** : तें कां ? असें आहे—"आलें देवाजीच्या मना तेथें कोणाचें चालेना." जसें नशिबीं असेल तसें घडून येतें, त्यांत तुमच्याकडे तरी काय आणि आमच्याकडे तरी काय ? जिकडे जाल तिकडे हीच दशा. अहो इकडे हे कोण ?

[ चार-पांच नाटकवाले प्रवेश करितात. ]

तुम्ही आलांत, फार चांगलें केलेंत, फार नामी गोष्ट झाली. तुम्ही आलांत हें पाहून मला फार बरें वाटतें. मित्र हो, ए गड्या, तुमच्या आमच्या गेल्या मुलाखतीपासून तुझ्या ओठावर व हनुवटीवर ही मजेदार कोंवळी कोंवळी झालर कीं रे दिसूं लागली ! आणि तुम्ही बाईसाहेब, मी तुम्हांला गेल्या वर्षी भेटलों तेव्हां तुमच्यांत आणि स्वर्गांत दोन बोटें अंतर होतें, पण आतां एकच राहिल्यासारखें दिसतें. एका वर्षांत बरीच मजल हाणिलीत ! वा: वा: वा ! बंद रुपयाप्रमाणें तुमचा आवाज फुटून बदबदूं तर लागला नाहीं ना ? तोही आम्हांस आवडत नाहीं असें नाहीं. समुद्राप्रमाणें जें पाहिजे तें आम्हांस खपतें. बरें, कांकूं केल्याशिवाय आम्हाला एक नक्कल म्हणून दाखवा; पाहूं दे अलीकडे काय सुधारणा केली आहेत तीं. म्हणा, मनाला द्रव येण्यासारखी एखादी फक्कड नक्कल म्हणा.

**एक नाटकवाला** : कोणती नक्कल, महाराज ?

**चंद्रसेन** : एकदां ती मीं तुमच्याकडून म्हणविली होती, पण रंगभूमीवर ती कधीं आली नाहीं; अथवा आलीच असली तर फक्त एक वेळ आली असेल. कारण तो खेळ साधारण लोकांना रुचला नाहीं, हें मला स्मरतें. कुणबटांना साखरभाताची चव काय ? परंतु मला, आणि माझ्यापेक्षांही अशा बाबतींत ज्यांच्या मताला विशेष वजन अशांना, तो खेळ फार पसंत पडला. त्यांतील प्रवेशपरंपरा, त्याचें चतुर संविधानक आणि त्याची सुरेख भाषा पाहून सर्व रसिकांनीं माना डोलविल्या. त्या वेळेस एकजण असें म्हणाला कीं, या नाटकांत झणझणीत व चटकदार पद्यें नाहींत किंवा नखरेदार घडीव शब्दरचना नाहीं हें खरें. तरी सगळी भाषा प्रौढ आणि गोड असून चोचले नसतां ती सुरेख साधली आहे. त्यांतलें एक भाषण मला फारच आवडलें. द्रोणाचार्यांनें अश्वत्थाम्याच्या मृत्यूची वार्ता ऐकिली त्या सुमारास तें आहे. विशेषेंकरून धृष्टद्युम्नानें द्रोणाचार्याचा शिरच्छेद केला त्या प्रसंगाचें वर्णन फारच मनोवेधक झालें आहे. तें तुला आठवत असेल तर म्हणून दाखीव पाहूं. मधांपासून आठवतों आहें, पण त्याचा आरंभ कोठें झाला आहे तें ध्यानांत येत नाहीं.

**मेला अश्वत्थामा ऐशी वार्ता—**

छेः, असें नाहीं; 'अश्वत्थामा' येथून त्याचा आरंभ झाला आहे.

पद

अश्वत्थामा मेला ऐशी वार्ता द्रोणाचार्याला
कळोनि आल्यावरचा तुम्हां कथितों प्रकार जो घडला ।।ध्रु०।।
तद्हृदयानें अर्थ घेतला चिरंजीव कीं मम मेला,
आश्चर्य गमे चिरंजीविपण गेलें कैसें विलयाला !
अश्वत्थामा हत्ती मेला ठाउक नव्हतें हे त्याला,
याच्या योगें पुढें केवढा अनर्थ परिसा हो झाला ! १
मोहें भरली बुद्धी, मनिचें धैर्य सर्वही तें खचलें,
समाधि लावुनि शोध करावा ऐसें तद्हृदया गमलें.
पलितमौलि त्या वीरवरानें धनुष्य करिचें टाकियलें
प्राणायामा करुनि समाधी योगज्ञें मग लावियला. २
इतुक्यामध्यें द्रुपदनृपाच्या पुत्रें धृष्टद्युम्नानें
हृदयीं खिळलें वैर पूर्विचें आठवूनिया, अवमानें
द्रोणाचा तो अवनत मस्तक छेदियला निज शस्त्रानें,
ऐशापरि तो त्रैलोक्यगुरू ब्राह्मण नाशातें गेला. ३

हं, यापुढचं म्हण पाहूं ?

**शालेय** : वाहवा, वाहवा ! महाराज ! आपण खचित हें गंधर्वाप्रमाणें गायलें.

**नाटकवाला** : पद

[उद्धवा, शांतवन कर जा—या चालीवर]

ऐकुनिया द्रोणवधवार्ता, शोकाकुल तत्सुत झाला. ।। ध्रु०।।
हा ताता ! हा गुरुवर्या ! वत्सलतापारावारा !
सोडोनी मजला जाशी, मी करितों तव अनुकारा !
जीवन हें व्यर्थ मज वाटे ! व्यर्थचि हा सर्व पसारा !
चाल— तातहीन जातां सदनीं
मम दुर्मुख पाहुनि जननी
नभ करील आक्रांतांनीं
कैसा मी साहूं त्याला ! १

हा ताता ! एकधन्वीशा ! कुरुसैन्याच्या आधारा,
मजसाठीं वीरवरें त्वां, केलें कां या अविचारा ?

सोडुनियां रणकर्मातें, कां शोका दिधला थारा ?

चाल— टाकुनी वृत्ति वीराची
आवरिली कां विप्राची ?
गोष्ट ती शत्रुदंडाची,
आठवली कां नच तुजला २

अधमें त्या धृष्टद्युम्नें, पाहुनि तुज मूर्छित वीरा !
क्लीबापरि साधिलि संधी, पूर्वीच्या स्मरुनी वैरा !
अपमाना पात्र अशाला परि केलें कां निजशरिरा ?

चाल— मरता जरि अश्वत्थामा,
तरि करिता योधनकर्मा
मृति गांठी त्या, या शर्मा
वाटविलें कां न चित्ताला ? ३

**शालेय** : हें गाणें फार लांबलचक वाटतें बोवा !

**चंद्रसेन** : चिंता नाहीं. न्हावी आला म्हणजे तुमच्या या मिशा न् हें सगळे छाटून टाकूं म्हणजे झालें—हूं चालूं दे. पुढें काय झालें ? अश्वत्थाम्याचें समाधान कृपाचार्यांनीं केलें, परंतु घरीं अश्वत्थाम्याची वृद्ध आई कृपी होती, तिला पति मेल्याचें कळलें, तेव्हांचें तें पद म्हण पाहूं ?

**नाटक०** : 'धनुराकारा वृद्ध माउली पलितशिरा ती तशी'

**शालेय** : वा: जी बहार ! वा: जी बहार ! 'धनुराकारा' 'पलितशिरा' 'पलितशिरा' 'धनुराकारा !' वा: एकूण कवीची वाणी रसाळ यांत संशय नाहीं.

**नाटकवाला** पद

[राग पिलू–बलसागर तुम्ही वीर० या चालीवर]

धनुराकारा वृद्ध माउली पलितशिरा ती तशी
यष्टि करीं घेऊनि निघाली याया रणभूमिशीं ॥ ध्रु० ॥
वार्धक्याच्यामुळें कष्टली, पाउल नुचले जरी,
वात्याप्रेरित जीर्ण लताशीं लोटिलि शोकें तरी,
हपटत हपटत लोळत धृष्टद्युम्नाच्या शीबिरीं
आली, मार्गी आक्रंद तिचा भरे नभोविवरीं.
पतिघाती तो पाहुनि शापा अश्रुजला घे करीं,

**परी अतिश्रमवशें प्राण तिज सोडी त्या अवसरीं**
**अवनत आधिच, जीर्ण लांकडापरि पडली भूवरी,**
**तिची ही स्थिती द्रे अनुतापा धृष्टद्युम्नाशीं. १**

**शालेय** : पहा, पहा, महाराज, त्याचें तोंड अगदीं उतरून जाऊन त्याचे डोळे पाण्यानें भरून आले आहेत. – बाबा, आतां पुरें कर, पुरे कर.

**चंद्रसेन** : छान म्हटलेंस; थोडया वेळानें मी बाकीचें तुझ्याकडून म्हणून घेईन – कारभारीबाहेब, जा आणि या नाटकवाल्यांची नीट व्यवस्था लावा. अहो ऐकलेंत ना वृद्धकपी, यांची चांगली बरदास्त ठेवायची. हे नाटकवाले म्हणजे कांहीं अंशीं दवंडीवाल्यासारखे आहेत. म्हणून कारभारीसाहेब, तुम्ही मेल्यावर तुमच्या थडग्यावरच्या शिलालेखांत तुमच्यासंबंधानें कांहीं वेडेवांकडें लिहिलें तरी हरकत नाहीं, पण जिवंत असतां यांच्या तोंडून आपला दुर्लौकिक करून घेऊं नका.

**शालेय** : महाराज, त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांची व्यवस्था ठेवितों.

**चंद्रसेन** : प्रत्येक मनुष्याला त्याच्या योग्यतेप्रमाणें वागवायाचें म्हटलें तर चाबकाच्या तडाख्यांतून कोणी तरी सुटेल कीं नाहीं याचा संशय आहे. आपल्या पदवीप्रमाणें आणि योग्यतेप्रमाणें त्यांची व्यवस्था ठेवा. त्यांची पात्रता जितकी कमी तितकें तुमचें औदार्य अधिक दिसणार. त्यांना घेऊन चला.

**शालेय** : चला मंडळी.

**चंद्रसेन** : मित्र हो, जा त्याच्यामागून. उद्यां तुमचा खेळ करवूं.

[पहिल्या नाटकवाल्याशिवाय बाकीच्यांसह **शालेय** जातो.]

हे पहा, गडया, तुला मातंग राजाचा खून करून दाखवितां येईल काय ?

**नाटकवाला** : होय, महाराज.

**चंद्रसेन** : तर मग तो आपण उद्यां रात्रीं करवूं. मूळच्या भाषणांत मी दहा–बारा ओळी घातल्या तर त्या तुला म्हणतां येतील कीं नाहीं ?

**नाटकवाला** : न यायला काय झालें महाराज ?

**चंद्रसेन** : ठीक आहे.––जा कारभाऱ्याच्या पाठीमागून; आणि हें पहा, त्याची थट्टाबिट्टा करूं नका. [पहिला नाटकवाला जातो. **जुंग** व **भूंग** यांस उद्देशून] मित्र हो, आपण रात्रीं फिरून भेटूं. तुम्ही येथें आलांत हें फार चांगलें केलेंत.

जुंग : आज्ञा घेतों, महाराज. [भुंग व जुंग जातात.]

चंद्रसेन : देव तुमचें कल्याण करो ! आतां मी एकटा आहें. अरेरे, काय माझी ही दशा ! माझ्या पोटांतल्या पोटांत जे कड येताहेत त्यांची कल्पना मजखेरीज इतरांस कशी करतां येणार ? मी किती दुष्ट ! किती अधम ! श्वानांत आणि माझ्यांत भेद काय ! हा अद्‌भुत चमत्कार नव्हे का ? या पोरानें कल्पित कथेंतील पात्रांच्या भाषणाला सुरवात केल्याबरोबर आपली मनोवृत्ति अशा रीतीनें पालटून टाकावी कीं अश्रू म्हटलें कीं अश्रू, ग्लानि म्हटली कीं ग्लानि, गहिंवर म्हटला की गहिंवर; सारांश, अर्थान्तराप्रमाणें कपाळ, डोळे, भिवया, नाक, तोंड आणि आवाज हीं याला वाटेल तशीं फिरावीं !! आणि हें इतकें कशासाठीं म्हणाल तर त्यांत कांहीं अर्थ नाहीं ! त्या कृपीसाठीं ! कृपी याची कोण आणि हा तिचें काय लागतो ? माझ्याप्रमाणें त्याच्या मनःसंतापाला खरोखर कारणें असतीं तर त्यानें कोण कहर करून सोडिला असता ? मला असें वाटतें कीं, रडून रडून यानें अश्रूंनीं सर्व रंगभूमि भिजवून सोडली असती, आणि असें भाषण करिता कीं तें ऐकून चांगल्या चांगल्यांची देखील अंतःकरणें भेदून गेलीं असतीं, मग पाप्यांची कथा काय ? त्यांची तर भीतीनें पांचावर धारण बसली असती. अल्लड लोक थक्क होऊन गेले असते आणि अडाण्यांचा एकच गोंधळ होऊन गेला असता ! फार तर काय, पण डोळयांना आणि कानांना यानें पराकाष्ठेच्या विस्मयांत पाडिलें असतें. असें असतां मी पहिल्या प्रतीचा ढिला, मूर्ख आणि मठ्ठ मनुष्य, वेळ-अवेळ न पाहतां व आपल्या कामाकडें दृष्टि न देतां भ्रांतिष्टासारखा स्वस्थ बसलों आहें. साक्षात् माझ्या बापाचें वित्त आणि प्रिय प्राण यांचा नाश झाला तरी माझा गाढवाचा घुमेपणा सुटत नाही ! हा, नीचा, भेकडा ! या अधमाला कोणी पाजी असें म्हणेल काय ? याचे हे कान कोणी उपटील, याचें हें टाळकें कोणी सडकील काय ? याच्या कंबरेंत दोन लाथा कोणी मारील काय ? याच्या तोंडावर कोणी थुंकेल काय ? आणि याचा कतघ्नपना लोकांपुढे कोणी आणील काय ? हे सुजन हो, सदय व्हा, आणि यांपैकीं एक तरी शिक्षा मला बरीचशी करा; हा हा ! ती मी आनंदानें सोशीन. बकऱ्याच्या काळजापेक्षां देखील माझें काळीज भेकड अं ? अजागळा, तुला राग तरी येणार कधीं ? लोकांनीं तुझ्या अंगाची प्रत्यक्ष चमडी उडविल्याखेरीज त्यांचा सूड घेण्याची बुद्धि तुला व्हायची नाहीं, नाहीं तर दुसरा एखादा असता तर त्यानें केव्हाच त्या चोराचे तुकडे तुकडे करून कुत्र्यापुढें किंवा गिधाडापुढें घातले असते ! सख्ख्या भावजईशीं जारकर्म कर-

णाऱ्या नीचाधमा, भ्रातृघातका, चाण्डाळा ! तुझा सूड उगविल्यांवाचून मी राहीन काय ?

आ हा हा ! काय माझें शहाणपण ! काय माझी अक्कल ! काय माझें शौर्य ! वैऱ्यानें प्रत्यक्ष बापाचा जीव घेतला हें ठाऊक असून व त्याचा सूड घेण्याबद्दल आकाश–पाताल अनुमोदन देत असून मी एखाद्या बाजारच्या हलकट वेश्येसारखा त्याला शिव्या देत बसलों आहें ! आहा रे पण्डा ! !

हं, हं, हं, छे; त्यांत कांहीं हंशील नाही. पुनः कदाचित् बडबडायाला लागेन. (डोक्यावरून हात फिरवून) यांतून कांहीं बाहेर पडेल काय ? (सुचल्यासारखें करून) हो, मीं असें ऐकलें आहे कीं, ज्यांच्या हातून खून झाला असतो असे लोक नाटकास गेले असता तेथें त्यांनीं केलेल्या कृत्यासारखें कृत्य पाहण्यांत आलें तर लागलेच ते काळे पडतात, आणि आपला अपराध कबूल करितात; कारण खुनाला तोंड नसलें तरी एखादे वेळेस त्याला भलत्याच प्रकारानें वाचा फुटते. असें आहे तर मग या नाटकवाल्यांकडून माझ्या बापाच्या खुनासारखा खेळ काकाच्या पुढें करवितों; त्याच्या तोंडावर कशीं काय चिन्हें दिसतात तीं पाहतों; मधून मधून त्याला चटका लागेल असें बोलतों, आणि जर का त्याचें तोंड उतरल्यासारखें दिसलें तर मग पुढें काय करावयाचें तें माझें मला ठाऊक आहे. मीं जें पिशाच्च पाहिलें आहे तें कदाचित विघ्नसंतोषी असेल. या पिशाच्चांना पाहिजे तीं रूपें घेतां येतात हें सर्वप्रसिद्धच आहे. तेव्हां ज्याला मी आपल्या बापाचा समंध म्हणून समजत आहें, त्यानेंच माझी खिन्न आणि भांबावलेली स्थिति पाहून मला छळण्याचा बेत कशावरून केला नसेल ? असल्या पिशाच्चांच्या गप्पांवर भरंवसा ठेवून कांहीं उपयोग नाहीं. यापेक्षां चांगला पुरावा पाहिजे. राजाचें कर्म फोडण्याला खेळच करविला पाहिजे, त्याखेरीज तरणोपाय नाहीं.



# अंक तिसरा

## प्रवेश १ ला

---

**स्थळ : किल्ल्यातील एक दिवाणखाना.**

[**राजा, राणी, शालेय, मल्लिका, जुंग** आणि **भृंग** हे प्रवेश करितात.]

**राजा** : त्याच्या अंत:करणाची शांतता नाहींशी करणाऱ्या या भयंकर वेडेपणाचा तपास तुम्हांला कांहीं केल्या लावतां येईना का ? मी तुम्हांस असें विचारतों कीं या खुळांत कांहीं तथ्य आहे, किंवा सगळेच सोंग ? तुमच्या प्रयत्नांचें कांहींच चालेना ? मोठाच चमत्कार !

**जुंग** : माझी प्रकृति बिघडली आहे एवढें तो कबूल करतो, पण त्याचें कारण काय तें बिलकुल सांगत नाहीं.

**भृंग** : बरें, आपण होऊन तो कांहीं सांगेल म्हणावें तर त्याचें नांवच नको. कारण आम्ही त्याला वेडेवांकडे प्रश्न करून पेंचांत आणलें कीं वेडेपणाचें सोंग करून हा निसटलाच त्यांतून.

**राणी** : बरें, तुमची–त्याची भेट कशी झाली ? तो तुमच्याशीं नीट रीतीनें वागला का ?

**जुंग** : वा; फारच गरीबीनें आणि सभ्यपणानें.

**भृंग** : पण त्यांत पराकाष्ठेचा कृत्रिमपणा दिसे.

**जुंग** : आपण होऊन कांहीं एक प्रश्न करीत नसे; पण आम्ही जें विचारूं त्याचें उत्तर तेव्हांच देई.

**राणी** : त्याला एखाद्या खेळाच्या नादीं लावण्याचा प्रयत्न करून पाहिलांत का ?

**जुंग** : आईसाहेब, असें झालें—आम्ही जातां जातां आम्हांला वाटेवर कांहीं नाटकवाले भेटले. ती बातमी आम्ही तेथें त्याला सांगितल्याबरोबर त्याला फार

आनंद झाल्यासारखें दिसलें. ते नाटकवाले येथेंच आले आहेत, व आज रात्री त्याच्यासाठीं खेळ करण्याचा त्यांना हुकूम झाला आहे म्हणून ऐकतों.

**शालेय** : तुम्ही म्हणतां तें बरोबर आहे. आणि सरकार, उभयतांना तो पाहण्यास घेऊन येण्यासाठीं तो माझ्या पाठीमागें फार लागला होता.

**राजा** : त्यांत हो काय ? मी मोठ्या आनंदानें येईन. आणि खरेंच पुसाल तर मित्र हो, हें वर्तमान ऐकून आम्हांला फार समाधान वाटत आहे. आतां माझें तुम्हांला इतकेंच सांगणें आहे कीं, हा त्याचा नाद सुटूं देऊं नका. होईल तितकें करून त्याचें मन त्यांत गढून जाऊं द्या.

**जुंग** : सरकार, आमच्याकडून होईल तितकी खटपट करितों.

[**जुंग** आणि **भृंग** निघून जातात.]

**राजा** : प्रिये, तूंही क्षणभर एकीकडे हो. कारण मल्लिकेची आणि त्याची येथें सहज गांठ पडलीं असें घडून आणण्यासाठीं आम्ही त्याला तावडतोब निघून येण्याविषयीं सांगून पाठिवलें आहे. शालेयांनीं आणि मीं असा बेत केला आहे कीं, आम्हांला तो दिसेल, पण आम्ही त्याला दिसणार नाहीं, अशा ठिकाणीं उभे राहून, मल्लिकेची आणि त्याची भेट झाल्यावर त्यांचा जो संवाद होईल, त्याव-रून त्याच्या खुळेपणाचें कारण मल्लिकेवर त्याचें प्रेम आहे तेंच कीं काय, याचा निर्णय करावयाचा.

**राणी** : आपली मर्जी असेल त्याप्रमाणें. बाई मल्लिके, त्याला वाटेवर आणण्याला तुझ्याकडून होईल तितकी खटपट करण्यांत तूं अंतर करूं नको. तुझ्या रूपासाठीं तो वेडावला असला तर बरें होईल. त्याला पाहिल्याबरोबर भिऊन जाऊं नको; वेडेवांकडे दोन शब्द तो बोलला तर त्यासाठीं रागावूं नको. त्यानें किंचित् लगटपणा केला, तर त्याला झिटकारूं नको. तो आला म्हणजे त्याच्याशीं प्रेमानें वाग. गोड बोल. म्हणेल तें कबूल कर. सारांश, ह्या त्या रीतीनें तो ताळ्यावर येईल असें कर. तो चांगला झाला म्हणजे तुम्हांला काय कमी आहे ?

**मल्लिका** : आईसाहेब, माझ्या हातून होईल तेवढें मी करून पाहतें.

[**राणी** निघून जाते.]

**शालेय** : मल्लिके, तूं येथें फिरत रहा. महाराज, आपण कशाच्या तरी आड उभें राहूं या. मल्लिके, तूं हें पुस्तक मधून मधून वाचीत जा, म्हणजे तूं येथें एकटी असल्याबद्दल त्याला संशय येणार नाहीं. आपण करतों आहों हें कांहीं

चांगलें नाहीं. पण अनुभवावरून असें पक्कें सिद्ध झालें आहे कीं, साधूपणाचें व सालसपणाचें चांगलें ढोंग केलें, म्हणजे अट्टल सोद्यांना देखील जाळ्यांत पकडतां येतें.

**राजा** : (एकीकडे) बरोबर आहे बाबा; म्हणतोस तें अक्षरशः खरें आहे. याचें हें वाक्य माझ्या अंतःकरणाला कसें वज्रासारखें टोंचीत आहे! माझें भाषण आणि माझें आचरण! "करणी कसाबाची आणि बोलणीं मानभावाची" म्हणतात तें का मिथ्या आहे!! अहा रे पापात्म्या! तुझ्या बोलण्यांत आणि करण्यांत थोडें तरी साम्य असायाचें होतें! बाजारच्या एखाद्या थेरड्या अवदसेनें म्हातारपणा लपविण्यासाठीं गालांवरच्या सुरकुत्यांत भरलेला रंग बरा; पण आपली राक्षसी कृति लपविण्यासाठीं तीवर तूं ज्या लबाड्यांचें पांघरूण घालतोस त्या अत्यंत निंद्य होत. आतां हें अंतर्दुःख मी कसें साहूं?

**शालेय** : महाराज, तो आल्याची चाहूल होत आहे; चला, चला; आपण आड होऊं या.

[**राजा** आणि **शालेय** निघून जातात. **चंद्रसेन** प्रवेश करितो.]

**चंद्रसेन** : जगायाचें कीं मरायाचें येवढाच प्रश्न उरला आहे. कसें? दैवाच्या दारुण दुर्विलासामुळें होणाऱ्या अनंत यातना मनांतल्या मनांत सोसाव्या हें बरें, किंवा जिवावर उदार होऊन त्यांचा समूळ प्रतिकार करण्यास उद्युक्त व्हावें हें बरें? मरणें—निजणें—हो, दोन्ही सारखींच! यांत काय अधिक आहे? आणि निजणें म्हणजे अंतःकरणाला आणि शरिराला सतत जाचणाऱ्या ज्या अनंत आधि व व्याधि त्यांचा क्षणभर विसर पाडणें. असें होईल तर किती इष्ट गोष्ट होईल! मरणें—निजणें—निजणें! पण त्यांत स्वप्न पडलें तर? हां, येथें पंचाईत आली खरी. कारण या नाशवंत कुडीचा त्याग करून ती महानिद्रा घेऊं लागल्यावर काय काय स्वप्नें पडतील याचा निश्चय करतां येत नसल्यामुळें साहस करण्यास धीर होत नाहीं; आणि म्हणूनच आम्ही आपलें सगळें आयुष्य दुःखांत काढितों; नाहीं तर निर्दय कालाचे तीव्र कोरडे कोण ओढून घेतो? जुलमी लोकांचे अन्याय किंवा गर्विष्ट लोकांचा उद्दामपणा कोण साहता? प्रेम-भंगामुळें मनात होणाऱ्या अनंत वेदना, न्याय मिळण्यास लागणारा उशीर, अधिकाऱ्यांचें उद्दाम आचरण, आणि बिचाऱ्या सहनशील गुणवान् लोकांना विचारशून्य अज्ञान लोकांचे जे लत्ताप्रहार घ्यावे लागतात, या सर्वांचा धारेच्या वीतभर पात्यानें शेवट करितां येता, तर तें कोण सोसता? हा दुर्वह प्रपंचभार डोकीवर घेऊन हें दुःसह्य आयुष्य कण्हत कण्हत कोण कंठिता? पण उपाय काय?

ज्याच्या सरहद्दीवर पाय टाकलेला कोणीहि पांथ परत येऊं शकत नाहीं, अशा त्या यमलोकांत एकदां प्रवेश केल्यावर पुढें काय होईल या भीतीनें आमच्या बुद्धीचा निश्चय ढळतो, आणि आम्ही ज्या व्यथा सोशीत असतों त्याच सोसणें बरें, पण ज्या अदृष्ट व अननुभूत आहेत त्यांत उडी घालणें नको असे वाटूं लागतें. याप्रमाणें विचार करण्यानें आम्हां सर्वांच्या पदरीं भेकडपणा येतो, बुद्धीचा निश्चय झाल्याबरोबर मनास वाटणारा जो उल्हास तो 'करूं कीं नको करूं' असल्या विचारांनीं तेव्हांच गलित होतो, आणि मोठमोठ्या साहसाच्या प्रचंड कल्पनांचा ओघ मागें फिरून त्या कधींच सिद्धीस न जातां जेथल्या तेथें लय पावतात.—पण हो; अरे, ही रमणीय मल्लिका!—चारुगात्री, तुझ्या स्तवानें माझ्याही पापांचें क्षालन होवो!

**मल्लिका** : महाराज, अलीकडे आपलें कसें काय चाललें आहे?

**चंद्रसेन** : ठीक आहे.

**मल्लिका** : महाराज, आपण मला कांहीं वस्तु प्रीतीनें नजर केल्या होत्या, त्या मी कित्येक दिवस परत करण्याच्या विचारांत होतें. आज त्या आपण परत घ्याव्या अशी विनंती आहे.

**चंद्रसेन** : छे:, मीं नाहीं. मीं आपणांला कधीं कांहीं दिलें नाहीं.

**मल्लिका** : महाराज, आपण नीट आठवण करून पहाल तर त्या दिल्या होत्या असें आपल्या लक्षांत येईल. आणि त्या देतांना जीं मधुर भाषणें केलीत तीं तर त्यांच्यापेक्षां अधिक मोलाचीं होतीं. आतां त्यांचा स्वाद गेला आहे. यासाठीं त्या परत घ्या. कारण दिलेल्या देणग्या, देणारा निष्ठुर झाला म्हणजे, उदार प्रकृतींना त्या नकोशा होतात. ह्या घ्या.

**चंद्रसेन** : हां, हां, आपण प्रामाणिक आहां का?

**मल्लिका** : कसें म्हणतां, महाराज?

**चंद्रसेन** : आपण रूपवती आहां का?

**मल्लिका** : आपलें म्हणणें तरी काय, महाराज?

**चंद्रसेन** : आपण जर प्रामाणिक आणि रूपवती असाल, तर आपल्या प्रामाणिकपणाचा रूपाशी कांहीं एक संबंध ठेवूं नका.

**मल्लिका** : सौंदर्याला प्रामाणिकपणापेक्षां दुसरा कोण भला सोबती मिळणार?

**चंद्रसेन** : हो, तें खरें; कारण सौंदर्याच्या अंगीं असें सामर्थ्य आहे की, तें प्रामाणिकपणाला आपल्यासारखें तेव्हांच छिनाल करून सोडील, पण प्रामाणिक-

पणाच्यानें सौंदर्याला आपल्यासारखें लवकर करवणार नाहीं. कित्येक दिवसपर्यंत लोकांना हें मोठें गूढ कोडें वाटे. पण अलीकडे त्याची सत्यता सर्वांच्या प्रत्ययास आली आहे. होतें खरें माझें एकदां तुमच्यावर प्रेम.

**मल्लिका** : महाराज, आपण असें मला भासविलें खरें.

**चंद्रसेन** : आपण माझ्यावर भरंवसा ठेवायाचा नव्हता. नवीन सद्‌गुण जोडल्यानें पहिला दुर्गुण समूळ नाहीसा झाला असें घडत नाहीं. मी आपल्यावर प्रीति ठेवलीच नाहीं.

**मल्लिका** : तर मग आपण मला फारच फसविलें.

**चंद्रसेन** : आतां आपण एखाद्या मठांत चालत्या व्हा. पाजी लोकांचें आई-पण आपल्या शिरावर विनाकरण कशासाठीं घेतां ? मी सरासरी प्रामाणिक आहें. तरी माझ्याही अंगांत असे कांहीं दुर्गुण आहेत कीं मला पाप्याला आईनें जन्म दिला नसता तरी बरें झालें असतें. मी फार गर्विष्ठ, खुनशी आणि महत्त्वाकांक्षी असा आहें. लोकांच्या खोडचा करण्याच्या कल्पना अहोरात्र माझ्या डोक्यांत 'हूं' म्हणून एकावर एक येत असतात; त्यामुळें कोणती आधीं करूं आणि कोणती मागून करूं असल्या अनिश्चयानें माझी अगदीं त्रेधा उडून जाते. पृथ्वीला निव्वळ भार असे माझ्यासारखे निरुपयोगी जीव जन्माला येऊन जगाला काय फायदा ? आम्ही सगळे पक्के दगलबाज हरामखोर आहों; आमच्यापैकीं कोणावरही विश्वास ठेवूं नको. आपली एखाद्या मठाची वाट धर. आपले वडील कोठें आहेत ?

**मल्लिका** : घरीं आहेत, महाराज.

**चंद्रसेन** : तर मग जा आणि त्यांना आतांच्या आतां कोंडून घाल. कारण त्यांच्या शहाणपणाचा प्रताप त्यांना आपल्या घरांतल्या घरांत उधळूं दे; त्याचा प्रभाव बाहेर यायाला नको. यावें तर.

**मल्लिका** : जगन्नाथ, या राजबिंड्याकडे करुणार्द्र दृष्टीनें पहा !

**चंद्रसेन** : तूं जर लग्न करीत असलीस तर तुला एका आशीर्वादाचें आंदण देतों; तें हें कीं, तूं परिटघडीसारखी पतिव्रता राहिलीस किंवा सफेतीसारखी निष्कलंक असलीस, तरी तुझ्यावरचा लोकापवाद म्हणून टळणार नाहीं. याकरितां जोगीण बन आणि एखाद्या मठांत चालती हो. ऊठ. अथवा लग्न करण्याविषयीं तुझा आग्रहच असला तर तें एखाद्या ठोंब्याशीं लाव; कारण तुमच्यामुळें आपल्या तोंडाला काळोखी कशी येते हें शहाण्या लोकांना पक्कें ठाऊक झालें

आहे. तर मग गोसावीण हो आणि बिलंब न लावतां एखाद्या मठांत दडी दे. यावें ! यावें !

**मल्लिका** : जगच्चालका, ब्रह्मांडनायका ! यांच्यावर कृपा कर आणि यांना ताळ्यावर आण.

**चंद्रसेन** : आपल्या चितारकामाची आख्याही माझ्या ऐकण्यांत आली आहे. ईश्वरानें आपणांस एक चेहरा दिला असून आपण आपल्याकरितां दुसरा उत्पन्न करितां ! जाऊं दे कीं, त्याची पंचाईत मला कशाला पाहिजे ? मीं त्याचा नादच सोडला आहे. त्यानें माझें डोकें अगदीं फिरवून सोडिलें. हें पहा, याउप्पर आपल्याला लग्नेंच नकोत. जे आधींच त्या पाशांत सांपडून चुकले आहेत त्यांपैकीं एक मात्र सोडून बाकीचे आहेत तसे राहूं दे. पण अविवाहितांनीं ब्रह्मचर्यच आचरिलें पाहिजे. चल जा, एकदम मठाची वाट धर कशी !

[**चंद्रसेन** निघून जातो.]

**मल्लिका** : (सुस्कारा टाकून) परमेश्वरा, या उदार आत्म्याची काय दुर्दशा ही ! दृष्टि राजपुरुषाची, वाणी पंडिताची, छाती शिपायाची—या सुंदर राष्ट्राचा सगळा जीव आणि सगळी शोभा — व्यवहार आणि आचार यात अनुकरण करण्यासाठीं ज्यानें त्यानें आपल्यापुढें ठेविलेला कित्ता, व सर्वांचें चित्त आकर्षणारा लोहचुंबक ! अरेरे ! सर्वस्वीं गेला, सर्वस्वीं गेला ! आणि मी ? छे: ! माझ्यासारखी दु:खी आणि हतभागी स्त्री जन्मास कधींच आली नसेल. ज्या मला याचा प्रेमयुक्त भाषणमधु एकवार सेवितां आला त्या मला याच्या उदार आणि अद्वितीय बुद्धीला झालेला भ्रंश पहावा लागावा ना ? शिव शिव ! तडा गेला म्हणजे भांड्याचा नाद जसा राहत नाहीं, त्याप्रमाणें या वेडेपणामुळें याच्या बुद्धींतील स्थिरता नाहींशी होऊन याचें अनुपम रूप व प्ररूढ तारुण्य यांची माती माती झाली ! ज्या मीं ते दिवस पाहिले त्या मला हे दिवस पहाण्याचें कपाळीं यावें ना ! धिक्कार असो जीविताला !

[**राजा** आणि **शालेय** पुन: प्रवेश करितात.]

**राजा** : प्रेम ? छे ! तिकडे त्याच्या मनाचा कल मुळींच नाही. तसेंच तो जें थोडेंसें बोलला तें वेडेंवाकडें तर होतें, पण शुद्ध वेडेपणाचें होतें असें नाहीं. त्याच्या अंत:करणाला कांहीं तरी खात आहे, व त्याचें पुन: पुन्हां चिंतन केल्यानें त्याच्या मनाला उद्विग्नता उत्पन्न झाली आहे. आणि मला अशी शंका वाटते की, तिचीं कारणें आपण बाहेर पडूं दिलीं तर पुढें—मागें मोठी भीति उत्पन्न होण्याचा संभव आहे. यासाठीं मीं झटदिशीं असें ठरवून टाकिलें आहे कीं फार दिवस

मागें पडलेल्या खंडणीची मागणी करण्यासाठीं त्याला ताबतोब श्वेतद्वीपास पाठवून द्यावें. असें केल्यानें समुद्राची भव्य शोभा त्याच्या दृष्टीस पडेल, व निरनिराळे देश, व त्यांतील चमत्कारिक चमत्कारिक आणि तऱ्हेतऱ्हेचे देखावे पाहून त्याच्या अंतःकरणाला पीडणारी व्यथा कदाचित् दूर होईल, व तसें झाल्यानें त्याची बुद्धि ताळयावर येईल. कां, तुमचें कसें काय म्हणणें आहे ?

**शालेय** : हो, तेंही बरें आहे. पण मला असें वाटतें की, त्याच्या व्यथेला सुरुवात होण्यास पाहिलें कारण प्रेमखण्डन झालें आहे. मल्लिके, यावर तुझें काय म्हणणें आहे ? तुझें आणि चंद्रसेनाचे जें बोलणें-चालणें झालें तें तूं आम्हांला सांगायला पाहिजे आहेस असें नाहीं, आम्हीं तें सर्व ऐकलें आहे. महाराज, आपणांस वाटेल तसें करावें; पण आपणांस पसंत पडलें तर—मला असें वाटतें कीं, येवढा आजच्या रात्रीचा खेळ झाल्यावर राणीसाहेबांनी त्याची एकान्तीं गांठ घ्यावी, आणि त्याजपासून त्याच्या अस्वस्थतेचें कारण काढून घेण्याची खटपट करून पाहावी. त्यांनीं त्याच्याशीं बोलतांना कृत्रिम भाव अगदीं ठेवूं नये; त्याच्या पोटांत शिरून त्याचें काय म्हणणें आहे तें काढून घ्यावें. आणि आपण आज्ञा द्याल तर त्याचें भाषण समग्र ऐकून घेतां येईल अशा ठिकाणीं मी लपून बसतों. राणी साहेबांकडून त्याच्या अस्वस्थतेचें निदान नाहींच झालें तर त्याला श्वेतद्वीपाला पाठवून द्या, किंवा येथें कोठें तरी अटकेंत ठेवा. तात्पर्य, ही युक्ति सफल नाहीं झाली तर आपणांस वाटेल तें करा.

**राजा** : बरें तर, अगोदर तुम्ही म्हणतां तसेंच करून पाहूं. थोरांच्या वेडासंबंधानें बेसावध राहून उपयोग नाहीं.

[सगळे निघून जातात.]

## प्रवेश २ रा

स्थळ–किल्ल्यांतील एक वाडा.

[ **चंद्रसेन** आणि **नाटकवाले** प्रवेश करितात. ]

**चंद्रसेन** : मी तुला सांगितलें आहे त्याप्रमाणें हुबेहूब तें उठवून दे. बाकीच्या नाटकवाल्यांप्रमाणें हवा तसा ओरडत सुटूं नको. कारण तसें करणें मला पसंत पडतें तर तें तुझ्याकडे न देतां गांवच्या दवंडीवाल्याकडे दिलें असतें. दुसरें हें ध्यानात ठेव की, प्रसंगविशेषीं मात्र हात हालवायचें; नाहीं तर आपले एकसारखे पट्ट्याचे हात करीत बसशील ! कारण मनोवृत्ति कितीही उच्छृंखल झाल्या असल्या तरी बोलण्यांत नेमस्तपणा ठेवला म्हणजे भाषण चित्तवेधक होतें.

पुष्कळदां कर्कश पोरें 'क्यें' करून जेव्हां ओरडतात, तेव्हां माझ्या पायाची आग मस्तकास चढते. असल्या मूर्खपणानें रस उत्पन्न न होतां भाषणाच्या चिंधड्यान् चिंधड्या होतात, व रंगभूमीजवळ बसणारांच्या कानठळ्या बसतात. असल्या गद्ध्याच्या पाठीचें मला चाबकानें धिरडें करून टाकावेंसें वाटतें ! या राजश्रीनें एकदां तोंड उघडलें की, याच्यापुढें कैदाष्णीचेंसुद्धां तोंड बंद !

**नाटकवाला** : महाराज, माझ्या हातून असें व्हायाचें नाहीं हें खात्रीनें सांगतों.

**चंद्रसेन** : त्राटिकेचा सूर काढूं नको असें म्हटलें म्हणून आपला तोंडांतल्या तोंडांत मुळमुळ करीत बसशील ; पण तेंही उपयोगाचें नाहीं. या कामांत ज्याची त्यानें अक्कल खर्चिली पाहिजे; पढवून किती येणार आहे ? भाषण आणि अभिनय हीं एकमेकांना जुळून चाललीं पाहिजेत. फाजीलपणा बिलकुल कामाचा नाही. कारण नाटक म्हणजे काय तर स्वभावाचें यथोचित अनुकरण; म्हणून त्यांत एखादी बाजवीपेक्षां फाजील गोष्ट झाली, म्हणजे त्याचा तेव्हांच बेरंग होऊन जातो. सात्त्विकपणाची मुद्रा निराळी, तिरस्काराची मुद्रा निराळी. तात्पर्य काय कीं, रस आणि समय यांच्या अनुसंधानानें अभिनय झाला पाहिजे. याचा अतिक्रम झाला किंवा हा कमी पडला म्हणजे अज्ञ लोकांना मात्र हंसूं येतें, पण सहृदय प्रेक्षकांना पराकाष्ठेचा खेद होतो. हजारों अरसिक प्रेक्षकांनीं टाळी दिली, पण अशांपैकीं एकानें जरी नाक मुरडलें, तरी सर्व खेळावर पाणी पडलें असें तुम्ही मानिलें पाहिजे. माझ्या पहाण्यांत असे कित्येक नाटकवाले आले आहेत कीं, ज्यांची अरसिक व मूर्ख लोक पराकाष्ठेची वाखाणणी करीत असतात, पण त्यांच्यांत गुण म्हणाल तर काडीचा देखील नसतो. बोलणें काय, गाणें काय, पोशाख काय; त्याचें सगळें बकासुरी काम ! असल्या नाटक्यांना कोपरापासून नमस्कार असो ! हे बेटे मनुष्यस्वभावाची इतकी खराब बतावणी करतात कीं, त्यामुळें मला कधीं कधीं वाटतें कीं, या लोकांना आमच्या नेहमींच्या ब्रह्मदेवानें घडविलेलें नसावें, तर त्यांच्याकरितां कोणी तरी भाडोत्री ब्रह्मदेव धरून आणला असावा.

**नाटकवाला** : आम्ही त्या बाबतींत आपल्याकडून पुष्कळ सुधारणा केली आहे, महाराज.

**चंद्रसेन** : नुस्ती सुधारणा काय उपयोगी ? तसल्या प्रकारची चुकीन् चुकी काढून टाकली पाहिजे. तुमच्यांत जो विदूषकाचें सोंग घेणारा असेल त्यानें जेवढें पुस्तकांत लिहिलें असेल तेवढेंच बोलावें. नाहीं तर कांहीं कांहीं असे

फाजील विदूषक असतात कीं दुसऱ्यांस हंसविण्यासाठीं ते आपले दांत अगोदर विचकतात. यांनीं बत्तीशीं काढून लोकांना खो खो करायला लावलें म्हणजे बाकीच्या पात्रांचे श्रम फुकट जाऊन श्रोत्यांच्या मनांवर वाईट परिणाम होतो, व खेळाचा फजिता उडून जातो. यासाठीं ग्रंथकाराकडे लक्ष न देतां जे कोणी अद्वातद्वा भाषण करितात, ते मोठें वाईट काम करितात. असें करण्यांत त्यांना मोठी शेखी वाटते, पण त्यांत फार नुकसान आहे. असो, तुम्ही पुढें चला आणि सगळी तयारी ठेवा; जा, उठा तर मग. [खेळवाले पडद्यामागें जातात.]

[**शालेय, जुंग** व **भृंग** हे प्रवेश करितात.]

**चंद्रसेन** : कसें काय खासगी कारभारी ? आज काका येताहेत का नाटक पाहायाला ?

**शालेय** : नुसते काकाच का ? आईसाहेबसुद्धां, आणि आतांच्या आतां.

**चंद्रसेन** : जा तर मग, त्यांना लवकर तयारी करायला सांगा. (**शालेय** जातो.) बरें, तुम्ही दोघेजण जा आणि त्यांना घाई करा.

**जुंग** :<br>**भृंग** : } —हो, जातों महाराज.

[ **जुंग** आणि **भृंग** जातात; व **प्रियाल** प्रवेश करितो. ]

**चंद्रसेन** : कोण आहे तिकडे ? आः हा ! प्रियालराज, आपण का ते ?

**प्रियाल** : चाकरीसाठीं सेवक तयार आहे, महाराज.

**चंद्रसेन** : प्रियाला, तुझा निःसीम प्रामाणिकपणा पाहून मला असें वाटतें कीं, दुनियेंत असा दुसरा मित्र पैदा होणें अशक्य आहे.

**प्रियाल** : उदार धनीसाहेब, त्यांत काय आहे !

**चंद्रसेन** : मी तुझी व्यर्थ स्तुति करितों आहें असें समजूं नको. कारण कसा तरी नीतीनें चरितार्थ करून आनंदानें राहणाऱ्या तुझ्यासारख्या गरीबाची स्तुति करून मला काय मिळावयाचें आहे ? गरीब लोकांची स्तुति करतो कोण ? ज्या हलकट श्रीमंत लोकांची स्तुति केल्यानें पैसा उखळतां येण्याजोगा असेल त्यांच्या पायांवर कुत्र्यासारखें वागडण्यांत किंवा त्यांचे हात चाटण्यांत कांहीं फायदा तरी आहे. साखरपेरे लोक अशांची हांजी हांजी करून कधीं कधीं घरें भरून घेतात. पण तुझ्यासारख्याला विचारतो कोण ? तथापि माझ्या बुद्धीला बऱ्यावाईटाची निवडानिवड करितां येऊं लागल्यापासून, व भला मनुष्य कोण, लबाड मनुष्य कोण हें मला कळूं लागल्यापासून, माझें मन तुझ्यावर बसलें आहे. कारण तुझी वृत्ति अशी आहे कीं, पाहिजे ती विपत्ति सोसून तिच्याबद्दल मनाला येवढेंसुद्धां

वाईट वाटूं द्यावयाचें नाहीं, आणि दैवाच्या विचित्र गतीमुळें चांगलें वाईट कसेही प्रसंग आले तरी सदा आनंदी असावयाचें. तात्पर्य काय कीं, अडचणी आल्याबरोबर हवें तसें भकत न सुटतां जे विचारानें वागतात, व नीतिपराङ्मुख होत नाहींत, ते पुरुष धन्य खरे ! लाभालाभाच्या आशेनें ज्याच्या मनोविकारांत फरक होत नाहीं असा मनुष्य मला दाखीव; मी त्याला अहोरात्र कंठाशीं धरीन, इतकेंच नाहीं, तर तुझ्याप्रमाणें त्याला हृदयाच्याहि हृदयांत घालून ठेवीन. असो, आमचें पांडित्य भलतीकडे झुकायाला लागलें तें आटपून धरून प्रस्तुत विषयाकडे नजर दिली पाहिजे. हें पहा, आज राजापुढें एक खेळ होणार आहे. त्याच्या संविधानकाचा एक भाग आणि आमच्या वडिलांच्या मृत्यूचा प्रकार हे फार जुळतात. याकरितां माझें तुला असें सांगणें आहे कीं, त्या प्रवेशाला आरंभ झाला म्हणजे तूं काकांच्या तोंडाकडे एकसारखी टक लाव आणि त्यांच्या मुद्रेवर काय फरक होतो तो पहा. या प्रवेशांत एक भाषण आहे तें ऐकल्याबरोबर त्यांचें तोंड खर्‌कन उतरून जाऊन चोरून केलेल्या अपराधाच्या भीतीनें तें काळें पडलें नाहीं तर तो समंधबिबंध सगळें झूट व आमच्या कल्पना पहिल्या प्रतीच्या गचाळ असें मानिलें पाहिजे. तर मग एकीकडून तूं त्याच्याकडे पहात रहा व दुसरीकडून मी रहातों; आणि खेळ आटपला म्हणजे आपण दोघे एके ठिकाणीं बसून त्याच्या चर्येविषयीं चर्चा करूं.

**प्रियाल :** ठीक आहे, महाराज. खेळ चालला असतां त्यांच्या चेहऱ्यावरील झालेला, फार तर काय, तनसडीइतका फरक माझ्या नजरेखालून सुटला तर म्हणाल तें ऐकेन.

**चंद्रसेन :** खेळासाठीं मंडळी निघालीसें वाटतें. आता आमचें वेड आम्हांला घेतलें पाहिजे. तूं एखादी सोईची जागा धरून बस.

[वाजत-गाजत **राजा, राणी, शालेय, मल्लिका, जुंग, भृंग,** आणि
दुसरे लोक प्रवेश करितात.]

**राजा :** चंद्रसेना, कसें काय आहे?

**चंद्रसेन :** वारा खाऊन पाणी पिऊन भला भक्कम माजलों आहें. भूक लागल्यास आपलीं गोड गोड वचनें आहेतच आहेत. खबुतरें देखील तुम्हांला अशीं पाळतां येणार नाहींत.

**राजा :** चंद्रसेना, असलें काय उत्तर दिलेंस ? हे कांहीं आमचे शब्द नव्हत.

**चंद्रसेन :** आतां ते माझेही पण नाहीत. (शालेयाकडे वळून) कां हो

कारभारी समशेरबहादूर, तुम्ही शाळेंत असतांना नाटकांत एकदां नाचलां होता, नाहीं बरें ?

**शालेय** : होय महाराज; आणि त्याबद्दल लोकांनीं माझी तारीफ केली.

**चंद्रसेन** : ज्याकरितां लोकांनीं आपली येवढी तारीफ केली, असें आपण कोण बनलां होतां ?

**शालेय** : मी सर्वजय झालों होतों. हजारी चौकांत माझा मोक्ष झाला. वीरशर्म्यानें माझ्या पोटांत खंजीर खुपसला.

**चंद्रसेन** : अशा गरीब मेंढराचा जीव घेणारा लांडगा खरा. खेळवाल्यांची तयारी आहे का ?

**जुंग** : होय महाराज. आपल्या हुकुमाची ते वाट पाहाताहेत.

**राणी** : चंद्रसेना, ये बाळ, मजजवळ बैस.

**चंद्रसेन** : छे आई, हें इकडे एक मोहक पांखरूं आहे !

**शालेय** : (राजाकडे पाहून)—हें पाहिलेंत ना, महाराज ?

**चंद्रसेन** : (मल्लिकेस) बाईसाहेब, आपल्या शेजारीं जागा देतां का ?

[**मल्लिकेच्या** पायांजवळ बसला राहतो.]

**मल्लिका** : हें काय महाराज ?

**चंद्रसेन** : भिऊं नका, मी दुसरें तिसरें कांहीं करीत नाहीं; आपल्या पायांवर डोकें टेकतों. टेकूं का नको ?

**मल्लिका** : आपण आज फार आनंदी दिसतां, महाराज.

**चंद्रसेन** : कोण, मी ?

**मल्लिका** : होय महाराज.

**चंद्रसेन** : छेः, आपल्या पायांचा चाकर; आनंदी नसावें तर काय करावें ? पहा आमच्या आईसाहेब कशा आनंदी दिसताहेत, आणि आमच्या बापाला मरून दोन प्रहरसुद्धां झाले नाहींत.

**मल्लिका** : असे काय भलतेंच बोलतां, महाराज ? त्यांना मरून बेंदुणी चार महिने झाले.

**चंद्रसेन** : हं, हं ? इतके दिवस झाले का ? अबब ! किती काळ लोटला हा ! मग ठीक. आमचा बाप तरी मोठा चिकट; दोन महिने झाले तरी माझे डोकें तो सोडीत नाहीं. यावरून झालें काय कीं कोणी मोठा मनुष्य मेला तर त्याची आठवण त्याच्या पाठीमागें चार–सहा महिने राहायाला कांहीं हरकत नाहीं. पण चार महिन्यांकरितां देखील त्याची समाधि बांधली पाहिजे; नाहीं तर गिधाडांनीं मटकावून टाकलेल्या सडक्या गाढवासारखा त्याचा मागमूस

देखील राहायाचा नाही. असल्या गाढवाच्या थडग्यावर "मेलास बा मेलास, जगा विसरलास." असा लेख असतो !!

[तुताऱ्या वाजतात. देखाव्याला आरंभ होतो. एक राजा आणि एक राणी मोठ्या प्रेमानें प्रवेश करितात; राजा तिच्या आणि ती त्याच्या गळ्याला मिठी मारते; ती त्याच्यापुढें गुडघे टेकून तुझ्यावर माझें स्थिर प्रेम आहे अशा खुणा करिते. तो तिला वर उचलतो आणि आपलें डोकें तिच्या खांद्यावर ठवतो; ती त्याला एका पुष्पशय्येवर टेकविते, आणि तो निजला असें पाहून चालती होते. नंतर एक पुरुष येतो, त्याचा मुकुट काढून घेऊन तो त्याचें चुंबन घेतो, आणि त्याच्या कानांत विष ओतून निघून जातो. राणी परत येते, आणि राजा मेला आहे असें पाहून पराकाष्ठेचें दुःख झाल्याची चिन्हें दाखविते. दोन-तीन मुक्यांसह विष घालणारा पुरुष पुनः येतो, आणि राणीप्रमाणें दुःख झालें आहे असें दाखवितो. मुके राजाचें प्रेत घेऊन जातात. तो पुरुष मोठमोठ्या नजरा पुढें करून पाणिग्रहण करण्याविषयी राणीचें मन वळवितो; कांहीं वेळपर्यंत ती कांकूपणा आणि नाखुषी दाखविते, पण शेवटीं त्याच्या मागणीला रुकार देते. नंतर सर्व निघून जातात.]

**मल्लिका** : याचा अर्थ काय, महाराज ?

**चंद्रसेन** : याचा अर्थ पाजी अर्थसाधूपणा; याचा अर्थ मुका खोडसाळपणा.

**मल्लिका** : मला वाटतें या मुक्या देखाव्यानें खेळाचें संविधानक सूचित होतें.

[**सूत्रधार** प्रवेश करितो.]

**चंद्रसेन** : हा हा गोमाजी त्याचा अर्थ सांगेल. हे नाटकवाले बेटे असले उतावीळ असतात कीं, त्यांच्या तोंडांत एवढें म्हणून गुह्य राहायाचें नाहीं; आपलें सगळें सांगत सुटायाचें.

**मल्लिका** : ह्या देखाव्याचा हेतु काय तो हा मनुष्य सांगेल काय ?

**चंद्रसेन** : तो हा सांगेल; आणखी पाहिजे तें सांगेल; त्याला दाखवाल तें तो सांगेल, किंवा सांगाल तें तो दाखवील. त्याला दाखविण्याची मात्र भीड धरतां कामा नये, म्हणजे सांगायला तिसरा पाय !

**मल्लिका** : महाराज, आपण हें काय बोलूं लागलां ? आपल्या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. जाऊं दे कीं, मी आतां आपल्याशीं बोलतच नाहीं. मी आपली खेळाकडे लक्ष देतें.

**सूत्र०** : आमच्यासाठीं व आमच्या खेळासाठीं हात जोडून खावंदास अशी विनंती आहे कीं, कृपा करून एक-दोन अंक करून दाखविणार आहों, त्यांकडे सर्वांचें अवधान असावें. [निघून जातो.]

**चंद्रसेन** : याला का प्रस्तावना म्हणावी कीं प्रस्तावनेचा प्रत्याहार म्हणावा ?

**मल्लिका** : ही फारच अल्प प्रस्तावना झाली; नाहीं बरें महाराज ?

**चंद्रसेन** : खरोखरीच बायकाच्या प्रेमासारखी अल्प !

[एक **राजा** आणि एक **राणी** प्रवेश करितात.]

**खे० राजा** : अग्निब्राह्मणांसमक्ष उपाध्यायानें आमचे हातांत हात घातल्यास व कामदेवानें आमच्या अंतःकरणांची ऐक्यता करून दिल्यास आज पक्कीं तीस वर्षें झाली; येवढ्या काळांत भगवती वसुंधरेसभोंवतीं भगवान् सूर्यनारायणाचे तीस वेढे झाले, व परप्रकाशित शीतचंद्रानें 'तीस गुणिले बारां'दां आपला क्षयवृद्धीप्रत पावणारा आनंददायक व कामीजनांस त्रासदायक प्रकाश भूमंडलावर पाडिला. पण आमचें प्रेम पहिल्या दिवसासारखें अढळ आहे.

**खे० राणी** : आमच्या प्रेमाची ताडातोड होईपर्यंत आणखी अशींच तीस वर्षें लोटोत ! परंतु आपली प्रकृति अलीकडे इतकी क्षीण झाली आहे, व आपली पहिली आनंदवृत्ति नाहींशी होऊन आपल्या मुखश्रीवर इतकी ग्लानि आली आहे कीं, मला आतां आपला अगदी भरंवसा नाहीं !! तथापि प्राणनाथ, मला आपला भरंवसा नाहीं असें जें मी म्हणतें व वारंवार शंका घेतें, यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण प्रीतीमुळें बायका वाजवीपेक्षां फाजील भितात; व बायकांच्या प्रेमाला आणि भयाला परमावधि नसल्यामुळें अमुक बायको फाजील प्रीति करते किंवा अमुक बायको फाजील भिते असें म्हणतां येत नाहीं. आतां माझी आपल्यावर किती प्रीति आहे हें माझ्या वागणुकीवरून आपल्या अनुभवास आलेंच आहे. म्हणून माझी जशी प्रीति तसें माझें भय. ज्या ठिकाणीं प्रीति मोठी, त्या ठिकाणीं शंकेला येवढेसें कारण झालें कीं भीतीला जागा होते. तसेंच ज्या ठिकाणीं भीतीला येवढीशी जागा असतां ती थोड्यांत मोठी होते, त्याठिकाणीं खरेंच मोठें प्रेम आहे असें समजावें.

**खे० राजा** : प्रिये, तुला येथें टाकून लवकरच मला जावें लागेल असें वाटतें ! माझे आतां हातपाय अगदीं चालेनासे झाले. असो, ईश्वरकृपेनें तूं तरी माझ्या पाठीमागें आनंदी सुखी आणि सद्गुणी रहा म्हणजे झालें; आणि खरो-

वर तुला सांगून ठेवतों, मी गेल्यावर माझ्यासारख्याच एखाद्या मायाळू मनुष्याशीं तूं आपला विवा–

**खे० राणी** : प्राणनाथ, कशाला उच्चारितां तीं पुढलीं अक्षरें ! असलें बेइमानाचें काम माझ्या हातून होईल काय ? ज्यांनीं आपला पहिला नवरा मारला असतो त्याच टवळ्या दुसरा नवरा करतात ! देवा, माझ्या मनांत असली दुष्ट बुद्धि कधीं आली तर माझें एकदम निसंतान कर !

**चंद्रसेन** : याला म्हणतात गुळवेल, नांव गोड आणि सत्त्व कडू.

**खे० राणी** : खरी प्रीति म्हणजे पहिल्या लग्नांत; दुसरें लग्न करायचें तें आपलें पैशासाठीं ! इश्श रे देवा, आग लागेना मेली त्या पैशाला ! तो काय मेला डोंबलावर घालून घ्यायचा आहे ! प्राणनाथ, आपल्या पाठीमागें ही काया दुसऱ्याच्या स्पर्शानें बाटवून घेऊन आपल्याला अधोगति आणूं कीं काय ?

**खे० राजा** : तूं बोलते आहेस त्याप्रमाणें तुझें अंतःकरण असेल तर मला आणखी काय पाहिजे ? पण, प्रिये, वारंवार होतें काय कीं आपण जो निश्चय करितों तो आपला आपणच मोडितों. स्मरण तरतरीत असतें तोंपर्यंत मी असें करीन व तसें करणार नाहीं असें बुद्धीला वाटतें; कोणताही विचार मनांत तत्क्षणीं येतो, पण तो हातून तडीस जाण्यास मोठी मुष्कील पडतें ! बोलणें सोपें, करून दाखविणें कठीण आहे ! फळ हिरवें असतें तोंपर्यंत तें डेखाला धरून राहतें; पण पिकून जड झालें कीं जमिनीवर पडतें. आपल्याला लोकांचें जें देणें असतें तें आपण तेव्हांच विसरून जातो. हे फार स्वाभाविक आहे ! मनोविकारांच्या भरांत आपण जो निश्चय करितों तो ते विकार नष्ट झाले म्हणजे आपण विसरतों. सुखदुःखाच्या अतिरेकांत केलेल्या निश्चयांचा लय त्यांच्याबरोबरच होतो. जें प्रथम अतिशय आनंदाला कारण, तेंच पुढें अतिशय शोकाला कारण होतें. थोड्या निमित्तानें दुःखाचें सुख आणि सुखाचें दुःख होतें. या जगांत स्थिर म्हणून काहीं नाहीं. यासाठीं ज्याप्रमाणें अनूकूल–प्रतिकूल दैव होत जाईल त्याप्रमाणें मनुष्यमात्रांचें प्रेम फिरणें हें साहजिक आहे. कारण, वित्ताला प्रेम ओढतें, की प्रेमाला वित्त ओढतें, याचा निश्चय अद्यापि आमच्या हातून झाला नाहीं. मोठा मनुष्य पतित झाला कीं त्याच्या गळ्यांतले ताईतसुद्धां त्याला सोडून जातात. गरीब मनुष्य पुढें सरसावला कीं, त्याला शत्रूचे मित्र होतात. आणि आजपर्यंत तर अशी स्थिति आहे कीं, जिकडे वित्त तिकडे प्रेम; कारण, ज्याला कशाचीच वाण नाहीं, त्याला मित्रांची तरी वाण कोठून असणार ? पण आपत्-कालीं ज्याला मित्र म्हणून जोडायला निघावें तो शत्रु बनतो. असो. मला वाटतें

मी भलतीकडेच भकलों; पण जसा आरंभ केला तसा एकदां शेवट केला पाहिजे; आपले हेतु आणि आपलें ललाटलिखित यांच्यांत असा बिलक्षण विरोध आहे की, त्यामुळें आपले प्रयत्न नेहमीं व्यर्थ जातात. त्याप्रमाणें तुला असें वाटत आहे कीं, 'माझ्या हातून दुसरें लग्न व्हायाचें नाहीं;' पण माझा अंत झाला कीं, त्याबरोबर या तुझ्या निश्चयाचाही अंत होईल.

**खे. राणी** : एकदां वैधव्य येऊन पुनः जर माझ्या हातून विवाह झाला तर किडे पडोत या माझ्या शरीराला ! हा अपराध माझ्याकडून झाल्यास मला अन्नान्नदशा येवो, व रात्रंदिवस माझे हाल हाल होवोत ! करमणूक आणि विश्रांति यांचें मला सदैव अंतर पडो व माझे हात-पाय वायूनें जेथल्या तेथें जखडले जाऊन तुरुंगांतील अंधाऱ्या कोठडींतल्या कैद्याप्रमाणें माझी अवस्था होवो ! सारांश, सुखापहारक म्हणून ज्या गोष्टी आहेत त्या माझ्या इष्ट हेतुचा विध्वंस करून मला निरंतर शोकसागरांत बुडवोत, आणि इहलोकीं व परलोकीं माझा भयंकर छळ होऊन मला दुर्गति प्राप्त होवो !

**चंद्रसेन** : (मल्लिकेकडे पाहून) आणि आतां हें वचन हिनें मोडिलें तर—

**खे. राजा** : शाबास, माझी शाबास ! जन्मास आल्यासारखा मी कृतकृत्य झालों ! ज्यांस असें स्त्रीरत्न लाभलें असेल ते धन्य खरे ! प्रिये, थोडा वेळ मला एकट्यालाच येथें ठेवून तूं अमळ एकीकडे हो. मी अगदीं थकून गेलों आहें व मला अगदीं चैन पडेनासें झालें आहे. यासाठीं हा सगळा त्रासदायक दिवस झोपेंत काढावा अशी माझी इच्छा आहे. [निजतो.]

**खे. राणी** : परमेश्वरा, या झोपेनें प्राणनाथांच्या संतप्त मनाला विश्रांति होऊन त्यांच्या कष्टांचा परिहार होवो, व त्यांची–माझी ताडातोड कधीं न होवो. [निघून जाते.]

**चंद्रसेन** : आईसाहेब, आपणांस हा खेळ कसा काय वाटतो ?

**राणी** : मला वाटतें या राणीनें येवढ्या शपथा घ्यावयाच्या नव्हत्या.

**चंद्रसेन** : पण त्याचें काय ? ती त्या पाळील.

**राजा** : झालेला प्रकार तूं पाहिलास ना ? त्याच्यापासून इजा तर नाहीं ना ?

**चंद्रसेन** : छे, छे, हा सर्व थट्टेचा खेळ; ते आपले थट्टेनें विष घालताहेत; त्यात इजा कसची ?

**राजा** : या खेळाला काय म्हणतात ?

**चंद्रसेन** : पुणीचा सांपळा ! कां, कळलें कीं नाहीं ? अर्थात् हें आलंकारिक उत्तर आहे. विशाखपुरास झालेल्या खुनावरून ह्या खेळाचें संविधानक रचिलें आहे; मातंग असें त्या राजाचें नांव. त्याची बायको वसुमती. आतां लवकरच सर्व तुमच्या पाहण्यांत येईल. हा मोठा अंतःकरणाला चटका लावणारा खेळ आहे ! पण आपणाला काय त्याचें ? ज्यांचीं अंतःकरणें शुद्ध आहेत अशा तुम्हां–आम्हांला त्याचा काय संबंध ? जो करील तो भरील, आपण आपले मोकळे ते मोकळेच.

[**वज्रमना** येतो. हा खे. राजाचा पुतण्या.]

**वज्रमना** : आ हा ! हें कृत्य आतांच्या आता उरकून घेण्याला ही किती खाशी वेळ आहे ! घातुक विचारांनीं डोक्यांत कसा पेट घेतला आहे, हात कसे फुरफुरले आहेत, वनस्पति तर बोलायलाच नको ! सगळी तयारी पण कशी नामी झाली आहे ! (कुपी पुढें करून) आ हा ! किती जाज्वल्य मिश्रण हें ! अगोदर बचनागासारख्या जबरदस्त मुळयांचा रस; त्यांत कांचेचा रस आणि सोमलाचें गाळीव सत्त्व ! घागरीयेवढया दोनशें बेडकांच्या भट्टीवर तापवून, प्रखर विंचू आणि साप तळलेल्या तेलांत तीनदां, व रेडयाच्या रक्तांत तीनदां बुचकळलेली ही कुपी ! जीव घेण्याची अशी तयारी कधीं कोणीं केली नसेल ! आ हाः ! चोहोंकडे अगदी सामसूम झालें आहे ! सगळी सृष्टि कशी निद्रित झाल्यासारखी दिसते ! झाडाचें एक पान देखील हालत नाहीं, किंवा येवढया बागेंत कोठें कुट्ट देखील होत नाहीं ! (थोडा विचार केल्यासारखें करून) हो ! आतां भितोस कां ? राज्य आणि स्त्री धाडसाखेरीज प्राप्त होत नसतात ! हें विषारी मिश्रणा, तुला आतां येवढीच प्रार्थना आहे कीं, तुझा आणि या निद्रित राजाच्या कर्णरंध्राचा संयोग झाल्याबरोबर तूं आपला विलक्षण प्रताप दाखविण्यास चुकूं नको. आमच्यासारख्यांना तुझ्याशिवाय आधार नाहीं. पहातों आतां या राजाचे प्राण किती त्वरेनें तूं हरण करतेस तें !

[राजाच्या कानांत विष ओततो.]

**चंद्रसेन** : पाहिलेंत ना काका ? राजाचें वित्त हरण करण्यासाठीं या चोरानें त्याला विष घातलें. या राजाचें नांव मातंग. याची गोष्ट सर्वत्र प्रसिद्ध आहे, व पहिल्या प्रतीच्या सागरांतील भाषेंत ती लिहिलेली आहे. आतां उगीच मजा पहा. हा पाजी खुनी त्या राजाच्या बायकोला वश करून घेईल.

**मल्लिका** : महाराज निघाले वाटते.

**चंद्रसेन** : काय, असल्या लुटपुटीच्या खुनाला भिऊन कीं काय !

**राणी** : प्राणनाथ, कसें काय आहे ?

**शालेय** : आटपा, खेळ आटपा; एकदम बंद करा.

**राजा** : कोण आहे रे तिकडे ? मशाली आणा ! चला येथून, निघा, उठा !

**शालेय** : मशाली ! मशाली ! मशाली !

[**चंद्रसेन** आणि **प्रियाल** यांखेरीज सगळे निघून जातात.]

**चंद्रसेन** : प्रियाला, टाळी दे टाळी ! कां, कशी आहे युक्ति ! आणखी पुरावा काय पाहिजे ? भरलीं म्हणावें आतां आपलीं शंभर वर्षें ! आले आतां आपले विपत्तीचे दिवस ! कोणी हंसत असतो; कोणी रडत असतो; जो हंसतो तो रडतो, जो रडतो तो हंसतो; चालला आहे जगाचा गाडा ! कोणी खालीं, कोणी वर ! एकाची होळी तर दुसऱ्याची दिवाळी !!

**प्रियाल** : महाराज, आपलें काम फत्ते झालें.

**चंद्रसेन** : का रे प्रियाला, आतां समंधाचा एकेक शब्द लाखाच्या मोलाचा आहे की नाहीं ? नीट पाहिलास ना सगळा प्रकार !

**प्रियाल** : हें काय सांगावें, महाराज ?

**चंद्रसेन** : विषाची गोष्ट काढल्याबरोबर कशी—

**प्रियाल** : पाहिली राजश्रींची त्रेधा कशी उडाली ती !

**चंद्रसेन** : चल, चल. राजवाड्यांतले तर सगळे कावळे उडून गेले, पण आपल्याला थोडें गाणें ऐकण्याची इच्छा झाली आहे. येत असलास तर चल त्या नाटकवाल्यांच्या घरीं जाऊं. पण हे कोण इकडे ! या तुम्ही खोकडसाहेब ! कां, लागलीच परत फिरलां ? निरोप घेऊन आलां आहांत वाटतें ! जासूदगिरींत इकडचा तिकडे लुबरेपणा करण्यांत तुम्ही भले वस्ताद !

**शालेय** : महाराज, आईसाहेबांच्या मनांत आपली एकान्तीं गांठ घ्यावयाची आहे. आपल्याला त्यांनीं बदामी महालांत बोलाविलें आहे.

**चंद्रसेन** : जा, तब्येत लागली म्हणजे येतों म्हणून सांगा.

**शालेय** : महाराज, असे करूं नका; आईसाहेब वाट पहात बसल्या आहेत.

**चंद्रसेन** : तुम्ही पुढें तर व्हा, मागून त्याचा विचार पाहूं. (**शालेय** जातो.) प्रियाला, तूंही या थेरड्याच्या पाठीमागें जा; आणि तो कोणीकडे जातो आहे आणि काय करतो आहे याची पाळद राख.

**प्रियाल** : बरें आहे, महाराज. (**प्रियाल** निघून जातो.)

**चंद्रसेन** : ही रात्रीची अत्यंत शांत वेळ आहे; मध्यरात्रीचा भर; डोळ्यांत बोट घातलें तरी दिसायाचें नाहीं असा काळोख, जखिणी, खवीस, हडळी, समंध यांचा आपआपल्या कोठारांतून आणि ढोलींतून बाहेर पडून स्मशानांत निर्भयपणें संचार करण्याचा काळ ! अशा वेळेस थडगीं कणीं आ करून बसलेलीं असतात, व नरकलोकांतून नाहीं तसल्या सांथी व रोग वर चढत असतात ! अशा वेळेस ताज्या रक्ताचा घोट घेऊन इतउत्तर मनुष्यमात्राच्या अंगावर कांटा उभा राहील असें कृत्य माझ्यानें करवेल तर किती नामी होणार आहे ! हो, पण प्रथम आई-कडे गेलें पाहिजे.—अंतःकरणा, असें अधीर होऊं नको, या दृढ हृदयाला अमानुष आणि राक्षसी विचारांचा तिळायेवढा संस्कार न होवो, प्रसंग पडल्यास थोडें निष्ठुर व्हावें लागलें तरी हरकत नाहीं, पण मनुष्यपणा सोडतां नाहीं कामा. तिच्या काळिजाला कट्यारीप्रमाणें टोंचतील असे शब्द मी बोलेन, पण कट्या-रीचा प्रत्यक्ष उपयोग कधींही करणार नाहीं. असें करण्यांत बोलणें एका तऱ्हेचें व मन दुसऱ्या तऱ्हेचें, असें झाल्यानें थोडा दांभिकपणा पदरीं येतो. पण हरकत नाहीं. देवा, तिच्या अंतःकरणाला घरे पाडणारे असे शब्द जरी मी बोललों तरी तिच्यावर शस्त्र धरण्याची दुष्ट बुद्धि मला देऊं नको.

[**चंद्रसेन** जातो]

## प्रवेश ३ रा

**स्थळ**—राजवाड्यांतील खोली.

[**राजा, जुंग** व **भृंग** प्रवेश करितात.]

**राजा** : तो मला अगदीं आवडेनासा झाला आहे, आणि यापुढें त्याचें खूळ येथल्या येथें वाढूं देणें म्हणजे आपण होऊन आपल्यावर संकट आणून घेण्या-सारखें आहे. याकरितां तुम्ही लवकर तयारी करा आणि याला बरोबर घेऊन श्वेतद्वीपाला निघा. मी आतांच्या आतां तुम्हांला थैली तयार करून देतों. याचे हे असले वेडेवेडे चार येथें कामाचे नाहींत. याच्या सान्निध्यानें पुढें—मागें आमच्या जिवाला आणि राज्याला धोका येण्याचा संभव आहे, यासाठीं याला येथून ताबडतोब हालविला पाहिजे.

**जुंग** : महाराज, आमच्याकडून पाहिजे तेव्हां निघण्याची तयारी आहे. आपल्या जिवावर आज कोट्यवधि जीव जगत आहेत, त्यांच्या संरक्षणाची काळजी आपणांस रात्रंदिवस बाळगिली पाहिजे. व तें कठीण कर्तव्यकर्म हातून तडीस जाण्यासाठीं जो पाहिजे तो उपाय केला पाहिजे.

**जुंग** : जो जगांत एकटा सोटबहीर, ज्याच्या पाठीमागें बाईल बडग्याची किंवा बाळंशाची कटकट नाहीं, अशानें देखील हवी ती करामत करून व पाहिजे तशी बुद्धि लढवून आपला त्रास चुकविला पाहिजे; मग आपल्यासारखे, ज्यांच्या कुशलावर लाखों जीवाचें कुशल अवलंबून आहे, अशांनीं तर हरप्रयत्नानें स्वसंरक्षणाचा उपाय केला पाहिजे; राजाचा अंत म्हणजे एका व्यक्तीचा अंत नव्हे, तर ज्याप्रमाणें एखादे धरण फुटलें म्हणजे त्याच्या दोन्ही दरडींवरील दगड आणि झाडें ढासळून पडतात, त्याप्रमाणें राजाला अपाय झाला कीं सगळ्या प्रजेला अपाय होतो. एखाद्या उंच पर्वताच्या शिखरावर प्रचंड चक्र असतें, आणि तें एकदां फिरूं लागलें म्हणजे त्याच्याबरोबर त्याच्या अऱ्यांना अडकविलेल्या हजारों वस्तू सहज फिरतात, पण दुर्दैवानें तें कां जर एखादे वेळेस थबकलें तर त्या हजारों वस्तू एकामेकांवर आदळून त्यांचा चुराडा होऊन जातो, त्याप्रमाणें राजजीवितचक्र एकदां बिघडलें कीं त्याबरोबर सगळ्या राष्ट्राचा बिघाड होतो. सारांश काय, कीं जी गोष्ट राजाच्या दुःखाला कारण होते ती सगळ्या प्रजेला दुःखांत बुडविते.

**राजा** : तर मग विलंब न लावितां जाण्याची तयारी करा. या पोराच्या खुळापासून आपणांस जें भय उत्पन्न झालें आहे, व जें दिवसेंदिवस वणव्यासारखें पसरत चाललेलें आहे तें जेथल्या तेथें खुंटवून टाकिलें पाहिजे.

**जुंग व भृंग** : महाराज, आम्ही आमच्याकडून होईल तितकी त्वरा करून निघतो. [**जुंग** व **भृंग** जातात. **शालेय** प्रवेश करितो.]

**शालेय** : महाराज, तो आईसाहेबांच्या महालाकडे चालला आहे. करितां त्यांचें बोलणें काय होतें तें ऐकण्यासाठी मी तेथेंच कोठें तरी पडद्याआड उभा राहतों. माझी अशी खात्री आहे कीं, त्या त्याचें हृद्गत काढून घेतील. पण न जाणों, आपण म्हटलेंत त्याप्रमाणें किती झालें तरी ती त्याची आई आहे, कदाचित् याच्या मोहानें वाईट परिणाम होण्याचा संभव आहे. यासाठीं त्यांचें काय चालतें तें माझ्यासारख्या तिऱ्हाइतानें ऐकून ठेवणें अगदीं जरूर आहे. आपण आतां स्वस्थ असावें; निजायाला जाण्यापूर्वी मी आपल्यास येऊन भेटेन, आणि झालेली सर्व हकीकत कानांवर घालीन.

**राजा** : शाबास, कारभारी असावा तर असा. (**शालेय** जातो. नंतर आपणांशीं) माझा हा अपराध किती ओंगळ; त्याचा दुर्गंध स्वर्गापर्यंत जाऊन पोहोंचला असेल. जगांतील सर्व देशांच्या नीतिशास्त्रांनीं अत्यंत निंद्य मानलेला असा सख्ख्या भावाचा मी खून केला ना! प्रार्थना करण्यासाठीं मनाला एकाग्र

करावें म्हणून मी केवढा वेळ धडपडलों आहें, पण माझ्या हातून कोठली ती होणार ? माझ्या दृढतर अपराधामुळें माझ्या दृढ निश्चयाचा चुराडा होत आहे. जशीं दोहींकडून दोन महत्त्वाचीं कामें आलीं म्हणजे कोणचें करूं आणि कोणचें न करूं अशा विवंचनेंत दोन्हीही राहतात, त्याप्रमाणें माझ्या मनाची द्विधा स्थिति झाली आहे. भ्रातृरुधिरानें हा दुष्ट हात याहीपेक्षां अधिक भिजला म्हणून काय झालें ? दयावंत परमेश्वराच्या कारुण्योदकानें याचें प्रक्षालन करून टाकतां येणार नाहीं काय ? दयेचा गुण काय, तर अपराध कसाही असो त्याची क्षमा करावयाची. आणि प्रार्थनेंत तरी हेंच दुहेरी सामर्थ्य आहे कीं नाहीं — कीं, आम्ही पतित होण्यापूर्वी अमुक ठिकाणीं दगा आहे अशी इशारत द्यावयाची व पतित झालों म्हणजे क्षमा करावयाची ? तर मग आतां मी परमेश्वरावर, हवाला ठेवितों, म्हणजे माझा अपराध नाहींसा झालाच. अरे पण, मी कोणत्या प्रकारची प्रार्थना करूं ? मी केलेल्या खुनाची मला क्षमा करा, अशी ? — छेः, ती कांहीं उपयोगी नाहीं; कारण मुकुट, ऐश्वर्य, स्त्री वगैरे ज्या वस्तूंसाठीं मी खून केला त्या वस्तू मजपाशीं आहेत ! अपराधानें संपादिलेल्या वस्तूंचा उपभोग ज्यानें टाकिला नाहीं अशाला कोण क्षमा करील ? या पृथ्वींतील भ्रष्ट न्यायाधीश करतील कदाचित्. कारण येथें वारंवार असें दिसून येतें कीं, अगोदर अन्यायानें द्रव्य संपादन करावें; आणि मागाहून त्याच द्रव्यापैकी अर्ध्यामुर्ध्यानें न्यायाधीशांचीं तोंडें भरावीं, म्हणजे अपराधाची क्षमा होते. इतकेंच नाहीं तर, त्या अन्यायापहृत द्रव्याच्या अर्ध्या–अधिकाचा राजरोस उपभोग घेण्याला देखील सापडतो. पण असें स्वर्गी चालेल काय ? नांव कशाला ? तेथें अशी लबाडी चालायाची नाहीं; तेथें कृत्याचें खरें स्वरूप उघडीस येतें आणि खेटरें मारल्यासारखीं तोंडें खालीं करून आमच्या अपराधांची आम्हांलाच शाबिती करून द्यावी लागते. तर मग आतां कसें करावें ? कोणता उपाय राहिला ? पश्चात्तापानें काय होईल तें करून पहावें. त्याच्यानें काय होणार नाहीं ? पण ज्याला पश्चात्तापच होत नाहीं त्याच्याबद्दल त्याच्यानें काय होणार ? काय माझी शोचनीय अवस्था ही ! साक्षात् मृत्यूप्रमाणें कठोर हें हृदय ! हा चाण्डालकर्म करणारा आत्मा ! व्यसनपंकांत रुतलेला व्यसनी जसा अधिकाधिक आंत जातो, त्याप्रमाणें मुक्तीसाठीं तडफडणारा हा आत्मा जास्त जास्त पापपाशांत सांपडत आहे. गन्धर्व–किन्नर हो, या पापाधमाकडे करुणार्द्र दृष्टीनें पहाल काय ! जानूंनो, स्नायूंनो, अंतःकरणनाडींनो, आज तुम्हांला पोलादासारखा कठिणपणा कोठून आला ? वांका, खालीं वांका, अनिर्दंश शिशूच्या अवयवांतील मार्दवासारखें मार्दव

आपल्या ठिकाणीं आणा, त्या जगदीशाला साष्टांग नमस्कार घाला, म्हणजे सर्व ठीक होईल !

[एकीकडे होऊन नमस्कार घालितो. **चंद्रसेन** प्रवेश करितो.]

**चंद्रसेन** : हा आतां उडवून टाकण्याला कांही हरकत नाहीं; तो प्रार्थना करितो आहे; उडवतोंच तर मग आता.--पण मग हा अधम स्वर्गाला जाणार !--अशानें आमचा सूड आम्हांला भरून पावला का ? दम धरा, तें नीट पाहिलें पाहिजे. या रामोशानें माझ्या बापाचा जीव घेतला; आणि त्यासाठीं मी त्याचा एकुलता एक मुलगा या नीचाला स्वर्गाला धाडणार ! खाशी तोड ! असें करणें म्हणजे खुनाबद्दल इनाम देणें होय; सूड घेणें नव्हे ! या नराधमानें अतिक्रूरपणानें आयुष्याच्या ऐन सुखाच्या दिवसांत माझ्या बापाचा जीव घेतला. पापनिरसनासाठीं त्याच्या हातून थोडाबहुत दानधर्म देखील होऊं दिला नाहीं; आज डोक्यावर त्याच्या पापाचा केवढा घडा बसला असेल हें तो परमेश्वर जाणे ! आपल्या स्थितीवरून विचार करितां मला तर असें वाटतें कीं, त्याचीं सगळीं पापें जशींच्या तशीं असतील; त्यांपैकीं एकाचें देखील त्याच्याकडून क्षालन झालेलें नाही. तर मग प्रार्थना करीत असतां याचा वध करून याला स्वर्गाला पाठवूं आणि मुक्त होऊं देऊं का ? अशानें मी सूड उगविला असें होईल काय ? नाहीं, असें कधींही व्हावयाचें नाहीं. चल, शस्त्रा; वरच्यावर रहा व ख़ालीं येशील तर सांभाळ; हाता, सर मागें ! आणि यापेक्षा चांगला समय शोधून काढ. तो दारू पिऊन धुंद झाला असेल, निजला असेल, गांवांत असेल, किंवा पशूप्रमाणें भ्रातृजायेशीं रतिसुख घेण्यांत गढला असेल; द्यूत खेळत असेल, खोटया आणा वाहत असेल; सारांश, जें कृत्य करीत असतां प्राण घेतला तर मुक्ति मिळण्याची आशा नाहीं अशी वेळ पाहिजे. असा सांपडला कीं उडीव, म्हणजे मग याला रौरवनरकाखेरीज दुसरी गति कोठली ? आई माझी वाट पहाते आहे. असल्या प्रार्थनांनीं आपल्या विपद्ग्रस्त आयुष्याची मुदत मात्र हा वाढवून घेतो आहे.

[**चंद्रसेन** निघून जातो; राजा उठून पुढें येतो.]

**राजा** : माझे शब्द मात्र वर जात आहेत. विचार खालच्या खालींच. पण विचाराखेरीज शब्द देवापर्यंत कधीं तरी जातील काय ? छे, नांव नको.

[राजा जातो.]

## प्रवेश ४ था

स्थळ—वाड्यांतील दुसरी एक खोली.

[**राणी** आणि **शालेय** प्रवेश करितात.]

**शालेय** : तो परस्पर इकडे येईल. हें पहा, त्याच्याकडून सगळें बेताबेतानें काढून घ्या. त्याला म्हणावें कीं तुझे चाळे फार माजले; याउपर ते कोणास पुरे पडणार नाहींत; तुला त्याबद्दल कधींच भोगावें लागते, पण मी म्हणून मधें पडून त्या थराला ही गोष्ट जाऊं दिली नाहीं. मी येथें लपून आहेंच. कृपा करा आणि त्याच्या पोटांत शिरून सगळें काढून घ्या.

[पड्यांत आई, आई, असा शब्द होतो.]

**राणी** : माझ्याकडून मी होईल तितके करीन. त्याबद्दल अगदीं भीति बाळगूं नका—व्हा, पड्याआड व्हा; तो आलासें वाटतें. [**शालेय** पड्याआड होतो.]

[ **चंद्रसेन** प्रवेश करतो.]

**चंद्रसेन** : कसें काय आहे, आईसाहेब ?

**राणी** : चंद्रसेना, तूं आपल्या वडिलांचा मोठा अपराध केला आहेस.

**चंद्रसेन** : आई, तूं माझ्या वडिलांचा मोठा अपराध केला आहेस.

**राणी** : हें काय रे असले भलभलते बोलतोस ?

**चंद्रसेन** : हें काय ग असले द्वाडपणाचे प्रश्न करतेस ?

**राणी** : चंद्रसेना, अलीकडे तूं असा रे कां वागतोस ?

**चंद्रसेन** : आई, माझ्याकडून काय चूक झाली ?

**राणी** : मला तूं विसरलास का ?

**चंद्रसेन** : छेः, छेः, असें माझ्या हातून कसें होईल ? आपण राणी आहां, आपल्या नवऱ्याच्या भावाची बायको आहां, आणि—परमेश्वराच्या कृपेनें असें नसतें तर बरें होतें—आपण आमच्या मातोश्री आहां.

**राणी** : माझ्याशीं तूं नीट नाहीं ना बोलत ? बरें तर, तुला नीट बोलावयास लावतील अशांनाच पाठवून देतें.

**चंद्रसेन** : या, या, चाललांत कुठें ? खालीं बसा, अशा भांबावूं नका. आपले काळीज कसें आहे हें मी आपणांस उघडपणें दाखविणार आहें तेवढें पहा, आणि मग कोठें त्या जा.

**राणी** : अरे, तूं करणार काय ? माझा खून का करणार ? धांवा हो धांवा ! धांवा हो धांवा !

**शालेय** : (पडद्यापाठीमागें) काय, धांवा हो धांवा !

**चंद्रसेन** : इकडे कोण खुसबूस करतो आहे ? जेथें तेथें या घुशीनें बेजार केलें. (तरवार उपसतो.) मर, पोटासाठीं मर. (पडद्यांतून वार करतो.)

**शालेय** : (पडद्याच्या मागें) मेलों रे मेलों.

**राणी** : अरे मूर्खा, काय केलेस हें ?

**चंद्रसेन** : खरोखरीच काय केलें मला माहीत नाहीं ! कोण काका होता की काय ? [पडदा वर उचलून शालेयाला पुढें ओढीत आणतो.]

**राणी** : अरे, किती अधीरपणाचें आणि घोर कृत्य केलेंस हें !

**चंद्रसेन** : घोर कृत्य !—खरोखरच आईसाहेब, राजाला मारून त्याच्या भावाशीं लग्न करण्याइतकें घोर कृत्य !

**राणी** : राजाला मारून ?

**चंद्रसेन** : होय आईसाहेब, माझे तेच शब्द होते.—(शालेयास उद्देशून) भिकाऱ्या, उतावळ्या, लुडबुड्या, पाजी मनुष्या, हा तुमचा–आमचा शेवटचा रामराम ! तूं बरा मनुष्य असशील असें मला वाटलें होतें. भोग आतां आपल्या कर्माचीं फळें. फाजील लुबरेपणा करणें चांगलें नाहीं, हें आतां तुला पक्कें समजून आलें असेल—आई, हात कशाला आपटतेस ? घाबरूं नको, खालीं बैस आणि तुझ्या अंतःकरणाला बोधपर अशा दोन गोष्टी सांगतों आहें तिकडे लक्ष दे. माझी अजून अशी समजूत आहे कीं, तुझें अंतःकरण काळ्या ठिक्कर पाषाणाप्रमाणें कठिण झालेलें नाहीं व समजुतीची गोष्ट प्राण गेला तरी ऐकून घ्यायाचीच नाहीं अशा प्रकारचा दुर्व्यसनाचा पगडा अजून त्याच्यावर बसला नाहीं.

**राणी** : इतकें तोंड टाकून तूं मला बोलतो आहेस असें मीं काय केलें आहे ?

**चंद्रसेन** : मीं काय केलें आहे ? लाज नाहीं वाटत असा प्रश्न विचारायाला ? तूं आज एक असली दिवटी निघालीस, यामुळें सर्व कुलस्त्रियांना खालीं माना घालाव्या लागत आहेत ! तुझ्या कृत्यामुळें पातिव्रत्य हें शुद्ध ढोंगासारखें झालें आहे ! तुझ्या गुणांनीं स्त्री–पुरुषांतील निष्कलंक प्रेमाची रमणीयता नाहींशी होऊन तें मनुष्यजातीला व्याधीसारखें झालें आहे ! आणि विवाहकालीं ज्या शपथा वाहावयाच्या, त्या द्यूतकारांच्या खोट्या पैजांप्रमाणें झाल्या आहेत ! काय सांगावें ? तुझ्या या कृत्यामुळें लग्नविधि हा निःसार झाल्यासारखा होऊन वैवाहिक धर्मवाक्यें असंबद्ध प्रलाप झालीं आहेत ! हा तुझा राक्षसीपणा पाहून साक्षात् परमेश्वराचा क्षोभ झाला आहे, व त्याच्या विचारानें या पंचमहाभूतात्मक अखिल त्रैलोक्यांत प्रलयकालच्यासारखा एकच गोंधळ होऊन गेला आहे !

**राणी** : सर्व ब्रह्माण्डांत ज्याचा डंका झाला आहे असें माझ्याकडून झालें आहे तरी काय ?

**चंद्रसेन** : हें चित्र पहा आणि हें चित्र पहा ! दोघां भावांच्या या दोन हुबेहूब प्रतिमा. आः हा ! कोण तेज हें या कपाळावर ! भुंग्यासारखे काळे केस ! छाती किती रुंद ! हिऱ्यासारखे चमकणारे डोळे ! आसन तरी किती झोंकदार ! जसा कांहीं गगनचुंबित शैलशिखरावर प्रत्यक्ष पूर्णचंद्रच टेकला आहे ! सारांश काय कीं, विधात्यानें होईल तितकी आपली अक्कल खर्च करून जगाला आपलें घटनाचातुर्य दाखविण्यासाठीं हा सौंदर्यमय रम्य पुतळा निर्माण केला व सुदैवानें हा तुला पति लाभला होता. आतां या इकडे पहा; हा तुझा आतांचा नवरा. थंडीच्या रापेनें खुरटलेल्या कणसाप्रमाणें आपल्या सुदृढ वडील भावाची दशा करून टाकणारा तोच हा ! तुला डोळे तरी आहेत काय ? अशा या मदनाला टाकून या कालकूटाला कां भाळलीस ? उत्कट कामवासनेमुळें म्हणावें तर तेंही बरोबर दिसत नाहीं; कारण विषयवासना उच्छृंखल असण्याचें तुझें वय नाहीं. या वयांत ती विचाराच्या आधीन असते ! पण याला सोडून याला मिठी मारलीस, यांत विचार काय केलास ? अक्कल तर तुला खचित आहे; नाहीं तर तुझे सगळे व्यापार खुंटले असते; तर मग ती असून तिला वळकट विकृति झाली आहे असें मानिलें पाहिजे; तुला खूळ लागलें म्हणावें तर खुळे देखील अशी चूक करीत नाहींत, व संभ्रम कितीही उद्दाम झाला तरी त्याला बऱ्यावाईटाची निवडानिवड करून भेदाभेद पाहण्याचें थोडें तरी सामर्थ्य असतेंच असतें. कोणत्या डाकिणीच्या झपाट्यांत सांपडून असें कृत्य करण्यास तूं सिद्ध झालीस ? तुझे डोळे, कान, नाक, तोंड, हात, सगळींच इंद्रियें नष्ट झालीं का ? एकच इंद्रिय नष्ट झालें असतें तर तुला अशी भूल पडली नसती. कोण बेशरमपणा हा ! कामदेवा, असल्या उतारवयांत इच्या शरीरांत जर तूं एवढा जबरदस्त पेट घेतलास, तर ज्यांच्या अंगीं तारुण्यभर मुसमुसतो आहे अशांच्या शरीरांत आगडोंब करून त्यांच्या सद्‌गुणांची लाही करून तूं टाकीत असशील यांत नवल कोणतें ? व तरुणांना त्याबद्दल दोष तरी कां द्यावा ? ज्याअर्थी सर्व विचार सोडून थेरडीं माणसें तरण्याबांडाप्रमाणें हवें तें करण्यास मागेंपुढें पाहीनाशीं झालीं त्याअर्थी आजपासून मनोविकार अनावर झाल्यामुळें जारकर्म करण्यास प्रवृत्त होणाऱ्याला दोष म्हणून देतां कामा नये.

**राणी** : चंद्रसेना, आतां पुरें कर. तुझ्या या भाषणानें माझे डोळे उघडले, आणि माझें कर्म मला दिसूं लागलें. बोलूं नको, माझा जीव अगदीं कासावीस

झाला आहे; या माझ्या अपराधाचा डाग कधींही जाणार नाहीं. कोण कृत्या मी!

**चंद्रसेन** : अपत्य न होतांच पति मृत झाला तर दिराकडून एक संतान करून घेण्यास कांहीं हरकत नाहीं, अशी शास्त्राज्ञा आहे; पण तुझ्या विषयवासनेचा कांहीं अलौकिक प्रकार ! तुझ्या बरोबरीचा मी तुझा मुलगा जिवंत असतां तेरा दिवसांच्या आंत तूं त्या जाराशीं पाट लाविलास, तेव्हां तूं साक्षात् राक्षसी नव्हेस का ! तुझ्या कामवासनेला जसा कांहीं ऊत आला आहे ! खातेऱ्यात जशीं डुकरें लोळतात, त्याप्रमाणें त्या अधमाला अंथरुणावर घेऊन जा, आणि एकमेकांना मिठ्या घाला; कवटाळा, मुके घ्या, हवा तसा धिंगाणा घाला; ऊठ येथून; मला पुनः हें तुझें काळें तोंड दाखवूं नको.

**राणी** : चंद्रसेना, मी घोर अपराधी आहें, पण तुझ्या पाया पडतें, आतां पुरें कर; तुझा एकेक शब्द माझ्या काळिजाला घरे पाडून जात आहे. बाळा, मी तुझी आई ना ? माझी येवढीशी देखील दया तुला नाहीं का येत ?

**चंद्रसेन** : हरामखोर, पाजी, रामोशीण ! निर्दय, कृतघ्न, चाण्डाळीण ! तुझ्या पहिल्या नवऱ्याचे एकविसांश गुण तरी या नीचाच्या अंगीं असावयाचें होते ! राजकलंक दिवटा ! राज्य आणि सत्ता चोरणारा भामटा ! माझ्या बापाचा रत्नखचित मुकुट काढून घेऊन आपल्या टाळक्यावर घालण्याला या मांगड्याचा हात तरी कसा वाहवला ?

**राणी** : पुरें, पुरें चंद्रसेना !

**चंद्रसेन** : राजा कसला हा ? चिंध्यांचा आणि धांतुट्यांचा राजा ! —

[**समंध** प्रवेश करतो.]

हे आकाशस्थ गंधर्व-किन्नर हो, या अनाथ लेंकरावर तुमच्या कृपेची छाया असूं द्या ! हें सौम्य रूप धरून तूं रे बाबा कशासाठीं आलास ?

**राणी** : शिव शिव ! याला भ्रम झाला !

**चंद्रसेन** : वेळ जात चालला तसतसा तुझ्या आज्ञेचा मला विसर पडूं लागला म्हणून माझ्यावर रागावण्यासाठींच आलास ना ? बोल, बोल; मला असा संशयांत ठेवूं नको !

**समंध** : मीं सांगितलें आहे तें विसरूं नको. अलीकडे तें तुझ्या स्मरणांतून अगदीं जात चालल्यासारखें दिसलें, म्हणून त्याची तुला पुनः आठवण देण्यासाठीं प्रकट झालों. अरे, पण तिकडे पहा, तुझी आई फारच घाबरल्यासारखी दिसते. तिच्या अंतःकरणाची अगदीं कालवाकालव होऊन गेली आहे. यासाठीं तिचें थोडें

सांत्वन कर. ज्यांना विचार कमी, त्यांना कल्पनेची फार बाधा होते. चंद्रसेना, तिच्याशीं दोन शब्द बोल.

**चंद्रसेन** : कसें काय आहे, आईसाहेब ?

**राणी** : शिव शिव ! बाळा, असें रे काय करूंलागलास ? डोळ्यापुढें कांहीं एक नसतां पाहिल्यासारखें करून नुसत्या हवेशीं काय बोलत सुटलास ? डोळे किती ताठले आहेत ! कांपतो आहेस किती ! अंगावर असा एकाएकीं कांटा कां आला ? बाळा, असा घाबरा आणि उतावीळ होऊं नको; थोडा शांत हो, किंचित् विचार कर. पहातो आहेस तरी काय ?

**चंद्रसेन** : त्याच्याकडे, त्याच्याकडे पहातों. पहा पहा, त्याची मुद्रा किती फिकट दिसते ती ! त्याच्या खिन्नतेची कारणें आणि याची आकृति पाहून पाषाणालासुद्धां द्रव येईल. माझ्याकडे पाहूं नको. कारण तुझी केविलवाणी मुद्रा पाहिली म्हणजे माझा दृढ निश्चय जेथल्या तेथें नाहींसा होतो. मला जें काम करावयाचें आहे तें भित्रेपणानें होण्याजोगें नाहीं; त्याला मांगासारखा निष्ठुरपणा पाहिजे. अश्रु पाडायचे नाहींत, रक्त पाडायाचें आहे.

**राणी** : हें कुणाशीं बोलतो आहेस ?

**चंद्रसेन** : त्या तिथें तुला कांहीं दिसत नाहीं ?

**राणी** : कांहीं नाहीं. जें आहे तें सर्व दिसत आहे; नाहीं तें कोठून दिसेल ?

**चंद्रसेन** : तुला कांहीं ऐकूं देखील आलें नाहीं काय ?

**राणी** : तुझ्या–माझ्या शब्दांखेरीज दुसरें कांहीं नाहीं.

**चंद्रसेन** : असें कां म्हणतेस ? तिकडे, तिकडे पहा ! तो पहा, कसा हळूं-हळूं चालला आहे; बाबा जिवंत असतां जसला पेहराव करीत, तसला पेहराव करून आलेले तुझ्या नाहीं दृष्टीस पडत ? पहा, पहा, ते आतां दाराच्या बाहेर पडताहेत !

[समंध जातो.]

**राणी** : हे सगळे, बाबा, तुझ्या बुद्धीचे खेळ; एकदां मन भकले म्हणजे नाहीं नाहीं त्या गोष्टी डोळ्याला दिसूं लागतात ! भ्रम, हा सारा भ्रम, बाळा !

**चंद्रसेन** : भ्रम ? तुझ्या-माझ्यांत तूं काय भेद पाहिलास ? तुझ्याप्रमाणें माझी नाडी शांत आहे, व तुझ्याइतकेच तिचेही ठोके पडत आहेत. मी बोललों तें सारें बरळणें असें समजूं नको. पाहिजे असलें तर प्रतीतीसाठीं मला सांग, म्हणजे झालेलें सगळें बोलणें मी पुनः बोलून दाखवितों; वेड्याच्यानें तसें होईल काय ? कधीं नाहीं. आई, तुला माझी येवढी प्रार्थना आहे कीं, आपले दुष्ट

अपराध लपविण्यासाठीं माझें सारें बोलणें भ्रांतिष्टपणाचें असें समजूं नको. तूं अशी लबाडी करशील तर आंतून तुझें सर्व अंग कुजून जाईल, आणि त्यामुळें वरचें कातडें झडायाला लागून त्यांत किडे पडतील. परमेश्वरापाशीं अपराध कबूल कर. झाल्या गोष्टीचा पश्चात्ताप कर. पुढें असें करूं नको, व झालेले अपराध छपविण्याच्या भरीस पडून दुप्पट अपराधी होऊं नको. व मी तुला या ज्या दोन उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या त्यांबद्दल क्षमा कर. करतां काय ? क्षमा ही मागितलीच पाहिजे. कारण, काळ असा विपरीत आला आहे कीं, भल्यांनीं लुच्चांची क्षमा मागितली पाहिजे. इतकेंच नाहीं, तर गरज पडल्यास कंबर बांधून त्याचे जोडे डोक्यावरहि घ्यायलाहि तयार असलें पाहिजे.

**राणी** : चंद्रसेना, आतां तूं माझें काळीज उकलून त्याचे दोन तुकडे केलेस !

**चंद्रसेन** : बरें तर मग, त्यांपैकीं वाईट तुकडा असेल तो टाकून दे, आणि चांगल्याच्या संगतीनें राहा. येतों तर मग. पण आज काकाच्या खोलींत जाऊं नको. अंगीं खरा सद्‌गुण नसला तरी तो आहे असें बाहेरून तरी दाखवावें. असल्या कृत्रिमपणानें ज्या चोरट्या वाईट खोडी लागलेल्या असतात त्यांचें जरी कांहींच वाटेनासें होतें, तरी त्यांत एक चांगला गुण आहे, तो हा की, बाहेरून सद्‌गुणाचा आणि सदाचाराचा आव घातल्यानें लोकांत नाचक्की तरी होत नाहीं. आज रात्रीं मन घट्ट कर म्हणजे उद्यांचा दिवस हलका जाईल. उद्यांचा गेला म्हणजे परवांचा त्याच्यापेक्षां हलका जाईल; कारण अभ्यासानें स्वभाव पालटतां येतो, इतकेंच नाहीं, तर एखादे वेळेस वाईट खोडसुद्धां समूळ काढून लावतां येते. येतों तर मग. दे आतां मला निरोप. (शालेयाकडे बोट दाखवून) या म्हाताऱ्या कारभाऱ्यासाठीं मला वाईट वाटत आहे, पण काय करूं ? ईश्वराच्या मनांतच अशी गोष्ट आली, त्याला माझा काय इलाज ? त्याच्या इच्छेनें यानें आजपर्यंत मला पुष्कळ त्रास दिला; आज मी त्याचा मोक्ष करावा अशी तिकडूनच प्रेरणा झाली. आतां याला कोठें तरी सुस्थळीं नेऊन गाडतों, तूं अगदीं भिऊं नको. याला ठार केल्याबद्दल मी पूर्णपणें जबाबदार आहें. बरें आहे तर, येतों मी आतां. आज मी निष्ठुर झालों याचें कारण इतकेंच कीं, पुढें आपल्या स्नेहांत बिघाड न यावा. आधीं कडू मग गोड, यासारखी मजा नाहीं. हें पहा, पण आणखी एक शब्द सांगतों तेवढा ऐकून घे, मग तुला वाटेल तसें कर.

**राणी** : मी काय करूं ?

**चंद्रसेन** : मीं तुला सांगितलें आहे तसें अलबत् करूं नको. त्या धगडाच्या

भुलकावणीला भुलून आज पुन: त्याच्या खोलींत जा. गेलीस म्हणजे अर्थात् तो तुझ्याशीं लाडीगोडी लावायाला लागेल. "जिवलगे ! प्राणप्रिये !" असें म्हणेल; लडिवाळपणानें तुझे गाल कुसकरील ; घट्ट मुके घेईल ; गळ्याला मिठ्या मारील. असें झालें म्हणजे आपण अगदीं पाघळून जाल आणि त्या कावेबाजानें विचारल्याबरोबर "चंद्रसेन कांहीं खरोखर वेडा नाहीं ; त्यानें खुळेपणाचें उगीच सोंग घेतलें आहे." असें म्हणून झालेल्या प्रकाराचा खडान् खडा त्याला सांगाल यांत संशय नाहीं. खरोखर असेंच केलें पाहिजे. कारण आपल्यासारख्या रूपवती, धीर आणि शहाण्या राणीला असल्या बेडकापासून, असल्या नामी बोक्यापासून, असल्या फक्कड कावळ्यापासून येवढी महत्त्वाची गोष्ट लपवून कशी ठेवितां येईल ! छे छे ! असें कोणाच्याच हातून होणार नाहीं. सगळी अक्कल आणि सगळा गुह्यपणा एकीकडे गुंडाळून ठेवून दुसऱ्याला अपशकुन करण्यासाठीं आपलें नाक कापून घेण्याची चांगलीशी तोड काढ. असें केल्याशिवाय खऱ्या शहाणपणाचा उजेड पडेल कसा ?

**राणी** : चंद्रसेना, असे तीक्ष्ण शब्दप्रहार माझ्यावर करूं नको. माझा प्राण गेला तरी बेहेत्तर आहे. तुझ्या बोलण्यांतील एक अक्षरसुद्धां मी बाहेर फोडणार नाहीं बरें ?

**चंद्रसेन** : आमची श्वेतद्वीपाला उचलबांगडी व्हायाची आहे, हें तुला समजलेंच असेल.

**राणी** : हो हो, मी तें अगदींच विसरलें; हो, तुला तिकडे धाडावयाचें ठरलें आहे खरें.

**चंद्रसेन** : श्वेतद्वीपाच्या राजाला थैली लिहून तयार आहे. माझ्याबरोबर माझे लहानपणचे सोबती जुंग व भृंग यांना देण्याचा बेत झाला आहे. दांत न पाडलेल्या सापाइतका यांच्यावर माझा भरंवसा आहे. माझा उपाय नाहीं ? या लुच्चांची लबाडी पाहून मला तशी लबाडी शिकली पाहिजे. होऊंच द्या तर मग आतां. ज्याची विद्या त्याला फळली आणि ज्याच्या तंगड्या त्याच्या गळ्यांत येऊन फजीता उडाला म्हणजे मोठी मौज होते. आतां हट्टालाच काम पेटलें आहे. कांहीं चिंता नाहीं; त्याच्यापेक्षां वीतभर माझा बार खोल घेतों, आणि ठिकऱ्या ठिकऱ्या उडवून देतों. एका दगडानें दोन कावळे पाडतां येणें यांत तरी कसब आहे. (**शालेया**ला उद्देशून) या थेरड्याच्या मनांत माझी गठडी वळवायाची होती. आतां याचें हें गांठोडें शेजारच्या खोलींत नेऊन पुरतों. बरें आहे तर आईसाहेब, घेतों आतां आपला निरोप. जिवंत असतां या मसलतगाराची कोण वटवट चालत

असे. पण आज यानें किती शांत, केवढी गंभीर वृत्ति धारण केली आहे ! चला महाराज, आपली एकदां शेवटची चाकरी बजाविली पाहिजे. येतों आईसाहेब, येतों. ऐन रंगांत असलांत तरी या अनाथ पोराला अगदींच विसरून जाऊं नका.

[**चंद्रसेन शालियाचा** मुडदा ओढीत जातो व मागाहून **राणी** जाते.]



# अंक चवथा

## प्रवेश १ ला

स्थळ — किल्ल्यांतील एक दिवाणखाना

[ **राजा, राणी, जंग** आणि **भृंग** प्रवेश करितात. ]

**राजा** : प्रिये, तूं अशी घाबरल्यासारखी कां दिसतेस ? येवढ्यानें श्वास टाकायाला काय झालें ? उराला इतका कांप कशानें सुटला ? सांग काय झालें आहे तें. मला तें समजलें पाहिजे. चंद्रसेन कोठें आहे ?

**राणी** : ( **जंग** आणि **भृंग** यांजकडे पाहून) क्षणभर बाहेर जा बरें. प्राणनाथ, काल रात्री काय हो भयंकर गोष्ट पहाण्याचें माझ्या कपाळीं आलें !

**राजा** : मदनिके, म्हणतेस तरी काय ? चंद्रसेनाची प्रकृति कशी काय आहे ?

**राणी** : समुद्रावर तुफान वारा सुटला म्हणजे तो जसा खवळून जातो, त्याप्रमाणें तो अगदीं बेफाम होऊन गेला आहे. माझ्याशीं बोलत असतां तो एकदम चवताळल्यासारखा झाला आणि "**उंदीर उंदीर**" असें म्हणत म्यानांतून कट्यार काढून पडद्याकडे धांवत गेला, आणि वेडेपणाच्या लहरींत त्यानें ती त्यांत खुपसली. ती बिचाऱ्या म्हाताऱ्याला लागून तो तात्काळ गतप्राण झाला !

**राजा** : काय भयंकर कृत्य हें ! शालेयाच्या जागीं आम्ही असतों तरी आमची तीच दशा झाली असती; याच्या या उच्छृंखलपणाची ज्याला त्याला मोठी भीति पडली आहे. तुला काय, मला काय, हरएक मनुष्याला याच्यामुळें केव्हां काय प्रसंग येईल याची सदा धास्ती. शिव शिव ! आतां या खुनाबद्दल करावें तरी काय ? दोष आमच्या कपाळीं येणार; नीटच तें; कारण लोक असें म्हणणार कीं, हा असा वेडा झाला आहे हें जर यांना पक्कें ठाऊक होतें तर यांनीं त्याला हत्यारें घेऊन हवें तसें भटकूं द्यावयाचें नव्हतें, कोंडून घालावयाचें होतें.

अथवा त्याच्या पाठीवर एखादें माणूस ठेवावयानें होतें. पण ममता वेडी म्हणतात तें आज खरें प्रत्ययास आलें. पोराला उगीच कशासाठीं त्रास द्यावा, अशा समजुतीनें करायाला पाहिजे होता तो बंदोबस्त केला नाहीं; त्यामुळें बाहेर फुटेल या भीतीनें आंतल्या आंत छपविलेला दुष्ट रोग जसा प्राणावर बेततो तशी आमची स्थिति झाली आहे. प्रिये, तो आहे तरी कोठें ?

**राणी** : शालेयाला मारून त्याचें प्रेत पुरण्यासाठीं घेऊन गेला आहे. याच्या वेडेपणाचा भारीच बाई चमत्कार वाटतो ! शालेयाला मारलान् तो मारलान्, तितक्यांत आणखी शुद्धीवर आल्यासारखा झाला; आणि केल्या कृत्याबद्दल रडूं लागला ! हलक्या धांतूंनीं भरलेल्या खाणींत अवचित जसें सोनें सांपडावें तसा याच्या बुद्धीचा प्रकार झाला आहे. वेड्यासारखें नाहीं नाहीं तें बडबड बडबड बडबडतो आणि मधेंच शुद्धीवर येतो.

**राजा** : मदनिके, चल आतां ! उद्यां सूर्योदयाच्या पूर्वी त्याला तारवांत घालून येथून काढून लावतों. इलाज नाहीं; अधिकाराच्या जोरानें म्हणा किंवा कांहीं युक्तीनें म्हणा हा खून आतां आम्हांस आंतल्या आंत दडपून नेला पाहिजे. अरे जुंगा, भृंगा —

[ जुंग आणि भृंग पुनः प्रवेश करितात. ]

मित्र हो, चंद्रसेनानें वेडाच्या भरांत शालेयाचा खून केला व त्याचें प्रेत तो आपल्या आईच्या महालांतून कोणीकडे घेऊन गेला आहे ! यासाठीं कांहीं लोक मदतीला घ्या, आणि त्याचा शोध करा. दोन गोड शब्द बोलून त्याच्याकडून तें प्रेत काढून घ्या, आणि स्मशानाकडे घेऊन चला. मेहरबानी करून या कामास विलंब लावूं नका.

[ जुंग व भृंग जातात. ]

चल आतां प्रिये, चार शहाणे मुत्सद्दी बोलावून आणूं, आणि या अकस्मात् घडून आलेल्या गोष्टीची हकीकत त्यांना सांगून पुढें आमच्या मनांत जी व्यवस्था करावयाची आहे, तीविषयीं त्यांचा सल्ला घेऊं. आतां हें जरी खरें आहे कीं, अशा प्रकारच्या दुर्लौकिकाचा विषारी शर पाहिजे तितक्या अंतरावर तोफेच्या गोळ्या-प्रमाणें माऱ्याच्या जागेवर हटकून जाऊन पडतो, तरी कदाचित् आपण त्यांतून चुकूं, आणि हवेंतल्या हवेंत त्याचा वेग नाहीसा होईल. चल आतां, चल, माझें मन पराकाष्ठेचें अस्वस्थ आणि उद्विग्न झालें आहे.

## प्रवेश २ रा

स्थळ—किल्लयांतील दुसरा एक दिवाणखाना.

[ चंद्रसेन येतो. ]

**चंद्रसेन** : एकदांची नीट व्यवस्था लागली.

**जुंग** }
**भृंग** } ( पडद्यांत ) चंद्रसेन महाराज ! चंद्रसेन महाराज !

**चंद्रसेन** : कोण आहे ? चंद्रसेनाला कोण हांक मारतो आहे ? हं हं, हे आले.

[ जुंग आणि भृंग येतात. ]

**जुंग** : महाराज, आपण त्या प्रेताचें केलेंत तरी काय ?

**चंद्रसेन** : अरे, धुळींतून आलेलें तें धुळींत मिळविलें.

**जुंग** : तें कोठें आहे तें सांगा, म्हणजे स्मशानांत तें आम्ही घेऊन तरी जाऊं.

**चंद्रसेन** : असेंच समजूं नका.

**जुंग** : काय ?

**चंद्रसेन** : मी आपला विचार सोडून तुमच्या विचारानें चालेन असें. शिवाय, जा रे, तुझ्यासारख्या सुडक्याला माझ्यासारखा राजपुत्र उत्तर द्यायला खोळंबला आहे !

**जुंग** : आम्ही तर मग सुडके झालों म्हणावयाचें !

**चंद्रसेन** : सुडके नाहीं तर काय ? एखाद्या सुडक्याचा बोळा जसें पाणी शोषून घेतो, त्याप्रमाणें तुम्ही लोक राजाची मर्जी संपादण्यांत, बक्षिसें लाटण्यांत व अधिकाराच्या जागा उपटण्यांत भल्ले बस्ताद. पण असले अधिकारी परिणामीं राजांच्या फार उपयोगी पडतात. माकड ज्याप्रमाणें एखादा पदार्थ दाढेंत धरून ठेवितें, आणि मग तो हवा तेव्हां गट्ट करितें, त्याप्रमाणें राजेलोक यांना एकदां आपलेंसें करून ठेवितात, आणि गरज पडली कीं पिळून काढतात. असें झालें म्हणजे सुडक्यांनो, तुम्ही पहिल्याप्रमाणें कोरडे ते कोरडे.

**जुंग** : महाराज, आपलें बोलणें आम्हांस बिलकुल कळत नाहीं.

**चंद्रसेन** : वा:, फारच चांगलें झालें. म्हणतात ना, गाढवाला कोटिक्रमाची काय चव ?

**जुंग** : तेवढें प्रेत कोठें आहे तें सांगा, आणि आम्हांबरोबर राजाकडे चला.

**चंद्रसेन** : प्रेत ? राजाजवळ ? ज्यांत गुण नाहीं तें प्रेतच. अरे, राजा म्हणजे एक चीज !

**भृंग** : चीज, महाराज ?

**चंद्रसेन** : हो हो, अभावाची चीज. चला मला घेऊन; सगळा लपंडावीचा खेळ !

## प्रवेश ३ रा

स्थळ – किल्ल्यांतील आणखी एक दिवाणखाना.

[ नोकरांसह **राजा** येतो. ]

**राजा** : त्याला शोधून आणण्यासाठीं व त्या प्रेताचा तपास लावण्यासाठीं मीं माणसें पाठविलीं आहेत. हा असा पाहिजे तिकडे भटकतो हें किती भयंकर आहे ? तथापि त्याला फार काचणींत ठेवणेंही चांगलें नाहीं; कारण वेडावलेल्या लोकांचा तो अगदीं जीव कीं प्राण होऊन बसला आहे ! त्यांची आवड नावड विचारावर अवलंबून असती तर असें न होतें; त्यांना काय जें दिसेल तें तें खरें मानायाचें. आणि असें झालें म्हणजे शिक्षा करणाराची शिक्षा मात्र डोळ्यांत खुपते, अपराध्याचा अपराध मुळींच दिसत नाहीं. या सगळ्या पेंचांतून सुटण्यास त्याला एकदम श्वेतद्वीपाला पाठवून द्यावा हाच उत्तम उपाय दिसतो; तशाखेरीज गत्यंतर नाहीं. जालीम रोगावर जालीम उपाय केले तरच ते हटण्याची कांहीं आशा असते, नाहीं तर मुळींच नाहीं.

[ जुंग येतो. ]

कसें काय ! काही तपास लागला का ?

**जुंग** : महाराज, तें प्रेत कोठें पुरलें आहे, हें तो कांहीं नीट सांगत नाहीं.

**राजा** : बरें, तो तरी कोठें आहे ?

**जुंग** : बाहेर, महाराज. जवळ मनुष्य ठेवून आपली आज्ञा घेण्याकरितां आंत आलों.

**राजा** : आणा त्याला माझ्यापुढें.

**जुंग** : ए भृंगा, चंद्रसेनमहाराजांना आंत घेऊन ये.

[ **चंद्रसेन व भृंग** येतात. ]

**राजा** : चंद्रसेना, शालेय कोठें आहे ?

**चंद्रसेन** : मेजवानींत दंग आहे !

**राजा** : मेजवानींत ? कोठें ?

**चंद्रसेन** : तो हात मारतो आहे अशा ठिकाणीं नव्हे, तर त्याच्यावर हात मारताहेत अशा ठिकाणीं. कारस्थानी आळ्यांची तमाम मंडळी जमून त्यांनीं तुमच्या शालेयावर मुबलक तोंड चालविलें आहे. या आळ्यांप्रमाणें श्रेष्ठ अन्न खाणारा जगांत दुसरा कोणीही नाहीं. कारण, दुसरीं जनावरें आम्ही आपल्या-साठीं पोसतों, आणि आम्ही आपल्याला आळ्यांसाठीं पोसतों ! आळ्या या दृष्टीनें आपले अगडबंब राजे आणि मरतुकडे भिकारडे यांत कांहीं विशेष तफा-वत नाहीं; एकाच मेजवानींतल्या दोन चिजा; फार झालें तर एक भोपळ्याची भाजी तर दुसरी दोडक्याची. हा आमचा शेवट !

**राजा** : शिव शिव !

**चंद्रसेन** : हें पहा, येथें सगळा चट्टयामट्टयाचा प्रकार आहे !

**किडा खाई राजाला ॥ मासा गट्ट करी त्याला ॥**
**भिकारी तो त्या माशाला ॥ धरूनि फांशीं मटकावी ॥**

**राजा** : म्हणतो आहेस तरी काय ?

**चंद्रसेन** : दुसरें काय ? राजेलोकांना भिकाऱ्याच्या आंतड्यांत जाऊन बाहेर पडण्याची पाळी कशी येते हें दाखविलें.

**राजा** : चंद्रसेना, शालेय कोठें आहे ?

**चंद्रसेन** : स्वर्गलोकीं ! तेथे त्याला हुडकायाला कोणी पाठवा; तुमच्या मनुष्याला तेथें तो सांपडला नाहीं तर त्याला नरकलोकीं शोधायाला तुम्हांला खुद्द गेलें पाहिजे. पण खरोखरीच तुम्हांला असें सांगतों कीं, एका महिन्याच्या आंत जर तो तुम्हांला सांपडला नाहीं, तर जिन्यावरून--सज्जावरून जातांना तुम्हांला त्याचा वास येईल.

**राजा** : जा, पहा जा, तेथें त्याला पुरला आहे कीं काय ?

[कांहीं चाकर जातात.]

**चंद्रसेन** : त्याला कशाला इकडे आणवितां ? आपण जाईतोंपर्यंत तोच तेथें थांबेल.

**राजा** : चंद्रसेना, तुझ्या हातून जी चूक झाली आहे तींतून तुला कसें तरी पार पाडिलें पाहिजे. म्हणून, आम्ही अशी योजना केली आहे कीं, सर्व मायापाश एकीकडे ठेवून तुला क्षणाचा विलंब न करितां तूर्त श्वेतद्वीपाला पाठवून द्यावा;

यासाठीं आपली काय तयारी करावयाची असेल ती लवकर कर. गलबत तयार आहे, वारा अनुकूल आहे; बरोबरच्या सर्व मंडळीची सिद्धता आहे; सारांश, निघण्यास उणें म्हणून कांहीं नाहीं. उद्यां सूर्योदयाच्यापुढें तुम्ही येथें उपयोगी नाहीं.

**चंद्रसेन** : श्वेतद्वीपाला काय ?

**राजा** : होय, चंद्रसेना.

**चंद्रसेन** : छान, छान.

**राजा** : आमचे हेतु मनांत आणशील तर युक्ति चांगली आहे असें तुझ्या लक्षांत आल्याखेरीज राहणार नाहीं.

**चंद्रसेन** : तुमचे हेतु समजायाला चाणक्यच पाहिजे ! बरें असो, श्वेतद्वीपाला ना ! येतों तर मग निरोप, आईसाहेब.

**राजा** : आई नव्हे, बाप.

**चंद्रसेन** : छेः, आईच. आई आणि बाप म्हणजे नवरा आणि बायको; एकाच हाडामांसाचीं. कारण, बायको नवऱ्याची अर्धांगी; आणि म्हणून 'आई'च ठीक आहे. श्वेतद्वीपाला ना ? येतों तर मग.

[**चंद्रसेन** निघून जातो.]

**राजा** : जा, जा, त्याच्या पाठोपाठ जा; आणि युक्तिप्रयुक्तीनें त्याला गलबतावर घेऊन चला; बिलकुल उशीर लावूं नका. आजच्या रात्रीं तो येथून बाहेर पडेल तर बरें होईल. चला निघा; सगळ्या प्रकारची जाण्याची तयारी झाली आहे. आतां अगदीं विलंब लावूं नका. कृपा करून होईल तितकी त्वरा करा.

[**जुंग** आणि **भृंग** निघून जातात.]

हे श्वेतद्वीपाधिपते, या बलभद्राचें विस्तीर्ण सामर्थ्य मनांत आण, म्हणजे संग्रामनिष्णात आमच्या प्रखर खड्गापुढें तुमचीं नवशिकीं हत्यारें कांहींच नाहींत, व आमच्या पराक्रमाला भिऊन तुम्ही आम्हांस करभार देतां आहां ही गोष्ट तुझ्या लक्षांत येईल, व त्यामुळें आमच्याशीं स्नेह जोडणें किती आवश्यक आहे हें समजून येऊन आज आम्ही तुझ्यावर जी विश्वासाची कामगिरी सोपविली आहे, तिची तुझ्याकडून उदासीनपणामुळें हयगय होणार नाहीं. वकिलांपाशीं दिलेले खलिते वाचून पाहिल्यावर चंद्रसेनाला जगांतून दूर करण्याचें काम तुझ्यावर टाकलें आहे, हें तुला कळून यईल. हे श्वेतद्वीपाधिपते, हें काम कसेंहि करून

तूं करच; याच्यामुळें सर्पदंशासारख्या मला वेदना होत आहेत, त्यांतून मला तूं सोडीव. हें काम तुझ्याकडून फत्ते झालें असें मला कळेपर्यंत, कांहीं केलें तरी सुख म्हणून कांहीं मला होणार नाहीं. [जातो.]

## प्रवेश ४ था

स्थळ–बलभद्रांतील एक माळ.

[**प्लवंगाधिप, तांडेल, खलाशी** वगैरे प्रवेश करितात.]

**प्लवंगाधिप** : दीपसिंग, तुम्ही बलभद्राधिपतीकडे जा, त्याला आमचे फार फार सलाम सांगा, आणि असें कळवा कीं, पूर्वी वचन दिल्याप्रमाणें प्लवंगाधिप आपल्या राज्यांतून सैन्य नेण्याची परवानगी मागत आहे. तळ कोठें पडणार हें तुला ठाऊक आहेच. शिवाय, त्यास आणखी असें सुचवावें कीं, त्याच्या मनांत आमच्याशीं कांहीं बोलावयाचें असल्यास आम्ही समक्ष येऊन भेटण्यास व हवा तो खुलासा करण्यास तयार आहों.

**दीपसिंग** : जातों, धनीसाहेब.

**प्लवंगाधिप** : जपून बेताबातानें जा.

[**प्लवंगाधिप** आणि **खलाशी** जातात.]

[नंतर **चंद्रसेन, जुंग, भूंग** आणि दुसरे कांहीं इसम प्रवेश करितात.]

**चंद्रसेन** : तांडेलसाहेब, कुणाचें सैन्य हें ?

**तांडेल** : प्लवंगाधिपतीचें, महाराज.

**चंद्रसेन** : मेहेरबानी करून कोणीकडे चाललें आहे तें सांगाल का ?

**तांडेल** : पोलोमाच्या एका भागावर.

**चंद्रसेन** : त्यावर सेनापति कोण आहे बरें ?

**तांडेल** : वृद्ध प्लवंगाधिपतीचे पुतणे, महाराज.

**चंद्रसेन** : बरें, थेट पोलोमावर किंवा त्याच्या सीमेवर चाल होत आहे ?

**तांडेल** : खरेंच पुसाल, तर टीचभर जमिनीच्या तुकड्याचा तंटा पडला आहे. तो काबीज करण्यासाठीं आम्ही चाललों आहों. माझ्याकडे तो लागवडीला असता तर त्याच्याबद्दल मी चार आणे देखील फाळा देतों ना; आणि खरेंच सांगतों, आज त्याचा मिराशी हक्क जरी कोणाला विकला तरी, पोलोमाला किंवा प्लवंगाला, मी म्हणतों यापेक्षां एक तनसडी देखील कोणी अधिक देणार नाहीं.

**चंद्रसेन** : असें असेल तर पोलोमचा राजा त्याची मुळींच पर्वा करणार नाहीं.

**तांडेल** : त्याचें कशाला नांव घेतां ? त्यानें केव्हांच त्याच्यासंबंधीं बंदोबस्त केला आहे !

**चंद्रसेन** : दोन हजार शिपाई आणि वीस लक्ष रुपये खर्ची घालून देखील या येवढ्या तुकड्याच्या भांडणाचा निकाल लागेल का याचा संशय अं ! संपत्तीला ऊत आला आणि शांतता फाजील झाली, म्हणजे बाहेर कांहीं एक गडबड नसतां मनुष्यामनुष्यांत रणें पडण्यास आंतल्या आंत जीं कारणें निपजतात तीं या रीतीनें होत. रामराम, तांडेलसाहेब.

**तांडेल** : खावंदांवर परमेश्वर चिरकाल प्रसन्न असो. [**तांडेल** जातो.]

**जुंग** : महाराज, चलतां ना ?

**चंद्रसेन** : थोडें पुढें व्हा; हा पहा, तुमच्या पाठोपाठ आलोंच म्हणून समजा.

[**चंद्रसेना**खेरीज सगळे जातात.]

**चंद्रसेन** : जी जी गोष्ट पहावी तीवरून मी अजून कसा सूड उगविला नाही याबद्दल मजकडे जबरदस्त दोष येऊं पाहतो ! गिळायाचें आणि झोंप ताणायची अशांतच मनुष्यानें आपला सगळा वेळ आणि शहाणपण हें भरीस घातलें, तर पशूपेक्षां त्याची मातब्बरी ती कशासाठीं मानायाची ? असें तो करील तर तो निव्वळ पशु; अधिक कांहीं नाहीं. ईश्वरानें आम्हांस पूर्वापार ज्ञान होईल असें जें बुद्धिवैचित्र्य दिलें तें उपयोगावांचून निष्फळ दवडण्यासाठीं नव्हे. परिणामाविषयीं वारंवार शंका घेऊन 'हें करूं कीं नको ? तें करूं कीं नको ?' अशा विवंचनेंत फार वेळ पडणें हें अत्यंत मंदबुद्धित्वाचें लक्षण होय. अशा विचारांत एक भाग शहाणपणाचा तर तीन भाग मूर्खपणाचे असतात. हेतु, इच्छा, सामर्थ्य व इतर सर्व साधनें यांचें मला आनुकूल्य असतांही "अरे, ही गोष्ट अजून माझ्या हातून व्हावयाची आहे !" असें घुम्यासारखें मीं घोकीत कां बसावें ? जमिनीच्या एवढ्याशा तुकड्यासाठीं जीवांची राखरांगोळी करण्यास सिद्ध झालेल्यांची ढोबळ उदाहरणें माझ्यापुढें असतां मी आपला बसल्या जागेवरून हालत नाहीं, तेव्हा काय म्हणावें या शंकेखोरपणाला ! पहा बरें, येवढें मोठें प्रचंड सैन्य हा अल्पवयस्क सुकुमार राजपुत्र युद्धाला घेऊन निघाला आहे, पण त्याबद्दल त्याला येवढी तरी भीति वाटते आहे काय ? अति उद्दाम महत्त्वाकांक्षेनें त्याची चित्तवृत्ति ग्रासून टाकली असल्यामुळें तो जिवावर उदार झाला आहे ! आपल्यावर येणाऱ्या भयंकर प्रसंगाची त्याला भीति देखील वाटत नाहीं,

आणि एका कसपटाच्या मोलाच्या तुकड्यासाठीं वित्त, शरीर व जीवित यांच्याविषयीं तो बेगुमान झाला आहे. मोठेपणाचें खरें लक्षण म्हणजे मोठेंच कारण घडून येईपर्यंत स्वस्थ बसणें हें नव्हे, तर ज्या ठिकाणीं मानहानि होण्याचा प्रसंग आहे, त्या ठिकाणीं कसपटासाठीं देखील जीव देण्यास तयार असणें हें होय. आतां माझी स्थिति पहा. लोकांनीं बाप मारावा, आई भ्रष्ट करावी; मनाची आणि शरीराची लाही होत असावी, तरी आपला पाषाणासारखा मी जागच्या जागीं सुस्त? निर्लज्जा चंद्रसेना, आज वीस हजार मनुष्यांच्या डोक्यांत अभिमानाचें वेड शिरून तीं नांव गाजविण्यासाठीं, त्या सर्वांना गाडण्यास देखील न पुरण्यायेवढ्या जमिनीच्या तुकड्यासाठीं, जीवांचे बळी पाडण्यास सिद्ध झालीं आहेत, हें पाहून तरी कांहीं हातपाय हालवूं लाग! (थोडा वेळ विचार केल्यासारखें करून) ठीक आहे, येथून पुढें विचार करायाचा तर एक सूड घेण्याचा आणि खून पाडण्याचा, नाहीं तर विचार असा करायाचा नाहीं!

## प्रवेश ५ वा

**स्थळ** : किल्ल्यांतील एक दिवाणखाना.

[**राणी**, **प्रियाल** आणि एक **गृहस्थ** येतात.]

**राणी** : मी तिच्याशीं बोलणार नाहीं.

**गृहस्थ** : ती अगदीं केविलवाणी व भ्रमिष्टासारखी झाली आहे. तिची ती दशा पाहून दुःख वाटल्यावांचून राहत नाहीं.

**राणी** : ती म्हणते तरी काय?

**गृहस्थ** : ती आपल्या बापाची वारंवार आठवण करते, आणि असें म्हणते कीं, त्याच्यासंबंधानें दुनियेंत झालेली गडबड माझ्या कानावर आली आहे; मग मोठ्यानें सुस्कारे टाकते, ऊर बडवून घेते, व झाडझुडुप पाहिलें कीं, त्याच्यावर आवेशानें चालून जाते. तिच्या बोलण्यांत तरी कांहीं अर्थ असतो असें नाहीं. पण अर्धें तोंडांतल्या तोंडांत, अर्धें स्पष्ट असें जें ती पुटपुटते, तें ऐकून भोवतीं जमलेल्या लोकांना मात्र असें वाटतें कीं, त्यांत कांहीं अर्थ असावा. मग ते आपआपल्या समजुतीप्रमाणें आणि इच्छेप्रमाणें तिच्या त्या विसंगत बरळण्याचा अर्थ काढूं लागतात. तिची ती दीन मुद्रा, ते वेडेवांकडे हातवारे व तें घाबऱ्या घाबऱ्या पाहणें, यांनीं कित्येकांना असें वाटतें कीं, आम्हीं काढलेलाच तर्क खरा. सारांश काय कीं, तिची ती दैन्यावस्था पाहून ती कांहीं तरी सार्थ बोलत असेल असें वाटतें, व फार खेद होतो.

**प्रियाल :** राणीसाहेब, तिच्याशीं बोलावें हें बरें. नाहीं तर तिच्या बोलण्या-वर कुटाळ लोक नाहीं नाहीं त्या कोटया बसवूं लागतील.

**राणी :** बरें तर मग, येऊं दे तिला आंत. [प्रियाल निघून जातो.] कोण माझी दशा ही ! अथवा पापी अंतःकरणाचा धर्मच असा कीं, कांहीं घडून आलें तरी त्यावरून, आपणावर मोठें अरिष्ट येणार आहे असें त्यास वाटायाचेंच ! गाळांत रुतलेल्या मनुष्याप्रमाणें अपराधी मनुष्य सुटण्यास जों जों प्रयत्न करितो तों तों अधिक अधिकच गोत्यांत पडतो.

[**मल्लिकेसह प्रियाल पुनः येतो.**]

**मल्लिका :** बलभद्राची सुंदर राणी कोठें आहे ?

**राणी :** मल्लिके, बाई कसें काय ?

**मल्लिका :** (गाते.) (पद)

**करुं काय मि रे मजला जाशी त्यजुनी**
**मज दुबळी येथ करुनी ।।**
**तें मजवरिचें, प्रेम आज संपोनी**
**शवगर्ती जाय लपोनी ।।**
**उजळपणा त्या प्रेमाचा, रे ।**
**आजवरी दृष्ट जो साचा, रे ।**
**मज न पुन्हां तो पाहूं मिळे कीं नयनीं ।**
**जातें मीहि तर्मी बुडुनी ।।** १

**राणी :** मल्लिके, अग मल्लिके, असें काय बडबडतेस बाई ? काय झालें तुला ?

**मल्लिका :** कसें ? कसें म्हणतां बाईसाहेब ? कसें होय ?

(पद)

**किति सांगुं तुम्हांला बाई, जाहलें काई, वृत्त आजी**
**जें सुदृढ हृदय भाजी ।। अहो ऐका ! ।।ध्रु०।।**
**अजि जाय मरुनि तो पहा, धरणितें त्यजी वीरगाजी**
**विसरोनि चिता माजी ।। अहो० ।।**
**प्राण जयाचे हरिले यमानें ।**
**देह तयाचा धरिला धरेनें**
**घेई शिलेला अपुल्या उशाला ।**
**तृणशय्येवर करि शयनाला ।।**

**राणी** : अग मल्लिके, हें बघ —

**मल्लिका** : (गाते.) **देवाजीच्या कृपें ॥ आमच्या बाबाला ॥**

**प्रसंग हा आला ॥ विपरीत ॥**

**राणी** : माझें थोडें ऐकणील का, मल्लिके ? [राजा येतो.]

**मल्लिका** : आपलें ना ? आपलें ना ? हो हो; ऐका, ऐका. (गाते.)

(पद)

**मृत देह मागुती उरे, पुरिति खल तथा भूमिमाजी**
**क्रूरता हृदयीं ताजी ॥अहो०॥ २**

**होति त्या दुजी नच उशी,—लांकडी—तरी तीस राजी**
**स्वस्थ तें पडत शेजीं ॥अहो०॥ ३**

**राजा** : बाळे, कसें काय आहे ?

**मल्लिका** : बरें, बरें, देव तुमचें कल्याण करो. वडयाचें तेल वांग्यावर आणि काकाचा राग बापावर ! महाराज, आपण काय आहों हें आपणांस समजतें, पण काय होऊं तें समजत नाहीं, होय ना ? साखरेचें खाणें त्याला देवाचें देणें ! (तोंडांतल्या तोंडांत गाण्याचे सूर ओढते.)

**राजा** : एकसारखा बाप तिच्या मनांत घोळतो आहे, आणि दुसरें काय ?

**मल्लिका** : जाऊं द्या कीं, त्याचें नांव कशाला ? पण जर कोणीं विचारिलें कीं याचा अर्थ काय ?—तर असें म्हणावें—(गाते.)

(अंजनीगीत)

**उदइक विजयादशमीला मी, नाहुनि माखुनि वस्त्रें लेउनि ।**
**येइन मित्रा आस धरूनी, भार्या तव व्हाया ॥**

(कामदा)

**विसरलां कशी ही स्ववल्लभा । तुजविणें मला कोण, वल्लभा ?**
**प्रियकरा, तुला वेष्टि मल्लिका । आम्रका जशी स्निग्ध वल्लिका ॥**

**राजा** : ताई मल्लिके, माझें थोडें ऐकून घेशील का ?

**मल्लिका** : तुमच्या गळयाशपथ मी पुनः असें कधीं नाहीं करायाची. नाहीं भरंवसा ठेवायाची. त्याचें नांव नाहीं काढायाची. (गाते.)

(साकी)

त्या तरुणाच्या मधुरालापें वेडावुनि ती गेली
परि निर्लज्जें वचन मोडुनी फारचि दुःखित केली ॥
चेष्टा मदनाच्या ॥ केवळ विपरित करणीच्या ॥

**राजा** : इची अशी स्थिति होऊन किती दिवस झाले ?

**मल्लिका** : आतां सर्व ठीक होईल असें मला वाटतें. मनुष्याला धीर पाहिजे. पण त्या म्हाताऱ्याला अगदीं गार जमिनींत त्यांनीं निजविला हें पाहून मला रडें आल्याशिवाय राहत नाहीं. हें सारें समजेल माझ्या दादाला. तुमच्या भल्या उपदेशाचें माझ्या डोक्यावर मोठें ओझें आहे. आ रे बेटा, आव ? ये, इस् पिस पिस ! येतें, बायांनो, येतें अं ? सासूबाई, येतें अं ? (जाते.)

**राजा** : प्रियाला, जा बाबा तिच्या पाठोपाठ, आणि तिला भलतेंसलतें करूं देऊं नको. (प्रियाल जातो.) दुःख अत्यंत दुःसह झालें म्हणजे त्याचा असा शोचनीय परिणाम होतो. बापाचें अकस्मात् मरण हेंच तिच्या वेडाचें कारण. मदनिके, मदनिके ! संकटें यायाला लागलीं म्हणजे तीं एक–दोनच, कोणीकडे आलीं आणि कोणीकडे गेलीं, असें व्हायाचें नाहीं. तीं एकदां येऊं लागलीं म्हणजे त्यांचे पर्वतच्या पर्वत कोसळतात. प्रथम तिचा बाप मारला गेला; पुढें तुझ्या मुलाला पराकाष्ठेच्या अवखळ गुणामुळें बाहेर घालवावा लागला. सत्य माहीत नसल्यामुळें शालेयाच्या मरणासंबंधानें लोकांत नाहीं नाहीं त्या दाट अफवा पसरत आहेत, व ते त्याविषयीं हवे तसले तर्क काढूं लागले आहेत; इकडे आम्ही घाईघाईनें त्याला आंतल्या आंत मूठमाती देऊन बसलों; बरें, अशा प्रसंगीं मल्लिका तेवढी तरी नीट असायाची होती, पण तेंही नाहीं. तिलाही याच वेळेस वेड लागलें ! विचारच नाहींसा झाल्यावर माणसांत आणि मातीच्या चित्रांत किंवा पशूंत काय फरक आहे ? मी इतक्यालाही डगलों नसतों. पण नुकतीच अशी बातमी लागली आहे कीं तिचा भाऊ उत्तालाहून चोरून येथें आला आहे व शालेयाच्या मृत्यूसंबंधानें टवाळ लोक नाहीं नाहीं त्या कल्पना त्याच्या मनांत भरून देत आहेत, त्यामुळें तो अगदीं खवळून गेला आहे. व मुळांत तथ्य काय आहे हें माहीत नसल्यामुळें त्याला आमचा संशय येऊन त्यानें आम्हांवर मोटा कटाक्ष धरिला आहे. हें ऐकल्यावर मात्र माझें धाबें अगदीं गडबडून गेलें; मनुष्य धीर तरी धरील कोठवर ? या निरनिराळ्या यातनांमुळें एखाद्याला तोफेच्या तोंडीं बांधून मारावें तशी माझी अवस्था झाली आहे. (आंत गडबड होते.)

**राणी** : कोण आहे आंत ? कसली गडबड चालली आहे ?

**राजा** : कुठें आहेत ते माझे तुर्क ? त्यांना म्हणावें दरवाजावर हुशार रहा !

[ दुसरा एक **गृहस्थ** प्रवेश करितो. ]

(त्यास) काय गडबड आहे हो ?

**गृहस्थ** : महाराज, आपला जीव सांभाळा, जीव सांभाळा ! प्रचंड वणवा पेटला म्हणजे तो जशीं एका पाठीमागून एक रानें मोठ्या झपाट्यानें फडशा करीत जातो, त्याप्रमाणें तीव्रजव हा द्वाड आणि दांडग्या लोकांचा पुढारी होऊन तुमच्या अधिकाऱ्यांना बेदम करीत इकडे वेगानें येत आहे. बाजारभाई त्याला राजा म्हणूं लागले आहेत; जिकडे तिकडे अंदाधुंदी माजून राहिली आहे; लहान नाहीं, थोर नाहीं; नवें नाहीं, जुनें नाहीं. जो तो वाटेल तसें बोलूं लागला आहे ! धाक अगदीं उडाला; वचक तर नाहींसा झाला व चालरीत चटसारी बुडून जाऊन चोहोंकडे झोटिंगपादशाही माजून राहिली आहे, व जग अत्यंत रानटी अवस्थेंत असल्यासारखें भासूं लागलें आहे. शहरचे सगळे हुच्चभाई, " तूं आमचा राजा ! तूं आमचा राजा !" म्हणून त्या तीव्रजवाच्या पाठीमागें लागले आहेत, आणि " कांहीं झालें तरी आम्हीं तीव्रजवाला राजा करणारच करणार " असा आकाश-पाताळ दणदणून टाकणारा ओरडा करीत भटकत आहेत !

**राणी** : द्वाडपणाची मेल्यांना केवढी हौस पहा ! चांगलें, चांगलें, बल-भद्राच्या कुत्र्यांनो, चांगलें आरंभलें आहे ! (आंत आवाज होतो.)

**राजा** : अरे, यांनीं दारेंसुद्धां फोडिलीं वाटतें !

[ शस्त्रासह **तीव्रजव** व त्याच्या पाठीमागून
**बलभद्राचे** लोक येतात. ]

**तीव्रजव** : राजा कोठें आहे ? लोक हो, आपण कृपा करून बाहेर उभे राहा.

**लोक** : नाहीं, आम्ही आंत येतों.

**तीव्रजव** : कृपा करून माझें म्हणणें ऐका.

**लोक** : बरें आहे, बरें आहे. [लोक दाराच्या बाहेर राहतात.]

**तीव्रजव** : मी तुमचा आभारी आहें. दारावर मात्र खडा पहारा असूं द्या. नीचा राजा, माझा बाप कुठें आहे तो टाक ?

**राणी** : बाळा तीव्रजवा, शांत होशील का ?

**तीव्रजव** : शांत होऊं म्हणतेस ? रांडेचा कारटा असतों तर मी शांत झालों असतों ! शांत होऊन निर्दोष बापाला जारिणीपति आणि निष्कलंक आईला अधम जारिणी करूं काय ?

**राजा** : तीव्रजवा, सगळी मर्यादा सोडून असा क्रोधाविष्ट कां झालास ? मदनिके, सोड त्याला. माझ्या जीवाबद्दल भिऊं नको. राजकायेवर नैसर्गिक तेजाचें आणि पवित्रतेचें असें झांकण असतें, कीं राजद्रोह कितीहि प्रमत्त झाला तरी तिला तो दटावील मात्र; पण तिच्यावर प्रत्यक्ष हात टाकण्याची किंवा तिला स्पर्श करण्याची त्याची छाती नाहीं. तीव्रजवा, तू असा संतापलास कां, तें मला मांग. मदनिके, किती सांगावें, सोड त्याला. बोल, तीव्रजवा, बोल.

**तीव्रजव** : माझा बाप कोठे आहे ?

**राजा** : तो मेला.

**राणी** : पण तो त्यांच्याकडून नाहीं कांहीं !

**राजा** : त्याला हवें तें विचारूं दे.

**तीव्रजव** : तो कसा मेला ? माझ्याशीं चेष्टा चालायाच्या नाहींत. धिक्कार असो राजनिष्ठेला ! वचनें आणि प्रतिज्ञा जळून खाक होवोत ! सदसद्विचार आणि प्रौढता यांचा खग्रास होवो ! हवी ती शिक्षा सोसायाला मी तयार आहें. माझा मुद्दा येवढाच आहे कीं, जें होईल तें होवो, मृत्युलोक आणि स्वर्गलोक यांना मी अंतरलों तरी बेहेत्तर आहे, पण मी म्हणून माझ्या बापाच्या मृत्यूबद्दल पक्का सूड घेतल्याशिवाय कधींही सोडणार नाहीं !

**राजा** : कोण तुझा हात धरणार आहे ?

**तीव्रजव** : माझा मी. सगळ्या जगाचें देखील मी ऐकणार नाहीं ! कुणाला वाटेल कीं हें माझ्या हातून कसें होईल ? पण सांगून ठेवतों, माझ्यापाशीं अशीं साधनें आहेत कीं, त्यांच्यामुळें मला थोडक्यांत पुष्कळ काम साधतां येणार आहे.

**राजा** : तीव्रजवा, तुझ्या बापाला कोणीं पारिलें हें निश्चयात्मक समजून घेणार, का आवेशाच्या भरांत मित्राला व अमित्राला आणि अपराध्याला व निरपराध्याला सगळ्यांनाच रसातळाला पाठविणार ?

**तीव्रजव** : त्याच्या शत्रूशिवाय इतरांच्या केंसाला बोट नाहीं लावायाचा !

**राजा** : मग ते कोण आहेत हें तुला समजून घ्यायाचें आहे काय ?

**तीव्रजव** : त्याचे जे मित्र असतील त्यांना—हें पाहा. (बाहु पुढें करून) मी असें घट्ट आलिंगन देईन; व गरज पडल्यास त्यांच्यासाठीं आपली मान उतरून देण्यास सुद्धां मागेंपुढें पहाणार नाहीं.

**राजा** : वाजवी. आतां तूं सदपत्याप्रमाणें आणि चालीच्या पुरुषाप्रमाणें बोलूं लागलास. तुझ्या बापाचा जो एकाएकीं शेवट झाला त्यांत माझें बिलकुल अंग नाहीं, व त्यासाठीं मला पराकाष्ठेचें दुःख होत आहे, अशी तुझ्या अंतःकरणाची बालंबाल खात्री झाली तर तूं मला दोष नाहीं ना लावणार ?

**लोक** : (पडद्यांत) येऊं दे तिला आंत.

**तीव्रजव** : काय आहे तिकडे ? गडबड कसली ?

( **मल्लिका** पुनः येते. )

अग्निनारायणा, माझा मेंदू जाळून त्याची राखरांगोळी कर ! अश्रूंनो, सातपट खारट होऊन माझ्या डोळ्यांच्या पहाण्याच्या शक्तीचा समूळ उच्छेद करा ! शपथ घेऊन सांगतों, या तुझ्या वेडेपणाच्या भारंभार, तीळभर अधिक पण कमी नाहीं, इतका सूड घेतल्यावांचून मी राहणार नाहीं. अहाहा ! नयनानन्दकारिणी, आम्रकलिके, सुकुमार कुमारी, प्रिय भगिनी, रमणीय मल्लिके ! देवा, देवा, देवा ! वृद्ध मनुष्याच्या जीवित्वाप्रमाणें अशा तरुण कन्येची बुद्धिही लयाला जावी का ? मनुष्याची मनोवृत्ति प्रेमानें उन्नत होते, प्रेमविषय नाहींसा झाला म्हणजे त्याच्याबरोबर तिचा सारभूत असा कांहीं भाग तरी नाहींसा झाल्याशियाय रहात नाहीं.

**मल्लिका** : (गाते) (पद)

**अरे मेल्या यमा हित काय तुशीं ? ॥ ध्रु० ॥**
**ते सौख्यनिधी, महनीय गुणी,**
**उचलोनि तयाप्रति नेशि क्षणीं,**
**तुजला कि नसे पुसताच कुणी ?**

**शासन करि तुज, नुरला किं कुणि अज, कथि तूं मज**

**तीव्रजव** : ताई, तुझी ही दैन्यावस्था पाहून माझ्या अंगांत क्रोधाग्नि जसा भडकत आहे, तसा तुझ्या शुद्धीतल्या भाषणांनीं सुद्धां भडकला नसता !

**मल्लिका** : (गाते)

**गा गा गा गा गा**

जाऊन येऊन फिरुन मुली तूं "गा गा गा गा गा." पाहिलेंसना, हें ध्रुपद कसें जुळतें तें ? (गाते.)

**धन्याची पोर, धन्याची पोर,**
**जो नेई तो हरामखोर.**

**तीव्रजव** : शुद्ध तथ्याखेरीज या बरळण्यांत दुसरें कांहीं नाहीं.

**मल्लिका** : ही बकुळीची कळी; ही घे तुला; विसरूं नको बरें; ही कोराटीची डाहळी घे म्हणजे तुला विचार फुटतील.

**तीव्रजव** : आ हा हा ! स्वप्नांत जागृति यावी त्याप्रमाणें ह्च्या खुळेपणांत देखील ह्लिा ही कोण आठवण आणि कोण विचार !

**मल्लिका** : ही पहा कांहीं गुलबाशीची आणि कांहीं तगरीचीं फुलें आहेत; या आघाडयांतला निम्मा तुला घे आणि अर्धा मला ठेव. त्याचें तूं बाशिंग कर अं ? लोकांला कशाला आधीं नादीं लावावें आणि मग फशीं पाडावें ? (गाते.)

**खुळघाला खुळा मिळाला। जीव घेऊन पळाला ॥**

आलें अं, आलें अं, जरा थांब, थोडें थांब. होतीं पुष्कळ, पण बाबा मेला त्या दिवशीं सगळीं कोमेजलीं; म्हणतात त्याचा चांगला शेवट झाला !

**तीव्रजव** : विचार, व्यथा, विकार,—सारांश, इचें जें जें पहावें तें तें अंतःकरणाला पाझर फोडितें आणि करुणा आणितें.

**मल्लिका** : (गाते.) **धरणीवर पडला ।**
**बाबा माझा धरणीवर पडला ।**
**धरणीवर पडला ।**
**बाबा माझा धरणीवर पडला ॥**

जे देवा, तुझ्या पायां पडतें; जे देवा, तुझ्यापुढें नाक घासतें. (जाते.)

**तीव्रजव** : देवा, हें तूं पाहतो आहेस काय रे ?

**राजा** : तीव्रजवा, तूं आपल्या दुःखाचा अर्धा वांटा मला न देशील तर त्वां माझ्याशीं मोठा अन्याय केल्यासारखें होईल. गांवांत जा, आणि तुला वाटतील ते चार शिष्ट मित्र घेऊन ये; ते सर्व हकीगत समजून घेऊन तुझा-आमचा न्याय करतील. आणि मग जर त्यांच्या नजरेला असें आलें की, साक्षात् किंवा परंपरेनें तुझ्या बापाच्या मरणाशीं माझा अगदीं थोडा तरी संबंध आहे, तर तुझें समाधान करण्यासाठीं तुला मी आपलें राज्य, मुकुट, आणि म्हणशील तर जीव देखील देईन; पण तसें झालें नाहीं तर मात्र तूं शांत होऊन आमच्या विचारानें चाल, म्हणजे आपण एकदिलानें परिश्रम करून अपराध्याला योग्य दंड करण्याचा उपाय करूं.

**तीव्रजव** : बरें तर मग, तसेंच होऊं द्या. परंतु त्याला कोणी कोणत्या उपायांनीं मारला, उघडपणें त्याचा प्रेतसंस्कार कां झाला नाहीं, देऊळ, समाधि

किंवा कोणत्याही प्रकारचें स्मारक त्याच्यासाठीं कां झालें नाहीं, त्याच्या नांव-लौकिकाप्रमाणें गो-दानें, शय्यादानें, श्राद्धक्रिया इत्यादि धर्मकर्में कां झालीं नाहींत वगैरे अनेक गोष्टींची बारीक चौकशी लागून माझें समाधान होण्याजोगा निवाडा झाला पाहिजे.

**राजा** : बरें, तसें होईल, जो अपराधी ठरेल त्याचा शिरच्छेद करूं. चल तर मग आतां माझ्याबरोबर. [निघून जातात.]

——

## प्रवेश ६ वा

स्थळ – किल्ल्यांतील दुसरी एक खोली.

[**प्रियाल** आणि एक चाकर प्रवेश करितात.]

**प्रियाल** : कोण ते माझ्याशीं बोलण्यासाठीं खोळंबून राहिले आहेत ?

**चाकर** : खलाशी, सरकार. आपल्या नांवचीं पत्रें घेऊन आलों आहों, असें ते म्हणतात.

**प्रियाल** : येऊं दे त्यांना आंत. (चाकर जातो.) चंद्रसेन महाराजांकडून जर हे खलाशी आले नसतील तर दुसऱ्या कोणाकडून हे यावेत याचा माझ्यानें अजमास करवत नाहीं. [**खलाशी** येतात.]

**एक खलाशी** : ईश्वर तुमचें कल्याण करो !

**प्रियाल** : तो तुझेंहि कल्याण करो !

**प० खलाशी** : आलें त्याच्या मनांत तर करील बापडा. महाराज, हें आपल्याला पत्र दिलेलें आहे. श्वेतद्वीपाला जो वकील निघालेला होता त्याजकडून हें आलेलें आहे. आपल्याला प्रियालच म्हणतात ना ?

**प्रियाल** : (वाचतो)

"प्रियाला, हें पत्र वाचून पाहिल्यावर या लोकांना राजाला भेटविण्याची कांहीं तरी खटपट कर. यांच्यापाशीं राजाला देण्यासाठीं दिलेलीं पत्रें आहेत. आम्हांला निघून दोन दिवस झाले नाहींत तों चांचे लोकांचें एक लढाऊ गलबत आमच्या पाठीस लागलें. वारा अगदीं मंद असल्यामुळें गलबतें चालेनात. शेवटीं निरुपायास्तव लढाईला उभें राहणें भाग पडलें. तिच्या झपाट्यांत मी चांच्यांच्या

गलबतांत उतरलों. लागलेंच त्यांनीं आमच्या गलबतापासून आपलें गलबत दूर काढून घेतलें, व दुर्दैवानें मी एकटाच त्यांत कैदी सांपडलों. भल्या चोराप्रमाणें ते माझ्याशीं वागले, व त्यांनीं मला कोणत्याही प्रकारचा त्रास दिला नाहीं; याबद्दल पुढें-मागें मला त्यांचे उपकार फेडले पाहिजेत. मीं पाठविलेलीं पत्रें राजाला पोहोंचतीं कर, आणि होईल तितकी त्वरा करून मला येऊन भेट. मला तुजपाशीं दोन गोष्टी बोलायाच्या आहेत. त्या ऐकल्याबरोबर तुझी छाती फुटेल, परंतु संकटाच्या मानानें त्या कांहींच नव्हत हें तुला समजून येईल. हे भले खलाशी मी ज्या ठिकाणीं आहें त्या ठिकाणीं तुला घेऊन येतील. जुंग आणि भृंग श्वेतद्वीपाच्या वाटेवर आहेत. त्यांच्याविषयींही मला तुजपाशीं पुष्कळ सांगायाचें आहे."

'तुझें निरंतर हित चिंतणारा
तुझा प्रिय मित्र,
**चंद्रसेन.**'

चला, मी तुमच्या पत्रांची वास्तपुस्त लावतों, आणि हें मला लवकरच केलें पाहिजे. कारण, ज्या ठिकाणाहून तुम्हीं पत्रें आणलींत त्या ठिकाणीं तुम्हांला घेऊन जायाचें आहे. [जातात.]

——

## प्रवेश ७ वा

**स्थळ**—किल्ल्यांतील दुसरा एक दिवाणखाना.

[**राजा** आणि **तीव्रजव** प्रवेश करितात.]

**राजा** : आतां मजविषयींचा तुझ्या मनांतला सगळा राग नाहींसा होऊन तूं मला आपल्या जिवलग मित्राप्रमाणें मानिलें पाहिजेस. कारण तुला सर्व हकीकत कळली आहे, आणि तीवरून असें समजून आलें आहे कीं, ज्यानें तुझा बाप मारिला तो माझाही जीव घेण्याविषयीं प्रयत्न करीत होता.

**तीव्रजव** : असें उघड दिसतें खरें. पण ज्या हरामानें असे दारुण आणि निर्घृण अपराध केले, त्याची चौकशी तुम्हीं कशी केली नाही ? ज्याला थोडें शहाणपण आहे किंवा स्वसंरक्षणाची काळजी आहे, तो असें करण्यास कधीं न चुकता.

**राजा** : खरें म्हणतोस. पण तसें न करण्याला मुख्य दोन कारणें झालीं. तीं कदाचित् तुझ्या दृष्टीला पोकळ दिसतील, पण मला फारच महत्त्वाचीं वाटतात. एक तर राणीनें म्हणजे त्याच्या आईनें त्याच्याकडे पाहून जीव धरिला आहे; आणि माझ्याविषयीं म्हणशील तर--आतां त्यांत माझा गुण असो कीं दुर्गुण असो—ती माझ्या सुखाला आणि जीवित्वाला इतकी आवश्यक होऊन बसली आहे कीं, ताऱ्यास जसें आपल्या कक्षेंतून बाहेर पडतां येत नाहीं, त्याप्रमाणें तिचें वचन मला उल्लंघवत नाहीं. त्याची उघडपणें चौकशी न करण्याचें दुसरें कारण असें कीं, साऱ्या लोकांचें त्याच्यावर पराकाष्ठेचें प्रेम आहे. प्रीतीमुळें ते त्याचे अपराध विसरून जातात, आणि जशी एखादी नदी आपल्या ओघानें गोट्याचे शाळिग्राम बनविते त्याप्रमाणें हे त्याच्या खोड्यांचेच गुण घेत बसतात. या रीतीनें चोहोंकडून जोराचा आडवा वारा वाहत असल्यामुळें, गलोलीचा दगड साबजाला न लागतां आपल्याच अंगावर उलटेल अशा भीतीनें त्या पंचायतीत मी पडलों नाहीं.

**तीव्रजव** : आणि या रीतीनें माझा उदार पिता परलोकवासी झाला व जिला प्रत्यक्ष अप्सरासुद्धां दासी शोभणार नाहींत अशी माझी अद्वितीय रूपवती बहीण वेडी झाली ! असो, सूड घेण्याची वेळ येईल !

**राजा** : त्यासाठीं सदां सर्वदां चिंतन करून निद्राभंग करून घेऊं नको. डोक्यावर संकटांचा कडा कलला असला तरी 'आहे एक सृष्टिचमत्कार' असें म्हणून त्याच्याकडे गमतीनें पहात बसूं इतके आपण मूर्ख आणि निष्काळजी आहों असें तूं समजूं नको. अधिक लवकरच तुझ्या कानांवर येईल. तुझ्या बापाविषयीं आम्हांला काळजी होती; आणि आमची आम्हांलाहि आहे. आणि येवढ्यावरून मला वाटतें, काय तर्क करावयाचा तो तुझ्या लक्षांत येईल.

[ एक जासूद येतो. ]

काय रे, काय बातमी आहे ?

**जासूद** : महाराज, चंद्रसेनमहाराजांकडचीं पत्रें आलीं आहेत. हें आपलें; हें आईसाहेबांचें.

**राजा** : चंद्रसेनाकडून ? कोणी आणली ती ?

**जासूद** : महाराज, तीं खलाशांनीं आणलीं असें म्हणतात; मीं कांहीं त्यांना पाहिलें नाही; तीं मला पारिजातकानें दिलीं; आणि त्याला तीं आणणारांकडून मिळालीं.

**राजा** : बरें, जा तूं. ( जासूद जातो. ) तीव्रजवा, वाचायाचीं ना तीं ?

[वाचतो.]

"श्रीमंत सकलगुणालंकृत अखंडराजलक्ष्मीविराजित प्रतापशाली बल-भद्राधिपति तीर्थस्वरूप काका यांस चंद्रसेनाचा कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार, विज्ञापना ऐशीजे:—मला आपल्या राज्यांत नागवा उघडा आणून सोडिलें आहे. उदईक आपल्या पायांच्या भेटीची अपेक्षा करीत आहे. त्या प्रसंगीं, प्रथम आपली क्षमा मागून मग अशा विलक्षण रीतीनें एकाएकीं परत कसा आलों हें सांगेन."

'चंद्रसेन'

याचा अर्थ काय ? बाकीचे सारे परत आले कीं काय ? किंवा ही सारीच लबाडी आहे, आणि वास्तविक असें कांहीं झालेंच नाहीं ?

**तीव्रजव** : आपल्याला अक्षर ठाऊक आहे काय ?

**राजा** : हो, हें चंद्रसेनाचेंच अक्षर. 'नागवा !' आणि ताज्या कलमांत असें म्हटलें आहे कीं 'एकटा !' यांत तुझा कांहीं तर्क चालतो काय ?

**तीव्रजव** : आपली तर बोवा अक्कल गुंग झाली. पण येऊं दे तर त्याला; मलाही तेंच पाहिजे आहे. जोंपर्यंत मनांत राग जळतो आहे तोंपर्यंत 'बच्चाजी, तूं हें असें केलेस' असें त्याच्या तोंडावर सांगण्याची संधि मिळाल्यास किती मजा होणार आहे ?

**राजा** : तीव्रजवा, असें जर असेल तर—तें कसें करावें, अथवा कसें करूं नये यासंबंधानें तूं माझें ऐकशील का ?

**तीव्रजव** : होय; पण तोंड-हात बांधून घेणें मात्र मी नाहीं कबूल करणार.

**राजा** : तुझें समाधान झालें म्हणजे झालें ना ? समुद्रावर कांहीं गोता आल्यामुळें जर तो परत आला असेल आणि पुन: निघण्याची त्याची इच्छा नसेल, तर माझा असा विचार आहे कीं, मी मोठ्या परिश्रमानें नुकतेंच जें एक कोयडें तयार करून ठेविलें आहे त्यांत त्याला अडकवून द्यावयाचें, तें अशा रीतीनें कीं बाहेर न पडतां तेथल्या तेथेंच त्याचा मोक्ष व्हावा. आणि अशा रीतीनें त्याचा शेवट झाला म्हणजे त्याबद्दल जनापवाद आमच्याकडे येणार नाहीं, इतकेंच नाहीं, तर प्रत्यक्ष त्याच्या आईला देखील असें वाटेल कीं, त्याचा अंत झाला तो केवळ अपघातानें झाला.

**तीव्रजव** : महाराज, आपली योजना आम्हांला कबूल आहे; मात्र इतकेंच झालें पाहिजे कीं, त्याचा शेवट माझ्या हातून लागला पाहिजे.

**राजा** : तें काम ओघानेंच तुझ्याकडे आलें. तूं बाहेरदेशीं गेल्यापासून एका गुणाविषयीं इकडे तुझा फार लौकिक झाला आहे. त्यासंबंधानें लोक तुझी फारच तारीफ करितात, व ती चंद्रसेनाच्या कानावर जाईल अशा रीतीनें बोलतात.

आणि त्याला तर तुझ्या इतर गुणांपेक्षां त्या एकामुळें तुजविषयीं इतका मत्सर उत्पन्न झाला आहे कीं, माझ्या मतें तो अत्यंत निंद्य आहे.

**तीव्रजव** : महाराज, तो कोणचा गुण ?

**राजा** : काय सांगावें, तारुण्यमंदिलाला शोभा देणारा तो झगझगीत शिरपेंच आहे; कारण, ज्याप्रमाणें उतारवयांत साधा पोषाख व पोक्त भाषण हीं शोभतात, त्याप्रमाणें रंगेलपणा आणि छानछुकी हीं तारुण्याला साजून जातात दोन महिन्यांपूर्वी उत्तालाहून एक गृहस्थ आला होता. मी स्वत: उत्तालचे पुष्कळ लोक पाहिले आहेत, व त्यांच्याशीं लढलों आहें, आणि ते जबरदस्त स्वार आहेत. हें मला ठाऊक आहे. पण परवांच्या बहाद्दरानें अश्वविद्या जणूं काय भारून टाकल्यासारखी दिसली; त्यानें रिकिबीवर डावा पाय ठेविला मात्र, तों त्याच्या घोडयानें अशी विलक्षण पक्कड केली कीं तो त्याच्या पाठीवर खिळल्यासारखा भासून त्याचें आणि त्याच्या घोडयाचे मिळून तुंबरासारखे एक नवीनच जनावर बनल्याप्रमाणें दिसलें; व त्यानें अशा अद्‌भुत पकडी करून दाखविल्या कीं, तशा माझ्याच्यानें कधींही होणार नाहींत !

**तीव्रजव** : कोण तो, उत्ताली होता काय ?

**राजा** : हो उत्ताली.

**तीव्रजव** : तर मग तो खचितच केतकीकान्त असला पाहिजे.

**राजा** : हो, तोच तोच.

**तीव्रजव** : त्याची माझी चांगली ओळख आहे. त्याची गोष्ट कशाला पाहिजे ? आजकाल तो उत्तालचा लाल आहे. !

**राजा** : त्यानें तुझीही फार तारीफ केली; आणि विशेषेंकरून तो असें म्हणाला कीं, ढाल–तरवारीच्या खेळांत अंगावर घेतलेला घाव हटकून चुक-विण्याच्या कामीं तीव्रजवाशीं बरोबरी करणारा सगळ्या उत्तालांत एक मनुष्य नाहीं ! अशा प्रसंगीं तो चालून जाऊन पाऱ्यासारखा हलूं लागला, आणि अंग चुकवून ढालेवर नेमके घाव घेऊं लागला म्हणजे पाहणारांचीं अंत:करणें थक्क होऊन जातात. त्याच्या तोंडून हा तुझा लौकिक ऐकून चंद्रसेनाला इतकें वाईट वाटलें, व इतका मत्सर उत्पन्न झाला कीं, त्या दिवसापासून तूं केव्हा परत येशील, आणि तुझ्याशीं मी केव्हां खेळेन असें त्याला झालें आहे. आतां आम्ही जो व्यूह रचिला आहे तो यावरच—

**तीव्रजव** : महाराज, यावरच कसा ?

**राजा** : तीव्रजवा, तुझ्या बापावर तुझी प्रीति होती किंवा नाहीं ? अथवा 'वचने किं दरिद्रता' या पंथाचे, तोंडानें रेलचेल दुःख दाखविणारे, पण कोरड्या अंतःकरणाचे पंडित आपण आहांत ?

**तीव्रजव** : असला प्रश्न कां विचारलांत ?

**राजा** : बापावर तुझी ममता नव्हती असें मी म्हणत नाहीं, पण ममतेचा धर्म असा आहे कीं ती कालानें उत्पन्न होते; आणि तिची ज्वाला व तिचें तेज हीही कालानेंच कमी झाल्याचीं उदाहरणें आहेत. ममतेच्या ज्वालेंतच एक प्रकारची वात किंवा काजळी असते, व तिच्या योगानें ती कमी होते, आणि हें नीटच आहे. कोणत्याही वस्तूचें चांगुलपण सर्वकाळ एकसारखें राहत नाहीं. कारण चांगुलपण फार झालें की फाजिलपणामुळें त्याचा लय होतो. म्हण आहे— 'अति सर्वत्र वर्जयेत्'. कांहीं करायाचें मनांत आलें तर तें मनांत आल्याबरोबर करून टाकावें. कारण, त्याच्यासंबंधानें चर्चा झाली, किंवा कोणी आड आला, किंवा दुसरा कांहीं अडथळा आला, तर तेंच मनांत आलेलें कमजोर होतें, किंवा अजीबात मागें पडतें. ज्याप्रमाणें भाता एकसारखा चालत असला म्हणजे बरा असतो, नाहीं तर तेव्हांच बिघडतो, त्याप्रमाणें मनाची प्रकृति आहे; त्यांत आलेलें चांगलें काम एकदम उरकलें तर बरें, नाहीं तर तें तत्काळ ढिलें पडतें. अरे, मी भलतीकडेच वाहायाला लागलों; मला आपल्या मुद्द्यावर येऊं दे.— चंद्रसेन परत आला आहे; तेव्हा तूं आपल्या बापाच्या पोटच्या आहेस असें सिद्ध करून दाखविण्यासाठी, बोलण्याखेरीज कोणतें कृत्य करण्याचा पत्कर घेतोस ?

**तीव्रजव** : देवळांत त्याचा गळा कापण्याचा.

**राजा** : एकदा खून करायाचा म्हटलें म्हणजे मग सुगति आणि दुर्गति यांच्या विचारांत पडूं नये; सूड घ्यायाचा तो पक्का घेतला पाहिजे. परंतु तीव्र-जवा, तुझ्या हातून हें होईल तर पहा. तूं घरांतून बाहेर पडूं नको. चंद्रसेन परत आला, म्हणजे तूं घरीं आला आहेस हें त्याला कळेल. मग आम्ही कांहीं माणसें लावून त्याच्यापुढें तुझ्या नांवाचा असा स्तुतिपाठ चालवूं कीं, संतापून जाऊन त्यानें तुझ्याशीं लढाईलाच उभें राहावें. जात्या शांत व उदार आणि गंभीर मनाचा तो असल्यामुळें, ही आमची लुच्चेगिरी त्याच्या लक्षांत येणार नाहीं. आणि असे होऊन तो लढाईला एकदां उभा राहिला म्हणजे रक्तपात करण्यास भुकेलेल्या तीक्ष्ण तरवारीनें तुझा बाप मारल्याबद्दल खेळाच्या सपाटयांत त्याचा समाचार पाहून घे.

**तीव्रजव** : तें मी करीन, आणि त्या कामाकरितां मी आपली तरवार साखून ठेवीन. मीं एका वैदूपासून एक तेल घेऊन ठेविलें आहे, तें इतकें जालीम आहे कीं, त्यांत बुचकळलेलें चाकूचें पातें अंगाला लागून थोडें रक्त निघालें म्हणजे पुरें, मग ब्रह्मांडांतल्या सगळ्या वनस्पतींपासून काढलेला उतारा जरी त्यावर दिला, तरी त्यापासून बिलकुल फायदा होणें नाहीं. मी आपल्या तरवारीचें टोंक त्यांत बुचकळीन आणि मग खेळतां खेळतां चंद्रसेनाला त्याचा थोडा जरी स्पर्श झाला तरी बस्स आहे; तेवढ्यानें तो मेला पाहिजे.

**राजा** : असें नाहीं, आणखी या गोष्टीचा विचार करूं या. या कामाला काळवेळ पाहून हात घातला पाहिजे. हलगरजेनें आमची मसलत बाहेर पडण्यापेक्षां तिच्या भरीस न पडणें हेंच बरें. यासाठीं या मसलतीच्या मागें दुसरी एक जोडगोळी भरून ठेविली पाहिजे; अशासाठीं कीं, पहिलीचा बार हुकला तर मागली पाठोपाठ सोडतां यावी. पण थांब, मला पाहूं दे कसें बरें हें? आलें ध्यानांत. खेळतांना हात चुकविण्याचा पण तर लावायाचाच. आणि खेळण्याच्या झपाट्यांत तुम्ही लाल झालां आणि थकून गेलां, म्हणजे चंद्रसेन दारू मागेल त्या वेळेस मी त्याला विष घातलेला पेला भरून देईन. तो त्यानें घेतला म्हणजे तो तुझ्या विषारी तरवारीच्या बारांतून जरी सुटला असला तरी यानें आपला इष्ट हेतु खास सिद्धीस जाईल.

[**राणी** येते.]

हं, तूं इतक्या घाईघाईनें कां आलीस ?

**राणी** : संकटें एकामागून एक इतक्या जलदीनें येतात कीं, तीं एकमेकांची पाठच शिवतातशीं दिसतात. तीव्रजवा, तुझी बहीण बुडाली, बाबा !

**तीव्रजव** : बुडाली ! अहो कोठें ?

**राणी** : नागझरीच्या ओढ्यावर ती कोठें हिंडत हिंडत गेली आणि फुलें तोडण्याच्या आशेनें कांठावर एक सोनचांफ्याचें झाड होतें त्यावर चढली. पुढें फुलें तोडण्याच्या नादांत पाण्यावर एक बारीक खांदी आली होती, तीवर गेली त्यासरशीं ती तिच्यासह मोडून पाण्यांत पडली. कांहीं वेळपर्यंत लुगड्याच्या फुग्यामुळें पाण्यावर गाणें म्हणत ती तरंगत राहिली, पण पाणी शिरून फुगा नाहींसा होण्याबरोबर, तिच्या नाका–तोंडांत पाणी जाऊन तिचा शब्द बंद झाला, व एका क्षणांत दुष्ट मृत्यु तिला पात्राच्या तळीं घेऊन गेला.

**तीव्रजव** : शिव शिव ! तर मग ती बुडाली आं ?

**राणी** : बुडाली, बुडाली !

**तीव्रजव** : ताई ! अनाथ मल्लिके ! सगळें पाणी तूंच घेऊन बसलीस, यासाठी मी आतां डोळ्यांतून पाणी येऊं देत नाही. पण काय करावें ? स्वभावा-पुढें इलाज नाही. पुरुषाच्या जातीला रडणें शोभत नाहीं ! पण नाइलाज झाला म्हणजे रडें कोसळतें. महाराज, नमस्कार असो तुम्हांला. माझें काळीज कसें पेट घेत आहे ! पण काय करूं ? मूर्खपणामुळें गला गप्प बसण्याची पाळी आली आहे ! (जातो.)

**राजा** : मदनिके, चल, त्याच्या पाठोपाठ जाऊं. त्याचा राग शांत करण्या-साठीं मला कोण यातायात पडली ! आतां मला अशी भीति उत्पन्न झाली आहे कीं, याच्या योगानें तो पुन्हां चेतेल; याकरितां चला त्याच्या पाठीमागें.

[निघून जातात.]



# अंक पांचवा

## प्रवेश १ ला

स्थळ—स्मशान.

[दोन खड्डेकरी कुदळी वगैरे घेऊन येतात.]



**पहिला खड्डेकरी** : जिनें आपण होऊन स्वतःला मारून घेतलें, तिला शास्त्रोक्त मार्गानें पुरावयाची का ?

**दुसरा ख०** : माझें ऐक. हो, पुरायाची; आणि म्हणून खड्डा नीट सरळ खण. तिचा पंचनामा झाला आहे, आणि पंचांच्या मतें असें ठरलें आहे कीं, तिला शास्त्रोक्त मार्गानें पुरावी.

**पहिला ख०** : स्वसंरक्षणासाठीं तिनें स्वतःस बुडवून घेतलें नसतां असें कसें होईल ?

**दुसरा ख०** : कसें ? पंचांच्या तसेंच दृष्टीस आलें.

**पहिला ख०** : ते निर्दोष असलेच पाहिजे; त्याशिवाय तसें होणार नाहीं. कारण, त्यांत मुद्दा असा आहे—मीं जाणूनबुजून जर आपल्याला बुडवून घेतलें, तर मीं सापराध कृत्य केलें असें होतें; आणि कृत्याचे प्रकार तीन आहेत; आचरणें, करणें, घडवून आणणें. आणि म्हणून तिनें जाणूनबुजून स्वतःला बुडवून घेतलें हें सिद्ध झालें.

**दुसरा ख०** : अहो प्रचंड तर्कशास्त्री, माझें थोडें ऐकाल का ?

**पहिला ख०** : थोडें ऐकून घे. कल्पना कर, येथें पाणी आहे; येथें मनुष्य आहे; झालें. जर तो मनुष्य पाण्याकडे गेला आणि त्यानें आपणाला बुडवून घेतलें, तर त्याच्या मनांत असो वा नसो, तो गेला हें खरें. आलें कीं नाहीं तुझ्या ध्यानांत ? परंतु पाणीच जर त्याच्याकडे चालून आलें, आणि त्यानें त्याला बुडविलें, तर त्यानें स्वतःला बुडवून घेतलें असें होत नाहीं. म्हणून ज्यानें स्वतःस मारून घेतलें नाहीं, त्यानें आत्महत्या केली असें होत नाहीं.

**दुसरा ख०** : पण असा का कायदा आहे ?

**पहिला ख०** : हो हो, आमच्या पंचांचा असाच कायदा आहे.

**दुसरा ख०** : त्यांतलें तुला इंगित सांगूं का ? ही जर मोठ्या घरची बाई नसती, तर तिला शास्त्रोक्त मार्गानें पुरूं दिलें नसतें.

**पहिला ख०** : असें म्हणतोस काय ? असो. मोठ्या शरमेची गोष्ट हीच की, श्रीमंत लोकांनीं मन मानेल त्याप्रमाणें मारून घेतलें किंवा बुडवून घेतलें तरी त्यांना शास्त्रोक्त मार्गानें मूठमाती मिळते ती मिळतेच. ऊठ कुदळी. भले दादा, गौंडी, सुतार आणि लोहार या सगळ्यांत अधिक टिकाऊ काम कोणाचें ?

**दुसरा ख०** : सूळ करणाराचें. कारण, त्या बापड्याची करणी लाखों-जणांना पुरून उरते.

**पहिला ख०** : शर्थ आहे बोवा, तुझ्या अकलेची; इतक्यांना पुरून उरतो, तेव्हां सूळ चांगलेंच करितो, पण तो कोणत्या रीतीनें चांगलें करितो ? जे वाईट करितात त्यांना चांगलें करतो. आतां देवळापेक्षां सूळ बळकट केले असतात असें तूं म्हणतोस हें वाईट करतोस, म्हणून सूळ तुला चांगला करील. आणखी एकवार.

**दुसरा ख०** : गौंडी, सुतार, लोहार, या सगळ्यांत टिकाऊ करामत कोणाची ?

**पहिला ख०** : सांग बोवा ती आपल्याला; आणि सोडीव या पेंचांतून.

**दुसरा ख०** : भले शाबास, आतां मी सांगेन.

**पहिला ख०** : रडा, रडा काय तें.

**दुसरा ख०** : अरीच्या मायची मी. आतां नाहीं बोवा आपण सांगत.

[**चंद्रसेन** आणि **प्रियाल** कांहीं अंतरावर प्रवेश करितात.]

**पहिला ख०** : आतां त्याबद्दल डोकेंफोड करूं नको; तुमचें लट्ठ गर्दभ कितीही ठोकलें तरी जलद पाऊल टाकायाचें नाहींच; आणि यापुढें जर तुला कोणी हाच प्रश्न विचारला, तर म्हणावें "खड्डेकरी." तो जीं घरें बांधतो, तीं जलप्रलयापर्यंत टिकतात. जा, कलालजीकडे जा, आणि शिसा करून घेऊन ये.

[दुसरा खड्डेकरी जातो. पहिला खणतो आणि गातो.]

**माझी बसली बाइल, माझी बसली बाइल**
**वईशेजारीं ॥ माझी० ॥ ध्रु० ॥**
**तिच्या पुढं उभा हा गडी ॥ तिच्या० ॥**
**कुदळ पावडी, घेता रोंकडी,**
**कामकरी, जी ज़ी जी ॥ वई० ॥ ॥ माझी० ॥ १**

**चंद्रसेन** : याला आपल्या धंद्याबद्दल कांहींच वाटत नाहीं काय ? थडगें खणतांना हा आपला गातो आहे !

**प्रियाल** : अभ्यासानें तें काम त्याच्या अगदीं अंगवळणीं पडून गेलें आहे.

**चंद्रसेन** : खरें तें; ज्याच्या हाताला फार कष्ट ठाऊक नाहींत, त्याला तेव्हांच फोड येतात.

**पहिला ख०** : (गातो.)

**पर अतां झाला म्हातारा**
**थक्‌वा शरिरा, येतो जरा,**
**टिलगीरी, जी जी जी ॥ बई ॥ २**

( वर एक डोक्याची करटी फेंकतो. )

**चंद्रसेन** : या करटीच्या आंत एकदां जीभ होती; आणि हिला गातां येत असे. या शुंभाला कुदळीच्या टोल्यासरशी अशी ही आतां उडवून देण्यांत कांहींच वाटत नाहीं ! आतां हा गाढव जिच्याशी यथेच्छपणें बागडतो आहे, ती कदाचित् एखाद्या ईशतत्त्वशोधकाची अथवा कोणा राजकारणी पुरुषाची करटी असेल, नाहीं बरें ?

**प्रियाल** : असेल कदाचित्, महाराज.

**चंद्रसेन** : किंवा सकाळच्या प्रहरीं राजवाड्यांत प्रवेश करून राजास अदबीनें 'जी महाराज ! कशी काय तब्यत आहे ?' म्हणून मुजरा करणाऱ्या दरबारी पुरुषाची असेल. आणि हे दरबारी गृहस्थ दुसऱ्या एखाद्या दरबारी गृहस्थाचा घोडा उपटण्याचा बेत मनांत धरून त्याच्या तोंडापुरती त्या जनावराची तारीफ करणारे असतील; नाहीं बरें ?

**प्रियाल** : होय, महाराज.

**चंद्रसेन** : अशा एखाद्याची असेल; नाहीं तर एखाद्या भाग्यशाली राणीची असेल ! पण आज तिच्या कपाळीं या खड्डेकऱ्याच्या कुदळीचे ठोके खाण्याचें आलें आहे खरें. उगीच विचार केला तर हें स्थित्यंतर लक्षांत धरण्याजोगें आहे असें दिसून येईल. कुदळीचे टोले खावे इतक्यासाठींच का हाडांचा एवढा मोठा बडेजाव राखायाचा ?–या विचारानें माझें डोकें तर फिरून गेल्यासारखें झालें आहे.

**पहिला ख०** : (गातो)

**किती गोड, नशिब हें ह्या कवटीचें ! ॥ ध्रु० ॥**
**खणणारा माझ्याबाणी,**
**माझी कुदळ याला खणी,**
**खोरं माझं वर्ति अणी,**
**चिकट अंगि फिरति कसे पुंजके किडयांचे !**

(आणखी एक करटी वर फेंकतो.)

**चंद्रसेन** : ती पहा, दुसरी एक करटी; ती कदाचित् एखाद्या वकिलाची असेल. आतां त्याचीं वकीलपत्रें, त्याचीं दप्तरें, त्याचीं खतेंपत्रें, त्याचीं करारपत्रें, त्याचीं बक्षिसपत्रें, आणि त्याच्या लबाडया कोठें गेल्या ? या असल्या दांडग्या मनुष्याच्या ओबडधोबड टिकावाचे वेडेवांकडे रट्टे हूं चूं न करितां तो कशासाठीं सोसतो आहे ? आतां तो याला आपल्या सामर्थ्याची दरडावणी कां नाहीं दाखवीत ?—आणि फौजदारीची गोष्ट कां नाहीं काढीत ? हं ! हं ! या मनुष्यानें आपल्या ऐन भराच्या दिवसांत मोठमोठया जमिनी गट्ट केल्या असतील; खरेदीपत्रें करून घेतलीं असतील; गहाणपत्रें करून घेतलीं असतील; नोंदणीपत्रें करून घेतलीं असतील. एवढया जमिनीच्या मालकाचें आतां फक्त साडेतीन हात तुकडयावरच स्वामित्व ना ? काळीच्या एवढया मालकाची काळानें अशी काळी माती व्हावी ना ? गहाणपत्रांचें ज्याच्यापाशीं ओझें, त्याची अशी धाण काय ? एवढासा हा खाडा याच्या मालमिळकतीच्या कागदपत्राला देखील न पुरता; पण तेवढयांत याची समजूत झाली आहे !

**प्रियाल** : एक सूतभर देखील अधिक नाहीं, महाराज.

**चंद्रसेन** : बरें, आतां या गुलामाशीं बोलूं. अरे, कोणाचें रे हें थडगें ?

**पहिला ख०** : माझें, महाराज. (गातो.)

**चिकट अंगि फिरति कसे, पुंजके किडयांचे ! ॥**

**चंद्रसेन** : खरोखरीच तें तुझेंचसें मला वाटतें; कारण, तूं त्यांत आहेस.

**पहिला ख०** : सरकार, आपण त्यावर आहां, आणि म्हणून तें आपलें नाहीं; माझ्याविषयीं पुसाल तर मी त्यांतला नाहीं, पण तें माझें आहे.

**चंद्रसेन** : त्यांत तूं असून माझें नाहीं म्हणतोस, तेव्हां तूं खोटें बोलतोस. ते मेल्यासाठीं आहे, जित्यासाठीं नव्हे; म्हणून तुला मी खोटा म्हणतों.

**पहिला ख०** : संभाळा सरकार; हं हं म्हणतां असलें खोटेपण माझ्यावरून तुमच्यावर उडेल !

**चंद्रसेन** : कोणा पुरुषासाठीं रे, हा खाडा खणीत आहेस ?

**पहिला ख०** : कोणा पुरुषासाठीं नाहीं !

**चंद्रसेन** : तर मग कोणा बायकोसाठीं ?

**पहिला ख०** : दोघांसाठींही नाहीं.

**चंद्रसेन** : यांत कोणाला पुरायाचें ?

**पहिला ख०** : जी एकदां बायको होती, सरकार; पण जी आतां, — देव तिचें भलें करो, मेली आहे.

**चंद्रसेन** : पाहिलास ना कसला विकट हट्टवादी मनुष्य हा ? याच्याशीं बोलतांना, तंतोतंत जोखून शब्द घातले तर बरें; नाहीं तर हा लागला त्याचे भलभलते अर्थ करायाला. देवाशपथ रे प्रियाला, अलीकडे दोन तीन वर्षांत लोक फार लबाड झाल्याचें माझ्या नजरेस आलें आहे. कुणबी म्हणतो दरबाऱ्याला मागें टाकीन, पण दरबारी तर त्याच्या वाऱ्याला भितो. तुला खड्डेकरी होऊन किती दिवस झाले ?

**पहिला ख०** : वर्षांतल्या साऱ्या दिवसांपैकीं ज्या दिवशीं आमच्या पहिल्या चंद्रसेनमहाराजांनीं प्लवंगाच्या महाराजास जिंकिलें, त्या दिवशीं मी या कामांत पडलों.

**चंद्रसेन** : त्याला किती दिवस झाले ?

**पहिला ख०** : तुम्हांला नाहीं का तें कळत ? एखादें वेडें पोर देखील सांगेल. अहो, छोटे चंद्रसेनमहाराज झाले त्या दिवशींच तें. ते महाराज वेडे झाले आहेत आणि त्यांना श्वेतद्वीपास धाडलें आहे.

**चंद्रसेन** : असें काय ? त्याला श्वेतद्वीपाला रे कशाला धाडलें आहे ?

**पहिला ख०** : कशाला म्हणतां ? कारण, तो वेडा झाला होता. त्याचें शहाणपण त्याला तेथें येईल, अथवा तें नाहीं आलें तरी हरकत नाहीं. कारण तेथें त्याची फारशी मातब्बरी नाहीं.

**चंद्रसेन** : कां, कां ?

**पहिला ख०** : त्याचें वेडेपण तेथें कोणाच्या लक्षांत येणार नाहीं; तेथले लोक त्याच्याइतकेच वेडे आहेत.

**चंद्रसेन** : तो वेडा रे कसा झाला ?

**पहिला ख०** : लोक म्हणतात फारच चमत्कारिक रीतीनें.

**चंद्रसेन** : पण कसल्या चमत्कारिक रीतीनें ?

**पहिला ख०** : काय सांगावें, त्याचें शहाणपणच नाहींसें झालें !

**चंद्रसेन** : कशासाठीं ?

**पहिला ख०** : कशासाठी ? पोटासाठी. या बलभद्रांत खड्डेकऱ्याचें काम करूं लागल्यास फार नाहीं पण लहानपणापासून तीस वर्षें झालीं.

**चंद्रसेन** : न कुजतां खाड्यांत मनुष्य किती दिवस राहूं शकतो ?

**पहिला ख०** : खरोखर पुसाल तर तो मरायाच्या पूर्वींच कुजला नसला तर,—काय सांगावें, आजकाल असले कुजके मुडदे येतात कीं, त्यांना जेमतेम खड्ड्यांत लोटण्याची देखील मुष्कील पडते.—असो, जर तो पहिलाच कुजला नसला, तर तुमचें देव भलें करो, — टिकेल आठ नऊ वर्षें; चांभार हटकून नऊ वर्षें टिकतो.

**चंद्रसेन** : इतरांपेक्षां तोच अधिक कां ?

**पहिला ख०** : कां म्हणतां सरकार ? कारण, त्याचें चामडें त्याच्या धंद्यांत इतकें कमावलें जातें कीं, तें बरेच दिवस पाणी शिरकूं देत नाहीं. आणि तुमचें हें पाणी आहे कीं नाहीं,—हें शिवें आमच्या या मुड्याला तेव्हांच कुजवितें. ही पाहा ही करटी, एकवीस आणि तीन इतकी वर्षें जमिनीत आहे.

**चंद्रसेन** : कोणाची रे ती ?

**पहिला ख०** : होता भांचोद एक तो वेडगळ. तुम्हांला ती कोणाची असेलशी वाटते ?

**चंद्रसेन** : मला बरें काय ठाऊक ?

**पहिला ख०** : कोड भरो त्या गचाळ पाजी मनुष्याला. त्या रांडलेकानें माझ्या डोक्यावर ताडीचा मोघा ओतला. अहो, ही करटी, सरकार, येऱ्या म्हणून राजाचा खुषमस्कऱ्या होता नाहीं, त्याचीच ही.

**चंद्रसेन** : ही, ही ?

**पहिला ख०** : हो, हो, त्याचीच.

**चंद्रसेन** : पाहूं दे ती मला. (करटी घेतो.) शिव शिव ! बिचाऱ्या येऱ्या ! प्रियाला, तो मला चांगला ठाऊक होता; अनेक नकला आणि विलक्षण कोट्या, किती किती म्हणून तुला सांगूं ? "कोकरूं घेतां का कोकरूं" म्हणून अगदीं थोडक्यांत थोडकें म्हटलें तरी त्यानें मला एक हजारदां तरी पाठीवर घेऊन इकडे तिकडे पळवीत नेलें असेल. या ठिकाणीं त्याचे ओठ होते. त्याचे मीं किती वेळां मुके घेतले असतील कोण जाणे. येऱ्या, आतां त्या तुझ्या चेष्टा, त्या खोड्या, त्या उड्या, त्या नकला, ते गाण्याचे चुटके कोठें आहेत ? तूं एकेक कोटी करूं लागलास म्हणजे मंडळीचीं हंसून हंसून पोटें दुखवीत होतास. स्वतः

आतां दांताड वासून बसला आहेस, पण एक देखील सुचत नाहीं ना? इतकी फजिती करून घ्यावी का? आतां असें कर. आपल्या चटोर बायका असतात कीं नाहीं, त्यांच्याकडे जाऊन त्यांना सांग कीं, तुम्हीं हवें तितकें केशर लावून बोट बोट जरी रंगलांत तरी तुमचा परिणाम हा माझ्यासारखाच व्हायाचा. असें म्हणून त्या कशा काय हंसतात त्या पहा. प्रियाला, कृपा करून मला एक गोष्ट सांग—

**प्रियाल** : काय ती महाराज ?

**चंद्रसेन** : अलिसुंदराला जमिनींत पुरल्यावर तो असाच दिसला असेल काय रे ?

**प्रियाल** : असाच.

**चंद्रसेन** : आणि त्याला अशीच घाण येत असेल काय ?
(घाणीचें शहारे आणून करटी खालीं ठेवतो.)

**प्रियाल** : अगदीं अशीच, महाराज.

**चंद्रसेन** : आमची काय दुर्गति होते ती पाहिलीस ना, प्रियाला? का रे, आपण जर असाच तर्क करीत मागें गेलों, तर त्या अलिसुंदराची माती आपल्या खिडकीच्या गिलाव्याला लागली असेल असें दाखवितां येणार नाहीं काय ?

**प्रियाल** : त्या रीतीनें पत्ता लावण्यास फार त्रास पडणार आहे.

**चंद्रसेन** : छे, त्यांत काडीइतका देखील त्रास नाहीं. थोडा बेतानें मात्र विचार केला पाहिजे. असें पहा; अलिसुंदर मेला; अलिसुंदराला पुरलें; अलिसुंदराची फिरून धूळ झाली; धूळ म्हणजे माती; आणि तिचा आपण गिलावा करितों; म्हणून खिडकीच्या गिलाव्याला जी आपण माती लाविली आहे, त्यांत अलिसुंदर येण्याचा संभव आहे. तसेंच:—

(पद)

**कैशी चित्र पहा जगताची ही रहाटी आहे,**
**पंचमहाभूतें जीं त्यांमधिं विश्व सकळ गुरफटलें आहे! ॥ ध्रु० ॥**
**हरिश्चंद्र रघुराज युधिष्ठिर**
**प्रबळ पराक्रमि कितिही जाले,**
**तद्देहाचीं तत्त्वें शेवटीं**
**भिन्न विपरिणत झालिंच पाहे! १**

अरे, पण थांब थांब! इकडून राजा येत आहे!

[पुढे मल्लिकेचें प्रेत व मागून **राजा, राणी, तीव्रजव, कारटे** व दुसरे इष्ट मित्र येतात.]

अरे, राणी आणि दरबारी लोकहि बरोबर आहेत. त्यांच्यापुढें इतक्या समारंभानें काय चाललें आहे ? हं, हं, या चिन्हांवरून त्यांच्यापुढें ज्याचें प्रेत चाललें आहे त्यानें आत्महत्या केली असावी असें दिसतें. कोणी मोठा मनुष्य असेलसें वाटतें. थोडा वेळ आड होऊन पाहूं या. (**प्रियालासह** आड होतो.)

[**मल्लिकेचें** प्रेत भुईवर ठेवितात.]

**तीव्रजव** : आणखी काय करायाचें राहिलें आहे ?

**चंद्रसेन** : (बाजूस) अरे, हा तीव्रजव, फारच भला मनुष्य बरें. पहा, पहा.

**तीव्रजव** : दुसरें काय करायाचें ?

**पहिला कारटा** : शास्त्रोक्त जेवढा विधि होता, तेवढा सारा आटोपला. ही कशी मेली याचा अजून संशय आहे; आणि महाराजांची स्वारी मध्यें न पडती तर आम्ही इतका विधि देखील करूं दिला नसता. मंत्र वगैरे कांहीच न म्हणतां खाड्यांत घालून दगड-माती वर लोटली असती. परंतु सरकारच्या सांगण्यास्तव अपमृत्यूचा विचार एकीकडे ठेवून, नित्याप्रमाणें कुमारीला उचित असें और्ध्वदेहिक केलें.

**तीव्रजव** : आतां दुसरी कोणतीहि क्रिया राहिली नाही ना ?

**प० कारटा** : कांहीं राहिलें नाहीं. हिच्यासाठीं श्राद्ध वगैरे करणें, म्हणजे तिच्या पदरीं यमयातना, आणि आमच्या पदरी पापसंचय बांधणें होय.

**तीव्रजव** : भगवति वसुंधरे ! घे हिला आतां आपल्या उदरांत. हिच्या सुंदर आणि निष्कलंक देहापासून सुगंधी पुष्पें उद्भवोत, आणि तीं शिवाच्या मस्तकीं पडोत. अरे कारट्या, तूं क्रियेच्या गप्पा सांगत आहेस, पण तुला खात्रीनें सांगतों कीं, ही माझी भगिनी दिव्य स्वर्गांगना होईल व तूं पिशाचयोनीला जाऊन स्मशानांत भटकत फिरशील !

**चंद्रसेन** : (बाजूस) काय, ही माझी सुंदरी मल्लिका ?

**राणी** : मधुर वस्तू मधुराकृतींच्या सेवेला लावल्या पाहिजेत. (**मल्लिकेवर** फुलें पसरून) प्रिये मल्लिके, संपला बरें आज तुमचा आमचा ऐहिक ऋणानुबंध ! तुला चंद्रसेनाची बायको करून, त्याला आणि तुला मांडीवर घ्यावें, आणि दोघांच्या तोंडांत साखर घालावी असें माझ्या मनांत फार होतें. मला असें वाटे कीं, तुझ्या गर्भाधानाचा सुखसोहळा पाहण्याचा सुखाचा दिवस मला येईल; पण

दुर्दैवानें तें सर्व एकीकडे राहून हीं तांबडीं फुलें तुझ्या शवावर घालण्याचें मज मंदभागिनीच्या कपाळीं आलें आहे !

**तीव्रजव** : ज्या अधमाधमाच्या दुष्करणीनें तुझ्या तीव्र बुद्धीचा विलोप झाला त्या नीचाचा सत्यानाश होवो !! दम धरा, इतक्यांत माती लोटूं नका ! मला आणखी एक वेळ तिचें आलिंगन घेऊं द्या. (थडग्यांत उडी मारतो.) हं, टकला आतां मेलेल्यावर आणि जित्यावर माती, आणि सह्याद्रीइतका उंच पर्वत करा !

**चंद्रसेन** : (पुढें येऊन) कोण तो इतक्या मोठ्या निकरानें शोक करितो आहे ? याची शोकवाणी ऐकून नभोगामी तारे देखील आश्चर्यचकित होऊन जेथल्या तेथें थबकून राहिल्यासारखे दिसतात. बलभद्राचा राजपुत्र हा मी चंद्रसेन थडग्यांत उडी टाकतों.

**तीव्रजव** : चांडाळा, कोट वर्षें रौरव नरक भोगशील !

(त्याची मानगोटी धरतो.)

**चंद्रसेन** : तूं हें चांगलें बोलला नाहींस. तुला नीट रीतीनें सांगतों. तूं माझा गळा सोड; कारण, मी स्वभावतः जरी संतापी आणि रागीट नाहीं, तरी विनाकारण कोणी मला त्रास दिला तर तो मी सहन करून घेणार नाहीं. याकरितां तुला बऱ्याची गोष्ट सांगतों, तोंड आटप आणि बऱ्या बोलानें गळ्याचा हात काढ.

**राजा** : अरे, त्यांना सोडवा !

**राणी** : चंद्रसेना ! चंद्रसेना !

**सर्वजण** : अरे गृहस्थ हो, अरे गृहस्थ हो,—

**प्रियाल** : महाराज, शांत व्हा, शांत व्हा ! असें वेड्यासारखें काय करितां ?

[हुजरे त्यांना सोडवितात; आणि थडग्याच्या बाहेर येतात.]

**चंद्रसेन** : कां, कां ? माझ्या डोळ्यांत त्राण आहे तोंपर्यंत यासंबंधानें मी त्याच्याशीं लढायला तयार आहें.

**राणी** : बाळ, कोणत्या संबंधानें ?

**चंद्रसेन** : मल्लिकेवर माझें इतकें प्रेम होतें कीं चाळीस हजार भावांचें देखील प्रेम त्याच्यापुढें टिकाव न धरितें. तूं काय करशील रे तिच्याकरितां ?

**राजा** : अरे तीव्रजवा, तो अगदीं वेडा झाला आहे; त्याच्या नादीं लागूं नको.

**राणी** : तीव्रजवा, तुला माझ्या गळ्याची शपथ आहे, या वेळेस त्याला सोड.

**चंद्रसेन** : सांग, सांग तूं तिच्याकरितां काय रे करशील ? रडशील ? लढशील ? उपास करशील ? स्वत:ला फाडून घेशील ? दारू पिशील ? सुसर खाशील ? मीहि यांपैकीं पाहिजे तें करीन. तूं येथें रडायाला आलास होय ? किंवा थडग्यांत उडी टाकून प्रेमांत माझ्यावर ताण करतोस होय ? तूं स्वत:ला जिवंत पुरून घेत असलास तर मीहि तसें करायाला तयार आहें. आणि पर्वताच्या गप्पा गारीत असलास तर त्यांतहि मी तुला हटेन असें नाहीं. लक्षावधि बिघे जमीन उकरून आकाशाला भिडेल एवढा पर्वत जरी त्यांनीं माझ्यावर रचला तरी तो मी आपल्या अंगावर घेण्याला तयार आहें ! बडबडच जर करायाची असली तर त्यांत मी दाद देतों असें समजूं नको.

**राणी** : या वेळेस त्याचें कोणी एक नांव घेऊं नका; तो आतां लहरींत आहे, व ती अशीच कांहीं वेळ राहील. तिचा भर उतरला म्हणजे तो गाईसारखा गरीब होईल, इतकेंच नाहीं, तर झाल्या कृत्याचा त्याचा तोच खेद करीत बसेल.

**चंद्रसेन** : बोलतों आहें हें थोडें ऐकून घेशील का ? माझ्याशीं जो तूं अशा उद्धटपणानें वागलास त्याचें कारण काय ? पहिल्यापासून मी तुला भला म्हणून समजत असें. जाऊं दे कीं पण, त्यांत काय आहे ? कोणी हवें तें भगीरथ प्रयत्न करी ना, सापाला दूध पाजून किंवा कुत्र्याचें शेपूट नळींत घालून काडीचा फायदा व्हावयाचा आहे काय ? अर्थात् नाहीं. आधीं होता वाघ्या, दैवयोगें झाला पाग्या; त्याचा एळकोट राही ना, देहस्वभाव जाई ना ! [जातो.]

**राजा** : प्रियाल, जा बाबा, त्याच्याबरोबर अस आणि त्याला नीट संभाळ. [ **प्रियाल** जातो. **तीव्रजवास** उद्देशून ] काल रात्रीं सांगितल्याप्रमाणें थोडा धीर धर; थोडक्यांत या किटकिटीचा निकाल करणार. प्रिये मदनिके, चंद्रसेनाला धाकांत ठेवण्याची कांहीं तोड काढ, आणि सध्यां त्याच्या अगदीं पाठीवर ऐस. मल्लिकेचें टोलेजंग स्मारक केलें पाहिजे. थोड्या वेळानें तरी हा आमच्या पाठी-मागचा त्रास टळणार आहे, पण तोंपर्यंत मारूनमुटकून धीर धरला पाहिजे.

[ जातात. ]

## प्रवेश २ रा

स्थळ–किल्ल्यांतील दिवाणखाना.

[ **प्रियाल** व **चंद्रसेन** येतात. ]

**चंद्रसेन** : याच्याबद्दल हें इतकें झालें; आतां हें दुसरें पहा; त्या वेळची स्थिति तुला ठाऊक आहेच.

**प्रियाल** : हें काय विचारतां, महाराज ?

**चंद्रसेन** : हें बघ, प्रियाला, त्या वेळेस माझ्या अंतःकरणांत जी कालवाकालव होत होती, तिच्यामुळें माझा डोळा देखील लागेना. मला असें वाटलें कीं, सुळावर देण्याची किंवा कडेलोट करण्याची किंवा उभें जाळण्याची ज्याला शिक्षा झाली आहे, तो देखील माझ्याइतका तळमळत नसेल. आतां तूं त्याला अविचार म्हण कीं कांहीं म्हण; पण तुला खचित सांगतों, चोहोंकडून गराडा पडला, म्हणजे अविचारच एखाद्या वेळेस बचाव करतो. अशा प्रसंगीं प्राणिमात्र जिवाउपर धाडस करितात, आणि तसें करण्याखेरीज दुसरा इलाजच नाहीं. यावरून असें स्पष्ट सिद्ध होतें कीं, आम्ही कितीही दुर्बल असलों तरी कार्य करविणारी एक सत्ता आहे, ती बिलकुल कमी पडूं देत नाहीं.

**प्रियाल** : यांत मात्र अगदीं संशय नाहीं.

**चंद्रसेन** : नंतर मी उठून आपल्या खोलीच्या बाहेर पडलों; अंगांतला झगा वाऱ्यानें खडखडूं लागला तो हळूच सावरून धरिला, आणि ते कोठें आहेत तें पहाण्यासाठीं अंधारांत चाचपूं लागलों. सुदैवानें ते लवकरच सांपडले; मग त्यांच्या खिशांत जपून हात घालून आपलें काम करून घेतलें आणि झटदिशीं पुनः आपल्या खोलींत येऊन बसलों. नंतर पापपुण्याची भीति क्षणभर एकीकडे गुंडाळून ठेवून तो लखोटा फोडिला आणि तो अद्वितीय खलिता वाचला. त्यांतील अक्षरें, प्रियाला, तूं जर आपल्या डोळ्यांनीं पहातास तर तुझें काळीज एकदम फाटलें असतें ! राजाच्या हातून झालेला असला हरामखोरपणा, असला निंद्य पाजीपणा कधींही कोणीं ऐकला नसेल !—उघड उघड हुकूम, मोठमोठीं लांबलचक कारणें दाखवून !—कशासाठीं, तर बलभद्राच्या कल्याणासाठीं, इतकेंच नाहीं तर श्वेतद्वीपाच्या देखील कल्याणासाठीं ! उघड उघड हुकूम ! अरेरे, माझा येवढा बागुलबोवा होण्याचें कांहीं तरी कारण ? माझ्या जिवंत असल्यामुळें येवढी भीति आणि इतकी दहशत कीं, खलिता वाचून पाहिल्याबरोबर, क्षणाचा विलंब न लावितां, नाहीं,— तरवारीला धार लावण्यांत सुद्धां वेळ न दवडतां, माझें डोकें एकदम उडवावें !

**प्रियाल** : महाराज, असें होईल तरी कसें ?

**चंद्रसेन** : हा खलिता घे, आणि फुरसतीअंतीं समग्र वाचून पहा. परंतु मग मीं काय केलें, ऐकतोस ?

**प्रियाल** : सांगा सांगा, महाराज.

**चंद्रसेन** : याप्रमाणें त्या चांडाळचौकड्याच्या कचाटींत सांपडल्यामुळें आतां

पुढें काय करावें याचा विचार करूं लागण्यापूर्वींच, डोक्यांत एक एक कल्पना येऊं लागली,— नंतर मीं खालीं बसलों. दुसरा एक खलिता खरडला आणि मग त्याची सुरेख नक्कल केली. आमच्या इकडल्या संस्थानिकांप्रमाणें मलाही चांगलें लिहिण्याचा मोठा तिटकारा होता, आणि हाताला लागलेलें वळण नाहीसें होण्याविषयीं मी आपल्याकडून होईल तितकी खटपट केली होती. पण तशांतून जें थोडेंबहुत चुकून राहिलें होतें त्यानें आज लाख रुपयांची कामगिरी बजाविली. नवीन खलित्यांत काय लिहिलें तें सांगूं का ?

**प्रियाल** : तें केव्हां ऐकेनसें मला झालें आहे, महाराज.

**चंद्रसेन** : काकाच्या नांवानें श्वेतद्वीपाच्या राजास असें लिहिलें कीं–– ज्याअर्थी श्वेतद्वीप हें आमच्या मांडलिक संस्थानांत मोडतें व आम्हांस करभार देतें, ज्याअर्थी उभय राष्ट्रांतील प्रेम शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें उत्तरोत्तर वृद्धि-गत होणें इष्ट आहे, ज्याअर्थी या दोन राष्ट्रांची एकी आणि एक विचार असल्यानें शांततेची वृद्धि होऊन दोघांचेंही अधिकाधिक कल्याण होणार आहे––हे आणखी असेच महत्त्वाचे पुष्कळ ' ज्याअर्थी ' घालून अखेरीस अशी विनंती केली आहे कीं, या खलित्यांतील मजकूर वाचून पाहिल्याबरोबर, त्याची पुढें कमी–अधिक बिलकुल वाटाघाट न करितां, हा घेऊन येणारास, तीर्थ घेण्याची, किंवा ' राम ' म्हणण्याची देखील फुरसत न देतां, आपण ताबडतोब मारून टाकावें.

**प्रियाल** : त्याला मोर्तब कसें केलेंत ?

**चंद्रसेन** : अरे, म्हण आहे ना, परमेश्वराची करणी आणि नारळांत पाणी ! सुदैवानें खिशांत बाबांची मोहरेची आंगठी आली होती, ती आणि आमच्या संस्थानचें मोर्तब हीं एकाच सांच्याचीं असल्यामुळें काम फत्ते झालें. याप्रमाणें सर्व तयारी झाल्यावर पहिल्या खलित्याप्रमाणें याची घडी घातली, मोर्तब केलें, आणि त्यांना न कळतां हा नवीन खलिता पहिल्याच्या जागीं घालून ठेविला. नंतर, दुसऱ्या दिवशीं चांच्यांचीं आणि आमची लढाई झाली. आणि त्याच्यापुढें काय झालें तें तुला आधीच ठाऊक आहे. म्हणून आतां सांगत बसत नाहीं.

**प्रियाल** : झालें तर मग, जुंगाचा आणि भूंगाचा अखेरीस असा परिणाम होणार.

**चंद्रसेन** : मी त्याला काय करूं ? या मूर्खांनाच जर नसत्या उठाठेवी करण्याची हौस नसती तर असें कशाला होतें ? खरें म्हणशील तर यांचा मला पूर्वीपासून तिटकारा असे; आणि हे भले, असें मीं कधींच समजलों नाहीं. त्यांचेच खेळ त्यांना भोवत आहेत. दोहींकडून दोघां जबरदस्तांची चक्काचक्की उडूं लागली

म्हणजे हलक्यासलक्यानें तीत पडूं नये आणि नाक ठेचून घेऊं नये. एडक्याच्या टकरींत गरीब बिचाऱ्या पैशाची कशी दामटी वळून जाते तें तुला नाहीं ठाऊक ?

**प्रियाल** : शिव शिव ! काय म्हणावें या राजाला !

**चंद्रसेन** : तर मग मीं असें करणें अगदीं अवश्य आहे, असें तुला वाटत नाहीं काय ? ज्यानें माझा बाप मारिला, आई जारिणी केली, माझा आशावृक्ष समूळ तोडून पाडला, माझा जीव घेण्यासाठीं गळ घातला—असले दुष्टपणाचे प्रकार ज्यानें केले, त्याचे या हातानें तुकडे होणें हें अगदीं न्याय्य नाहीं काय ? आणि यापुढें जर मी 'हो का नाहीं' असें करीत असलों तर मजकडे अधमपणा येत नाहीं काय ?

**प्रियाल** : श्वेतद्वीपावर सोंपविलेल्या कामाचा शेवट त्याला लवकरच कळून येईल.

**चंद्रसेन** : हं, थोडक्यांतच कळेल. तेवढ्या अवधीचा पण मला चांगलाच उपयोग करून घेतला पाहिजे; खरें म्हटलें म्हणजे मनुष्याचें आयुष्य हें काय एका क्षणाइतकें आहे. पण गड्या प्रियाला, तीव्रजवाची आणि माझी मारामारी झाली, हें मला बरोबर वाटत नाहीं; त्याला जो राग आला तो कांहीं गैरवाजवी नव्हता. आपल्यावरून जग ओळखावें म्हणतात तें का खोटें ? जसें द्यावें तसें घ्यावें. तो भेटला म्हणजे मी त्याची क्षमा मागेन. पण काय करूं, त्यानें तो मल्लिकेसाठीं जेव्हां विलक्षण शोक आरंभिला, तेव्हां माझें अगदी देहभान नाहीसें झालें !

**प्रियाल** : अहो, दम धरा, हें पहा इकडे कोणसें येत आहे. कोण आहे तो ?

[ **श्वपति** प्रवेश करितो. ]

**श्वपति** : आपण परत आल्यानें सर्वांस मोठा आनंद झाला आहे.

**चंद्रसेन** : आपली आमच्यावर मेहेरबानीच म्हणायाची. हे अजागळशिरोमणी तुझ्या पाहण्यांत आहेत काय ?

**प्रियाल** : नाहीं, महाराज.

**चंद्रसेन** : तर मग तूं मोठा सुखी आहेस; कारण, असल्या खतरुडांची माहिती असणें मोठें पाप होय. याचा सुपीक जमीन-जुमला पुष्कळ आहे. पशुपशूंचा राजा झाला म्हणजे त्यांचीं हाडें तो चघळायाला लागला म्हणून समजावें. तीं चिवट असल्यानें दाढा दुखतात हें खरें, पण त्यांना मांसाचा पुष्कळ दर्प असतो, यामुळें आशा सुटत नाहीं.

**श्वपति** : धनीसाहेबांना फुरसत असेल तर महाराजांनीं कांहीं निरोप सांगितला आहे तो कळवितों.

**चंद्रसेन** : तो ऐकून घेण्याला तीन पायांवर मी उभा आहें. पण आपण तेवढी पगडी डोक्यावर नीट बसवाल काय ? पागोटीं डोक्यावर नीट घालण्यासाठीं केलेलीं असतात.

**श्वपति** : महाराज, कानशिलाला वारा लागतो आहे. म्हणून थोडी कलती करून घेतली आहे.

**चंद्रसेन** : असल्या टारग्यांना कानशिलांत दिल्याशिवाय यांना नीट ऐकायाला यायाचें नाहीं. पण कान फुंकण्यावरच जेथला कारभार चालणार तेथें डोक्यावरची पगडी कानावर आणि पायांतली वहाण डोक्यावर आली तर नवल काय ? का मुरकुटजी, थंडी फार कडक आहे नाहीं ?

**श्वपति** : महाराज, इतका कडक उन्हाळा पडला असून थंडी काय म्हणतां ? ह्या पहा माझ्या डोक्यांतून घामाच्या कोण धारा चालल्या आहेत !

**चंद्रसेन** : बरोबरच तें; आम्हांला जो हिंवाळा तो या पाजीला उन्हाळा; आणि म्हणूनच याचें डोकें फिरून जाऊन याची पगडी कानावर टेकली आहे. प्रियाला, कोळी माशीला धरतांना, किंवा भोरकिडा मुंगीला धरतांना तूं कधीं पाहिला आहेस रे ? आम्ही म्हणतों जग आमच्यासाठीं आणि ढेंकूण म्हणतात तुम्ही आमच्यासाठीं ! कसें काय तोंडपुजे, उन्हाळा फार जारी म्हणतां होय ? त्यानें माझ्या तोंडाला काळोखी आली, नाहीं बरें ?

**श्वपति** : महाराज, फारच जारी. आपली तर अगदीं त्रेधा झाली आहे ! महाराज, सरकारसाहेबांनीं आपणांस असें सांगण्यास सांगितलें आहे कीं, मीं आपल्या जिवावर मोठा पण लाविला आहे.

**चंद्रसेन** : त्यांनीं पण लाविला असता तर त्याचें मला काय सांगतोस ? माझ्यासारखें तुला तर नाहीं ना खूळ लागलें ? आतां कृपा करा, आणि ही पगडी अशी सारून घ्या.

**श्वपति** : महाराज, आपल्या पायां पडतों; माझ्या डोक्यासाठीं येवढें माफ करा; कारण, तें बरें तर जग बरें, नाहीं तर त्याची आमची वाट बरोबरच. महाराज, उत्तालाहून तीव्रजव नुकताच परत आला आहे; महाराज, ईश्वर स्मरून आपल्याला अगदीं इमानानें सांगतों कीं, असा उमदा, असा अक्कडबाज, असा इज्जतवाला, असा खूबसूरत, असा चैनबाज हिंमतबहाद्दर ढाल–समशेरींतला कारागीर आपल्या तर ऐकण्यांत नाहीं, मग पाहण्यांत

कोठला ? फार काय सांगावें, पण कर्णाचें दान, भीमाचें बळ, अर्जुनाचें चातुर्य आणि द्रोणाची युद्धविद्या हीं सगळीं त्याच्यांत एकत्र मिळाल्यासारखीं दिसतात. रूप तर काय साक्षात् मदनाची मूर्ति ! मला तर असें वाटतें कीं, तो सर्वोत्तम-गुणगणसाररत्नभाण्डागारच म्हटला तरी चालेल.

**चंद्रसेन** : तुम्ही त्याची स्तुति केलीत म्हणून त्याचे गुण कांहीं कमी होत नाहींत. आतां त्याच्या झाडून साऱ्या गुणांची याद करायाची म्हटली तर मोठ-मोठे गणिती देखील हात टेकतील. आणि इतकें असूनहि आपण त्याची केलेली स्तुति त्याच्या गुणाच्या मानानें कांहींच नाहीं. पण शिरस्त्याच्या मार्गानें ऐकून घ्या म्हणशील, तर मी कबूल करितों कीं, त्याच्यांत नांवाजण्यासारखे गुण आहेत व तो मोठा उदार–आत्मा आहे. आणि त्याच्या गुणासारख्या अलौकिक आणि दुर्मिळ गुणांचा एकत्रवास त्याच्या प्रतिमेखेरीज इतर ठिकाणीं हुबेहुब कधींच मिळायचा नाहीं ! आणि ही प्रतिमा तरी स्वच्छ आरशांतील प्रतिबिंबाव्यतिरिक्त कोठें सांपडणार ! त्याच्या छायेखेरीज त्याचें जसेंच्या तसें चित्र कोण काढणार ?

**श्वपति** : महाराजांनीं त्याचें यथोचित वर्णन केलें यात अणुमात्र संदेह नाहीं.

**चंद्रसेन** : राव, वैशिष्टय बोला, वैशिष्टय ? त्याचें वैशिष्टय काय ? प्रस्तुतच तो अत्यंत रसनाग्रवर्ती होण्याचें प्रधान कारण काय ?

**श्वपति** : महाराज ?

**प्रियाल** : महाराज, थोडे समजतील असे शब्द घाला ना ? आपण मनांत आणलें तर आपणांस तसें करतां येईल.

**चंद्रसेन** : या गृहस्थाची विशेष तारीफ कशाबद्दल होत आहे ?

**श्वपति** : तीव्रजवाची म्हणतां ?

**प्रियाल** : अहो महाराज, यांनी आणलेलें पोतें सपशेल मोकळें झालें; यांच्याजवळच्या भाड्यानें आणलेल्या चांगल्या चांगल्या शब्दांची पुंजी संपली !

**चंद्रसेन** : त्याची; राव, त्याची.

**श्वपति** : मला ठाऊक आहे, आपण कांहीं गैरमाहीत नाहीं.

**चंद्रसेन** : तुम्हांला असें ठाऊक असतें तर बरें होतें. पण तसें असतें तर ही मजा कशी उडती ? बरें, मग पुढें ?

**श्वपति** : तीव्रजवाच्या गुणांविषयीं महाराज अपरिचित नाहींत.

**चंद्रसेन** : तें नाहीं बोवा, आपल्याच्यानें कबूल करवत. कदाचित् आम्ही त्याच्या बरोबरीचे असू; पण मनुष्य माहीत असणें म्हणजे त्याचा तो ठाऊक असणें होय.

**श्वपति** : तसें नाहीं महाराज; मी त्याच्या शस्त्रकौशल्यास उद्देशून बोलत होतों. परंतु अलीकडे लोकांनीं त्याचा जो डंका मांडिला आहे, त्यावरून त्याच्या तोडीचा स्पर्धी नाहीं असा बोभाटा दिसतो.

**चंद्रसेन** : त्याचें शस्त्र तें कोणतें ?

**श्वपति** : ढाल आणि तरवार.

**चंद्रसेन** : याला दोन म्हणतात; बरें असो.

**श्वपति** : सरकार, महाराजांनीं सहा अरबी घोडे लाविले आहेत, व तीव्रजवानें आपल्या तर्फेनें सहा उत्ताली ढाली आणि तरवारी लाविल्या आहेत; त्यांपैकीं एकेकीचें काम काय म्हणून सागूं ! आ हा ! अशी नकशी आपण जन्मांत कोठें पाहिली नाहीं ! कारागिरानें कसबाची पण कमाल करून सोडिली आहे ! दस्तगी, बीळा, कबजा पनाह, कटोरी, कोफ्त, ढाल, जें जें पहावें तें तें अद्‌भुतच ! कबजा आणि कोफ्त मिळूनच आठ–दहा हजार रुपये पडले असतील. आहा ! दस्तगीचें तरी काम काय विचारावें ?

**चंद्रसेन** : अहो बृहस्पति, बोलतां आहां तरी काय ? हे कोणच्या कोशांतले शब्द चोरलेत ? दस्तगी तें काय ?

**प्रियाल** : तरी मला वाटलेंच कीं एखादा 'खां' अवतरल्याशिवाय हें भाषण आपल्याला कळायाचें नाहीं !

**श्वपति** : दस्तगी म्हणणे तरवारीचे बंद.

**चंद्रसेन** : तरवारीपेक्षां तारवाचे बंद म्हटलें तर कांहीं बरे शोभतात; कारण त्यांत ते नांगराच्या तरी उपयोगी पडण्याचा संभव आहे. बरें असो, काय म्हणतोस, सहा अरबी घोड्यांबद्दल मोठ्या किंमतीचे आणि बारीक नकशीचे कबजे, कोफ्त, ढाल, पनाह, पिपला आणि दस्तगी ज्यांना आहे अशा सहा ढाल तलवारी लाविल्या आहेत काय ? बरें, पण या पणाच्या अटी काय ?

**श्वपति** : महाराज, सरकारानीं असें ठरविलें आहे कीं, त्याचे तुमचे चार हात झाले तर तिहींपेक्षां अधिकांत त्याच्यानें तुमच्यावर सरशी करवणार नाहीं; म्हणजे त्यानें तुमच्यावर बारा वार केले तर त्यांतले निदान नऊ तरी तुम्ही हटकून चुकवाल. ही अट तुम्हांला कबूल होत असली तर सांगा, म्हणजे आतांच्या आतां खेळण्याची तयारी होती आहे.

**चंद्रसेन** : आणि मीं नाहीं म्हटलें तर—

**श्वपति** : तसें नव्हे महाराज, आपल्या मनांत खेळायाला उभें राहायाचें आहे कीं नाहीं तें सांगा.

**चंद्रसेन** : अहो बुद्धीचे खंदक, मी दिवाणखान्यांत इकडे तिकडे फिरत आहें; महाराजांच्या मनांत असलें तर ही माझी विश्रांतीची वेळ आहे; हत्यारें घेऊन या, आणि तीव्रजव तयार असेल व महाराजांनाही पसंत पडत असेल तर त्यांचा शब्द खरा करण्यास माझ्यानें होईल तें मी करून पाहीन. जिंकलों तर ठीकच आहे, हरलों तर पदरांत लाज आणि फाजील वार येतील. बेहत्तर आहे आले तरी.

**श्वपति** : असें कळवूं का तर मग सरकारांना ?

**चंद्रसेन** : हो, येवढें कळवा; मग त्याला आपल्या स्वभावाप्रमाणें जें तिखट-मीठ लागायाचें असेल, तें सांगून का चुकणार आहे ?

**श्वपति** : नाहीं नाहीं, महाराजांच्या सेवेला मी उभा आहें.

**चंद्रसेन** : नको, नको. आपल्याच. [ **श्वपति** जातो. ] यानें आपण होऊनच आपली शिफारस केली म्हणून बरें झालें; कारण, याच्या वतीनें ब्र काढणारा नाहीं कधीं मिळायाचा.

**प्रियाल** : महाराज, गेला एकदां शंखांतला किडा शंखांत निभावून !

**चंद्रसेन** : अरे, यानें आपण होऊन आपल्या पाठीला शंख लावून घेतला आहे. हा आणि असल्या शेंकडों ढंचें अलीकडे मोठें पीक माजलें आहे. यांचा धंदा काय तर रंग पाहून थेर करायाचे. यांचें ज्ञान कोठपर्यंत म्हणशील, तर गांवांत धेंडे धेंडें असतील त्यांचीं मतें कूटकुटून स्वतःच्या बेल्यांत भरावीं व मंडळी जमली म्हणजे त्यांच्यापुढें तीं आपलीं म्हणून काढून त्यांवर पांडित्य करावें. अशांची थोडी खात्रीची परीक्षा करायाची असली तर दोन जोराचे फुंकर घालावे, म्हणजे बुडबुडेबोवांनीं राम म्हटलें म्हणून समजा !

[एक **शिलेदार** प्रवेश करितो.]

**शिलेदार** : महाराज, सरकारांनीं श्वपतीला आपणांकडे पाठविलें होतें. त्यानें परत जाऊन सरकारांस असें सांगितलें कीं, आपल्या मनांत दिवाणखान्यांत त्यांची भेट घ्यायाची आहे. आपल्या मनांत आज तीव्रजवाशीं खेळायाचें आहे किंवा नाहीं, अथवा आणखी कांहीं दिवसांनीं खेळायाचें आहे, याचा खुलासा करण्याकरितां मला धाडिलें आहे.

**चंद्रसेन** : माझ्या निश्चयांना मी निरंतर जागृत असतों; व माझे निश्चय राजाच्या मर्जीवर अवलंबून असतात; त्यांना योग्य वाटत असेल तर माझी तयारी आहे. आता किंवा पुढें, मी आहें असा असलों म्हणजे माझी केव्हांच ना नाहीं.

**शिलेदार** : सरकार, राणीसाहेब व इतर मंडळी इकडे येण्याला निघाली आहेत.

**चंद्रसेन** : चांगली वेळ काढली.

**शिलेदार** : राणीसाहेबांची अशी सूचना आहे कीं, तीव्रजवाबरोबर खेळूं लागण्यापूर्वी त्याच्याशीं दोन गोड भाषणें बोलावीं.

**चंद्रसेन** : बरें आहे म्हणून सांगा तिला. [**शिलेदार जातो.**]

**प्रियाल** : महाराज, मला असें वाटतें की, आपण या पणांत हार जाणार.

**चंद्रसेन** : मला नाहीं असें वाटत. तो उत्तालाला गेल्यापासून माझी तालीम नित्य चालली आहे. मला वाटतें मी लावल्याप्रमाणेंच पण जिंकीन. परंतु या येथें (उराला हात लावून) ज्या भलभलत्या शंका येत आहेत त्यांची तुला कल्पना सुद्धा येणार नाहीं. पण जाऊ दे. त्यांत कांहीं हंशील नाही.

**प्रियाल** : महाराज, छे ! हें !--

**चंद्रसेन** : तो शुद्ध वेडेपणा आहे; असल्या शंकांची भीति फार झालें तर बायकांनीं बाळगावी.

**प्रियाल** : महाराज, तसें नाहीं. ही गोष्ट मनाला प्रशस्त वाटत नसेल तर ती करूं नका. आपल्या मनांत असेल तर त्यांना सांगतों कीं, महाराजांची तब्बेत ठीक नाहीं, यासाठीं खेळण्याचा बेत सध्यां रहीत करा.

**चंद्रसेन** : अगदीं नांव घेऊं नको; जें होणें असेल तें होईल. तें आतांच यायाचें असलें तर पुढें तरी नको; आणि पुढें यायाचें नसलें तर आतांचा उरकून जाऊं दे; आतां न आलें तरी केव्हां तरी तें यायाचेंच. कांहीं झालें तरी तयारी असली म्हणजे आटपलें. मनुष्य ज्या गोष्टी मागें टाकतो, त्यांविषयीं त्याला कांहीं एक कळत नसल्यामुळें त्या आज टाकल्या काय आणि उद्यां टाकल्या काय, सारख्याच.

[**राजा, राणी, तीव्रजव, शिलेदार** वगैरे दरबारी लोक, व हत्यारें घेऊन चाकर लोक प्रवेश करितात.]

**राजा** : चंद्रसेना ! ये, असा इकडे ये आणि हा हात मी तुझ्या हातांत घालतों आहें हा प्रेमानें धर. (**तीव्रजवाचा** हात **चंद्रसेनाच्या** हातांत घालतो.)

**चंद्रसेन** : तीव्रजवा, मी तुझी अंतःकरणापासून क्षमा मागतों. मीं तुझा अपराध केला आहे, पण ज्या अर्थीं तूं उदार पुरुष आहेस, त्या अर्थीं तूं त्याबद्दल मला क्षमा कर. येथें जमलेल्या मंडळीला ठाऊक आहेच, आणि तुझ्याही ऐकण्यांत

आलें असेल की, अलीकडे मी फार भ्रमिष्ट झालों आहें. तुझ्या मानाला, मनाला, आणि पदवीला अनुचित असें माझ्याकडून जें वर्तन झालें असेल तें वेडेपणामुळें झालें हें मी कबूल करितों. तीव्रजवाचा ज्यानें अपराध केला तो चंद्रसेन काय ? चंद्रसेनानें कधींच नाहीं; चंद्रसेनांतून चंद्रसेनत्व जर नाहीसें झालें असलें, आणि तो आपला आपण नसताना त्याच्याकडून तीव्रजवाचा अपराध झाला, तर तो चंद्रसेनाकडून झाला नाहीं; चंद्रसेनाला तो मान्य नाहीं. तर तो मग कोणी केला ? अर्थात्, त्याच्या वेडेपणानें. असें जर आहे तर ज्याचा अपराध झाला त्याच्यातर्फेचा चंद्रसेन होय, आणि चंद्रसेनाचा वेडेपणा हा त्याचा दुष्ट शत्रु होय. मित्रा, आतां माझी येवढीच आशा आहे कीं तुला कोणत्याही प्रकारें दुखविण्याचें माझ्या मनांत नव्हतें, हें या समाजापुढें प्रांजलपणें कबूल केल्यानें तुझ्या अत्यंत उदार अंतःकरणाची अशी खात्री होईल कीं, मीं जें आचरण केलें, तें न दिसतां सख्ख्या भावावर गोळी घालण्यासारखें होय.

**तीव्रजव** : चंद्रसेना, माझ्या मनाविषयीं म्हणशील तर या प्रसंगीं तुझा सूड घेण्याविषयीं अत्यंत उद्युक्त असण्याचीं कारणें त्याला असतांही, तुझें भाषण ऐकून तें समाधान पावलें आहे; पण मानाच्या संबंधानें मात्र मी अगदीं निराळ्या प्रकारचा मनुष्य आहें; त्यासंबंधानें कोणी सत्यवादी न्यायमूर्ति वृद्ध यांनीं पुढें होऊन "कलह माजवून रक्तपातानें तूं आपलें नांव सकलंक करून घेऊं नको" असें मला सांगितल्याशिवाय तुमची आमची मैत्री होणार नाहीं. पण तसें होईपर्यंत तूं ज्या प्रकारचें प्रेम मजबद्दल बोलून दाखविलें आहेस तें तसें घेऊन चालतो, आणि त्याला दोष येईल असें वर्तन करणार नाहीं.

**चंद्रसेन** : तूं म्हणतो आहेस तें मी आनंदानें कबूल करितों. चला तर मग, सख्ख्या भावांप्रमाणें राजानें केलेला पण कोण जिंकतो तें पाहूं या. आणा रे, हत्यारें आणा.

**तीव्रजव** : मलाही एक चकचकीत तरवार द्या.

**चंद्रसेन** : तीव्रजवा, तूं कशाला चकचकीत तरवार मागून घेतोस ? खेळायाला उभें राहून माझें शहाणपण बाहेर पडलें म्हणजे, कृष्णपक्षांत जसे तारे चमकतात तशी माझ्या अडाणीपणापुढें तुझी हातचलाखी चमकूं लागेल,

**तीव्रजव** : मित्रा, तूं माझी थट्टा करतोस.

**चंद्रसेन** : या तरवारीशपथ नाहीं.

**राजा** : ज्याला जीं लागतील तीं हत्यारें दे. चंद्रसेना, तुला पण ठाऊक आहे ना ?

**चंद्रसेन** : चांगला ठाऊक आहे. महाराजांनीं कच्च्या बाजूवरच फार भार घातला आहे.

**राजा** : मला त्याची बिलकुल भीति नाहीं. मीं तुम्हां दोघांनाही पाहिलें आहे. पण तो विशेष सुधारला आहे असें म्हणतात, म्हणून तशी अट लाविली.

**तीव्रजव** : ही फारच जड बुवा. दुसरी एक आण पाहूं.

**चंद्रसेन** : ही मला चालेल. सगळ्याच तरवारी लांब कां?

[ते खेळण्यास तयार होतात.]

**श्वपति** : होय, महाराज.

**राजा** : आज जर चंद्रसेनानें पहिले दोन वार तीव्रजवाच्या अंगावर केले, किंवा तिसरा उलट घेत असतां तो चुकविला तर आम्ही त्याच्या यशाबद्दल महोत्सव करण्याचा नेम केला आहे. ठेवा तर मग ते सर्व तांबे आणि पेले नीट बिछाइतीवर लावून. सर्व सिद्धता असूं द्या. आज चंद्रसेन जर हार गेला नाहीं, तर तीव्रजवाच्या आणि आमच्या घराण्यांची अशी मैत्री होणार आहे कीं, तशी आमच्या गेल्या चार पिढयांत कोणी पाहिली नसेल. होऊं द्या तर मग आरंभ. शिंगांचा आवाज नगाऱ्यांत, नगाऱ्यांचा तोफांत, तोफांचा गडगडाटांत, गडगडाटांचा प्रतिध्वनींत, याप्रमाणें चोहोंकडे धूमगजर होऊं द्या, व चंद्रसेनाच्या नांवाचा जयजयकार चालूं द्या! परीक्षकांना म्हणावें, खेळणारांकडे चांगलें लक्ष द्या.

**चंद्रसेन** : चल, ये.

**तीव्रजव** : तयार आहें, महाराज. (ते खेळतात.)

**चंद्रसेन** : एक.

**तीव्रजव** : नाहीं.

**चंद्रसेन** : न्याय.

**श्वपति** : एक वार, अगदीं उघड; बिलकुल संशय नाहीं.

**तीव्रजव** : बरें, पुनः.

**राजा** : दम धरा; इकडे आणा रे एक पेला भरून. हा बादशाही तूं घे.

[वाद्यांचा आणि तोफांचा आंत ध्वनि होतो.]

त्याला तो पेला द्या.

**चंद्रसेन** : किंचित एकीकडे ठेवा; येवढा हात खेळून घेतों. चल ये. (ते खेळतात.) दुसरा वार! कसें काय तुझें म्हणणें आहे?

**तीव्रजव** : लागला खरा; लागला खरा; मी कबूल करितों.

**राजा** : आपला चंद्रसेन जिंकणार.

**राणी** : वायूमुळें त्याला श्वास फार लागला आहे. बाळा चंद्रसेना, हा माझा रुमाल घे, आणि कपाळावरचा घाम पूस. तुला खचित यश येणार; मी आतां दोन घोट घेतें.

**चंद्रसेन** : आई, तुझ्या आशीर्वादानें येईलसें वाटतें.

**राजा** : मदनिके, पिऊं नको.

**राणी** : पितेंच; कृपा करून राग येऊं देऊं नये.

**राजा** : (एकीकडे) अरेरे ! तो विषाचा पेला ! आतां बोलून काय फळ ?

**चंद्रसेन** : आई, मी इतक्यांतच पीत नाहीं; थोडया वेळानें पिईन.

**राणी** : ये इकडे, मला तुझें तोंड पुसूं दे.

**तीव्रजव** : सरकार, आतां मी मारतों पहा.

**राजा** : मला नाहीं वाटत तुझ्यानें तें होईल.

**तीव्रजव** : (एकीकडे) आणि इतकें झालें तरी असें करण्यास माझें मन नाहीं साक्ष देत.

**चंद्रसेन** : तीव्रजवा, चल, हा तिसरा घे; तूं कीं नाहीं मनापासून खेळत नाहींस; तूं आपली माझी थट्टा चालविली आहेस. आतां एकदां तुझ्यांत जितकें सामर्थ्य असेल तितकें दाखव पाहूं.

**तीव्रजव** : असें म्हणतोस काय ! येच तर मग. (ते खेळतात.)

**श्वपति** : कोणाकडून कांहीं नाहीं.

**तीव्रजव** : हाच घे तर मग.

[**तीव्रजव चंद्रसेनाला** जखमी करतो; नंतर भांडणाच्या गर्दीत ते आपल्या तरवारी बदलतात. **चंद्रसेन तीव्रजवाला** वार करितो.]

**राजा** : अरे, त्यांना सोडवा; ते आतां हट्टाला पेटून चवताळल्यासारखे दिसतात.

**चंद्रसेन** : नाहीं नाहीं; पुनः होऊं द्या. [राणी पडते.]

**श्वपति** : अरे, तिकडे कोणी तरी राणीसाहेबांकडे पहा. त्यांना एकाएकीं असें काय झालें ?

**प्रियाल** : दोघेही जखमी झाले; कसें काय महाराज ?

**श्वपति** : कसें काय तीव्रजवा ?

**तीव्रजव** : श्वपति, आतां कशाला विचारतोस ? 'हांसत कर्म करावें, भोगावें रडत तेंच परिणामीं !' मी आपल्या विश्वासघातानें कीं रे आपला घात करून घेतला !

**चंद्रसेन** : राणीची कशी काय तब्येत आहे ?

**राजा** : तुमच्या अंगांतून रक्तें निघालेलीं पाहून तिला घेरी आली.

**राणी** : नाहीं नाहीं; दारू, दारू बरें बाळा चंद्रसेना ! ती दारू रे मला भोवती आहे !—दारू ! दारू ! मला विष घातलें रे विष ! (मरते.)

**चंद्रसेन** : अरेरे, काय चाण्डाळपणा हा ! दारांना कुलुपें लावा. दगा ! दगा कुठें आहे तो काढा बाहेर ! काढा !

**तीव्रजव** : (आपल्याकडे बोट दाखवून) चंद्रसेना, तो येथें आहे; चंद्रसेना, तूं मेल्यासारखा आहेस; त्रिभुवनांतलें पाहिजे तें औषध घेतलेंस तरी गुण म्हणून यायाचा नाहीं. तूं आतां फार झालें तर अर्ध तासाचा सोबती आहेस. तुझ्या हातांत जें शस्त्र आहे तें धार दिलेलें व विषांत बुडविलेलें आहे. माझा हरामखोरपणा मला चांगला भोवला; आतां या पडल्या जागेवरून मला पुनः उठणें नाहीं; तुझ्या आईनें प्यायलेल्या दारूंत विष होतें. आतां माझ्यानें अधिक बोलवत नाहीं. राजा,—राजाकडे सगळा दोष आहे.

**चंद्रसेन** : टोंक–टोंक देखील विषांत बुडविलेलें आहे काय ? तर मग विषा, बजाव आतां आपली कामगिरी ! (राजाला भोसकतो.)

**सर्वजण** : दगा ! दगा ! खून ! खून !

**राजा** : मित्र हो, अजून तरी मला वांचवा; मला नुस्ती जखम लागली आहे !

**चंद्रसेन** : नीचा, जाराधमा, बलभद्राच्या श्वाना, पी ही दारू. खाशी मैत्री जमली ! जा आतां आईच्या मागोमाग !

**तीव्रजव** : चंद्रसेना, खासा दंड केलास; त्यानेंच विष घालून तयार केलेला पेला तो. उदार चंद्रसेना, झालेल्या अपराधाबद्दल मला क्षमा कर; माझ्या आणि माझ्या बापाच्या मरणाबद्दल तुझ्याकडे कांहीं नाहीं ! (मरतो.)

**चंद्रसेन** : ईश्वर तुला त्या अपराधांतून मुक्त करो ! मी तुझ्या पाठोपाठ येतों. प्रियाला, मी मेलोंच आहें. हतभाग्य राणी, हा तुला शेवटला नमस्कार करितों ! प्रेक्षक हो, हा विलक्षण प्रकार दृष्टीस पडल्यानें तुम्ही चकित होऊन पांढरे पडलां आहां. पण काय करूं ? मृत्यूनें बळकट फांस लाविला आहे, नाहीं तर या गूढ प्रकरणाचा खुलासा केला असता. असो. पण आतां त्याचा काय उपयोग ? प्रियाला, मी तर गेलोंच आहें. पण तूं जिवंत आहेस; ज्यांना ठाऊक नसेल त्यांना माझा इतिहास कळीव.

**प्रियाल** : महाराज, त्याचें कशाला नांव घेतां ? यमपुरीस थोडा तरी मी आपल्या आधीं गेल्याशिवाय राहणार नाहीं. अजून माझ्यापुरती दारू राहिली आहे.

**चंद्रसेन** : प्रियाला, तूं खरोखर धीराचा असलास तर दे तो पेला मजकडे. आण, आण, घेऊं दे तो मला. प्रिय मित्रा, या अनर्थाविषयीं खरी हकीकत लोकांस समजली नाहीं तर माझ्या पाठीमागें माझ्या नांवाला केवढा कलंक लागेल बरें ? मजवर तुझें खरोखर प्रेम असेल तर माझ्यासाठीं इतक्यांतच स्वर्गसुख घेण्याची घाई करूं नको; माझा खरा वृत्तान्त लोकांस कळविण्यासाठीं या कष्टमय जगांत संकटानें दोन दिवस काढ, आणि काम उरकलें म्हणजे माझ्या भेटीला ये.

[दूर माणसें चालल्याचा आणि तोफा उडविल्याचा ध्वनि होतो.]
हा लढाईचा ध्वनि कोठें होत आहे ?

**श्वपति** : पोलोमाहून विजयी होऊन आलेला प्लवंगाधिप श्वेतद्वीपाच्या वकिलांच्या सलामीसाठीं हे बार काढीत आहे.

**चंद्रसेन** : मित्रा प्रियाला, मरतों तर मग मी आतां; या जबरदस्त विषानें माझे प्राण अगदीं कासावीस होऊन गेले आहेत. श्वेतद्वीपाकडील वार्ता आतां कांहीं माझ्या कानीं पडत नाहीं; परंतु तुझ्यापाशीं एवढें भविष्य करून ठेवतों कीं, लोक प्लवंगाला राजा नेमतात; त्यालाच नेमावा असें मलाही वाटतें. असो. एकाएकीं असा परिणाम कशानें झाला याची कमी अधिक हकीकत त्याला सांग; येतों तर मग आतां. ('राम' म्हणून मरतो.)

**प्रियाल** : (डोळयांत पाणी आणून) गेला ! गेला ! जगांतील उदार आत्मा गेला ! थोर राजपुत्रा, प्रिय मित्रा चंद्रसेना, बोलतां बोलतां, मला टाकून एकटाच पुढें गेलास ना ? यक्षकिन्नर हो, याला त्रास न होतां जपून घेऊन जा ! हा नगारा इकडे कोणीकडे ? [आंत शिपाई चालतात.]

[**प्लवंगाधिप**, श्वेतद्वीपाचे वकील आणि दुसरे लोक प्रवेश करितात.]

**प्लवंगाधिप** : अरेरे, काय अनर्थ हा !

**प्रियाल** : आतां त्यास काय पहातां ? पाहून तरी खेद आणि दुःख यांशिवाय काय लाभणार ?

**प्लवंगाधिप** : शिव शिव ! काय घोर प्रसंग हा ! हे दुष्ट मृत्यो, अशी कसली मेजवानी मांडली आहेस कीं, जिच्यासाठीं एक तडाक्यासरशी राजघराण्यांतील इतके पुरुष घेऊन गेलास ?

**एक वकील** : असला दुःखकारक प्रसंग कोणी कधींही पाहिला नसेल. आम्ही अवेळीं येऊन पोहोंचलों, इकडून खलिता आल्याप्रमाणें श्वेतद्वीपानें जुंग आणि भृंग यांस परलोकांस पाठविलें हें आतां आम्हीं कोणाला सांगावें, आणि कोणाची शाबासकी घ्यावी ?

**प्रियाल** : असें समजूं नका कीं, राजा जिवंत असता तर त्याच्या तोंडून तुम्हांला शाबासकी मिळाली असती ! जुंगाला आणि भृंगाला मारण्याबद्दल त्यानें कधींच खलिता पाठविला नाहीं. परंतु ज्या अर्थी या अनर्थाच्या प्रसंगालाच तुम्ही पोलोमाहून आणि तुम्ही श्वेतद्वीपाहून येऊन ठेपलां आहां, त्या अर्थी सर्वांस दिसतील अशा एखाद्या चवाठयाच्या उंच ठिकाणीं हीं प्रेतें ठेवण्याचा हुकूम द्या, म्हणजे अज्ञानानें घोटाळयांत पडलेल्या जगाला इत्थंभूत हकीकत सांगतों. म्हणजे दोन घटकेच्या अवकाशांत हे इतके आसुरी खून पडले कसे, समजांत चुक्या कोणाच्या झाल्या, सहज घात कोणाच्या हातून झाले, कोणकोणाच्या कपटामुळें कसकशीं तेढीं पडत गेलीं, आणि दुसऱ्याला फांस घालण्याच्या बेतांत असतां स्वतःच कोण कोण फांसांत पडले, हें लोकांना कळून येईल. यासंबंधाची मला खरी माहिती आहे.

**प्लवंगाधिप** : चला तर मग, ती ऐकूं या. ती ऐकण्याला चांगले चांगले लोक बोलवा. अशा राजपुत्रानें अकालीं परलोकास जावें आणि त्याचें राज्य मजकडे यावें हें काहीं चांगलें नाहीं. पण करतां काय ? वंशपरंपरेनें चालत आलेला हक्क कसा तरी चालविला पाहिजे !

**प्रियाल** : हो, त्यासंबंधानेंही मला थोडेंसें बोलावें लागणार आहे; खेरीज, तुम्हांलाच गादीवर बसविण्याविषयीं एकानें मजपाशीं आपली संमति देऊन ठेवली आहे, ती बाहेर पडल्यावर दुसऱ्या पुष्कळांचीही तिच्यासारखीच पडेल. तें असो, पण मीं सांगितल्याप्रमाणें लोकांस खरी हकीकत कळविण्याचें काम आतांच्या आतांच झालें पाहिजे; त्यांचीं मनें चवताळून गेलीं आहेत हें खरें; पण आतांच्या आतां तें काम उरकून टाकलें नाहीं, तर पुढें आणखी कट आणि मारामाऱ्या होण्याचा संभव आहे.

**प्लवंगाधिप** : चार शिलेदारांना म्हणावें कीं, शिपायांच्या प्रेताप्रमाणें तुम्ही चंद्रसेनाचें प्रेत उचलून घ्या आणि चवाठयावर घेऊन चला; कारण तो गादीवर बसता तर पहिल्या प्रतीचा राजा झाला असता; आणि त्याच्या सन्मानार्थ रणांत पडणाऱ्या वीराचा सगळा थाट झाला पाहिजे. उचला तर मग सगळीं प्रेतें; असा

भयंकर प्रकार रणांगणाला शोभतो, परंतु अशा ठिकाणीं तो अगदीं गैर दिसतो. जा, शिपायांना म्हणावें बंदुका सोडा.

[ मेल्याबरचें कूच; प्रेतें घेऊन जातात; त्यांच्या पाठीमागून तोफांची सलामी होते. ]

समाप्त



# वाक्यमीमांसा

आणि

## वाक्यांचें पृथक्करण



AN INQUIRY INTO THE NATURE OF SENTENCES
WITH
AN ANALYSIS OF THEM

BY
*G. G. AGARKAR, M. A.*
PROFESSOR OF LOGIC, AND PRINCIPAL, FERGUSSON
COLLEGE, POONA, AND FELLOW OF THE
UNIVERSITY OF BOMBAY

---

हें पुस्तक
तर्कशास्त्राचे प्रोफेसर व प्रिन्सिपाल, फर्ग्यूसन
कॉलेज आणि मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो
**गोपाळ गणेश आगरकर, एम्. ए.**
यांनीं केलें.

---

आवृत्ति २ री

सन १८९९

किंमत ०९; टपालहांशील ०१०६

# प्रस्तावना

कोणत्याही लोकांच्या उन्नतावस्थेचीं जीं अनेक व्यंजकें आहेत, त्यांपैकीं त्यांचा ग्रंथसंग्रह हें एक आहे. सामान्य लोकांची लिहिण्याबोलण्याची जी भाषा तींत अनेक विषयांवर ग्रंथ झालेले असले व होत असले, म्हणजे त्या लोकांस वाचनाची अभिरुचि लागून ज्ञान–संपादनापासून होणाऱ्या हितांचे ते वांटेकरी होऊं लागले आहेत, असें सिद्ध होतें. आतां जेव्हां कोणत्याही भाषेंत अनेक विषयांवर ग्रंथ होऊं लागतात, तेव्हां ते मनोरंजक व सुगम व्हावे, यासाठीं त्या भाषेच्या उत्पत्तीविषयीं, रचनेविषयीं, व शब्दकोषा-विषयीं भाषाभ्यास करणारांत चर्चा होऊं लागून, शुद्धभाषाविषयक ग्रंथ निपजूं लागतात. निरनिराळ्या धंद्यांतील लोकांना आपापले धंदे नीट चालविण्यास ज्याप्रमाणें त्यांस योग्य अशा हत्यारांचें साहाय्य घ्यावें लागतें, त्याप्रमाणें वक्त्यांस व लेखकांस शास्त्रीय विचार व मनोविकार हे श्रोत्यांस व वाचकांस थोडक्यांत आणि सुलभ रीतीनें समजाविण्यासाठीं व्यवस्थित वाक्यरचना व विस्तृत शब्द-समूह ज्या भाषेंत आहे अशीची मदत घ्यावी लागते. ज्याप्रमाणें लोहाराच्या हत्यारांनीं सोनाराचें, व सोनाराचे हत्यारांनीं घडघाळें करणाचें, काम नीट चालायाचें नाहीं, त्याप्रमाणें मोठमोठ्या कवींचा व शास्त्रीय ग्रंथ रचणाऱ्यांचा व्यवसाय, अडाणी लोकांचा ज्या प्रकारच्या भाषेंत व्यवहार होत असतो, त्या प्रकारच्या भाषेनें नीट चालत नाहीं. विकार व विचार समजावितांना भाषा अपुर्ती पडूं लागली कीं, प्रासादिक कवि आणि बुद्धिवान् व बहुश्रुत शास्त्रज्ञ हे नवीन शब्द पाडण्याच्या टांकसाळी सुरू करतात, व आपापल्या गरजा भागवून नेतात. याप्रमाणें कवींकडून व शास्त्रज्ञांकडून नवीन शब्दनाणीं प्रचारांत आलीं म्हणजे त्यांचे वर्ग बांधणें, ठिकठिकाणीं त्यांचे कसकसे अर्थ केले आहेत याचा तपास लावणें वगैरे दुसऱ्या प्रतीचीं कामें करणारे व्याकरणकार व कोशकार पुढें सरसावतात, आणि प्रसिद्ध कवींच्या, शास्त्रज्ञांच्या, आणि साधारणपणें सर्व सुशिक्षित लोकांच्या लिहिण्याच्या व बोलण्याच्या ज्या पद्धति असतील त्यांच्या निरनिराळ्या उद्देशांनीं निरनिराळ्या व्यवस्था लावून पुस्तकरूपानें त्या तरुण विद्यार्थ्यांच्या हातीं देतात. अशा रीतीनें अस्तित्वांत आलेल्या व्याकरणांच्या,

अलंकारांच्या, वृत्तांच्या, कोशांच्या वगैरे पुस्तकांनीं कोणत्याही भाषेंतील गद्य-रचना व पद्यरचना सुव्यस्थित होऊन शब्दार्थास स्थिरत्व येतें, व सर्व सुशिक्षित लोक सर्व प्रकारें नियत अशा एकाच प्रकारच्या भाषेंत लिहूं लागले व बोलूं लागले, म्हणजे त्यांमधील अन्योन्यव्यवहार फार सुकर होतो. भाषेस अशा प्रकारचें सौकर्य आणणें याहून भाषाविषयक पुस्तकांचा दुसरा उपयोग नाहीं. भाषाविषयक पुस्तकांहून अन्यविषयक पुस्तकें अधिक महत्त्वाचीं व उपयोगाचीं नाहींत, असें कोणीही म्हणूं शकणार नाहीं; पण भाषाविषयक पुस्तकेंही कांहीं कामाचीं नाहींत, असें देखील कोणत्याही समंजस मनुष्यास म्हणतां येणार नाहीं.

मराठी भाषेंत अशा प्रकारचीं पुस्तकें रचण्यांत वेळ व बुद्धि निदान प्रस्तुत काळीं तरी खर्चण्यांत हांशील नाहीं, असें म्हणणारे पुष्कळ लोक आहेत. यांपैकीं कित्येकांच्या मतें हिंदुस्थानांतील अठरापगड जातींप्रमाणें अठरापगड भाषा नाहींशा होऊन सर्वत्र हिंदुस्थानीसारखी किंवा इंग्रजीसारखी एखादी सामान्य भाषा काशीपासून रामेश्वरापर्यंत स्थापित होईल तर फार बरें असें असल्यामुळें, कोणत्याही देशी भाषेच्या रचनेच्या वगैरे संबंधानें काथ्याकूट करणाऱ्यास ते वेडेपीर समजत असतील, हें उघडच आहे! दुसऱ्या कित्येकांचें म्हणणें असें आहे कीं, आमच्या देशांत ग्रंथ लिहिणारांची संख्या अत्यंत स्वल्प आहे, तेव्हां त्यांनीं शब्दवादप्रचुर शुष्क भाषाविषयांकडे आपली मर्यादित हिंमत खर्च न करतां जेणेंकरून लोकांस राज्यविषयक, नीतिविषयक, व संपत्तिविषयक तत्त्वांचें ज्ञान होईल असे ग्रंथ उत्पन्न करण्यांत आपला काळ व उमेद खर्चावी!

आमच्या मतें या दोनही प्रकारच्या लोकांचे बोलण्यांत मुळींच अर्थ नाहीं असें जरी नाहीं, तरी त्यांचा उपदेश सर्वांनीं ऐकून तदनुसार वर्तन करणें इष्ट व शक्य नाहीं असें वाटतें. प्रथम—भाषा, लिपी, धर्म इत्यादि ज्या गोष्टींच्या अनेकत्वामुळें आमच्या पृथ्वीवर भिन्नराष्ट्रता मूळ उत्पन्न झाली, व आजपर्यंत ती कायम होऊन राहिली, ते अनेकत्व नाहींसें होऊन सर्वत्र सर्व महत्त्वाच्या गोष्टींत एकत्व स्थापित होईल तर किती बहार होणार आहे! पण हें व्हावें कसें? युरोपखंडांतील फ्रान्स, जर्मनी, इंग्लंड वगैरे अग्रणी देश आपापल्या भाषा व लिपी टाकून कोणत्याही एका सामान्य भाषेचा किंवा लिपीचा अंगीकार करण्यास सिद्ध होतील असें वाटत नाहीं. युरोपांत तसें न होण्यास जीं कारणें आहेत, त्यांपैकीं एक येथें लागू पडत नाहीं, हें आम्ही कबूल करतों. तसेंच सर्व हिंदुस्थान-भर एक भाषा स्थापण्याच्या विचारास त्या एका कारणापासून पुष्कळ साहाय्य होण्याचा संभव आहे, हेंही आम्ही नाकबूल करीत नाहीं. इंग्रज लोकांसारख्या सुधारलेल्या लोकांना हिंदुस्थानांत सार्वभौम राज्यसत्ता प्राप्त झाली असल्यामुळें

येथल्या सतरा पंधरा अर्धवट रानटी भाषा नाहींशा होऊन त्यांचे जागीं विद्वान् इंग्रजी भाषा चालू होईल तर फार बरें होईल, असें जें आम्हांपैकीं कित्येकांस वाटूं लागलें आहे, व तें घडवून आणण्यासाठीं कित्येकांनीं जो थोडाबहुत प्रयत्न केला आहे, तो केवळ अविचाराचा आहे, असें आमच्यानें म्हणवत नाहीं. तथापि आमची अशी समजूत झाली आहे कीं हिंदुस्थानांत सर्वत्र एक भाषा होण्यास ज्या अनुकूल गोष्टी आहेत त्यांहून प्रतिकूल गोष्टी फार व बलवत्तर असल्यामुळें, त्या संबंधानें केलेले श्रम व्यर्थ होणार आहेत. या देशांत इंग्रजी भाषेचा अभ्यास उत्तरोत्तर वाढत गेला तर त्यापासून देशी भाषा मागें पडण्याचा संभव नाही इतकेंच नाहीं, तर त्यांस उलट उत्तेजन येणार आहे, असा आमचा ग्रह झाला आहे. तेव्हां हिंदुस्थानांतील पुढें सरसावलेल्या इतर भाषांप्रमाणें मराठी भाषेसही उन्नतावस्था प्राप्त होऊन तींत उपयक्त व मनोरंजक ग्रंथसंग्रह दिवसें–दिवस अधिकाधिक होत जाणार असें वाटूं लागलें आहे.

आतां दुसरा प्रश्न असा आहे कीं, सध्याच्या देशस्थितींत पुस्तकें करणारांनीं शुद्ध भाषाविषयक वादांत आपली हिम्मत खर्चावी किंवा नाहीं ? त्यावर आमचें पहिलें उत्तर असें आहे कीं, शेंकडा नव्याण्णव लोकांस ज्याची पर्वा नाहीं किंवा गरज नाहीं अशा व्याकरणासारख्या एकदेशीय विषयांत काळ घालविणें आपणास व दुसऱ्यांस फायदेशीर होईल, असा पक्का सुमार दिसला तरच कोणी त्या मार्गास लागणार आहे. असें करतांना जर कोणी अटकळ करण्यास चुकला असला, तर इतर प्रमाद करणाऱ्यांप्रमाणें त्यालाही आपल्या प्रमादापासून होणारें नुकसान सोसावें लागून, पुढें त्या वाटेला फिरून न जाण्यास ताकीद मिळेल ! दुसरें असें आहे कीं, सर्वमान्य अशा कांहीं अत्यंत उपयुक्त गोष्टी आहेत असें जरी मानिलें, तरी त्या करण्याची सर्वांच्याच अंगीं पात्रता असेल असें नाहीं. कित्येकांना असेल तेवढें सामर्थ्य उपयक्ततेच्या व करमणुकीच्या दृष्टीनें दुसऱ्या किंवा तिसऱ्या प्रतीच्या व्याकरणासारख्या नीरस विषयांकडेच लावण्याची सोय असेल.

या दोन कारणांस्तव — म्हणजे एक तर मराठी भाषेस उत्तरोत्तर उन्नतावस्था येत जाणार आहे अशी खातरी झाली असल्यामुळें, व दुसरें सध्या दुसऱ्या एखाद्या विषयापेक्षा याच विषयावर चार पानें बरीं लिहितां येतील असें वाटल्यामुळें, मराठी वाक्यांची थोडीबहुत मीमांसा करून त्यांचें पृथक्करण करण्याच्या कामास मीं हात घातला. या विषयासंबंधानें आजपर्यंतच्या मराठी व्याकरणकारांच्या ग्रंथांत कांहींच विचार आलेला नाहीं असें नाहीं; परंतु माझ्या समजुतीनें यावा तितका आलेला नाहीं. कै. दादोबा पांडुरंग, कै. कृष्णशास्त्री चिपळोणकर, व कै. कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं यासंबंधानें जें लिहिलें

आहे तें मला अपुरें वाटल्यावरून, मी हीं पुढलीं शंभर सव्वाशें पानें महाराष्ट्र भाषोन्नतेच्छूंस अर्पण करीत आहे. तीं त्यांस कितपत मानवतील हें माझ्यानें सांगवत नाहीं. तथापि मीं आपल्याकडून तीं होतील तितकीं वाचनीय केलीं आहेत. तीं तयार करण्यांत पूर्व व्याकरणकारांपासून होण्यासारखी मदत मीं घेतली आहे, व तीबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. तथापि या कामांत मला जें विशेष साहाय्य मिळालें, तें मराठी व्याकरणकारांपासून नव्हे, तर इंग्रजी व्याकरणकारांपासून, व त्यांतही विशेषतः **बेन**पासून. या व्याकरणकाराचें व्याकरण माझ्या हातीं न पडतें, व तें शिकविण्यासाठीं त्याचा बारकाईचा अभ्यास मला न करावा लागता, तर प्रस्तुतसारख्या विषयावर लिहिण्याची इच्छा मला कधींच होतीना. **बेन**च्या व्याकरणापासूनच काय, त्याच्या या व याला लागून असलेल्या इतर विषयांवरील पुस्तकांपासूनही मला या कामीं पुष्कळ साहाय्य झालें आहे. सारांश, अनेक भाषाभिज्ञ या महा-पंडिताच्या अनेक पुस्तकांत वाक्यार्थमीमांसा व वाक्यरचना यांसंबंधानें जीं तत्वें माझ्या अवलोकनांत आलीं आहेत, त्यांपैकीं जेवढीं मराठी वाक्यांस लावण्या-सारखीं मला वाटलीं, तेवढीं मीं आपल्याकडून होईल तितका विचार करून दाखविलीं आहेत. बेनशिवाय **मेझन ऑरनॉल्ड, व्हिट्ने, मोरेल, हायले** वगैरे इतर इंग्रजी व्याकरणकारांपासून मला जो फायदा झाला आहे त्याबद्दल मी त्यांचाही आभारी आहे.

या पुस्तकांतील उपोद्घातांत "**वाक्याविषयीं सामान्य विचार**" केला आहे, तो माझ्या मतें आबालवृद्धांस समजण्यासारखा आहे. व्याकरणशास्त्राचें तात्त्विक ज्ञान होण्यास शब्दवर्ग ज्या तत्त्वांवर रचलेले असतात, त्या तत्त्वांचें स्वरूप स्पष्ट कळणें अत्यंत अवश्य आहे, अशी माझी फार दिवसांची समजूत झाली असल्यामुळें हा "**वाक्याविषयीं सामान्य विचार**" माझ्यानें जितका सोपा करवला तितका केला आहे. त्याच्या पुढला, पहिल्या भागांतील "**वाक्याविषयीं विशेष विचार**", किंचित कठीण झाला आहे. तो विद्यार्थ्यांनीं दुसरा भाग वाचल्यावर वाचला तरी चालेल. फक्त मराठी भाषेचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांस, किंवा पुढें ज्यांना इंग्रजी भाषेचा व व्याकरणाचा अभ्यास करा-वयाचा आहे, अशांसही हें पुस्तक उपयोगी पडावें, अशी माझ्याकडून मीं त्याची रचना केली आहे. हें शिकविणारास इंग्रजी व संस्कृत भाषेची थोडी माहिती असल्यास बरें होणार आहे. ज्या शिक्षकांनी **बेन**चें व्याकरण पाहिलें असेल त्यांना तर हें पुस्तक समजण्यास मुळींच कठिण पडणार नाहीं; कारण साधा-रणपणें मराठी व्याकरणाचें पृथक्करण बेनच्या इंग्रजी वाक्यांचे पृथक्करणाच्या

धर्तीवर नेलें आहे इतकेच नाहीं, तर कित्येक ठिकाणीं बेनच्या व्याख्यांचें अक्षरश: भाषांतर करून घेतलें आहे. ज्यांना इंग्रजी व मराठी व्याकरण शिकावयाचें असेल, त्यांच्या सोईसाठीं चवथ्या व पांचव्या परिशिष्टांत इंग्रजी व मराठी पृथक्करणसंज्ञा आणि इंग्रजी वाक्यपृथक्करणाचा बेनच्या मोठ्या व्याकरणांतून स्वल्प सारांश दिला आहे. तिसऱ्या परिशिष्टांत अभ्यासाकरितां दिलेलीं बहुतेक वाक्यें मराठी विद्यार्थ्यांच्या व शिक्षकांच्या सोईसाठीं शाळाखात्याच्या क्रमिक पुस्तकांतून वेंचून दिलीं आहेत. दुसऱ्या परिशिष्टांत बऱ्याच वाक्यांचें पृथक्करण करून दाखविलें आहे, व सवड असती तर आणखी पुष्कळांचेंही करून दाखविलें असतें; पण पृष्ठसंख्या मूळ अदमासाहून फार वाढत चालल्यामुळें माझ्या मनांत जितक्या वाक्यांचें पृथकरण करून दाखवायाचें होतें तितक्यांचें झालें नाहीं. तथापि जेवढें करून दाखविलें आहे तेवढें विद्यार्थ्यांस पद्धत लागण्यास पुरें आहे असें वाटतें. हें पुस्तक लिहित असतां मराठी भाषेंत शुद्ध लेखनाच्या संबंधानें माझें मन द्विधा झालेलें होतें. एकदां असें वाटे कीं कै. कृष्णशास्त्री चिपळोणकरांनीं आपल्या "**निबंधात**" सुचविल्याप्रमाणें संस्कृत शब्द संस्कृत नियमांप्रमाणें न लिहितां, मराठींतील प्रघाताप्रमाणें व उच्चाराप्रमाणें लिहावे; फिरून असें वाटे कीं, संस्कृत शब्दांस मराठीचे वळणावर नेल्यास गोंधळ होईल. अशा प्रकारच्या घोळांत पडलों असल्यामुळें कोठें संस्कृत पद्धतीस अनुसरून व कोठें मराठी पद्धतीस अनुसरून शब्दलेखन आलें आहे. 'कर्तरी', 'कर्मणी', 'भावी', 'संबंधी' वगैरे शब्दांस मराठी विशेषणें मानून शेवटची 'ई' नेहमी दीर्घ घातली आहे. 'रूढि', 'पद्धति', 'रीति', 'धातु' वगैरे शब्द कोठें संस्कृत व कोठें मराठी पद्धतीप्रमाणें लिहिण्यांत आले आहेत. सर्वांस ग्राह्य व मान्य अशी एक मराठी लेखनपद्धति पडेपर्यंत असल्या अस्थिरत्वाबद्दल सूज्ञ वाचक क्षमा करतील अशी उमेद आहे.

मराठी व्याकरणाच्या विवक्षित शाखेविषयीं असा विस्तृत विचार प्रथमच होत असल्यामुळें त्यांत कोठें निष्कारण पाल्हाळ झाला असेल, कोठें व्हावें त्यापेक्षां अपुरें विवरण झालें असेल, व कोठें पुस्तककर्त्याच्या हेळसांडीमुळें किंवा संकुचित वाचनामुळें व माहितीमुळें कांहीं गोष्टी अजीबात राहिल्या असतील

यांत संशय नाहीं. अशा प्रकारच्या प्रमादांबद्दल विद्वान व विचारी वाचकांकडून जितकी टीका होईल तितकी या स्वल्प प्रयत्नाच्या जनकाला प्रिय होईल इतकेंच नाहीं, तर कधींकाळीं या त्याच्या प्रयत्नाची पुनरावृत्ति काढण्याचा भाग्योदय आला तर तींत तो त्या टीकेचा मन:पूर्वक विचार करील.



# वाक्यमीमांसा

## उपोद्घात

### वाक्याविषयीं सामान्य विचार

भाषेच्या द्वारें मनुष्य आपले विचार एकमेकांस कळवितात. भाषा वाक्यांनीं झालेली असते. ज्याच्या योगानें आपल्या मनांतील कोणताही विचार मनुष्यास पूर्णपणें कळवून देतां येतो, अशा शब्दसमूहास वाक्य म्हणतात. तथापि पाहिजे त्या शब्दांनीं वाक्य होत नाहीं. "घोडा, गाडी, रस्ता, वर, हांकणें, जलद" हा शब्दसमूह आहे; पण यापासून कोणताही विचार व्यक्त केला, असें होत नाहीं. 'घोडा' किंवा 'गाडी' या शब्दांपैकी प्रत्येक शब्दानें थोडाबहुत अर्थबोध होतो, यांत संशय नाहीं. एका मनुष्यानें दुसऱ्या मनुष्यापुढें 'घोडा' हा शब्द उच्चारिल्यास, पहिला मनुष्य अमक्या जनावराचें नांव घेत आहे, असें दुसऱ्या मनुष्यास कळेल; पण त्या घोड्याविषयीं त्याच्या मनांत काय म्हणावयाचें आहे, याचें ज्ञान त्याला बिलकुल होणार नाहीं. 'घोडा' हा शब्द उच्चारल्यावर त्यानें 'रस्ता' असा दुसरा शब्द जरी उच्चारिला, तरी देखील 'घोड्या'विषयीं आपल्या मनांतील कोणताही विचार त्यानें दुसऱ्यास कळविला असें होत नाहीं. भेद इतकाच कीं, प्रथम तो एका वस्तूचें नांव घेत होता, आतां दोन वस्तूंचीं घेऊं लागला. याच रीतीनें त्यानें कितीही वस्तूंची नांवें घेतलीं तरी त्याच्या शेजाऱ्यास त्यांपासून कांहींएक समजणार नाहीं. तो त्याला असें म्हणेल कीं "घोडा घोडा, काय करतोस? त्या घोड्याविषयीं तुझ्या मनांत काय म्हणावयाचें आहे, तें सांगशील कीं नाहीं? वेड्याप्रमाणें एकापुढें एक कांहीतरी शब्द म्हणत राहशील तर मी त्यांच्यापासून काय समजूं?" दुसऱ्या मनुष्याचें हें बोलणें ऐकून पहिला मनुष्य जर असें म्हणाला, कीं "घोडा पळाला," तर त्यानें वाक्य उच्चारिलें असें होईल, व दुसऱ्या मनुष्यास त्यापासून लागलीच त्याच्या बोलण्याचा भावार्थ समजेल. "घोडा पळाला" अशा प्रकारच्या

शब्दांच्या वाक्यांतील पहिल्या शब्दास व्याकरणांत **नाम** असें म्हणतात; व दुसऱ्या शब्दास **क्रियापद**, असें म्हणतात. यावरून हें दिसून येईल कीं वाक्य होण्यास निदान दोन शब्द तरी असून त्यांपैकीं एक नाम किंवा नामार्थक असला पाहिजे, व दुसरा क्रियापद किंवा क्रियापदार्थक असला पाहिजे. असले दोन शब्द असल्याशिवाय वाक्य व्हावयाचें नाहीं. याच शब्दांस वाक्यमीमांसेंत **उद्देश्य** आणि **विधेय** असें म्हणतात. वाक्यमीमांसा म्हणजे वाक्याच्या अर्थाचें व्याकरण. याहून या संज्ञेची अधिक फोड पुढें करण्यांत येईल. वाक्यांत ज्या वस्तूविषयीं कांहींतरी सांगितलेलें असतें, व जी नाम किंवा नामार्थक असते, तिला **उद्देश्य** अशी पारिभाषिक संज्ञा आहे; तसेंच वाक्यांत ज्या शब्दानें कांहींतरी सांगितलेलें असतें, व जो क्रियापद किंवा क्रियापदार्थक असतो, त्याला विधेय अशी पारिभाषिक संज्ञा दिली आहे. यावरून वाक्यांत दोनच शब्द असले तर त्यांपैकीं एक **उद्देश्य** आणि दुसरा **विधेय** या सदराखालीं आलाच पाहिजे. पण वाक्यांत दोनच शब्द असतात, किंवा असावे, असा मुळींच नियम नाहीं. किंबहुना नित्याच्या बोलण्यांत व लिहिण्यांत आपण ज्या वाक्यांचा उपयोग करतों, त्यांत बहुशः दोहोंपेक्षां अधिक शब्द असतात. शिवाय, आपल्या मनांतील प्रत्येक विचार दोन शब्दांच्या वाक्यांनींच व्यक्त करण्याचा प्रयत्न केला तर बोलणें व लिहिणें फार वाढेल, सगळा अर्थ समजावून देण्यासाठीं दोन शब्दांचीं हवीं तशीं वाक्यें रचण्यांत फार त्रास पडेल, व इतकें करूनही कधीं कधीं अर्थांत दुर्बोधता आल्याशिवाय राहणार नाहीं. म्हणून वाक्यांत दोहोंपेक्षां अधिक शब्द योजण्याचा प्रघात पडला आहे, व तो अगदीं स्वाभाविक आहे.

'घोडा पळाला' या वाक्यानें अमुक प्रकारच्या जनावरानें अमुक प्रकारची क्रिया केली, येवढाच बोध होतो. याच वाक्यांत 'घोड्या'च्या मागें 'काळा,' आणि 'पळाला'च्या मागें 'भरधांव' असे दोन शब्द अनुक्रमें घालून वाक्य केलें, तर त्यापासून 'घोडा पळाला' या दोन शब्दांच्या वाक्यापेक्षां पुष्कळ अर्थबोध होणार आहे. 'काळा घोडा भरधांव पळाला' या चार शब्दांच्या वाक्यांत नवीन आलेले दोन शब्द जे 'काळा' आणि 'भरधांव' यांस व्याकरणांत अनुक्रमें **विशेषण** आणि **क्रियाविशेषण** म्हणतात. 'काळा' शब्दानें घोड्याचा रंग म्हणजे एका प्रकारचा गुण व्यक्त होतो व 'भरधांव' या शब्दानें त्याच्या पळण्याच्या रीतीचें वर्णन होतें. पहिल्या शब्दानें 'घोडा' या नामाचा गुण दाखविला जातो म्हणून त्यास विशेषण म्हणतात, व दुसऱ्यानें 'पळाला' या क्रियेचा गुण दाखविला जातो म्हणून त्यास क्रियाविशेषण म्हणतात. वाक्यमीमांसेप्रमाणें या चारही शब्दांस वर सांगितलेल्या दोन सदरांत आणितां येतें. कारण त्या मीमांसेप्रमाणें

कोणतीही वस्तु एका शब्दानें वर्णिली असो, किंवा एकाहून अधिक शब्दांनीं वर्णिली असो, जोंपर्यंत अशा शब्दसमूहापासून एका वस्तूहून अधिक वस्तूंचा बोध होत नाहीं, तोंपर्यंत त्या सर्व शब्दसमूहास **उद्देश्य** म्हणण्यास हरजत नाहीं. तसेंच जोंपर्यंत वर्णन करणाऱ्या शब्दसमूहापासून एका क्रियेहून अधिक क्रियांचा बोध होऊं शकत नाहीं तोंपर्यंत त्या सर्व शब्दसमूहास **विधेय** म्हणण्यास हरकत नाहीं. या दृष्टीनें पाहतां 'काळा घोडा भरधांव पळाला' या वाक्यांत 'काळा घोडा', हे दोन शब्द उद्देश्य होतात, व 'भरधांव पळाला' हे दोन शब्द विधेय होतात. 'गाय दूध देते' या वाक्यांत 'गाय' हें **उद्देश्य** आणि 'दूध देते' हें **विधेय** होय. 'दूध' या शब्दास व्याकरणांत 'देते' या क्रियापदाचें कर्म म्हणतात. कर्में नेहमीं नामें किंवा नामार्थक शब्द असतात. त्यामुळें कर्तृस्थानीं किंवा **उद्देश्यस्थानीं** येणाऱ्या नामांप्रमाणें यांचाही विशेषणांनींच विस्तार होतो. याच रीतीनें कोणत्याही वाक्यांत अशाच प्रकारचे कितीही शब्द आले तरी त्या सर्वांची **उद्देश्य** आणि **विधेय** या दोन सदरांखालीं वांटणी करून देतां येईल. वाक्य-मीमांसेंत **उद्देश्य** आणि **विधेय** येवढ्या दोनच संज्ञा आहेत, असें नाहीं. आणखी पुष्कळ आहेत. पण त्या येथें सांगण्याचा प्रयत्न केल्यास विषयविवेचनांत गोंधळ होण्याचा संभव आहे. सबब येथें येवढेंच सांगतों की वाक्यांत वर्णित वस्तु जोंपर्यंत एकच आहे, व वर्णित क्रियाही एकच आहे, तोंपर्यंत दुसरे कितीही शब्द आले आले तरी त्या सर्वांस त्यांच्या अर्थाच्या अनुरोधानें **उद्देश्याच्या** किंवा **विधेयाच्या** डब्यांत अडकवून टाकितां येईल! अशा तऱ्हेनें वाक्यांतील शब्दांची जी व्यवस्था लावणें तिला वाक्यमीमांसक, म्हणजे वाक्यांच्या अर्थाचें विवेचन करणारे लोक, **वाक्यपृथक्करण** म्हणतात.

"काळा घोडा भरधांव पळाला" या वाक्यांतील चार शब्द व्याकरण-कारांनीं केलेल्या शब्दांच्या मुख्य वर्गांपैकीं किंवा जातींपैकीं 'नाम', 'क्रियापद', 'विशेषण' व 'क्रियाविशेषण' या चार जातींचे व्यंजक आहेत. पुनः एकदां याच चतुःशब्दात्मक वाक्याचा अर्थ आणखी थोडासा वाढविण्याच्या उद्देशानें त्यास 'पुलावर' असा शब्द जोडूं. या संयुक्त शब्दांत 'पूल' व 'वर' असे पृथक शब्द आहेत. पहिला शब्द वस्तुव्यंजक असून नाम आहे. दुसरा नामाशीं आपला योग करून घेऊन उभयतांच्या निकट सान्निध्यानें क्रियाविशेषण उत्पन्न करणारा शब्द आहे. याला वैय्याकरण "शब्दयोगी" अव्यय म्हणतात; कारण हा स्वतः एखाद्या नामार्थक शब्दावर अवलंबून असतो इतकेंच नाहीं, तर ज्या नामास तो चिकटलेला असतो, त्या नामाचा संबंध तो वाक्यांतील क्रियेकडे लावून देतो. नामशब्दांशीं किंवा नामार्थक शब्दांशीं आपला योग करून घेऊन

क्रियाविशेषणें उत्पन्न करावीं, हें भाषेंतील शब्दयोगी अव्ययांचें काम आहे. नामांशी त्यांचा योग झाल्याशिवाय त्यांच्या अंगीं अर्थदर्शकता येत नाहीं; व तो झाला असतां त्या उभयतांच्या संयोगापासून जो अर्थ निष्पन्न होत असतो, तो वाक्यांतील क्रियेचा कांहीं तरी गुण, प्रकार किंवा रीति दाखवीत असतो. 'काळा घोडा पुलावर भरधांव पळाला' या वाक्यांत 'पुलावर' या शब्दसंयोगानें 'पळाला' या क्रियेचें स्थान दाखविलें जात आहे; म्हणून 'पुलावर' या शब्द-संयोगास स्थलवाचक क्रियाविशेषण म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां याच काळ्या घोड्याविषयीं आणखी एक नवीन गोष्ट सांगण्याच्या हेतूनें असें म्हणूं कीं "काळा घोडा पुलावर भरधांव पळाला, पण तो धरला." (असलें वाक्य बुद्धया घेतलें आहे, हें सांगावयास नकोच). या नवीन तीन शब्दांपैकीं पहिले दोन वर वर्णिलेल्या शब्दवर्गांत आलेले नाहीत. तिसरा मात्र आला आहे. तो क्रियापद आहे. पहिल्या दोहोंस व्याकरणकार अनुक्रमें **उभयान्वयी अव्यय** व **सर्वनाम** असें म्हणतात. पहिल्यास '**उभयान्वयी** अव्यय' म्हणण्याचें कारण असें आहे कीं, त्याच्या योगानें पहिल्या वाक्याचा आणि दुसऱ्या वाक्याचा अन्वय होतो. शब्दयोगी अव्ययांचा शब्दाशीं संयोग होऊन त्यापासून क्रिया-विशेषणें उत्पन्न होतात. **उभयान्वयी** अव्ययांच्या योगानें तशा प्रकारचा अर्थ उत्पन्न होत नाहीं. दोन वाक्यामध्यें ती आलीं असतां, तीं वाक्यें एकत्र घ्यावयाचीं, व त्यांचा परस्परांशीं थोडासा संबंध आहे, इतकाच बोध होतो. 'उभयान्वयी' अव्ययें' वाक्यें जोडणारे शब्द आहेत असें म्हटलें, यावरून तीं नुसते शब्द कधींच जोडीत नाहींत, असें समजूं नये. कधीं कधीं तीं समान शब्दही एकमेकांशीं जोडून देतात. तथापि त्यांचें मुख्य काम वाक्यें जोडणें हें आहे. कित्येक व्याकरणकारांचा असा आग्रह आहे कीं, उभयान्वयी अव्ययें नेहमीं वाक्येंच जोडतात; शब्द कधींही जोडीत नाहीत. पण हें मत सर्वांशीं ग्राह्य धरतां येत नाहीं. कांहीं स्थळीं उभयान्वयी अव्ययांनीं फक्त शब्दच जोडले आहेत, असें कबूल करणें भाग पडतें. तथापि या मतभेदाविषयीं विशेष खुलासा येथें करीत बसणें अप्रासंगिक होणार आहे. म्हणून या ठिकाणीं येवढेंच सांगतों कीं, उभयान्वयी अव्ययें दोन अथवा अधिक शब्द किंवा वाक्यें जोडणारे शब्द आहेत. शब्दयोगी अव्ययाप्रमाणें हीं स्वतंत्रपणें योजितां येत नाहींत, किंवा योजिली असतां त्यांपासून अर्थनिष्पत्ति होत नाहीं. त्यापासून अर्थ उत्पन्न होण्यास तीं शब्दान्वय किंवा वाक्यान्वय करीत असलीं पाहिजेत. आतां दुसरा अपरिचित शब्द जो 'तो', त्याविषयीं थोडें विवेचन करावयाचें. या व असल्या इतर शब्दांस "**सर्वनाम**" म्हणतात, हें वर

सांगितलेंच आहे, सर्वनामांनीं नामांचीं बहुतेक कामें होतात, व नामांस होणारे बहुतेक बिकार यांना होतात. नामांत आणि यांत मुख्य भेद असा आहे कीं, नामें प्रत्यक्ष वस्तूंची नावें असतात; सर्वनामें प्रत्यक्ष वस्तूंची नावें नसतात. ज्यावेळेस हीं नामाच्या जागीं योजिलेलीं असतात, त्या वेळेसच ही अर्थबोधक होतात. त्यांच्यापासून अर्थ होण्यास ज्या नामांच्या जागीं हीं योजावयाचीं असतील, त्यांचा एक वेळ तरी स्पष्ट उल्लेख करावा लागतो. ज्या नामांच्या जागीं ही योजिली जातात, तीं नामें बहुश: यांच्या अगोदर कोठें तरी येऊन गेलेली असतात. पण प्रत्येक ठिकाणीं असें झालेंच पाहिजे असें नाहीं. कित्येक ठिकाणी 'सर्वनाम' आधीं येऊन ज्या नामाच्या ऐवजीं तें योजिलेलें असतें तें नाम त्याच्या मागून येतें, पण जोंपर्यंत त्या नामाचा स्पष्ट उल्लेख झाला नाहीं, तोंपर्यंत त्या सर्वनामापासून वाचणारास किंवा ऐकणारास कांहीं एक अर्थबोध होत नाहीं. तें नाम ऐकिलें किंवा वाचलें, कीं, तत्काळ मागल्या सर्वनामावर प्रकाश पडून तें सार्थ होतें. मागेंपुढें कांहीं एक न सांगतां, 'त्याला पुष्कळ किंमत पडली' असें जर कोणी म्हणत राहिला, तर त्यापासून कोणालाही कोणत्याही प्रकारचा स्पष्ट अर्थ समजणार नाहीं. बुचकळ्यांत पडलेला वाचक किंवा श्रोता, लिहिणारास किंवा बोलणारास असा प्रश्न करील कीं, "तू 'त्याला त्याला' म्हणून फिरून फिरून म्हणतो आहेस, पण हें कोणाविषयीं म्हणतो आहेस ?" त्यावर 'त्याला पुष्कळ किंमत पडली' हें वाक्य योजणारानें जर असें म्हटलें कीं, "साहेबानीं उत्तम घोडा घेतला, पण त्याला पुष्कळ किंमत पडली" तर संशयग्रस्त वाचकांची आणि श्रोत्यांची संशयनिवृत्ति होऊन 'त्याला' म्हणजे 'घोड्याला' असें त्यांना समजून येईल. तेव्हां हें उघड झालें कीं, खुद्द सर्वनामांस नामांप्रमाणें अर्थ नाहीं. पुढें किंवा मागें सांगितलेल्या नामांच्या ऐवजीं जेव्हां त्यांचा उपयोग केलेला असतो, तेव्हांच तीं अर्थवाहक होतात. ज्या नामाबद्दल सर्वनाम योजावयाचें, तें नाम त्या सर्वनामाच्या अगोदर येऊन गेलें असल्यास, त्या नामाशीं त्याचा जो संबंध असतो त्यास 'पूर्वसंबंध' म्हणतात; पण तेंच नाम त्याच्या मागून आलें असल्यास त्याच्याशीं त्याचा जो संबंध असतो, त्यास 'उत्तरसंबंध' म्हणतात. सर्वनामांच्या या पूर्वोत्तरसंबंधांविषयीं पुढें आणखी लिहावें लागेल, म्हणून येथें इतकेंच पुरें करतों.

"काळा घोडा पुलावर भरधांव पळाला, पण तो धरला" या दोन स्वल्प वाक्यांच्यासंबंधानें येथवर जें विवेचन केलें आहे, त्यांवरून व्याकरणांत दिलेल्या शब्दांच्या मुख्य सात जाती कशा होतात, हे सूज्ञ वाचकांच्या लक्षांत आलें असेल. कोणत्याही बाह्येंद्रियानें किंवा मनानें बोध होणाऱ्या वस्तूचें जें नांव त्यास

व्याकरणांत 'नाम' म्हणतात. अशा वस्तूविषयीं कांहीं सांगावयाचें असल्यास, अथवा वाक्यमीमांसक म्हणतात त्या प्रमाणें 'विधान' करावयाचें असल्यास, ज्या शब्दाची योजना करतात, त्यास 'क्रियापद' असें म्हणतात. असल्या दोन शब्दांशिवाय कोणत्याही वस्तूविषयीं पूर्ण अर्थ व्यक्त करितां येत नाहीं. वाक्यास निदान असले दोन शब्द लागतात. दोन शब्दांच्या वाक्यांस पाहिजे तर 'नग्न' किंवा 'कृश' वाक्यें म्हणतां येईल. या द्विशब्दात्मक नग्न वाक्यावर विशेषणादि शब्दांचीं वस्त्रें घालून त्यास सुशोभित करतां येतें! अथवा या दोन शब्दांच्या वाक्यास वाक्याचा 'सांगाडा' अशी संज्ञा घाल तर विशेषणादि शब्द मांसस्थानीं त्यांत बसवून देऊन त्यास गोंडसपणा आणतां येतो, असेंही म्हटल्यास हरकत नाहीं! नामांचा कांहीं तरी गुण दाखवून त्यांचा अर्थ वाढवावा, व त्यांची व्याप्ति मर्यादित करावी, हें विशेषणाचें काम होय. 'घोडा' या शब्दापेक्षां 'काळा घोडा' या दोन शब्दांच्या संयोगांत अधिक अर्थ आहे खरा, पण जितक्या वस्तूंस 'घोडा' ही संज्ञा लावितां येईल, तितक्या वस्तूंस 'काळा घोडा' ही संज्ञा लावितां येणार नाहीं. म्हणून 'काळा' शब्दासारख्या विशेषणार्थक शब्दांनीं नामांच्या अर्थाचा विस्तार होतो, पण त्यांची व्याप्ति मर्यादित होते, असें व्याकरणकार मानितात. 'त्वरित', 'जलद', 'भरधांव' यासारख्या स्वतंत्र शब्दांनीं किंवा 'पुलावर' यासारख्या, 'नामें' आणि 'शब्दयोगी अव्ययें' यांच्या संयोगापासून झालेल्या, शब्दांनीं क्रियेच्या विवक्षित प्रकारादिकांचा बोध होतो, म्हणून त्यांस 'क्रियाविशेषणें' ही परिभाषिक संज्ञा दिली आहे. 'साटीं, स्तव, बद्दल, वर' इत्यादि शब्दांस ज्या वेळेस दुसऱ्या शब्दांच्या निकट सान्निध्यानेंच अर्थ उत्पन्न होतो, त्या वेळेस त्यांना शब्दयोगी अव्ययें म्हणण्याची रीति पडली आहे, व ती योग्य आहे. तसेंच, दोन शब्द किंवा वाक्यें जोडण्यासाठीं लाविलेल्या शब्दांस 'उभयान्वयी अव्ययें,' व नामांची पुनरुक्ति टाळण्यासाठीं त्यांच्या जागीं योजण्यांत येणाऱ्या शब्दांस 'सर्वनाम,' अशा वैय्याकरणांनीं ज्या संज्ञा दिल्या आहेत, त्याही बऱ्याच अन्वर्थक आहेत, इतकेंच नाहीं, तर त्या संज्ञांच्या योगानें भाषेंतील शब्दांचें अर्थानुरोधानें केलेलें वर्गीकरण स्पष्ट करतां येत आहे.

या विवेचनावरून असें दिसून आलें कीं, 'नाम', 'सर्वनाम', 'विशेषण', 'क्रियापद', 'क्रियाविशेषण', 'शब्दयोगी अव्यय' व 'उभयान्वयी अव्यय' हे वैय्याकरणांनीं शब्दांचे जे मुख्य सात वर्ग केले आहेत, ते कांहीं तरी अनुमानधक्कयानें केलेले नाहींत. भाषेंत त्या त्या अर्थाच्या शब्दांची अवश्यकता पडत असल्यामुळें सर्व सुधारलेल्या भाषांत त्यांची उत्पत्ति आपोआप झाली आहे. ते व्याकरणकारांनीं केलेले नाहींत . त्यांनीं जें काय केलें तें हेंच कीं, त्यांची उत्पत्ति

होऊन ते सर्वत्र उपयोगांत येऊं लागल्यावर त्यांचें त्यांनीं मनन केलें, व त्यांकडून होत असलेलीं कामें व त्यांचा अर्थ या दोहोंच्या अनुरोधानें त्यांनीं त्यांच्या जाती किंवा वर्ग कल्पून त्यांस पारिभाषिक नांवें दिलीं. हीं पारिभाषिक नांवें ठाऊक असोत किंवा नसोत. सुधारलेली भाषा बोलणारा प्रत्येक इसम प्रत्येक दिवशीं अनेकशः असल्या शब्दांचा बोलण्यांत व लिहिण्यांत उपयोग करीत असतो.

या सात वर्गांशिवाय 'उद्‌गारवाची' अथवा 'केवलप्रयोगी' अव्ययें म्हणून शब्दांचा आणखी एक आठवा वर्ग कल्पिला आहे. या वर्गांत सुखदुःखादि उद्‌गार प्रकट करणारे जे विसंगत शब्द बोलण्यांत किंवा लिहिण्यांत घालण्याची चाल पडली आहे, त्यांचा समावेश होतो. या शब्दांस व्याकरणांत फारसें महत्त्व देण्याचा प्रघात नाहीं. कारण एक तर हे क्वचित् प्रसंगीं येतात; दुसरें, कांहीं तरी विधान करणें हें जें वाक्याचें मुख्य काम, त्यास यांच्या योगानें म्हणण्यासारखी मदत होत नाहीं. या उद्‌गारवाची अव्ययांत मुळींच अर्थ नसतो असें नाहीं. त्यांचा बारकाईनें विचार केला तर त्यांपैकीं प्रत्यकास समग्र वाक्याचा अर्थ असतो असें दिसून येईल. 'अरेरे!' हा शब्द उच्चारिला असतां 'ही गोष्ट ऐकल्यानें मला दुःख होतें' अशा अर्थाचा बोध होतो; "वाहवा! शाबास! खाशी!" इत्यादि शब्दांनीं आनंदादि वृत्ति व्यक्त होतात; व याचप्रमाणें इतर केवलप्रयोगी अव्ययांचा अर्थ करून दाखवितां येईल. तथापि ज्याअर्थीं यांचा उच्चार आकस्मिक होत असतो, म्हणजे हें उच्चारण्यापूर्वीं मनाला विचार करण्यास सवड नसते, त्याअर्थीं—भय, आश्चर्य, किंवा अशाच प्रकारचा दुसरा एखादा मनोविकार—एकाएकीं उत्पन्न करणाऱ्या कारणांनीं शरीरावर जे परिणाम होतात, त्यांसारखेच या अव्ययांस गणतात. यांच्या योगानें विशेष प्रसंगीं मनाची जी स्थिति झाली असेल तिचा समजण्यासारखा ध्वनि मात्र होतो—कोणत्याही प्रकारचें स्पष्ट विधान होत नाहीं; म्हणून **वाक्यमीमांसेंत** यांचा एकवार उल्लेख करण्यापलीकडे यांविषयीं विशेष चर्चा करीत बसण्याचें प्रयोजन नाहीं, व शब्दवर्गांत यांचा समावेश करण्याची अवश्यकता नाहीं.

केवलप्रयोगी अव्ययांशिवाय शब्दांच्या सात जाती होतात, असें वर सांगितलें आहे. कित्येक व्याकरणकार शब्दाच्या सात जाती न मानतां त्यांच्या दोन किंवा तीन जाती कल्पून बाकीच्यांचा त्यांखालीं अंतर्भाव करितात. मराठी भाषेचे आदिव्याकरणकार कै० दादोबा पांडुरंग यांनीं आपल्या व्याकरणाच्या जुन्या आवृत्तींत असेंच केलें होतें. कै० कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या 'निबंधांत', व कै० कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं आपल्या व्याकरणांतही कांहीं

अंशीं ह्याच मार्ग अवलंबिला आहे. कांहीं इंग्रजी व्याकरणकारही हीच पद्धति अनुसरतात, व व्याकरणाच्या पुस्तकांत असें करण्याबद्दल सबळ कारणेंही दाखवितां येतील. पण **वाक्यमीमांसेत** तसें करण्याची गरज नाहीं इतकेंच नाहीं, तर तसें करूं गेलें असतां शब्दांच्या मुख्य जाती व पोटजाती दाखविण्यासाठीं योजलेल्या सांकेतिक पारिभाषिक संज्ञांची निष्कारण गर्दी होते, व त्यांचा अर्थ समजून घेण्याचे कष्ट वाचकास निरर्थक पडतात. **वाक्यमीमांसा** सुगम करण्यास त्या संज्ञा येथें सांगणें जरूर वाटलें तर तसेंही केलें असतें; पण ज्याअर्थी प्रस्तुत विषयाचा वाक्याच्या अर्थाशीं विशेष संबंध आहे, त्याअर्थी त्याचें विवेचन करून तदनुरोधानें शब्दांच्या किती जाती होतात हें पहाणें विशेष अगत्याचें आहे, व तसें केलें असतां वाक्यांत येणाऱ्या शब्दांचे सात वर्ग करणें भाग पडतें, हें खालीं दिलेल्या संक्षिप्त वर्गानुक्रमावरून दिसून येईल.

१. बाह्येंद्रियांनीं किंवा मनानें ज्ञेय अशा वस्तूंचीं नांवें. **नामें.**
२. असल्या वस्तूंविषयीं बिधान करणारे मुख्य शब्द. **क्रियापदें.**
३. पहिल्या वर्गातील शब्दांचा अर्थ वाढवून त्यांची व्याप्ति मर्यादित करणारे शब्द. **विशेषणें.**
४. दुसऱ्या वर्गातील शब्दांचा अर्थ वाढवन त्यांची व्याप्ति मर्यादित करणारे शब्द. **क्रियाविशेषणें.**
५. पहिल्या वर्गातील शब्दांच्या जागीं येणारे स्वतंत्रार्थशून्य शब्द. **सर्वनामें.**
६. नामार्थक शब्दांशी योग करून घेऊन क्रियाविशेषणाचा अर्थ उत्पन्न करणारे व त्या नामांचा क्रियापदाशीं अन्वय लावून देणारे शब्द. **शब्दयोगी अव्ययें**
७. दोन शब्द किंवा दोन वाक्यें. जोडणारे शब्द. **उभयान्वयी अव्ययें.**

पुनरुक्तीबद्दल येणारा दोष घेण्यास तयार होऊन वर जो वर्गानुक्रम दिला आहे तो पाहिल्यावर, त्यांत दिलेल्या शब्दजाति अगदीं पृथक् आहेत, हें सूज्ञ वाचकांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. पाहिजे तेवढी हातचलाखी केली तरी या सात जातींपैकीं कोणत्याही जातींत पडणारा शब्द त्याच अर्थानें दुसऱ्या कोणत्याही जातींत घालतां येणार नाहीं; तसेंच, ज्याला या सात जातीं-पैकीं एका जातींत घालतां येणार नाहीं असाही शब्द भाषेंत सांपडावयाचा नाहीं. यावरून हा सप्तसंख्यात्मक जातिविभाग अवश्यक आहे व पूर्णही आहे, असें मानिलें पाहिजे.



# वाक्यमीमांसा

## भाग पहिला

---

### वाक्याविषयीं विशेष विचार

उपोद्घातांत असें सांगितलें आहे कीं, वाक्यास एक नाम किंवा नामार्थक **शब्द**, व एक क्रियापद किंवा क्रियापदार्थक शब्द–असे निदान दोन शब्द तरी पाहिजेत; त्याशिवाय वाक्य व्हावयाचें नाहीं. यावर कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं वाक्यास दोन शब्दांची अवश्यकता नाहीं; एका शब्दानें सुद्धां वाक्य होऊं शकेल. उदाहरणार्थ 'सांजावलें', 'उजाडलें' इत्यादि शब्द या व अशाच प्रकारच्या इतर शब्दांपैकीं प्रत्येक शब्दापासून निराळा वाक्यार्थ निष्पन्न होतो, सबब वाक्यास दोनच शब्द पाहिजेत, एका शब्दानें वाक्य होत नाहीं, असा आग्रह धरणें बरोबर नाहीं, असे कांहीं विद्वानांचें मत आहे; व याच मतास अनसरून कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या **निबंधांत** 'उजाडलें,' 'सांजावलें' इत्यादि क्रियापदांस भावकर्तृक क्रियापदें न म्हणतां, अकर्तृक क्रियापदें म्हणावें, असें सुचविलें आहे. या गोष्टीचा शांतपणें विचार करितां असें दिसून येईल कीं, एका दृष्टीनें कै. विद्वानाचें वरील मत सयुक्तिक आहे, व दुसऱ्या दृष्टीनें तसें नाहीं. 'उजाडलें' या शब्दांतच 'उजाडणें' या भावाचा अंतर्भाव होतो, तेव्हां तो भाव निराळा कल्पून त्याची कर्तृपदीं योजना करणें, व 'उजाडणें उजाडलें' 'मळमळणें मळमळलें' असले विलक्षण प्रयोग करणें, यापेक्षां असल्या प्रयोगांस अकर्तृक क्रियापदें म्हणावें, हें मत सयुक्तिक नाहीं, असें कोण म्हणेल? 'उजाडलें' या शब्दांतच 'उजाडणें झालें', किंवा 'उजेड झाला', 'दिशा प्रकाशित झाल्या', असा अर्थ असतां, कर्त्यासाठीं आणखी एक 'उजाडणें' अध्याहृत घेऊन एका प्रकारची हास्योत्पादक द्विरुक्ति उत्पन्न करण्यांत काय फायदा आहे? कांहीं क्रियापदें अकर्तृक असतात, असें म्हटलें म्हणून काय झालें? यावर आमचें असें उत्तर आहे कीं, कांहीं क्रियापदें अकर्तृक असतात, असें मानण्यास आमची बिलकुल हरकत नाहीं. पण तीं क्रिया-

पदें दिल्यानें वाक्यें होतात, हें मात्र कबूल करतां येणार नाहीं. कारण, कोणत्याही क्रियापदार्थक शब्दांत कितीही अर्थ आला तरी तो एकच शब्द आहे, हें विसरतां कामा नये, व हें न विसरण्यांत पुष्कळ मुद्दा आहे. वाक्य हें मनांतील विचाराचें बाह्य स्वरूप आहे. विचारांत नेहमीं दोन पृथक् कल्पनांचें सादृश्य किंवा असादृश्य पहाण्यांत मन गुंतलेलें असतें. दोन पृथक् कल्पनांशियाय विचार नाहीं, व वाक्यांत या दोन कल्पनांचे प्रतिनिधिरूप दोन शब्द असल्याशिवाय वाक्याच्या अस्तित्वाची कल्पना मुळीच करतां येत नाहीं. आतां येवढें खरें आहे कीं, भाषेंत दोनही शब्द उक्तच असण्याची आवश्यकता नाहीं; दोहोंपैकीं एक उक्त व दुसरा अनुक्त असला तरी चालतो. पण भाषासंप्रदायाप्रमाणें एक शब्द अनुक्त असतांही वाक्यार्थाचा उद्बोध होतो, म्हणून एका शब्दानें वाक्य करितां येईल, हें म्हणणें मात्र बरोबर नाहीं. वाक्य हें जर विचाराचें बाह्यांग आहे, व मनापुढें दोन पृथक् कल्पना उभ्या असल्याशिवाय विचार चालत नाहीं, हें खरें आहे, तर दोन शब्दांशिवाय वाक्य होऊं शकेल, हें म्हणणें व्यर्थ आहे. जे कोणी आग्रहानें असें म्हणत असतील त्यांना 'वाक्य' आणि 'शब्द' यांतील भेदच समजत नाहीं, असें म्हणावें लागेल. कांहीं तरी अर्थाचा बोध करून देणें, हें शब्दाचें काम होय; कांहीं तरी विधान करणें हें वाक्याचें काम होय. वाक्यांत कशा-विषयीं कांहीं तरी सांगितलेलें असतें. तेव्हां ज्याविषयीं कांहीं सांगावयाचें असेल तद्दर्शक, व जें सांगावयाचें असेल तद्दर्शक—असे दोन शब्द असल्याशिवाय वाक्याची कल्पनाच होत नाहीं. शब्द म्हणजे अर्थाचा गठ्ठा होय; वाक्य म्हणजे दोन कल्पनांची पडशी किंवा दोन शब्दांच्या गठ्ठयांची माकण होय. एका गठ्ठयांत कितीही तागे असले तरी त्याला एकच गठ्ठा म्हटलें पाहिजे, त्याप्रमाणें एका शब्दांत कितीही अर्थ आला तरी त्याला एकच शब्द म्हटला पाहिजे. तसेंच, पडशीच्या प्रत्येक पाख्यांत एकेकच जरी वस्तू आली तरी तीं दोन पाखीं अगदीं निराळीं असून मधल्या भागाशीं जोडलेलीं असल्यामुळें त्यांस पडशीच म्हटलें पाहिजे. 'माती', 'वीट', 'भिंत', 'इमारत', 'देवालय', 'त्र्यंबकालय' या शब्दमालिकेंतील प्रत्येक शब्दांत मागल्या सर्व शब्दांचा अर्थ अंतर्भूत असून शिवाय विशेष अर्थ आहे. तरी यांपैकीं कोणत्याही शब्दापासून वाक्यार्थाचा बोध होतो, असें कदापि म्हणतां येणार नाहीं. वाक्यांत कधीं 'उद्देश्य' व कधीं 'विधेय' अनुक्त असतें, हें खरें आहे; व उक्त उद्देश्यापासून अनुक्त विधेयाचा, व उक्त विधेयापासून अनुक्त उद्देश्याचा बोध होतो, हेंही खरें आहे; तथापि येवढ्यावरून वाक्यास दोन शब्दांची अपेक्षा नाहीं, असें म्हणतां येणार नाहीं. पुष्कळदां विधेयार्थांत उद्देश्यार्थ इतका येऊन गेलेला असतो कीं, उद्देश्याच्या

जागीं कोणता शब्द घालावा, याचा निश्चय करण्याची मोठी पंचाईत पडते, व याच पंचायतीमुळें अशा प्रकारच्या विधेयांस किंवा क्रियापदांस अकर्तृक क्रियापदें म्हणावें, असा कै. कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं अभिप्राय दिला असावा असें वाटतें. 'उजाडलें' या क्रियापदास उजाडणें हा कर्ता किंवा **उद्देश्य** मानणें हें विचित्र वाटतें यांत संशय नाहीं; पण तरुण मुलांच्या समजुतीसाठीं अशाच प्रकारचा कांहीं तरी सुबोध शब्द कर्तृस्थानीं घेतला पाहिजे, हें तरुण शिष्यांच्या मनावर बिंबविलेंच पाहिजे. ही अडचण मराठी भाषेंतच आहे असें नाहीं. इतर भाषांतही ती आहे. इंग्रजींत 'It dawned' किंवा 'It rains' या वाक्यांत 'It' (इट्) हें सर्वनाम कोणत्या नामाच्या किंवा नामसूचित वस्तूच्या जागीं घातलें आहे असा प्रश्न घातला तर समाधानकारक उत्तर देतां येईल काय? 'Dawned' (डॉन्ड)शब्दांतच 'उजाडलें' हा अर्थ येऊन जातो, व त्याप्रमाणेंच 'Rains' (रेन्स) शब्दांत 'पाऊस पडतो' हा अर्थ येऊन जातो; 'It' (इट) शब्दानें कोणत्याही विवक्षित अर्थाचा बोध होत नाहीं; म्हणून इंग्रजी वैय्याकरणांनीं या सर्वनामांस जेव्हां अशी स्थिति असेल त्या वेळेस 'अनिश्चित' सर्वनाम (Indefinite Pronoun) म्हणावयाचें असें ठरविलें आहे. इंग्रजी भाषासंप्रदायाप्रमाणें शुद्ध विधानार्थक वाक्य कर्त्यावांचून करतां येत नसल्यामुळें, 'Dawned', (डॉन्ड) या क्रियापदामागें कर्तृस्थानीं कांहीं तरी शब्द घातलाच पाहिजे अशी अवश्यकता पडली, व त्या ठिकाणीं अनिश्चितार्थक 'It' (इट्) सर्वनाम घालण्याचा प्रघात पडला. इंग्रजींतील 'डॉन्ड' (Dawned), 'रेन्स' (Rains) वगैरे क्रियापदें तत्तदर्थदर्शक नामांवरून साधलीं असल्यामुळें, व त्याच नामांस पुनः कर्तृस्थानीं योजणें बरोबर दिसणार नाहीं असें वाटल्यामुळें, अशा प्रकारच्या वाक्यांचें कर्तृत्व 'इट्' (It) या अनिश्चित] सर्वनामाकडे आलें. 'इट्' (It) याचा अर्थ स्थूलमनानें एकंदर बाह्य 'वस्तुस्थिति' किंवा 'सृष्टि-व्यापार' असा केला पाहिजे; दुसरा इलाज नाहीं. लहान मुलांस 'वस्तुस्थिति' किंवा 'सृष्टिव्यापार' असल्या बिकट शब्दांचा अर्थ समजावून देणें कठिण आहे. म्हणून मराठी वैय्याकरणांनीं 'उजाडलें', 'सांजावलें' इत्यादि क्रियापदांस 'उजाडणें', 'सांजावणें' इत्यादि त्या त्या क्रियेचे भावदर्शक शब्द कर्ते घ्यावे म्हणून जो नियम घातला आहे, तो कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात तितका अप्रशस्त किंवा दूष्य नाहीं, असें आम्हांस वाटतें.

वाक्यास एक नामवाचक व एक क्रियापदवाचक असे दोन शब्द पाहिजेत, त्यांवाचून वाक्य होऊं शकत नाहीं, हा सिद्धांत आतां इतका दृढ होऊन गेला आहे कीं, कर्ता आणि क्रियापद किंवा उद्देश्य आणि विधेय यांच्या जागीं एकाच

अर्थाचे पर्यायशब्द आले तरी पुरे आहेत, पण निदान ते तरी आले पाहिजेत, असा अर्वाचीन नैय्यायिकांनी व वैय्याकरणांनी नियम घातला आहे. 'सूर्य तेजोमय आहे', 'कोळसा काळा असतो', 'हत्तीला सोंड असते', 'पारा एक पातळ धातू आहे', 'घोड्यास खूर असतात', 'मनुष्यास विचार करतां येतो' इत्यादि वाक्यांतील विधेयांत जो अर्थ आहे त्याचा अंतर्भाव त्या त्या वाक्याच्या उद्देश्यांत झालेला आहे. ज्याला 'कोळसा' या शब्दाचा अर्थ ठाऊक आहे, त्याला 'तो काळा असतो' हें सांगण्यानें कांहीं विशेष माहिती होते असें नाहीं. त्याप्रमाणेंच 'चौकोनास चार कोन असतात' या वाक्यापासून ज्याला 'चौकोन' या शब्दाचा अर्थ समजला आहे, त्याला कोणत्याही प्रकारचें नवीन ज्ञान प्राप्त होत नाहीं. तथापि 'चौकोनास चार कोन असतात' या शब्दसमुदायांत कांहीं एका वस्तूविषयीं कांहीं एक गोष्ट सांगितली आहे, म्हणून त्या समुदायास वाक्य म्हटलें पाहिजे. उद्देश्यांत विधेय अंतर्भूत असल्यामुळें वाक्यांस पाहिजे तर **शुद्ध शाब्दिक** वाक्यें म्हणा, पण त्यांस कसलीं तरी वाक्यें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. 'या पेट्या लोखंडाच्या केल्या आहेत', 'फटाकड्या चिनांतून येतात', 'स्पार्टन लोक स्त्रियांस पुरुषाप्रमाणें तालीमबाजी करूं देत', 'सुताप्रमाणें लोंकरीचा धागा सारखा पेटत जात नाहीं', 'कित्येक मनुष्यांना पंधरापासून पंचवीस भाषा येत असतात', इत्यादि वाक्यें 'कोळसा काळा असतो' अशा प्रकारच्या वाक्यांहून निराळ्या तऱ्हेचीं आहेत; कारण त्या त्या वाक्यांतील उद्देश्यांत विधेयांचा अर्थ अंतर्भूत झालेला नाहीं, तो अगदीं पृथक् आहे. असल्या वाक्यांस, पाहिजे तर **तात्त्विक** किंवा खरीं वाक्यें म्हणतां येईल. पण केवळ विधानदृष्टीनें 'तात्त्विक' आणि 'शाब्दिक' वाक्यांत कांहीं भेद नाहीं. उभयतांसही वाक्येंच म्हटलें पाहिजे.

वरील सर्व चर्चेवरून 'शब्द' आणि 'वाक्यें' यांतील भेद सुज्ञ वाचकांच्या लक्षांत आला असेल, व एक वस्त्वर्थक व एक विधानार्थक अशा प्रकारचे निदान दोन शब्द असल्याशिाय, किंवा त्यापैकी एखादा अनुक्त असल्यास सांगा म्हटल्यास सांगतां आल्याशिवाय, वाक्य होत नाहीं, या गोष्टीची समजूतही त्यांस चांगली पडली असेल अशी आशा आहे. 'शब्द' आणि 'वाक्य' यातील भेद, व वाक्याचें बाह्यस्वरूप यांची चांगली फोड केल्याशिवाय **वाक्यमीमांसे**चा पुढील भाग सुगम होणार नाहीं अशी भीति वाटल्यावरून यासंबंधानें इतका विस्तार करणें जरूर पडलें.

**वाक्यमीमांसे**च्या थेट मुलखांत पाय ठेवण्यापूर्वी तिच्या सीमेवरील आणखी एका वादग्रस्त प्रश्नाचा येथेंच उलगडा पाहिजे. आतांपर्यंत वाक्याविषयीं जें कांहीं लिहिण्यांत आलें आहे, त्यांत कोठें 'कर्ता', कोठें 'उद्देश्य', कोठें 'क्रियापद', व

कोठें कोठें 'विधेय', असे शब्द योजण्यांत आले आहेत. त्यावरून वाचकांचा असा गैरसमज होण्याचा संभव आहे कीं, 'कर्ता' आणि 'उद्देश्य' व 'क्रियापद' आणि 'विधेय', हे शुद्ध पर्यायशब्द आहेत. ज्याला व्याकरणांत 'कर्ता' म्हणतात त्यालाच वाक्यमीमांसेंत 'उद्देश्य' म्हणतात; व ज्याला पहिल्यांत 'क्रियापद' म्हणतात त्याला दुसऱ्यांत 'विधेय' म्हणतात. पण हा समज बरोबर नाहीं. पुष्कळ ठिकाणीं व्याकरणांत ज्याला 'कर्ता' म्हणतात तो वाक्यमीमांसेप्रमाणें त्या वाक्यांतील 'उद्देश्य' असतो; पण असा प्रकार सर्व ठिकाणीं घडतो, असें नाहीं. अनेक वाक्यांत क्रियेच्या वास्तविक कर्त्याहून वाक्याचें 'उद्देश्य' अगदीं भिन्न असतें. 'उद्देश्य' ठरवितांना वाक्यांत कोणत्या वस्तूविषयीं विधान केलें आहे, म्हणजे कोणत्या वस्तूंविषयीं काय सांगण्याचा इरादा आहे, या गोष्टीचा निर्णय फार जपून करावा लागतो. कर्त्याप्रमाणें उद्देश्याची अमूकच विभक्ति असली पाहिजे, असा प्रतिबंध नाहीं. उद्देश्याची पाहिजे ती विभक्ति असूं शकेल. संस्कृत व्याकरणांत प्रयोगप्रकरण ज्या तंत्रावर रचिलें आहे, तें तंत्र मराठी व्याकरणास लावितांना जितकी दक्षता ठेवायाला पाहिजे होती तितकी ठेवण्यांत आली नाहीं; म्हणून मराठी प्रयोगप्रकरणांत बराच घोंटाळा झाला आहे, व त्यासंबंधानें निरनिराळ्या वैय्याकरणांनीं निरनिराळीं मतें दिलीं आहेत. वाक्यद्वारें दुसऱ्यास आपल्या मनातील विचार कळवितांना निरनिराळ्या विभक्तींचा स्थूल मानानें कसा उपयोग करण्यांत येतो, याचा नीट विचार करण्यात येता, तर हा गोंधळ झाला नसता. संस्कृत व्याकरणांत हा गोंधळ नाहीं. शिवाय, उद्देश्याच्या विभक्तीविषयीं त्यांत जो नियम आहे, त्यामुळें संस्कृत वाक्यांचें पृथक्करण थेट इंग्रजी वाक्यांचे पृथक्करणाच्या धर्तीवर नेतां येण्यासारखें आहे. पण मराठी वाक्यांत दुर्दैवानें तशी सोय नाहीं. मराठी वाक्यांच्या पृथक्करणाचें बाह्य स्वरूप इंग्रजी व संस्कृत वाक्यांच्या पृथक्करणाहून थोडेंसें निराळें होतें. याचें कारण असें आहे कीं, वाक्यांत ज्या वस्तूविषयीं विधान करावयाचें असेल तिची प्रथमा विभक्ति असली पाहिजे, किंवा ती प्रथमा विभक्तींत असली पाहिजे, असा इंग्रजी व संस्कृत व्याकरणांचा नियम आहे. हा नियम स्थूलमानानें विभक्तींच्या वाक्यांतर्गत कार्यकर्तृत्वावर बसविलेला आहे. वाक्यांतील क्रियापदानें कोणत्या तरी वस्तूच्या क्रियेचा बोध होत असतो, किंवा तो करून देण्याचा उद्देश असतो; म्हणजे विचारांत ती वस्तू विशेष प्रमुख असून तिच्या संबंधानें कांहीं तरी सांगण्याचा हेतु असतो. अर्थातच कोणत्या वस्तूविषयीं काय सांगावयाचें हा निश्चय मनांत केल्यानंतर तो वाक्यद्वारें प्रकट करतांना क्रियादर्शक शब्द विचारांतील प्रमुख वस्तूच्या अनुषंगानें घालण्याचा प्रघात पडला, हें अगदीं स्वाभाविक आहे; तसेंच

ज्या वस्तुविषयीं विधान करावयाचें असेल, तिचें स्वरूपही वाक्यांतील इतर शब्दांच्या स्वरूपाहून निराळें असल्यास ठीक पडेल, असें वाटून त्या कारणासाठीं एक विभक्ति निराळी केली; या विभक्तीस 'प्रथमा' म्हणतात. संस्कृत वाक्यांत ज्या शब्दाची प्रथमा विभक्ति असते, किंवा जो प्रथमांत शब्द असतो, तो त्या वाक्यांतील क्रियापदाचा वास्तविक कर्ता असतोच असें नाहीं. त्याच्या प्रथमांतावरून येवढेंच समजावयाचें कीं, विचारात तो शब्द प्रमुख आहे, व बोलणाराच्या किंवा लिहिणाराच्या मनांत तदनुषंगानें क्रियापद योजून, त्याविषयीं कांहीं तरी विधान करण्याचा उद्देश आहे. कोणत्याही क्रियेचा खरा कर्ता किंवा खरें कर्म कोण आहे, हा विचार प्रयोगप्रकरणाच्या मुळाशीं नाहीं. 'कर्ता', 'कर्म', किंवा 'क्रियादर्शित भाव'—यापैकीं कोणाविषयीं विधान करावयाचें, याचा निश्चय झाल्यावर त्या त्या शब्दाची प्रथमा विभक्ति करून तो उद्देश्यस्थानीं योजावयाचा, व तदनुषंगानें क्रियापदाच्या पुरुषवचनाची व्यवस्था लावावयाची—या धोरणावर संस्कृत प्रयोगप्रकरण रचिलें आहे. इंग्रजी वाक्यांची रचनाही याच धर्तीवर केलेली असते.

इंग्रजी व संस्कृत वाक्यांच्या पृथक्करणाच्या धर्तीवर मराठी वाक्यांचें पृथक्करण नेतां येत नाहीं म्हणून जें वर म्हटलें आहे, तें उदाहरणांनी विशेष स्पष्ट केलें पाहिजे. प्रथम ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, वाक्यांतील सर्व शब्दांत मुख्य शब्द क्रियापद होय. या क्रियापदावर सर्व कांहीं अवलंबून असते. विभक्ति व शब्दयोगी अव्ययें यांच्या योगानें जीं विशेष कार्यें होतात, त्यांचा बहुतेक संबंध क्रियापदाकडे असतो. नामास शब्दयोगी अव्ययें लाविल्यानें क्रियाविशेषणें होतात, हें मागें सांगितलेंच आहे. विभक्तींपैकीं कांहीं वर्ज करून बाकीच्यांनीही क्रियाविशेषणांचाच अर्थ उत्पन्न होतो, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्या वस्तूविषयीं विधान करावयाचें असेल त्या वस्तूला प्रथमाविभक्तीचे प्रत्यय लावावयाचे, असा इंग्रजी व संस्कृत भाषांत संप्रदाय आहे. द्वितीया विभक्तीचें मुख्य काम म्हटलें म्हणजे सकर्मक क्रियापदांनीं दर्शविलेल्या क्रियांचा परिणाम ज्या वस्तूंवर घडत असेल त्या वस्तूंच्या नांवांस विवक्षित प्रत्यय लावून तीं त्या त्या क्रियापदांचीं कर्में आहेत, असें दाखवावयाचें. तृतीया विभक्तीवरून कोणत्याही क्रियेच्या करणाचा, साधनाचा, व कधीं कधीं कर्त्याचा बोध होतो. क्रियेची दिशा, हेतु, व अशाच प्रकारचे दुसरे अर्थ दाखविण्यासाठीं चतुर्थी विभक्तीची योजना केली आहे. पंचमी विभक्तीनें बहुधा क्रियेचा उगम किंवा उद्भवस्थान दाखविलें जातें. षष्ठी विभक्ति शुद्ध विशेषणार्थक आहे. स्वामित्व दाखविणें हें हिचें मुख्य काम आहे. सप्तमी विभक्तीनें क्रियेचें स्थान

आणि स्थिति यांचा बोध होतो. शेवटची विभक्ति संबोधन; हिची विभक्तीत गणना करावी किंवा नाही हा वादग्रस्त प्रश्न आहे. या विभक्तींत असलेल्या नामांस उद्‌गारवाची अव्ययें मानिलें तरी चालणार आहे; किंवा वाक्यांत यांच्यापुढें एखादें धातुसाधित अध्याहृत घेऊन हीं त्यांचीं कर्मे मानिलीं तरी देखील निर्वाह होणार आहे. सारांश काय कीं, विभक्तींच्या विचारांत संबोधनाचा विचार फार करण्याची आवश्यकता नाहीं.

विभक्तींच्या उपयोगांचें वर जें स्थूल स्वरूप दिलें आहे, त्यावरून हें दिसून येईल की, संस्कृतादि ज्या भाषांत या उपयोगांच्या अनुरोधानें वाक्यरचना करण्याचा प्रघात पडला आहे, त्यांत ज्या वस्तूविषयीं विधान करावयाचें असेल ती नेहमीं प्रथमांत असतें असें दृष्टीस पडतें. " रामो रावणं हन्ति " व " रामो रावणं जघान (अहन्) " या दोन वाक्यांत 'हन्ति' व 'जघान' या दोन क्रियांनीं 'रामा'विषयी विधान केलें आहे. हें दोन्हींही वाक्यांतील 'राम' शब्दाच्या प्रथमा विभक्तीवरून व्यक्त होतें. या दोन्हींही वाक्यांत 'राम' हाच शब्द त्यांतील विधेयांचा 'उद्देश्य', आणि क्रियापदांचा 'कर्ता' आहे; म्हणजे वाक्यमीमांसक या वाक्यांतील 'राम' शब्दास 'हन्ति' व 'जघान' या विधेयांचें 'उद्देश्य' म्हणतील, व व्याकरणकार त्यालाच 'हन्ति' व 'जघान' या क्रियापदांचा 'कर्ता' म्हणतील. या वाक्यांचें इंग्रजी भाषांतर " Rama kills Ravana " आणि " Rama killed Ravana, " असें होईल; व त्या भाषेंतील व्याकरणाच्या व वाक्यमीमांसेच्या नियमाप्रमाणें 'राम' (Rama) हा शब्द, संस्कृताप्रमाणें, 'हन्ति' व 'जघान' ('kills' and 'killed') या क्रियापदांचा 'कर्ता' आणि 'उद्देश्य' होईल. या दोनही वाक्यांत क्रियापद कर्त्रनुगामी असल्यामुळें, त्यांच्या प्रयोगास 'कर्तरी' प्रयोग म्हणतात. याच वाक्यांचें मराठी भाषांतर केलें असतां त्यांची काय स्थिति होते ती पहा. 'राम रावणास मारतो' व 'रामानें राणास मारिलें' हीं वरील संस्कृत वाक्यांचीं मराठी भाषांतरें होत. पहिल्या वाक्यांत संस्कृताप्रमाणें, 'मारतो' हें क्रियापद कर्त्रनुगामी आहे, व 'राम' शब्दाच्या प्रथमांतावरून तो 'मारतो' या विधेयाचें 'उद्देश्य' आहे, व हें संस्कृत व इंग्रजी भाषांतील विभक्तींच्या उपयोगांचा जो स्थूल नियम आहे, त्याला धरून आहे. पण दुसऱ्या वाक्यांत काय विलक्षण प्रकार घडून आला आहे तो पहा. 'रामा'विषयीं भूतकाळीं विधान करावयाचें असल्यामुळें 'राम' शब्दास तृतीया विभक्तीचा प्रत्यय लावावा लागला, व 'मारणें' क्रियापद नपुंसकलिंगी करावें लागलें! म्हणजे इंग्रजी व संस्कृत भाषांच्या वाक्यमीमांसेच्या नियमाप्रमाणें 'मारणें' हें क्रियापद मराठी भाषेंत,

भूतकाळी प्रयोग केला असतां, कर्मानुगामी न होतां नपुंसकलिंगी होऊन बसतें इतकेंच नाहीं, तर त्याच्या कर्त्याचा प्रथमांत नाहींसा होऊन त्याला तृतीयांत जडतो ! आतां कोणी असें म्हणतील कीं 'रामो रावणं जघान' या वाक्याचें 'रामानें रावणास मारिलें' असें भाषांतर न करितां 'रामानें रावण मारिला', असें करावें; व तसें करण्यास कोणतीही हरकत नाहीं. आम्हांस हें भाषांतरही कबूल आहे. पण हें कबूल केलें तरी मराठी भाषेची विचित्रता दूर होत नाहीं. रामानें रावण मारिला' या वाक्यांत 'रामा' विषयीं 'मारणें' या क्रियेचें भूतकाळी विधान करावयाचें असतां, 'राम' शब्द प्रथमा विभक्तींत घालतां येत नाहीं, व 'मारिला' हें क्रियापद किंवा विधेय 'रामा'नुगामी करतां येत नाहीं, ही जी मुख्य अडचण ती दूर होतच नाहीं. 'मारिला' हें क्रियापद कर्मानुगामी आहे. 'रावणा'च्या जागीं 'ताटिका' शब्द घातला कीं 'मारिला'च्या जागीं 'मारिली' हें क्रियापद येऊन बसेल; अथवा 'ताटिकेस' अशी द्वितीया योजिल्यास असल्या प्रयोगांत नेहमीं येणारें नपुंसकलिंगी 'मारिलें' हें क्रियापद पुढें सरेल ! इंग्रजी व संस्कृत भाषापद्धतीप्रमाणें या भूतकाळीं सकर्मकर्तरी प्रयोगाचें मराठी भाषांतर 'राम रावण मारिला' असें व्हावयाला पाहिजे होतें; व याच रीतीनें 'तो गाई बांधला', 'घोडे दाणा खाल्ले', 'बिढू शिप्यास किंवा शिपी बोलावला' असे सारे प्रयोग होते, तर इंग्रजी व संस्कृत वाक्यामीमांसेचे नियम मराठी वाक्यांस जसेच्या तसेच लावितां येते. पण असल्या प्रयोगांस एखाद्या इंग्रजी, कानडी, किंवा तेलंगी पंडिताशिवाय कोणीही शुद्ध मानणार नाहीं ! तेव्हां मराठी वाक्यांतील उद्देश्यविधेयांची सांगड लावून देतांना, केवळ प्रथमा विभक्तीवर भिस्त ठेऊन चालणार नाहीं, हें उघड आहे. 'उद्देश्याची' तृतीया विभक्ति, व 'विधेय' कर्मानुगामी केल्याशिवाय, मराठींत भूतकाळीं सकर्मकर्तरी प्रयोग मुळींच करतां येत नाहीं, असें नाहीं. "ते भात जेवले" हा प्रयोग थेट संस्कृत प्रयोगाच्या धर्तीवर आहे. पण असले प्रयोग फार थोडे आहेत. ज्या प्रयोगांत कर्त्याची किंवा उद्देश्याची तृतीया होते, व क्रियापद कर्मानुगामी किंवा नपुंसकलिंगी असतें—असले प्रयोग फार. तेव्हां "वाक्यांत ज्या वस्तूविषयीं विधान केलेलें असतें, ती प्रथमांत असून विधेय क्रियापद तदनुषंगी असतें", हा जो संस्कृत किंवा इंग्रजी वाक्यमीमांसेचा आद्य नियम तो सर्व मराठी वाक्यांस लागू करतां येत नाहीं. 'रामानें रावणास मारिलें', अथवा 'रामानें रावण मारिला' या दोनही वाक्यांत 'रामा' विषयीं मारणें' या क्रियेचें विधान करावयाचें असतां त्या शब्दाची तृतीया विभक्ति योजावी लागली; म्हणून मराठींत बऱ्याच ठिकाणीं 'उद्देश्य' तृतीया विभक्तींतही असतें, असा याच भाषेंतील वाक्यांसाठीं

निराळा नियम केला पाहिजे. हा नियम एकदा अंगीकारला कीं चतुर्थीही तोच हक्क मागूं लागते; व तिला तो न देणें अशक्य होतें. पहा, " माझ्यानें काम करवतें " किंवा " मला काम करवतें " या दोन वाक्यांत जितका तृतीयेचा तितकाच चतुर्थीचा प्रयोग प्रशस्त आहे. जो अर्थ पहिल्या वाक्यापासून उत्पन्न होत आहे, तोच दुसऱ्यापासून होत आहे; तेव्हां " माझ्यानें " हा जर व्याकरण-शुद्ध कर्ता मानिला तर 'मला' कां मानूं नये ? तसेंच वाक्यमीमांसेंत 'माझ्यानें' उद्देश्य मानिलें तर 'मला' ही तें मानण्यास काय हरकत आहे ? कारण वाक्य-मीमांसेचा मुख्य नियम असा आहे, की ज्या वस्तूविषयीं बिधान असेल ती " उद्देश्य " होय. " उद्देश्या "ची विभक्ति अमुकच असली पाहिजे असा आग्रह वाक्यमीमांसक धरूं शकत नाहीं. इंग्रजी व संस्कृत वाक्यांत 'उद्देश्य' नेहमीं प्रथमा विभक्तींत असतें, हें ठीक आहे; पण यावरून प्रत्येक भाषेंतील उद्देश्यपदें प्रथमा विभक्तींतच असलीं पाहिजेत असा नियम करतां येत नाहीं.ज्या वस्तूविषयीं किंवा तद्दर्शक शब्दाविषयी विधान करावयाचें असेल, ती अमुकच एका विभक्तींत घालण्याचा संप्रदाय असणें फार सोईचें आहे; पण एखाद्या भाषेंत ती सोय नसली, म्हणून भलताच शब्द, प्रथमा विभक्तींत आहे येवढ्यासाठींच वाक्यांतील विधेय क्रियापदाचें उद्देश्य करावयाचा कीं काय ? किंवा ज्या शब्दाविषयीं खरोखरी विधान केलेलें नाहीं [?] तो प्रथमा विभक्तींत नाहीं, म्हणून त्याला 'उद्देश्य' म्हणावयाचें नाही कीं काय ?तर असें कांही उपयोगी नाही; वाक्याच्या अर्थावरून ज्या शब्दाविषयीं विधान केलें आहे असें स्पष्ट निघत असेल, त्याची विभक्ती कोणतीही असली तरी त्यालाच 'उद्देश्य' केलें पाहिजें. असें न केलें व उद्देश्यनिश्चय केवळ प्रथमा विभक्तीवर अवलंबून ठेविला, तर वाक्याचें पृथ-क्करण करताना 'उद्देश्यस्थानीं' खरोखरी ज्याच्याविषयीं विधान नाहीं असा शब्द घालावा लागेल, व वाक्यमीमांसा म्हणजे वाक्याच्या अर्थाचें व्याकरण— ही जी वाक्यमीमांसेची व्याख्या तिला हरताळ लावावा लागेल !

संस्कृतांत 'कर्तरी', 'कर्मणी' आणि 'भावी' हे जे वाक्याच्या प्रयोगांचे संस्कृत व्याकरणकारांनीं तीन भेद केले आहेत, ते मराठी वाक्यांस लावितांना, आद्य मराठी वैय्याकरणांनी संस्कृत भाषा मराठीहून किती पूर्ण आहे, व तिची वाक्यरचना मराठींतील वाक्यरचनेपेक्षां किती व्यवस्थित आहे, हें जितक्या काळजीनें पहायाला पाहिजे होतें, तितक्या काळजीनें न पाहिल्यामुळें, मराठी प्रयोगांचे विभाग करून त्यांस नांवें देण्यांत फारच गोंधळ झाला आहे. संस्कृतांत प्रयोगांविषयी विचार करतांना 'कर्ता', 'कर्म', आणि 'क्रियापद' या तीन गोष्टींवर नजर देऊन प्रयोगांचे विभाग केले आहेत. वाक्यांतील क्रियापद सकर्मक

असो किंवा अकर्मक असो, तें जर तद्दर्शित क्रियेच्या वास्तविक कर्त्याच्या अनुरोधानें घातलें असेल तर, त्या क्रियापदास 'कर्तरी क्रियापद' म्हणावें, व त्याच्या प्रयोगास कर्तरी प्रयोग म्हणावा, असा संस्कृत व्याकरणाचा कर्तरी प्रयोगाविषयीं नियम आहे. कर्तरी प्रयोगांत कर्तृपद नेहमीं प्रथमांत असतें, व असलें पाहिजे. इंग्रजी भाषेंत या प्रयोगास 'ॲक्टिव्ह व्हॉईस' (Active Voice) असें म्हणतात. 'ॲक्टिव्ह व्हॉईस' मध्येंही कर्तृपद प्रथमांत असावें, असा नियम आहे. "कृष्णो गच्छति (कृष्ण-कृष्णा जातो)", "रामो रावणं हन्ति (राम रावणास मारितो)" हीं संस्कृत कर्तरी प्रयोगाचीं उदाहरणें होत. "कृष्णो गच्छति" या वाक्यांत 'गच्छति' हें अकर्मक क्रियापद असून तद्दर्शित क्रियेचा खरा कर्ता जो कृष्ण तदनुसारी तें आहे म्हणून 'कृष्णो गच्छति' हा कर्तरी प्रयोग होय. 'रामो रावणं हन्ति' या वाक्यांतही 'हन्ति' हें सकर्मक क्रियापद तद्दर्शित क्रियेचा वास्तविक कर्ता जो 'राम' तदनुसारी आहे, म्हणून "रामो रावणं हन्ति" हाही कर्तरी प्रयोग होय. आतां कित्येक वेळां असें होतें कीं, लिहिणाराच्या किंवा बोलणाराच्या विचारांत एखादी क्रिया किंवा क्रियेचा ज्या वस्तूंवर परिणाम घडला आहे ती वस्तू विशेष घोळत असते, व वाचणारांस किंवा ऐकणारांस फक्त त्या क्रियेच्या संबंधानें, किंवा क्रियेचा ज्या वस्तूंवर परिणाम घडतो त्या वस्तूंच्या संबंधानें, कांहीं सांगावें, येवढाच उद्देश असतो. अशा वेळीं तो त्या क्रियेच्या खऱ्या कर्त्यास मुळीच प्रमुखत्व देत नाहीं. कधीं कधीं कर्ता इतका प्रसिद्ध किंवा सहज लक्षांत येण्यासारखा असतो कीं त्याचा उल्लेख करणें कंटाळवाणें असतें. कित्येकदां क्रिया घडली आहे, पण कोणाकडून घडली आहे, हें ठाऊक नसतें, म्हणून तिचा 'कर्ता' सांगतां येत नाहीं. कित्येकदां क्रियेचा परिणाम कोणत्या वस्तूवर घडला आहे, हें स्पष्टपणें ठाऊक असतें, व तेवढेंच सांगण्याचा उद्देश असतो; क्रियेचा वास्तविक कर्ता सुप्रसिद्ध असल्यामुळें तो सांगण्याची गरज नसते, किंवा तो बरोबर रीतीनें ठाऊक नसल्यामुळें सांगतां येत नसतो. प्रत्येक वाक्यांत क्रियेचा खरा कर्ता सांगितलाच पाहिजे, असे म्हणणें म्हणजे विशेष तऱ्हेनें कर्तृक्रियासंबंध दाखविणारा जो शब्दसमूह त्यासच वाक्य म्हणावयाचें, अशी त्याची एकदेशीय व्याख्या करावी लागेल; व कर्त्याचा पत्ता लाविल्याशिवाय वाक्य लिहिण्याची किंवा बोलण्याची मनाई होईल. शिवाय कर्तृक्रियासंबंधाशिवाय इतर संबंधही व्यक्त करणें मनुष्यास अवश्य आहे. ते व्यक्त करण्यास्तव वाक्यासारखीच दुसरी कांहीं योजना करणें अवश्य आहे. क्रियापदांनीं वस्तूंच्या फक्त क्रियाकर्तृकत्वाचाच बोध होतो असें नाहीं; त्यांच्या अस्तित्वांचा, स्थित्यंतरांचा, व त्यांच्यावर बाहेरून घडत असलेल्या परिणामां-

चाही बोध होतो. तेव्हां कर्तृक्रियासंबंधदर्शक जो विशेष प्रकारचा शब्दसमूह त्यासच वाक्य म्हणण्यापेक्षां ज्या शब्दसमूहांत क्रियापद असून त्यामुळें कोणत्याही वस्तूचें क्रियाकर्तृत्व, तिची स्थिति, तिचें स्थित्यंतर, किंवा तिच्यावर घडत असलेला परिणाम यांपैकीं कशाचाही बोध होत असला तरी त्याला (शब्दसमूहाला) वाक्य म्हणावें, अशी वाक्याची व्यापक व्याख्या करणें अवश्य आहे. ' सूर्य प्रकाशतो ' ' चिमणी घरटें बांधते ' या वाक्यांत कर्तृक्रियासंबंध वर्णिला आहे. " तो साप अद्यापि जिवंत आहे ", " शिवाजी फार सदय होता " या वाक्यांत वस्तूंच्या स्थितीचें वर्णन आहे, " आमचा भाचा मामलतदार झाला ", " तुमचा भाऊ लवकरच चिटणीस होईल "—या वाक्यांत विवक्षित वस्तूंचीं स्थित्यंतरें सांगितलीं आहेत. " पाणी उपसलें ", "पानें वाढलीं ", "त्याला सडकून चोप मिळाला", " तुमच्या केंसाला काडीमात्र धक्का लागणार नाहीं " " ही जमीन आठपंधरा दिवसांत तयार केली जावी अशी आमची इच्छा आहे "—इत्यादि वाक्यांत विशेष वस्तूंवर बाहेरून घडत असलेले परिणाम, ते घडविणारांचा उल्लेख न करतां, समजाविले जात आहेत. तेव्हां वाक्यांत कर्तृक्रियासंबंधच दाखविला जातो, किंवा दाखविला जावा, हें म्हणणें बरोबर नाहीं. क्रियापद अकर्मक असून त्याच्या योगानें कोणत्याही वस्तूच्या कर्तृत्वाचा, स्थितीचा, किंवा स्थित्यंतराचा बोध होत असतो, व ती वस्तू किंवा तद्दर्शक शब्द प्रथमा विभक्तींत असतो, तेव्हां जें वाक्य होतें, त्याच्या प्रयोगास,—किंवा क्रियापद सकर्मक असून त्याच्या योगानें तद्दर्शित क्रियेचा वास्तविक कर्ता दाखविला जात असतो, व तो प्रथमांत असतो, तेव्हां जें वाक्य होतें, त्याच्या प्रयोगास—संस्कृतात कर्तरी प्रयोग म्हणतात. क्रियापद सकर्मक असून त्याचा वास्तविक कर्ता प्रथमेशिवाय दुसऱ्या कोणत्याही विभक्तींत असेल, व त्या कर्त्याच्या क्रियेचा परिणाम ज्या वस्तूवर घडत असेल ती वस्तू किंवा तद्दर्शक शब्द प्रथमांत असून, त्या सकर्मक क्रियापदास तदनुसारी होण्यास लागणारें अवश्य स्वरूप आलें असेल, तर त्या क्रियापदास कर्मणि क्रियापद, व तें ज्या वाक्यांत आलें असेल त्याच्या प्रयोगास कर्मणी प्रयोग, म्हणतात. " रामेण रावणो हन्यते " अथवा "रामेण रावणोऽहन्यत " हीं संस्कृत कर्मणी प्रयोगांचीं उदाहरणें होत. यांत ' हन् ' या सकर्मक धातूचा वास्तविक कर्ता ' राम ' तृतीयांत असून त्या क्रियेचा परिणाम ज्यावर घडत आहे तो 'रावण' प्रथमांत आहे, व ' हन् ' हा धातू रावणानुसारी करण्यासाठीं त्याला ' हन्यते ' व ' अहन्यत ' अशीं स्वरूपें आणिलीं आहेत. इंग्रजींतही असेंच होतें. " Ravana is (being) killed by Rama " व " Ravana was killed by Rama " असें वरील संस्कृत वाक्यांचें इंग्रजी भाषांतर होईल. अशा प्रकारच्या

कर्मणी प्रयोगास इंग्रजी भाषेंत " पॅसिव्ह् व्हॉईस् " (Passive Voice) असें म्हणतात. मराठीत याच धर्तीवर या वाक्यांचें भाषांतर केलें असतां तें " रामाकडून रावण मारिला जातो ", " रामानें रावण मारिजेतो ", " रामाकडून रावण मारला गेला", " रामानें रावण मारिजेला ", व " रामानें रावण मारिला " असें होईल. यांपैकीं पहिलें व तिसरें वाक्य इंग्रजी वाक्याच्या धर्तीवर आहे; अशी वाक्यें अगदींच अर्वाचीन पद्धतीचीं आहेत असें म्हणतां येणार नाहीं, मोरोपंतादि कवींच्या ग्रंथांतही असलीं वाक्यें आढळतात. (उदाहरणें पाहिजे असल्यास कै० कृष्णशास्त्री गोडबोले यांचें व्याकरण पहावें). दुसऱ्या व चवथ्या तऱ्हेचीं वाक्यें जुन्या ग्रंथांत सांपडतात. अलीकडे तसलीं वाक्यें प्रचारांतून अगदीं गेलीं आहेत. तीं असतीं तर फार चांगलें होतें. पांचवें वाक्य, " रामेण रावणोऽहन्यत " किंवा " रामो रावणं जघान (अहन्)", या दोन्ही वाक्यांचें, म्हणजे संस्कृत कर्मणी आणि कर्तरी वाक्यांचें, भाषांतर आहे, असें मानितां येईल. पण त्याचा प्रयोग मात्र कर्मणीच मानिला पाहिजे. कारण क्रियापद कर्मानुसारी असून कर्म प्रथमांत आहे. वाक्यांत क्रियापद सकर्मक असतां त्याचा प्रयोग कर्तरी किंवा कर्मणी होतो. म्हणजे क्रियापद कर्त्रनुसारी असून कर्ता प्रथमांत असला, म्हणजे कर्तरी प्रयोग होतो, व क्रियापद कर्मानुसारी असुन कर्म प्रथमांत असलें, व कर्ता दुसऱ्या एखाद्या विभक्तींत असला, म्हणजे कर्मणी प्रयोग होतो. क्रियापद सकर्मक असून कर्ता किंवा कर्म यापैकीं एकही प्रथमांत नाहीं, असें वाक्य बहुधा संस्कृतांत येत नाहीं. दोहोंपैकीं कोणा एकाच्या तरी अनुरोधानें क्रियापद घातलेलें असतें, व ज्याच्या अनुरोधानें तें घातलेलें असतें, त्याची प्रथमा विभक्ति असते. यामुळें संस्कृत भाषेंत सकर्मक क्रियापदापासून फक्त कर्तरी किंवा कर्मणी प्रयोग होतात; भावी प्रयोग होत नाहींत. " सकर्मक भावी " हा असंबद्ध प्रलाप किंवा शब्दविरोध आहे, असें संस्कृत वैय्याकरण बहुश: म्हणतील, असें वाटतें. संस्कृतांतील भावी प्रयोग फक्त अकर्मक क्रियापदावरून होतो. अकर्मक क्रियापदाचा कर्ता प्रथमा विभक्तींत न घालतां, दुसऱ्या एखाद्या विभक्तींत घालून, कर्मणी प्रयोगांत सकर्मक धातूंस जे प्रत्यय लावितात, ते अकर्मक क्रियापदास लाविल्यानें, संस्कृतांत भावी प्रयोग होतो. " तेन गम्यते " हें भावी प्रयोगाचें उदाहरण आहे. याचें मराठी भाषांतर ' त्यानें जाइजे ' किंवा ' तो जातो ' असें केलें पाहिजे. यांपैकीं ' त्यानें जाइजे ' असला प्रयोग जुन्या मराठींत मात्र आढळतो. अलीकडे तो प्रचारांतून अगदीं नाहींसा झाला आहे. क्वचित् पत्रांच्या वगैरे मान्यांत असले प्रयोग येतात. ' म्हणजे ', ' पाहिजे ' वगैरे जीं रूपें चालू मराठींत आढळतात ती क्रियार्थीच असतात, असा नियम नाहीं.

त्यांना अव्ययादि इतर शब्दजातीचाही अर्थ आला आहे. " तेन गम्यते " याचें इंग्रजी भाषांतर 'इट् इज् गॉन् बाय् हिम्' (It is gone by him) असें करावें लागेल. पण असले प्रयोग इंग्रजींत होत नाहींत.

संस्कृत वैय्याकरणांनीं आम्ही करीत आहों या दृष्टीनें वाक्याची मीमांसा किंवा वाक्यार्थाचें पृथक्करण केलें आहे असें वाटत नाहीं. यामुळें वाक्यांतील उद्देश्याची विभक्ति कोणती असावी, ती प्रथमेशिवाय दुसरी कोणती असली तर चालेल किंवा नाहीं, या प्रश्नाची त्यांनीं विशेष चर्चा केलेली नाहीं. कर्तरी, कर्मणी आणि भावी हे जे वाक्यांचे त्यांनीं तीन भेद किंवा प्रयोग केले आहेत, ते क्रियापदें कोणास अनुसरून असतात, हें पाहून केले आहेत. ते कर्त्यास अनुसरून असले तर त्यास कर्तरी, कर्मास अनुसरून असले तर कर्मणी, व क्रियेच्या भावास अनुसरून असले तर भावी, मानून त्या त्या वाक्याचा कर्तरी, कर्मणी, आणि भावी प्रयोग म्हणावा अशी त्यांची व्यवस्था दिसते. ज्या अर्थी भावी प्रयोगात क्रियापदापासून त्याच्या भावाचा बोध होतो, त्या अर्थी तद्दर्शक आणखी एक प्रथमांत शब्द वाक्याच्या पूर्ततेसाठीं वाक्यांत घातला पाहिजे, किंवा नेहमीं अध्याहृत घेतला पाहिजे, हें त्यांस अवश्यक वाटलें असावें, असे दिसत नाहीं. 'तेन गम्यते' या वाक्यांत विधान कोणाविषयीं आहे, असा प्रश्न पाणिनीस कोणी करता, तर त्याचें उत्तर तो काय देता, कोण जाणे. 'तेन गम्यते' या छोटया वाक्यांत प्रथमांत पद मुळींच दिसत नाही, व यांत 'जाणें' या क्रियेचा बोध करून देणें ही प्रधान गोष्ट आहे; तेव्हां हें क्रियापद तद्दर्शित भावानुसारी आहे, असें जाणून, अवश्य वाटल्यास 'तेन गमनं गम्यते' असा पूर्ण कर्तरी प्रयोग करावा, असा संस्कृत वैय्याकरणांचा झोंक दिसतो. इंग्रजींत क्रियापदार्थक नामें त्या त्या क्रियापदानंतर येऊन त्या त्या क्रियापदांस बाह्य सकर्मकत्व आणितात; अशा प्रकारच्या सकर्मक क्रियापदांवरून कर्मणी प्रयोग केले असतां ज्या तऱ्हेचे प्रयोग होतात, त्या तऱ्हेचा संस्कृतांतील 'तेन गमनं गम्यते' हा प्रयोग आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. 'ए ड्रीम् वॉज् ड्रेम्ट बाय् हिम् (A dream was dreamt by him), 'ए रेस वीज् रन्' (A race was run by him) इत्यादि प्रयोग सर्वांशीं 'तेन गमनं गम्यते' यासारखे आहेत. मराठींत यांच्या तोडीचे प्रयोग पाहिजे असतील तर 'खेळ खेळले गेले,' 'गीत गाइलें गेलें', 'धांव (मारली) धांवली गेली'— अशी नवीन सृष्टी निर्माण केली पाहिजे ! इतकें करूनही संस्कृतांतील 'तेन गम्यते' येवढयाशा चिमुकल्या वाक्यांत जी खुबी आहे, ती या लांबलचक ओबड-धोबड मराठी वाक्यांत येत नाहीं; आणि याचें कारण हें आहे की, संस्कृत

क्रियापदांच्या रूपांत जी बहुविधता आहे, तिचा एक दशांशही मराठींत आलेला नाहीं. संस्कृतांत नुसत्या भूतकालवाचक धातुसाधितांवरून प्रयोग होतात, म्हणून आम्ही मराठी भाषेंत तसें करायाला गेलों, तों क्रियापदांच्या भूतकाळीं रूपांच्या जागीं भूतकालवाचक धातुसाधितें येऊन बसलीं, व मराठी पूर्ण क्रियापदें बनून गेलीं ! निरनिराळ्या पुरुषीं व काळीं क्रियापदास होणारीं निरनिराळीं रूपें जीं एकदां मागें राहिलीं तीं राहिलीं ! "तैः गीतं" हें तृतीया विभक्तीचें अनेक वचन आणि भूतकालवाचक धातुसाधित यांनीं झालेलें वाक्य आहे. याचें मराठी भाषांतर 'त्यांनीं गाइलें' असें होईल. मराठींत व संस्कृतांत भेद इतकाच कीं, संस्कृतांतील "गीत" च्या जागीं भूतकाळाचीं, आणखी पांचचार रूपें तरी घालतां येतील; मराठींतील 'गाइलें' क्रियापद असून भूतकालवाचक धातुसाधितही आहे, व त्याच्या जागीं घालण्याजोगें 'गाणें' या धातूचें भूतकाळीं दुसरें रूप नाहीं !

कर्ता (उद्देश्य), कर्म, करण, संप्रदान, अपादान, संबंध (स्वामित्व,) व अधिकरण इत्यादिकांचा बोध करून देण्यासाठीं प्रथमादि विभक्तींची अनुक्रमानें योजना झाली आहे, असें मानिलें, व वाक्यांतील क्रियापद कर्त्रनुरोधी, कर्मानुरोधी, किंवा भावानुरोधी असेल त्याप्रमाणें तें तें पद विचारांत प्रधान आहे, असें कल्पून, क्रियापद तदनुरोधी आहे, म्हणून बोलणाराच्या किंवा लिहिणाराच्या मनांत त्या त्या वस्तूविषयींच विधान करावयाचें आहे असें मानिलें, तर संस्कृतांतील प्रयोगव्यवस्थेची आणि अलीकडील अर्थानुसारी वाक्यमीमांसेची पूर्ण एकता होईल; पण शंका एवढीच आहे कीं, क्रियापदाच्या रूपावरून तें ज्या शब्दाशीं ग्रथित असलेलें दिसतें त्याच शब्दाविषयीं प्रत्येक वाक्यांत विधान होत असतें कीं काय ? म्हणजे प्रयोग ठरवितांना संस्कृत व्याकरणकार ज्याला '**उद्देश्य**' म्हणून म्हणतात, त्याचविषयीं वाक्यांत विधान केलेलें असतें काय ? या प्रश्नास 'होय' असें उत्तर कदाचित् संस्कृत किंवा इंग्रजी वाक्यांच्या संबंधानें देतां येईल; पण मराठी वाक्यांच्या संबंधानें देतां येणार नाहीं, असें वाटतें. 'तारे चमकतात', 'तुम्हांला फावलें', 'माझ्यानें अथवा मला जाववतें', 'मुलगे वेद पढले', 'गाईनीं हंबरडा फोडिला', 'त्यांनीं तिला अतिशय नाडली', 'आम्हीं स्नान केलें', 'ते स्नान केले', 'मी स्नान (आंघोळ) केलों', 'तुम्हीं वस्त्रें धुतलीं(त) किंवा देवांस पूजिलें(त)', 'त्यांनीं शिप्यास (शिपी) बोलावला', 'मला त्याला पैसे द्यावे लागतात', 'मला पोथी पाहिजे आहे', 'हरीला अंबे पाहिजेत'—हीं आणि असलीं दुसरीं वाक्यें फार विचार करण्यासारखीं आहेत. यांचा जो बारीक दृष्टीनें विचार करील त्याला प्रथमा विभक्ति आणि क्रिया-

पदाचा तिच्याशीं संबंध—यावरच केवळ मराठी वाक्यांतील उद्देश्यविधेयांची व्यवस्था बसवून देतां येणार नाहीं. वाक्यांत क्रियापद ज्या शब्दाच्या अनुरोधानें असतें, त्याचविषयीं त्यांत विधान असतें असें मानिलें, तर आपल्या मराठी वाक्यांपैकीं कांहींचें फारच बिलक्षण रीतीनें पृथक्करण करावें लागेल. 'तो जातो', 'तो जाईल', 'तो भात जेवला', 'ते गाई बांधितील' वगैरे वाक्यांतील क्रियापदें कर्त्रनुगामी आहेत इतकेंच नाहीं, तर त्यांच्या योगानें कर्तृस्थानीं असलेल्या सर्वनामाविषयीं विधान होत आहे म्हणून त्यांस 'उद्देश्य' मानण्यास कांहीं हरकत नाहीं. पण 'रामानें रावण मारिला', 'त्यानें घर बांधावयाचें होतें', 'मला त्यांस पैसे द्यावे लागतात', 'त्याच्यानें धडा पाठ करवला असता', असल्या वाक्यांविषयीं काय करावें ? यांतील क्रियापदें तत्तद्दर्शित क्रियांच्या कर्त्यांस अनुसरून नाहींत; कर्मांस अनुसरून आहेत; तेव्हां व्याकरणदृष्ट्या त्यांस कर्मणी प्रयोग म्हणतां येईल. पण वाक्यमीमांसेंत त्यांची व्यवस्था कशी लावावयाची ? या वाक्यांत उद्देश्यपदें कोणतीं ? मुख्यत: विधान कोणत्या वस्तूविषयीं आहे ? इंग्रजी वाक्यमीमांसेच्या धर्तीवर यांचें पृथक्करण केलें तर त्यांतील कर्मपदांस 'उद्देश्य' म्हणावें लागेल; कारण इंग्रजींत क्रियापदें ज्या शब्दांच्या अनुषंगानें घातलेलीं असतात त्यांविषयीं तीं विधान करीत असतात, असें मानिलें आहे; व त्या भाषेच्या रूढीप्रमाणें बहुश: तसा अर्थही निघत असतो. कदाचित् संस्कृत वाक्याविषयींही असेंच म्हणतां येईल. पण 'त्यांनीं घोडे बांधिले', 'रामानें रावण मारिला' असल्या मराठी वाक्यांविषयीं जर असें म्हटलें, कीं यांतील क्रियापदें कर्मानुगामी आहेत, म्हणून हीं कर्मांविषयीं विधान करितात, कर्त्यांविषयीं करत नाहींत, सबब कर्मपदांनाच 'उद्देश्य' म्हणावें, व कर्तृपदें क्रियाविशेषणें मानावीं, तर ठीक दिसेल काय ? असल्या मताचा सर्वत्र स्वीकार होईल काय ? व सार्वत्रिक स्वीकाराहूनही विशेष महत्त्वाची जी गोष्ट कीं वाक्यमीमांसेंत खरोखरीच ज्याविषयीं वाक्यांत विधान मुख्यत्वेंकरून होत असेल तेंच **उद्देश्य** मानावें, ती केली असें होईल काय ? 'बांधिले' व 'मारिला' हीं क्रियापदें कर्मानुगामी आहेत हें उघड दिसत आहे. पण येवढ्यावरून तीं कर्मांविषयींच विधान करीत आहेत, कर्त्यांविषयीं बिलकुल करीत नाहींत, हें म्हणणें प्रशस्त होईल काय ? ज्यांस होईल असें वाटत असेल ते असल्या वाक्यांस व्याकरणदृष्ट्या कर्मणी प्रयोगांचीं उदाहरणें मानून वाक्यपृथक्करणांत 'घोडे' व 'रावण' हे शब्द उद्देश्यस्थानीं घालतील; व 'त्यांनी' आणि 'रामानें' हे शब्द विधेयक्रियाविशेषणवाचकांच्या कोष्टकांत घालतील. पण प्रश्न हा आहे कीं या आणि असल्या दुसऱ्या वाक्यांत खरोखरी विधान

कोणाविषयीं आहे? 'त्यांनीं' व 'रामानें' यांविषयीं? कीं 'घोडे' आणि 'रावण' यांविषयीं? पण हीं वाक्येंही क्षणभर एकीकडे राहूं द्या. "रामानें रावणास मारिलें", "त्यांनीं शिष्यांस बोलाविलें", "मला गांवास जाववतें" असल्या वाक्यांची काय वाट लावयाची? यांतील क्रियापदें कर्त्यांस अनुसरत नाहींत, व कर्मासही अनुसरत नाहींत. तीं स्वतंत्रपणें नपुंसकलिंगी आहेत. इंग्रजी वाक्यमीमांसेचा नियम मराठी वाक्यांस लागू केला तर यांच्या योगानें नपुंसकलिंगी शब्दांविषयींच विधान करितां येईल. दुसरें हेंही खरें आहे कीं, हीं स्वतंत्रपणें उच्चारिलीं असतां यांना नपुंसकलिंगी नामाशींच सांगडलें पाहिजे, अशी अवश्यकता मनास भासते. तेव्हां यांच्या योगानें कर्त्याविषयीं किंवा कर्माविषयीं विधान होत नाहीं, असें समजून यांना साजतील अशीं नपुंसक 'उद्देश्यपदें' अध्याहृत घ्यावयाचीं कीं काय? असेंच करणें प्रशस्त आहे असें मानिलें तर "रामानें रावणास मारिलें" या वाक्यांत 'मारणें' या उद्देश्याविषयीं विधान आहे असें समजून 'रामानें' व 'रावणास' हे दोनही **शब्द** विधेय-क्रियाविशेषणवाचकें केले पाहिजेत; व याप्रमाणेंच यांसारख्या इतर वाक्यांची व्यवस्था लाविली पाहिजे; आणि त्यांची अशी व्यवस्था लाविली तरच अशा वाक्यांच्या प्रयोगास मराठी व्याकरणकारांनीं दिलेलें भावीप्रयोग हें नांव चांगल्या रीतीनें शोभणार आहे. कोणत्याही प्रयोगांत क्रियापद कर्त्याच्या किंवा कर्माच्या अनुरोधानें असत नाही, नेहमीं नपुंसकलिंगी असतें, म्हणून त्यास भावी कां म्हणावें, हें समजत नाहीं. क्रियेचा भाव म्हणजे क्रियापदर्दर्शित क्रियावाचक नामशब्द जर अशा वाक्यांत 'उद्देश्य' किंवा 'कर्ता' केला तर त्या क्रियापदाला, मग तें सकर्मक असो किंवा अकर्मक असो, भावी, आणि तें ज्या वाक्यांत असेल त्याच्या प्रयोगाला भावी प्रयोग म्हणणें यथार्थ आहे. पण आमच्या मराठी वाक्यांच्या भावी प्रयोगाची कल्पना क्रियापदाच्या स्थाईक नपुंसकत्वावर सर्वथैव अवलंबून आहे इतकेंच नाहीं, तर **दादोबादिकांनीं** या 'भावी' चे 'सकर्मक भावी', 'अकर्मक भावी', आणि 'भावकर्तरी' असे उपभेदही करून टाकिले आहेत! आतां कोणी असे म्हणतील कीं त्यांनीं असें केल्याबद्दल त्यांस दोष देणें बरोबर नाहीं. संस्कृत भाषेंतील वाक्यांचे प्रयोगांचा विभाग करतांना जें तत्त्व पुढें ठेविलें असावें असें दिसतें, त्या तत्त्वावर मराठी वाक्यांच्या प्रयोगांचें वर्गीकरण पूर्णपणें केलें आहे असें समजूं नये. संस्कृत प्रयोगांचीं नांवें मात्र घेतलीं आहेत; संस्कृत वाक्यांतील प्रयोगप्रकरणांतर्गत विभाजक तत्त्व घेतलेलें नाहीं. मराठी वाक्यांत कर्तृगामी, कर्मगामी, व नपुंसक अशीं तीन प्रकारचीं क्रियापदें दिसतात, त्यांस अनुक्रमें कर्तरी, कर्मणी, आणि

भावी अशी नांवें देऊन टाकलीं. यावर आमचें इतकेंच उत्तर आहे कीं, हीं तीन नांवें संस्कृतांतील तीन प्रयोगांस ज्या कारणांस्तव दिलीं आहेत, त्या कारणांस्तव मराठींतील तीन प्रयोगांस तीं दिलीं नसतील, तर प्रयोगनिश्चय केल्यावर त्यांस कांहीं तरी नांवें दिलींच पाहिजेत, तेव्हां संस्कृत प्रयोगांचीं नांवें देण्यास तरी काय हरकत आहे, त्यांचीं लक्षणें स्वतंत्रपणें दिलीं म्हणजे झालें, असें समजून जर मराठी प्रयोगांचें नामाभिधान केलें असेल तर आमचें कांहींएक म्हणणें नाहीं. फार झालें तर येवढेंच म्हणतां येईल कीं ज्या नांवांनीं संस्कृतज्ञास एका प्रकारचा बोध होतो, तींच नांवें दुसऱ्या अर्थानें मराठींत न योजतां मराठी प्रयोगांचें लक्षण सुगम करण्यासारखीं दुसरीं नांवें ठेवतां येती. संस्कृत क्रियापदांच्या पाठीमागें लिंगांचें लचांड लागलेलें नाहीं; तें त्यांतील धातुसाधितांच्या मागें लागलें आहे; व संस्कृत धातुसाधितांवरून मराठी क्रियापदें साधलीं असल्यामुळें मराठी क्रियापदांपाठीमागें हें लिंगांचें लचांड लागून जाऊन वाक्यांच्या प्रयोगनिर्णयांत सर्वांहून श्रेष्ठ रक्कम होऊन बसलें आहे ! संस्कृतांत धातुसाधितें विशेषणासारखीं मानिलीं आहेत, व नामांताप्रमाणें विशेषणांत लिंगभेदेंकरून फिरत असल्यामुळें, संस्कृत धातुसाधित विशेषणांवरून साधलेलीं बहुतेक मराठी क्रियापदेंही लिंगभेदाप्रमाणें रूपांतरत्व पावूं लागलीं हें अगदीं साहजिक झालें.

वरील सर्व विवेचनावरून वाचकांच्या आतां हें पूर्णपणें लक्षांत आलें असेल कीं क्रियापदाच्या अनुगामित्वाप्रमाणें जर मराठी प्रयोगांची व्यवस्था लाविली, व त्या व्यवस्थेस धरून मराठी वाक्यांचें पृथक्करण करावयाचें म्हटलें, तर मराठी व्याकरणकारांनीं ज्यांना कर्तरी प्रयोग म्हटलें आहे त्यांतील कर्त्यांस, ज्यांना कर्मणी प्रयोग म्हटलें आहे त्यांतील कर्मास आणि ज्यांना भावी प्रयोग म्हटलें आहे त्यांतील क्रियापदांनीं सूचित क्रियादर्शक व भाववाचक अध्याहृत नामांस, मराठी वाक्यांचें पृथकरण करतांना ' उद्देश्य 'स्थानीं ठेऊन त्यांजविषयीं त्या त्या वाक्यांतील क्रियापदांनीं विधानें होतात, असें मानिलें पाहिजे. पण इंग्रजी किंवा संस्कृत प्रयोगप्रकरणाशीं मराठी प्रयोगप्रकरणाचें ऐकमत्य करून देण्यासाठीं अशा प्रकारचें मत सर्वांस पसंत पडेल असें वाटत नाहीं; आणि तें न पसंत पडणें हेंच बरोबर आहे; कारण क्रियापदांनीं खरोखरीच ज्या शब्दांविषयीं किंवा तद्दर्शित वस्तूंविषयीं विधान होत आहे असें दिसतें, त्या वस्तूंस, किंवा तद्वाचक शब्दांस, लिंगाच्या किंवा दुसऱ्या कोणत्याही अडचणीमुळें ' उद्देश्यपदें ' न करतां भलत्याच शब्दांस त्यांच्या जागीं ठेवणें हें कोणाही विचारी पुरुषास मान्य होणार नाहीं.

तेव्हां मग आतां करावें तरी काय ? संस्कृत किंवा इंग्रजी ' उद्देश्या 'प्रमाणें मराठी ' उद्देश्यपदें ' प्रथमांत असण्याची अवश्यकता नाहीं, व क्रियापदें लिंगादि गोष्टीत उद्देश्यानुगामी असलींच पाहिजेत असें मानण्याची गरज नाहीं, असें असेल तर मराठी वाक्यांतील उद्देश्यपदें पाहिजे त्या विभक्तींत असलीं तरी चालतील काय ? त्यांना कशाचाच आळा घालतां येणार नाहीं काय ? मराठीतील ' उद्देश्यपदें ' आणि ' क्रियापदें ' या उभयतांस समान असें कांहीच नाहीं काय ?—असे क्षोभक प्रश्न उत्पन्न होतात, व त्यांचें सर्वांस मान्य होण्यासारखें उत्तर देणें बरेंच कठिणही आहे. ज्या शब्दाविषयीं विधान करावयाचें असेल तो शब्द प्रथमा विभक्तींतच असला पाहिजे असें नाहीं, अशी मोकळीक एकदां दिली म्हणजे पाहिजे त्या विभक्तींत असलेल्या शब्दाविषयीं विधान करतां येईल, किंवा प्रत्यक्ष केलें जातें, असें कित्येकांचें म्हणणें पडेल. वाक्यांतील जो शब्द विचारांत प्रमुख असेल, व क्रियापदानें ज्याविषयीं विधान केलें जात आहे, असें वाचणारास किंवा ऐकणारास वाटत असेल, तो कोणत्याही विभक्तींत असला तरी त्या क्रियापदाचें ' उद्देश्य ' मानिलाच पाहिजे; आणि हा धोपट नियम एकदां स्वीकारिला कीं पाहिजे त्या विभक्तींतले शब्द ' उद्देश्य ' होऊं शकतील, असें मानणें भाग पडते. ' मुलें अभ्यास करतात ' यांत ' मुलें ' हा शब्द प्रथमा विभक्तींत असून ' उद्देश्य ' आहे, व त्याबद्दल कांहीं वाद नाहीं. आणि अशा प्रकारच्या इतर वाक्यांतील कर्तृस्थानीं असलेले प्रथमांत शब्द ' उद्देश्य ' मानण्यास हरकत दिसत नाहीं. मराठींत द्वितीया व चतुर्थी विभक्तींचे प्रत्यय एकच आहेत, तेव्हां उद्देश्यस्थानीं द्वितीयाविभक्त्यंत शब्द येऊं शकेल असें मानल्यास चतुर्थी विभक्त्यंतही येऊं शकेल असें मानिलेंच पाहिजे. किंवा कै० कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात त्याप्रमाणें या समप्रत्ययी दोन विभक्तींपैकी द्वितीया मराठींत मुळींच नाहीं, अशी कल्पना केली तरी निर्वाह होणार आहे. सर्व भाषांत सर्व विभक्ति असल्याच पाहिजेत, किंवा आहेत असें नाहीं. इंग्रजींत फक्त तीनच विभक्ति आहेत. प्राकृत भाषेंत चतुर्थी नाहीं; तिच्या जागीं षष्ठी येते. याच रीतीनें मराठींत द्वितीयेच्या जागी चतुर्थी येते, असें म्हणण्यास विशेष विरोध येईल असें वाटत नाहीं. अथवा द्वितीया विभक्ति ठेवणें अवश्य वाटल्यास हरएक प्रकारच्या कर्माचे विभक्तीस द्वितीया म्हणावें हें बरें दिसतें. शब्दास कोणताही प्रत्यय लागला असो किंवा नसो; दिसण्यांत त्याचें रूप प्रथमेसारखें दिसो किंवा चतुर्थीसारखें दिसो, जर तो कोणत्याही सकर्मक क्रियापदाचें किंवा धातुसाधिताचें कर्म असला, तर त्याची द्वितीया विभक्ति मानावी असें आम्हांस वाटतें. संस्कृतांत दोन अथवा अधिक विभक्तींचें कित्येक प्रत्यय तेच असतात, हें संस्कृतशास

ठाऊक असेलच. ' मुलांनी धडे केले ', ' धोंडोपंतांनीं मोतद्दारास मजकडे पाठवून दिलें ' या वाक्यांतील ' धडे ' आणि ' मोतद्दारास ' या शब्दांची द्वितीयाविभक्ति मानावी, हें प्रशस्त दिसतें. चालू रूढीप्रमाणें ' धडे ' या शब्दाची प्रथमा विभक्ति करून तिचा अर्थ करितात. असला द्राविडी प्राणायाम करीत बसण्यापेक्षां, ' धडे ' हा शब्द द्वितीयांत आहे असें मानण्यास काय हरकत आहे ? " रामौ रामौ " प्रमाणें " धडे धडे " अशीं प्रथमेचीं व द्वितीयेची अनेकवचनीं रूपें मानण्यास काय बाध आहे ? आतां तृतीया व चतुर्थी या विभक्ति कोणत्या प्रकारच्या वाक्यांत ' उद्देश्य ' होतात, हें पाहूं. ' रामानें रावण मारिला ' या या वाक्यांतील क्रियापद कर्मानुरोधी आहे. म्हणून त्याच्या प्रयोगास कर्मणी प्रयोग म्हणण्यास हरकत नाहीं, पण त्यांत विधान ' रावणा 'विषयीं नाहीं, ' रामा 'विषयीं आहे; कारण या वाक्यानें ' रामानें काय केलें ' हें सांगण्याचा मुख्य उद्देश दिसतो; ' काय झालें ' हें सांगण्याचा दिसत नाहीं. सबब या आणि अशा प्रकारच्या दुसऱ्या वाक्यांतील तृतीयांत कर्त्यास ' उद्देश्य ' मानण्यास हरकत दिसत नाहीं. त्याप्रमाणेंच ' रामानें रावणास मारलें ', ' गुरूंनीं मुलास पढविलें' इत्यादि वाक्यांतील तृतीयांत कर्त्यास कर्मणीप्रयोगांतील तृतीयांत कर्त्याप्रमाणें ' उद्देश्य ' मानावें. अशा प्रकारच्या तृतीयांत शब्दांखेरीज बाकीच्यांस तृतीयाविभक्तीचे दुसरे अर्थ लाऊन, ते विधेयक्रियाविशेषणवाचकें समजावे. अकर्मकर्तरी प्रयोगांतील कियापदाचा वास्तविक कर्ता तृतीया विभक्तींत असल्यास, व त्याविषयीं त्या क्रियापदानें विधान होत असल्यास, त्यासही ' उद्देश्य ' मानणें अवश्य आहे. ' माझ्यानें जाववतें ' इत्यादि शक्त्यर्थदर्शक वाक्यांतील तृतीयांत कर्त्यास ' उद्देश्य ' मानणें वावगें होणार नाहीं. अशाच प्रकारच्या ज्या सकर्म किंवा अकर्म कर्तरी प्रयोगांत तृतीयेच्या ठिकाणीं चतुर्थी घातली तरी चालते, अशा ठिकाणी क्रियापदांच्या योगानें चतुर्थ्यंत पदाविषयीं विधान होत असेल, तर त्यास ' उद्देश्य ' मानणें जरूर आहे. जो संशय उत्पन्न होतो तो ' मला आंबे पाहिजेत ' असल्या वाक्यांत होतो. असल्या वाक्यांत ' पाहिजेत ' या क्रियापदानें ' मला ' विषयीं विधान केलें आहे, किंवा ' आंब्यां ' विषयीं केलें आहे, याचा निर्णय करणें कठिण आहे. अशाच प्रकारची अडचण ' त्याला गांवास जावें लागतें ', ' मला त्यास पैसे द्यावे लागतात ' अशा प्रकारच्या वाक्यांच्या संबंधानेंही उत्पन्न होते. अशा ठिकाणीं दोनही रस्ते खुले असावे, हें बरें दिसतें. वाटेल त्यांनीं असल्या वाक्यांतील चतुर्थ्यंत पदांस ' उद्देश्य ' करावें, किंवा विधेयक्रियाविशेषणवाचक करावें. आम्हांस असल्या चतुर्थ्यंत शब्दांस क्रियाविशेषणवाचकें करावें हें बरें दिसतें. ज्या ठिकाणीं चतुर्थ्यंत शब्द ' उद्देश्य ' केल्यावांचून निर्वाहच होण्याचा संभव नसेल,

किंवा तो टाळण्यासाठीं वाक्याचा अर्थ विपरीत करावा लागून, विलक्षण शब्द अध्याहृत घ्यावे लागत असतील, अशा ठिकाणांशिवाय इतर सर्व ठिकाणीं चतुर्थ्यंत पदें क्रियाविशेषणवाचकें मानावीं, हें बरें दिसतें. वाक्याचा अर्थ करून त्यांत अमुक शब्दाविषयीं विधान केलें आहे असें ठरविल्यावर, तो कोणत्याही विभक्तीचा असला तरी त्याला 'उद्देश्य'स्थानीं ठेवण्यास वाक्यमीमांसकास मोकळीक असली पाहिजे हें जरी खरें आहे, तरी ही मोकळीक त्यानें कोठपर्यंत उपभोगावी यालाही कांहीं सीमा घातली पाहिजे. ती सीमा हीच कीं त्यानें वाक्याच्या अर्थावर व विधानावर नजर देऊन 'उद्देश्या'च्या जितक्या थोड्या विभक्ति होतील तितक्या करण्याचा प्रयत्न करावा. भाषेंतील लिंगाच्या व दुसऱ्या अडचणीमुळें 'उद्देश्यपदें' नेहमीं प्रथमा विभक्तींत असलीं पाहिजेत, असा नियम जरी घालतां येत नाहीं, तरी ज्याअर्थीं 'प्रथमे'शिवाय इतर विभक्तींस वाक्यांत दुसरीं कामेंही करावयाचीं असतात, त्याअर्थीं त्यांच्यावर प्रथमेचें काम जितकें कमी पडेल तितकें पडूं देण्याविषयीं खबरदारी ठेविली पाहिजे; नाहीं तर पाहिजे त्या वाक्यांत पंचम्यंत, षष्ठ्यंत, आणि सप्तम्यंत शब्दही 'उद्देश्य' होऊं लागतील. संस्कृतांत व इंग्रजींत प्रथमेनें जीं कार्यें होतात तीं मराठींत कधीं कधीं तृतीयेनें व चतुर्थीनें होतात, म्हणून मराठी व्याकरणकारांनीं कांहीं प्रयोगांत तृतीयांत व चतुर्थ्यंत शब्दांस कर्ते मानिले आहेत. हें त्यांचें करणें स्थूलमानानें वाक्यार्थास धरून होतें; व वाक्यपृथक्करणही ज्याअर्थीं वाक्यार्थावरच अवलंबून आहे, त्याअर्थीं त्यांत विशेषसा गोंधळ होत नसल्यास व्याकरणकारांनीं घातलेल्या सीमेचें उल्लंघन कां करावें हें समजत नाहीं. ज्या ठिकाणीं तसें केल्याशिवाय इलाज नसेल त्या ठिकाणी व्याकरणाचा मर्यादितपणा एकीकडे सारण्यास हरकत नाहीं; पण ज्या ठिकाणीं तशी अवश्यकता नसेल त्या ठिकाणीं भलत्याच शब्दावर नेट देत बसून आमच्या वाक्यांत त्याविषयींच विधान केलें आहे, असा आग्रह धरणें म्हणजे भाषेंत विनाकारण नवीन शंकांचा लोट आणणें होय. वाक्यपृथक्करण रूढ व्याकरणास धरून चाललें पाहिजे, व चालेल तितकें बरें. ज्या ठिकाणीं उभयतांत अपरिहार्य तेढ पडेल, त्या ठिकाणीं दोघांनीं दोन वाटा धरल्या तरी हरकत नाहीं. पण जर तशी स्थिति नसेल तर एकमेकांनीं एकमेकांच्या सलोख्यानें असावें हेंच योग्य आहे. अशानें व्याकरणापासून वाक्यमीमांसेला व वाक्यमीमांसेपासून व्याकरणाला, मदत मिळण्याचा व बळकटी येण्याचा संभव आहे. या दृष्टीनें विचार करतां प्रथमा, तृतीया, व चतुर्थी या विभक्तीशिवाय इतर विभक्ति उद्देश्यस्थानीं फार वेळ येऊं द्याव्या लागतील असें वाटत नाहीं. 'हिमालयांतून किंवा हिमालयापासून गंगा निघते', 'तिच्यापासून दोन महावीर

उद्भवले ', 'त्या हतभाग्य स्त्रीचीं तीन मुलें एके दिवशीं मेलीं ', 'पाण्यांत मासे राहतात ', 'चुलीत लांकडें जळतात ', 'ऑक्सीजनवायूंत विस्तव फार त्वरित पेट घेतो ', 'पाण्याच्या वेगानें पुष्कळ कामें करतां येतात ', 'माझ्या पसंतीस तुमचा मुलगा आला ', 'घरास दारें करावयाची आहेत '—इत्यादि वाक्यांतील क्रियापदांनी 'हिमालयांतून ', 'तिच्यापासून ', 'स्त्रीची ', 'पाण्यांत ', 'चुलींत ', 'वायूंत ', 'वेगानें ', 'पसंतीस ', 'घरास ' इत्यादि शब्दांविषयींच विधानें होत आहेत, कारण त्या त्या शब्दांविषयीं कांही सांगावें असा बोलणाराचा किंवा लिहिणाराचा उद्देश असलाच पाहिजे, निदान जेव्हां असेल तेव्हां तरी त्यांस 'उद्देश्यें ' मानिलीं पाहिजेत, असा एखाद्या तर्कटी वाक्यमीमांसकानें आग्रह धरिला, व "अस्माकूणां नैय्यायिकानां अर्थरि न तु शब्दरि तात्पर्यं " असा आपल्या तर्कशास्त्राचा डौल मांडिला, तर त्याच्यापुढें काय करावयाचें? तुमच्या अमर्याद तर्कशास्त्राशीं आमच्या मर्यादित व्याकरणशास्त्राचें जुगायचें नाहीं, असें त्याला सांगून त्याशीं वाद करणें सोडून दिलें पाहिजे. मराठी भाषेंत निरनिराळ्या विभक्तींस निरनिराळीं कामें नसतीं तर त्या साऱ्या तींत आल्याच नसत्या. त्या आल्या आहेत यावरून त्यांस पृथक् पृथक् कामें आहेत हें सिद्ध होतें. आतां कित्येक प्रसंगीं एका विभक्तीचें काम दुसऱ्या विभक्तीनें होतें व तेवढ्यापुरता तो तिचा हक्क कबूल करणें जरूर आहे. पण एवढ्यावरून असें होत नाहीं कीं पाहिजे त्या विभक्तीकडून पाहिजे तेव्हां पाहिजे तें काम करून घेतां येईल. वाक्यांद्वारा जीं कामें करावयाचीं तीं ठरीव आहेत; ठरीव कामास ठरीव साधनें असलीं तर ती उत्तमच व्यवस्था; पण दुर्दैवानें तशीं नसलीं तर निदान एका कामाचें साधन दुसऱ्या कामाकडे लावणें जितकें टाळवेल तितकें टाळण्याचा प्रयत्न केला पाहिजे. भाषेला सुलभता आणून तिचें उपयोगित्व वाढविण्यास दुसरा मार्ग नाहीं. यासाठीं पुढील वाक्यपृथक्करणांत प्रस्तुत व्याकरणास धरून प्रथमा, तृतीया, किंवा क्वचित् स्थळीं चतुर्थी या विभक्तींहुन इतर विभक्तींत असलेले शब्द बहुश: विधेयक्रियाविशेषणवाचकांसारखे मानिले आहेत, असें दिसून येईल.

हें वाक्यांविषयीं विशेष विचाराचें प्रकरण म्हणतां बरेंच लांबलें; तथापि त्याचा शेवट करण्यापूर्वी **संयुक्तक्रियापदां**विषयीं दोन शब्द लिहिले पाहिजेत. संस्कृतांतील कृदंतांवरून किंवा धातुसाधितांवरून मराठी क्रियापदें साधलीं आहेत, व संस्कृत वाक्यांत कृदतें किंवा धातुसाधितें पूर्ण क्रियापदांच्या जागीं घालून दुसऱ्यांचें काम पहिल्यांकडून करविण्यांत येतें, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. तसेंच, संस्कृताप्रमाणें मराठींत वर्तमानादि कालत्रयाचे निरनिराळे प्रकार दाख-

विणारीं क्रियापदें नाहीत, हेंही विसरतां कामा नये. वास्तविक पहातां वर्तमान, भूत आणि भविष्य या तीन प्रकारांहून काळाचे अधिक प्रकार करणें प्रशस्त आहे किंवा नाहीं, हा मतभेदाचा प्रश्न आहे. क्रियापदाबरोबर किंवा क्रियापदांच्या रूपावरून तद्दर्शित क्रियांच्या काळाचा बोध होतो, हें निर्विवाद आहे; पण त्या काळाच्या पूर्णत्वाचा, अपूर्णत्वाचा, किंवा रीतीचा बोध होतो किंवा नाहीं, हें संशयास्पद आहे. क्रिया पूर्ण किंवा अपूर्ण हें समजणें सोपें आहे; पण 'पूर्ण भूत', 'अपूर्ण वर्तमान', 'भूत भविष्य', 'वर्तमान भविष्य' किंवा 'भविष्य वर्तमान' असल्या शब्दांचा खरा अर्थ मनापुढें उभा करणें कठिण आहे. भविष्यकाळीं, वर्तमान काळीं, किंवा भूतकाळीं एखादी क्रिया पूर्ण किंवा अपूर्ण असेल, आहे, किंवा होती, हें समजण्यासारखें आहे; पण 'भविष्यभूत' म्हणजे काय समजावें? 'भविष्यांत' 'भूत' किंवा 'भूतांत' 'भविष्य' येणार कसा? जो 'भूत' तो 'भूत', व 'भविष्य' तो 'भविष्य.' 'भूतभविष्य' या शब्दसंयोगांत एका प्रकारची असंबद्धता दिसते. काळाचे हे विभाग मराठी व्याकरणकारांनीं इंग्रजी व्याकरणावरून घेतले आहेत. संस्कृताप्रमाणें मराठींत शुद्ध क्रियापदांचीं रूपें फार नाहींत; बहुतेक मराठी क्रियापदें विशेषणार्थक धातुसाधितांवरून साधलेलीं आहेत ही गोष्ट मराठीचे आद्य व्याकरणकार नेहमीं डोळ्यांपुढें ठेवते, व सर्वत्र इंग्रजी व्याकरणाचें अनकरण करण्यास प्रवृत्त न होते, तर मराठी कालप्रकरण इंग्रजी कालप्रकरणाहून तर काय, पण संस्कृत कालप्रकरणाहूनही सोपें होतें असें वाटतें. 'केलें', 'करतो' व 'करील' या तीन शब्दांच्या रूपांवरून तीन काळांचा बोध होतो, व तेवढे निराळे मानणें जरूर आहे. पण 'तो करीत आहे' या वाक्यांत 'करीत आहे' येवढें संयुक्त क्रियापद आहे असें मानून त्याचा 'अपूर्ण वर्तमान-काळ' समजण्याची काय अवश्यकता आहे? 'करीत' हें वास्तविक पहातां विशेषण आहे किंवा त्याच्या योगानें 'आहे' या क्रियापदानें स्पष्ट होणाऱ्या क्रियार्थाची रीती दाखविली जात आहे असें मानिलें, तर त्यास क्रियाविशेषण देखील मानितां येईल. 'करीत' यास विशेषण किंवा क्रियाविशेषण मानिलें म्हणजे वाक्यांत क्रियापदस्थानीं फक्त 'आहे' हा शब्द राहिला. 'आहे' या शब्दावरून पूर्णत्वाचा, अपूर्णत्वाचा, किंवा रीतीचा बोध होत नाहीं, फक्त वर्तमानकाळाचा बोध होतो. अशा रीतीनें धातुसाधितांचें व्याकरण करण्याचा प्रघात पडता, तर मराठींत संयुक्त क्रियापदांचा व काळांच्या अनेक प्रकारांचा निरर्थक घोंटाळा मुळींच न येता. पण तो आला आहे इतकेंच नाहीं, तर तो पुष्कळांना मान्यही झाला आहे. शिवाय, ज्याअर्थी या देशांत प्रस्तुत कालीं मराठी व्याकरणापेक्षांही इंग्रजी व्याकरणाचा अभ्यास विशेष काळजीनें करणें पुष्कळांस भाग पडत आहे, व इंग्रजी व्याकरणांत संयुक्त क्रियापदें व काळाचे अनेक प्रकार ठाम होऊन

बसले आहेत, त्याअर्थी मराठींत संयुक्त क्रियापदें आणि काळाचे अनेक प्रकार राहूं देण्याचा प्रयत्न चालेल, असें वाटतें. दुसरें असें आहे कीं, जेव्हां कोणतीही गोष्ट अस्तित्वांत येऊन सर्वमान्य होऊं लागते, तेव्हां तसें होण्यास कांहीं तरी योग्य कारणें होत असलीं पाहिजेत असें मानावें लागतें. संस्कृत व्याकरणांत 'वर्तमान', 'भूत' व 'भविष्य' येवढ्या तीनच काळांसाठीं क्रियापदांचीं रूपें आहेत असें नाहीं. या तीन प्रकारांहून काळाचे अधिक प्रकार मानले जाऊन, क्रियापदांच्या रूपांबरोबर त्यांचा बोध होईल, अशा रीतीनें क्रियापदांच्या रूपांत फेरफार करीत गेल्यामुळें, संस्कृत भाषेंतही एक प्रकारचीं संयुक्त क्रियापदें अस्तित्वांत आलीं आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. 'अकरोत्', 'चकार', 'अकार्षीत्' हीं भूतकाळाच्या तीन प्रकारांचीं तीन पृथक् रूपें आहेत. मराठींत यांचें भाषांतर 'केलें', 'करता झाला' व 'केलें आहे' असें होईल, व इंग्रजींत पहिल्या दोहोंचें "Did" ('डिड्' म्हणजे 'केलें') व तिसऱ्याचें "Has done" ('हॅज् डन्' म्हणजे 'केलें आहे') असें एका शुद्ध व एका संयुक्त क्रियापदानें करावें लागेल. तेव्हां मुख्य प्रश्न असा आहे कीं संस्कृतांत किंवा इंग्रजींत तरी भूतादिकांचे पोटभेद कशासाठीं अस्तित्वांत आले ? यावर कोणी असें म्हणतील कीं हे सगळे व्याकरणकारांचे प्रताप आहेत ! नाहीं नाहीं ते प्रकार कल्पून व्याकरणकार व्याकरणास काठिण्य आणितात ! आमच्या मतें हें बोलणें बरोबर होणार नाहीं. भाषेंत नवीन शब्द करून घालणें किंवा असलेल्या शब्दांचीं रूपें फिरविणें हें काम व्याकरणकार करीत नसतात; व्याकरणकारांहूनही ज्यांची योग्यता व उपयुक्तता मोठी आहे अशा उत्तम उत्तम कवींचें, वक्त्यांचें, व शास्त्रीय ग्रंथ लिहिणारांचें हें काम आहे. ते भाषेस हवी तशी नाचवितात, व हवे तसले प्रयोग योजून जातात. त्यांनीं योजलेले प्रयोग रूढ झाले म्हणजे त्यांचे वर्ग करून त्यांना नांवें देणें, व नवीन शिकणारास ते समजण्यास सुलभ होतील, अशा प्रकारची त्यांची व्यवस्था लावणें हें व्याकरणकाराचें नम्र कर्तव्य आहे. याहून पलीकडे तो जाऊं इच्छित नाहीं व त्यानें तशी इच्छा केली तरी ती सफल होण्याचा संभव नाहीं. 'खरडे लिहिण्यास बसत जा', 'तो मुलगा साताऱ्याहून पळून गेला', 'आम्हीं असलीं कामें आज कित्येक वर्षें करीत आलों आहों', 'रामशास्त्र्याच्या हातून सुद्धां असले क्षुल्लक प्रमाद नित्य होत जात असले पाहिजेत' इत्यादि वाक्यांत 'जा', 'गेला',

'आहों' व 'पाहिजेत' या शब्दांस क्रियापदें मानून त्यांच्याशीं लगटलेल्या 'बसत', 'पळून', 'करीत आलों', 'होत जात असले' वगैरे शब्दांस विशेषणांखालीं, किंवा क्रियाविशेषणांखालीं आणून टाकल्यास, क्रियापदास साधेपणा आणि व्याकरणास सुगमता आणल्यासारखें होईल खरें; पण तसें करण्यांत अर्थाचा अनर्थ न होऊं देण्याबद्दलही काळजी घेतली पाहिजे. नामें, विशेषणें, क्रियाविशेषणें--इत्यादिकांचे अर्थ ज्याप्रमाणें कधीं कधीं एकाच शब्दानें स्पष्ट होत नसल्यामुळें, दोन अथवा अधिक शब्दांचा उपयोग करावा लागतो, म्हणजे ज्याप्रमाणें अनेक प्रसंगीं मिश्र किंवा संयुक्त अर्थ प्रदर्शित करण्यासाठीं नामार्थक, विशेषणार्थक, आणि क्रियाविशेषणार्थक वाक्यांश किंवा वाक्यें यांचा उपयोग करावा लागतो, त्याप्रमाणें मिश्र किंवा संयुक्त क्रियार्थ दाखविण्यासाठीं एकाहून अधिक शब्द योजण्याची मोकळीक कां नसावी? व अशा प्रकारें योजलेल्या शब्दसमूहांस संयुक्त क्रियापदें किंवा क्रियापदार्थक वाक्यांश म्हणण्यास प्रत्यवाय कां असावा? दोन अथवा अधिक शब्द एकांत एक लपेटले जाऊन जर त्यांपासून एकाच क्रियार्थाचा बोध होत असेल, तर त्या सर्वांस क्रियापद कां मानूं नये? या दृष्टीनें विचार करतां कोणत्याही भाषेंत संयुक्त क्रियापदें येणें ही यादृच्छिक गोष्ट नाहीं तर आवश्यक गोष्ट आहे, व तीं मराठींतही आलीं आहेत ही खेदाची तर नाहीं, तर उलट आनंदाची बाब आहे, असें मानिलें पाहिजे. मात्र व्याकरणकारांनीं येवढें केलें पाहिजे कीं, एकदां संयुक्त क्रियापदें कबूल केल्यावर तीं कितीही मोठीं झालीं तरी तीं पत्करण्यास डगमगतां कामा नये. अमुक प्रकारच्या शब्दांनींच संयुक्त क्रियापदें होतात, किंवा संयुक्त क्रियापदांत अमुकच शब्द असावेत, अधिक असूं नयेत, अशा प्रकारचे प्रतिबंध ठेवणें बरोबर नाहीं. ज्या व जितक्या शब्दांनीं क्रियार्थाचा बोध होत असेल, तेवढ्या सार्‍यांस क्रियापद मानणें अवश्य आहे. 'ती पुण्यास जावयाची' यांत 'जावयाची' हें क्रियापद कां न करावें हें समजत नाहीं. 'जावयाची' हें विशेषण करून 'आहे' हें अध्याहृत क्रियापद सांगत बसण्यांत काय नफा आहे? ज्या शब्दांपासून विशेषणांचा किंवा क्रियाविशेषणांचा अर्थ स्पष्टपणें निघत असेल, त्यांस क्रियापदांत निष्कारण गोंवून टाकून, संयुक्त क्रियापदांची संख्या उगीच वाढवावी, असें कोणीही म्हणणार नाहीं. पण ज्या शब्दांपासून कोणत्याही वाक्यांत क्रियार्थ उत्पन्न होत असेल, त्यांना त्या वाक्यांत क्रियापदें करण्यास काय हरकत आहे? इतर ठिकाणीं किंवा इतर वाक्यांत असले शब्द इतर शब्दवर्गांत पडत असले, म्हणून ज्या वाक्यांत त्यांपासून क्रियार्थ उत्पन्न होत असेल, त्यांत त्यांस क्रियापदें न

करणें म्हणजे व्याकरणाचें अर्थानुगामित्व काढून घेऊन अर्थाला व्याकरणगामी करण्यासारखें आहे. असा प्रकार कोणालाही पसंत होण्यासारखा नाहीं, व म्हणून तो रूढ होण्यासारखाही नाहीं. तेव्हां मराठींत संयुक्त क्रियापदांचें जे प्रकरण आलें आहे तें ठीकच आहे. पण वर निर्दिष्ट केलेल्या कारणांसाठीं त्यांची व्याप्ति या पुस्तकांत, तर्खडकर, चिपळूणकर व गोडबोले वगैरे कं० विद्वानांनीं आपापल्या पुस्तकांत मानिलेल्या व्याप्तीहून थोडीशी अधिक मानिली आहे.



# भाग दुसरा

## वाक्यांचे भेद

**व्याकरणांत वाक्यांच्या रूपावरून त्यांचे तीन भेद करतात.**

ज्या वाक्यांत कशाविषयीं कांहीं तरी सांगितलें असतें, म्हणजे ज्यांत क्रियापदानें कशाविषयीं तरी विधान होत असतें, त्यास **विधानार्थक** वाक्य म्हणतात. उदाहरणार्थ 'गतवर्षी पुष्कळ पाऊस पडला', 'त्यांच्या शेतांत ऊंस पिकतो', 'पुण्यास बंदुकीच्या दारूचा कारखाना आहे', 'आमचे वडील नित्य गीता म्हणतात', 'चिमणी आपल्या पिलांस फार जपते' इत्यादि वाक्यांत क्रियापदानें विधान केलें जात आहे, म्हणून या आणि अशा प्रकारच्या इतर वाक्यांस 'विधानार्थक' वाक्यें म्हटलें पाहिजे. ज्या वाक्यांत अशा प्रकारें विधान न करतां, कांहीं प्रश्न विचारलेला असतो, त्यांस **प्रश्नार्थक** वाक्यें म्हणतात. उदाहरणार्थ 'पायबंद तोडून आमचा घोडा कोणीकडे पळाला ?', 'या वाटेनें तुम्ही एखादी काळी गाय पाहिलीत काय ?', 'तुमचे भाचे मुंबईस काय करीत असतात ?', 'मुलानों, तुम्ही आपले धडे तयार केलेत काय ?', वगैरे वाक्यांत कांहीं माहिती मिळण्याच्या हेतूनें प्रश्न केले आहेत, म्हणून त्यांस 'प्रश्नार्थक' वाक्यें म्हणतात. वाक्यांचा आणखी एक भेद आहे, त्यांस **आज्ञार्थक** वाक्यें म्हणतात. यांत विधान किंवा प्रश्न करण्याचा उद्देश नसतो. यांतील क्रियापदाच्या रूपावरून कोणास कशाविषयीं तरी आज्ञा किंवा हुकूम केला जात आहे, असा बोध होतो. उदाहरणार्थ 'चूप बस, माझें कर्तव्य मला करूं दे', 'कोसॅक, तूं या गृहस्थाला प्लेव्ह्‌ना येथें पोंचवून दे', 'परमेश्वरा, आमच्याकडे करुणार्द्र दृष्टीनें पहा', 'महाराजांनीं येवढी कृपा करावी', 'भगवंता, येवढें मला चुडेदान दे', 'मुली, त्यांना कुंकूं लाव' इत्यादि वाक्यांपासून आज्ञा, प्रार्थना वगैरेंचा बोध होतो म्हणून यांस 'आज्ञार्थक' वाक्यें म्हणतात. या 'आज्ञार्थकांतच' अनुज्ञा, विधि वगैरेंचा समावेश करणें प्रशस्त आहे. 'प्रार्थना', 'विनंती', 'अनुज्ञा' वगैरे आज्ञेचेच प्रकार आहेत हें ध्यानांत न ठेवल्यामुळें, कित्येकांनीं वाक्यांचें भेदप्रकरण विनाकारण विस्तृत केलें आहे. वाक्यांचे उपभेद करण्याची त्यांची जी पद्धत आहे तीप्रमाणें पांच किंवा सहा भेद न करतां शेंकडों भेद करतां येतील. या अनेक भेद करीत बसण्याच्या हौसेचें हास्यास्पद उदाहरण पाहिजे असेल तर **काव्यादर्शां**तील उपमालंकारांचें भेदानंत्य पहावें.

हे व्याकरणकृत वाक्याचे भेद येथें सांगण्याचें कारण येवढेंच कीं, यांपैकीं पहिल्यास म्हणजे 'विधानार्थक' वाक्यांच्या पृथक्करणास जे नियम लागू पडतात, त्यांवरून इतरांचें पृथक्करणही करतां येतें; म्हणून पुढें जीं अनेक उदाहरणें घेतलीं जातील तीं बहुधा 'विधानार्थक' वाक्यांचीं घेतलीं जातील. पण त्यांवरून कोणी असें समजतां कामा नये कीं, जे नियम 'विधानार्थक' वाक्यांस लागतात, ते इतरांस लागत नाहीत. 'विधानार्थक' वाक्यांचींच उदाहरणें फार घेण्याचें कारण असें आहे कीं मनुष्यास अन्योन्यव्यवहारांत 'आज्ञा' किंवा 'प्रश्न' यापेक्षां 'विधान' करण्याचा प्रसंग फार पडतो. माहिती देणें, कांहीं तरी कळविणें—हें भाषेचें मुख्य काम होय; व या कामास अत्युपयोगी 'विधानार्थक' वाक्यें आहेत, म्हणून वाक्यमीमांसक यांविषयींच विशेष चर्चा करितात.

'विधानार्थक' वाक्यांचे **सत्तावाची** आणि **निषेधवाची** असे पोटभेदही करण्याची चाल आहे. 'मला आंबा आवडतो', 'तो मुलगा हुषार आहे', 'अफूनें झोंप येते' इत्यादि वाक्यें 'सत्तावाची' आहेत. 'त्याला कोणाशीं बोलणें आवडत नाहीं', 'या मुलाच्या पोटांत आतां रोग राहिला नाहीं', 'शिवाजी निष्कारण क्रूरपणा करीत नसे' इत्यादि वाक्यें 'निषेधवाची' आहेत. दादोबांनी आपल्या मोठ्या व्याकरणांत क्रियापदांचें 'करणरूप' आणि 'अकरणरूप' म्हणून जो भेद केला आहे तोच हा. याविषयीं येथें याहून विशेष लिहिण्याची गरज नाही.

कोणी कोणी 'विधानार्थक' व 'संकेतार्थक' असे वाक्यांचे दोन भेद कल्पून, मग त्यांचे पोटभेद करतात. पण त्यांचा येथें विचार करण्याची मुळींच गरज नाहीं; कारण व्याकरणकार ज्यांना 'संकेतार्थक' वाक्यें म्हणतात तीं वाक्यपृथक्करणाच्या दृष्टीनें केलेल्या एका भेदांत येतात.

**वाक्यपृथक्करणासाठीं वाक्यमीमांसक वाक्यांच्या अर्थावरून त्यांचे मुख्य तीन भेद करतात. त्यांपैकीं पहिल्यास शुद्ध, दुसऱ्यास मिश्र, आणि तिसऱ्यास संयुक्त म्हणतात.**

कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं आपले व्याकरणांत वाक्यांचे 'शुद्ध' आणि 'संयुक्त' असे दोनच भेद कल्पून 'संयुक्ताचे' 'उभयप्रधान' व 'गौणप्रधान' असे पोटभेद केले आहेत. एका दृष्टीनें हा वाक्यविभाग बरा आहे. तो येथें न घेण्याचें कारण असें कीं, एक तर ज्या संज्ञा पुनः तोंडीं यावयाच्या, त्या उच्चारास सोप्या आणि समजण्यास सुगम अशा असाव्या. 'उभयप्रधान' व 'गौणप्रधान' या तशा नाहींत. दुसरें, ज्या शब्दांनीं कोणत्याही पारिभाषिक संज्ञेचा अर्थ स्पष्ट करावयाचा असतो किंवा तिजविषयीं विशेष विवेचन करावयाचें असतें, ते शब्द,

जमेल तर, त्याच संज्ञेंत न यावेत हें इष्ट असतें. वाक्यांच्या भेदांचें विवेचन करतांना 'गौण' आणि 'प्रधान' या शब्दांचा वारंवार उपयोग करावा लागतो; म्हणून त्यांवरूनच त्या भेदांचीं नांवें साधणें ठीक नाहीं.

**ज्या वाक्यांत एकच पूर्ण क्रियापद असून एकाच शब्दाविषयीं विधान असतें त्यास शुद्ध वाक्य म्हणतात.**

'त्याला तें आमिष सोडवेनासें झालें', 'त्यानें आपल्या पत्नीला कादंबरी कन्या मागें ठेविली', 'तुम्हां राजद्रोह्यांना मी भेटूं इच्छित नाहीं', 'यक्षकन्येला तुला भेटणें नको', 'आम्हां स्त्रियांची संगती, बरी नव्हेगा मेदिनीपति'; इत्यादि वाक्यांपैकीं प्रत्येकांत एका वस्तूविषयीं किंवा ती दाखविणाऱ्या शब्दाविषयीं क्रियापदानें फक्त एकच विधान केलें आहे म्हणून हीं सर्व शुद्ध वाक्यें होत. 'शुद्ध' वाक्यांत एकच **उद्देश्य** आणि एकच **विधेयक्रियापद** असतें. ज्या क्रियापदानें कोणत्याही 'उद्देश्या'विषयीं कांहीं तरी विधान होत असतें, त्यास **विधेयक्रियापद** म्हणतात. पूर्वीं एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें शुद्ध वाक्याचें पृथक्करण करतांना '**उद्देश्य**' आणि '**विधेय**' असे दोनच अवयव केले, तर त्यांपैकीं प्रत्येकांत शब्दांच्या सात वर्गांपैकीं निरनिराळ्या वर्गांतील कमी अधिक शब्द असण्याचा संभव आहे. त्यांपैकीं क्रियापदाशिवाय दुसऱ्या कोणत्याही वर्गांतील शब्दास विधान करण्याचें सामर्थ्य नाहीं. तेव्हां समग्र विधेयांतून 'क्रियापद' शब्द निराळा काढून, त्याला 'विधेय क्रियापद' अशी निराळी संज्ञा दिली असतां पुढील विवेचन सोपें होतें. 'विधेय क्रियापद' म्हणजे विधान करणारें क्रियापद. कोणत्याही उद्देश्याचें 'विधेय' म्हणजे त्याविषयीं जें म्हणावयाचें असेल तें म्हणण्यासाठीं योजिलेला शब्दसमूह बराच मोठा असण्याचा संभव आहे. पण त्यांत विशेष महत्त्वाचा शब्द क्रियापद असतो; कारण बाकीच्यांना त्या क्रियापदामुळें 'विधेयता' येत असते. यासाठीं कोणत्याही वाक्याचें सविस्तर पृथक्करण करतांना सर्वांआधीं 'विधेय क्रियापद' काय आहे, हें पहावें लागतें. त्यानंतर 'उद्देश्य' ठरवायाचें. हीं दोन ठरलीं कीं पुढचा पल्ला तेव्हांच येतो. 'उद्देश्यपद' आणि 'विधेय क्रियापद' हीं वाक्यपृथक्करणरूप मानसिक 'खो खो' चे दोन खुंट आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं !

**मिश्र** वाक्यांत एक मुख्य **उद्देश्य** व एक मुख्य **विधेय** असून दोन अथवा अधिक पूर्ण क्रियापदें असतात.

'ज्यावर तुझें प्रेम बसलें आहे तो आजारी आहे', 'ज्या घोड्यावरून तो गेला तो काळा आहे', 'तो पडला तेथेंच राहिला', 'मी जागा झालों तेव्हां सहा वाजले होते', 'मी काय करीन तें मला आतां सांगवत नाहीं', 'त्यानेंच

तें केलें हें उघड आहे', 'तुम्हांला असें वाटतें यांत तुमची चूक आहे' इत्यादि वाक्यांपैकी प्रत्यंकांत एकेक प्रधान किंवा मुख्य उद्देश्य व विधेय असून, दोन दोन पूर्ण क्रियापदें आहेत. शेवटच्या वाक्यांत 'चूक' हें मुख्य 'उद्देश्य' व 'आहे' हें मुख्य 'विधेय' असून, वाटतें' व 'आहे' अशी दोन पूर्ण क्रियापदें आहेत. 'तुम्हांला असें वाटतें' या पहिल्या वाक्यांत स्वतंत्र उद्देश्य व विधेय आहे; पण तें सारें वाक्य त्यानंतर आलेल्या 'यांत' शब्दासह पुढल्या वाक्याचें क्रिया-विशेषण झालें आहे. तेव्हां साऱ्या वाक्यांत एकच मुख्य **उद्देश्य** व एकच मुख्य **विधेय** आहे, असें म्हणण्यास हरकत नाही. जें वाक्य दुसऱ्या वाक्याचा अवयव झालेलें असतें, म्हणजे नाम, विशेषण, किंवा क्रियाविशेषण होऊन त्याचें तें तें कार्य करीत असतें, अशा वाक्यास **अवलंबी** वाक्य म्हणतात. कासाराच्या दुकानांत एकांत एक घालून ठेविलेल्या पितळेच्या डब्यांप्रमाणें किंवा पातेल्यांच्या गंजाप्रमाणें **मिश्र** वाक्याची कल्पना आहे. एका मोठ्या डब्यांत पाहिजे तर एकांत एक पांचसहा डबे बसवितां येतील, किंवा एकाजवळ एक असे दोन तीन लहान डबेंही बसवितां येतील. हे आंतले डबे कोणत्याही रीतीनें बसविलेले असोत; जोंपर्यंत त्यांचा थोरल्या डब्यांत समावेश होत आहे, तोंपर्यंत ते त्याच्या पोटांत येतात, असें म्हणण्यास हरकत नाहीं. याच रीतीनें **मिश्र** वाक्यांतील 'अवलंबी' वाक्यांची स्थिति आहे.

**संयुक्त वाक्यांत दोन अथवा अधिक (शुद्ध किंवा मिश्र) वाक्यें जोडलेलीं असतात.**

'मी जागा झालों आणि एकदम उठलों', 'सूर्य बराच वर आला आहे, पण तो ढगांनी आच्छादलेला आहे', 'त्या पक्ष्यास कोणी तरी गोळी घातली असावी, किंवा काठीनें मारलें असावें', 'ज्याच्यापाशी पैसा असतो त्याला शिकावेंसें वाटत नाहीं, आणि ज्याला शिकावेंसें वाटत असतें त्याला द्रव्याची अनुकूलता असत नाहीं',

'शुक्रवरें नळ गेला शिरला अंतःपुरीं सुखें सुरसा।'

हीं सर्व दोन 'संयुक्त' वाक्यें आहेत. यांतील चवथें 'संयुक्त' वाक्य दोन 'मिश्र' वाक्यांनी झालेलें आहे. मिश्र वाक्यांतील अवलंबी वाक्यांचा प्रधान वाक्यांत ज्याप्रमाणें समावेश होतो, त्याप्रमाणें या संयुक्त वाक्यांतील अवयवांची स्थिति नाहीं. त्यांपैकीं प्रत्येक स्वतंत्र असतें. एकानें दुसऱ्याच्या अर्थाला कोणत्याही प्रकारची मदत होत नसते. इमारतीचे खांब किंवा आगगाडीचे लोखंडी रूळ जसे एकमेकांस समांतर असून स्वतंत्र असतात, परंतु एके ठिकाणीं जखडले जाऊन समाईक कार्य करीत असतात, त्याप्रमाणें संयुक्त वाक्यांतील पोटवाक्यें स्वतंत्र असून विवक्षित अर्थ उत्पन्न करण्याचें काम करीत असतात. पुस्तकांतील

पानें, अडकित्त्याचीं पातीं, गाडीचीं चाकें, किंवा कागदावर काढलेल्या ओळी— यांसारखी 'संयुक्त' वाक्यांतील पोटवाक्यांची मांडणी असते, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**'शुद्ध', 'मिश्र', व 'संयुक्त' यांशिवाय 'संकुचित', व 'संक्षिप्त' अशीं दोन प्रकारचीं वाक्यें आहेत.**

वास्तविक पहातां यांना निराळें काढण्याची गरज नाहीं; कारण 'संकुचित' वाक्यांचा 'संयुक्त' वाक्यांत व 'संक्षिप्त' वाक्यांचा 'शुद्ध' किंवा 'मिश्र' वाक्यांत समावेश करतां येतो. 'संकुचित' वाक्यांत एकच शब्द दोन वेळां येऊं नये म्हणून तो एका वाक्यांत गाळलेला असतो; जसें 'माझें धोतर व जाकीट कोठें आहे?' म्हणजे 'माझें धोतर कोठें आहे?' व 'माझें जाकीट कोठें आहे?' शेवटल्या दोन वाक्यांचा संकोच न केल्यामुळें 'माझें', 'कोठें', व 'आहे' हे शब्द दोनदां लिहावे लागले. 'संक्षिप्त' वाक्यांत सामान्य शब्दच गाळिला असतो, असा नियम नाहीं. वाक्याच्या धोरणावरून जो शब्द सहज समजण्यासारखा असतो तो गाळलेला असतो. जसें, 'ते जितकी माझ्यावर तितकी मी त्यांच्यावर ममता करितों.' यांत, 'ममता करितात' हे दोन शब्द गाळले आहेत. 'माझें धोतर व जाकीट कोठें आहे', हें 'संयुक्त' वाक्य आहे. दुसरें 'ते जितकी' इत्यादि 'मिश्र' वाक्य आहे. 'तो माझ्याहून उंच आहे' यांत खरोखरी दोन वाक्यांचा संकोच आहे, तरी यास 'शुद्ध' वाक्य म्हणतां येईल.

## १. शुद्ध वाक्य

**ज्या वाक्यांत एक उद्देश्य व एक विधेय असतें त्यास शुद्ध वाक्य म्हणतात;**

उ० 'चंद्रजोतीचा प्रकाश चांदण्यासारखा पडतो'; 'ग्रह आपापल्या कक्षेंत सूर्याभोंवतीं फिरतात'; 'तारे स्वयंप्रकाश आहेत'; 'शेंडेनक्षत्रास तेजोमय शेंपूट असतें'; 'ताऱ्यांचें एकमेकापासून अंतर कमी अधिक होत नाहीं'; 'सूर्याचे किरण हवेंतून येतांना वांकडे होतात', 'मनुष्याच्या उच्छ्वासांतून कॅर्बानिक ॲसिड ग्यास निघत असतो.'

या सर्व वाक्यांपैकीं प्रत्येकांत एकेका वस्तूविषयीं एकेक विधान केलें आहे; म्हणून हीं सारीं शुद्ध वाक्यें होत. यांपैकीं कोणतेंही वाक्य फक्त दोन शब्दांनीं झालेलें नाहीं. शुद्ध वाक्यास निदान दोन शब्द तरी पाहिजेत, हें मागें सांगितलेंच आहे. आतां असा प्रश्न आहे कीं, शुद्ध वाक्यास जर दोन शब्द अवश्य आहेत तर त्याची शुद्धता न मोडूं देतां त्यांत दोहोंपेक्षां किती अधिक शब्द घालतां येतील? त्याचें उत्तर असें आहे कीं, शुद्ध वाक्याचें शुद्धत्व न गमावतां त्यांत हव्या तितक्या शब्दांची योजना करतां येईल. यावर कोणी अशी शंका घेईल

कीं, वाक्य जर पाहिजे तितकें लांबवितां येण्यासारखें आहे, तर 'मिश्र' व 'संयुक्त' वाक्यांचें प्रयोजन काय? त्यावर प्रत्युत्तर असें आहे कीं 'शुद्ध' वाक्यांत शब्दांची फार खिचडी झाली असतां त्याला दुर्बोधता येते इतकेंच नाहीं, तर कधीं कधीं इष्ट अर्थाहून भलताच अर्थ त्यापासून उत्पन्न होऊं लागतो. सर्वच अर्थ एका शब्दानें व्यक्त करण्यासारखे नसतात; निदान तसें करण्यास फार त्रास पडतो; म्हणून कधीं एक अर्थ व्यक्त करण्याकरितां संबंध वाक्य घालावें लागतें. 'तुमचा मन लावून केलेला अभ्यास तुम्हांस फलदायक होईल', हें शुद्ध वाक्य आहे. पण या वाक्यानें व्यक्त होत असलेला अर्थ 'तुम्ही मन लावून अभ्यास कराल तर तो तुम्हांस फलदायक होईल' या मिश्र वाक्यांत जितक्या सुगमतेनें स्पष्ट होतो, तितक्या सुगमतेनें पहिल्या संकुचित शुद्ध वाक्यांत होत नाहीं. कोणताही विचार 'शुद्ध', 'मिश्र' किंवा संयुक्त' वाक्यांत व्यक्त करणें बोलणाराच्या किंवा लिहिणाराच्या खुशीवर आहे. अगदीं सोपें लिहिण्याबद्दल व बोलण्याबद्दल ज्यांची प्रसिद्धि आहे, ते बहुधा 'शुद्ध' वाक्यांचा फार उपयोग करतात. तथापि पुष्कळदां कठिण विचार स्पष्ट करतांना त्यांना देखील 'मिश्र' व संयुक्त' वाक्यांचा आश्रय अपरिहार्य होतो.

शुद्ध वाक्यांत एकाहून अधिक पूर्ण क्रियापदें न येऊं देतां, व एकाहून अधिक उद्देश्यांविषयीं विधान न करतां तें पाहिजे तितकें कसें लांबवितां येतें, हें आतां पहावयाचें. 'नग्न' किंवा 'पंजरसम' द्विशब्दात्मक शुद्ध वाक्यांत निदान एक नाम व एक क्रियापद असे दोन अवयव पाहिजेत. या अत्यवश्य अवयवद्वयास 'प्राथमिक', 'अग्रच', 'आद्य' किंवा 'मुख्य' अवयव म्हणतां येईल. 'घोडा पळतो', 'गाय हंबरते', 'लोणी वितळतें', 'पाणी तापतें' इत्यादि वाक्यांतील अवयवांस 'प्राथमिक' अवयव म्हटलें पाहिजे. यांपैकीं प्रत्येकांतील उद्देश्यस्थानीय शब्द नाम आहे, व विधेयस्थानीय शब्द क्रियापद आहे, व हे दोन्हीही वाक्याच्या अस्तित्वास अवश्य आहेत. यावरून काय उघड झालें की शुद्ध वाक्यांतील 'उद्देश्य' नाम आणि 'विधेय' क्रियापद हे त्याचे 'प्राथमिक' अवयव होत. असल्या शब्दांशिवाय दुसरे शब्द 'शुद्ध' वाक्यांत आले तर ते त्याचे 'प्राथमिक' अवयव होऊं शकत नाहीत. ते 'उद्देश्याचे' किंवा विधेयाचे 'अनुषंगी' किंवा 'सहकारी' असतात. नामाशिवाय व क्रियापदाशिवाय त्यांना गति नाहीं. ते वाक्यविस्तार करण्यास फार उपयोगी आहेत हें खरें, पण त्यांना स्वतंत्रपणें कांहीं एक करतां येत नाहीं. नेहमीं त्यांना नामाच्या किंवा क्रियापदाच्या अंगभूत असावें लागतें. शुद्ध वाक्यांत जे शब्द 'उद्देश्य' नामाच्या अंगभूत असतात ते त्याचीं विशेषणें असतात; व जे शब्द विधेयक्रियापदाच्या अंगभूत असतात, ते त्याचीं क्रियाविशेषणें असतात. नामाच्या व क्रियापदाच्या या

अंगभूत किंवा अनुषंगी अवयवांस 'सहकारी' ही संज्ञा बरी दिसते. तेव्हां आतां 'शुद्ध' वाक्यांतील साऱ्या शब्दांचे दोन वर्ग झाले; पहिला 'प्राथमिक', व दुसरा 'सहकारी'. प्राथमिक अवयव म्हणजे 'उद्देश्य नाम' आणि 'विधेय-क्रियापद', व सहकारी अवयव म्हणजे 'विशेषणें' आणि 'क्रियाविशेषणें'.

'उद्देश्य' स्थानीं नेहमीं नामच यावयाला पाहिजे असा नियम नाहीं. कोणताही नामार्थक किंवा वेळेपुरता नामाचें कार्य करणारा शब्द आला तरी चालतो. नामाचीं कार्यें करणारे मुख्य दोन शब्द आहेत; सर्वनामें आणि धातु-साधित नामें. तेव्हां उद्देश्यस्थानीं सर्वनाम किंवा धातुसाधित नाम घालण्यास हरकत नाहीं. वाक्यपृथक्करण समजण्याची ज्यांना इच्छा असेल त्यांनीं ही गोष्ट पक्की लक्षांत ठेविली पाहिजे कीं वाक्यपृथक्करणांत किंवा वाक्यमीमांसेंत शब्दांच्या रूपापेक्षां त्यांच्या अर्थावर विशेष नजर ठेविली पाहिजे. कोणताही शब्द नेहमीं अव्ययासारखा येत असून एखाद्या वाक्यांत त्याचा नामासारखा उपयोग केला असला, तर त्याला त्या ठिकाणीं बेधडक नाम म्हटलें पाहिजे. 'त्याच्या प्रकृतींत आंतबाहेर नाहीं', या वाक्यांत 'आंतबाहेर' हें नाम असून 'नाहीं' या विधेयक्रियापदाचें उद्देश्य आहे. तसेंच 'पुरंदराच्या वरपासून खाल-पर्यंत आतां पहाण्यासारखें कांहीं उरलें नाहीं' या वाक्यांत 'वर' आणि 'खाल' हे नामार्थक शब्द आहेत. पुनः एकदां; "तुझे 'जर' आणि 'परंतु' ऐकतां ऐकतां कंटाळा येतो"; "गेल्याचा ही भूतकालवाचक धातुसाधित नामाची किंवा विशेषणाची षष्ठी आहे." या दोन वाक्यांतील 'जर', 'परंतु' आणि 'गेल्याचा'—हे शब्द नामांसारखे किंवा नामस्थानीय मानणें अवश्य आहे; व या रीतीनें पाहिजे तो शब्द नामाच्या जागीं घालता येईल, हें सुज्ञ वाचकांच्या लक्षांत आल्याशिवाय राहणार नाहीं. तथापि शुद्ध वाक्यांत नामाच्या जागीं वारंवार येणारे शब्द 'सर्वनामें' व 'धातुसाधित नामें' ही होत.

'विधेयक्रियापद' सकर्मक असल्यास त्याला कर्म असतें. 'कर्म' शब्दाची विस्तृत व्याख्या किंवा तीविषयीं विस्तृत विवेचन येथें करण्याची गरज नाहीं. येथें येवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं उद्देश्याप्रमाणें कर्मेंही नामवाचक शब्द असतात; म्हणून ज्या साधनांनीं उद्देश्याचा विस्तार होतो, किंवा जे शब्द उद्देश्य-स्थानी येऊं शकतात, त्या साधनांनी कर्माचा विस्तार होतो, व ते शब्द 'कर्म', स्थानीं घालतां येतात. नामांचा विशेषणांनी विस्तार होतो; व कर्म नामवाचक शब्द असल्यामुळें त्यांचाही विशेषणांनीं विस्तार होतो. नामाच्या जागीं विशेषतः सर्वनामें व धातुसाधित नामें येतात. कर्में नामवाचक शब्द असल्यामुळे त्यांच्या जागींही विशेषतः सर्वनामें व धातुसाधित नामें येतात. 'तुम्ही फार थकलां', 'तुमचें सांगणें हितावह आहे' या वाक्यांतील 'तुम्ही' व 'सांगणें' हे शब्द

अनुक्रमें सर्वनाम व धातुसाधित नाम असून त्या त्या वाक्याचें 'उद्देश्य' आहेत. 'मी तुला बोलाविलें', 'त्यांचें करणें मला आवडतें' या वाक्यांतील 'तुला' आणि 'करणें' हे शब्द अनुक्रमें सर्वनाम व धातुसाधितनाम असून त्या त्या वाक्यांतील सकर्मक क्रियापदांचीं कर्में आहेत. पहिल्या वाक्यांत तृतीयांत 'मीं' आणि दुसऱ्या वाक्यांत चतुर्थ्यंत 'मला' हे शब्द सर्वनामें असून त्या त्या वाक्याचे उद्देश्य आहेत.

उद्देश्य आणि कर्म नामवाचक शब्द असतात, त्यामुळें त्यांच्या जागीं जे शब्द येतात तेही नामवाचक असतात; म्हणून नामांचा विस्तार करण्याचीं जीं साधनें आहेत त्यांनी उद्देश्य आणि कर्म यांच्या जागीं येणाऱ्या शब्दांचाही विस्तार करतां येतो.

**नामांचा विस्तार खालीं दिलेल्या चार प्रकारांनीं होतो.**

१. **विशेषणें**. विशेषणें हीं नामाचा विस्तार करणारे आद्य शब्द आहेत. 'सद्गुणी पुरुषांस सर्वत्र मान मिळतो'; 'फ्रेडरिक धी ग्रेट यास उंच लोक फार आवडत'; 'पानिपत येथें पुष्कळ शूर शिपाई पडले'; इ. मराठी भाषा संस्कृत भाषेची नात असल्यामुळें संस्कृताप्रमाणें मराठींतही लहानमोठे समास घालण्याची चाल आहे. या समासांपैकीं जे विशेषणार्थक असून कोणत्याही नामाचा गुण दाखवीत असतात, त्यांना विशेषणें मानून याच सदराखालीं गोंविलें पाहिजे. 'ईश्वरभक्तिपरायण परमपूज्य शिष्यानंदकारी परमहंस कृष्णस्वामी काशीस गेले.' या वाक्यांतील सामासिक पदें 'कृष्णस्वामी 'चीं विशेषणें आहेत.

याच सदराखालीं ज्या नामांचा विशेषणासारखा उपयोग केलेला असतो, तीं घातली पाहिजेत. 'टोळधाड', 'घरजावई', 'किताबखाना', 'सरकारदेणें' 'शेतकाम', 'घरभाडें', 'जमीनंतरमबंदी', 'सौजन्यराशी' इत्यादि सामासिक शब्दांतील पहिले अवयव विशेषणें आहेत. असले समास बहुतकरून तत्पुरुष असतात, व या समासांस संस्कृत व्याकरणांत विशेषणात्मक समास म्हणतात. गुणवाचक, संख्यावाचक, व सार्वनामिक असे विशेषणांचे मुख्य भेद आहेत; त्यांपैकीं पहिल्या वर्गांत धातुसाधित विशेषणें घालतां येतील. मराठी भाषेंत या विशेषणांचा भरणा फार आहे.*

२. **समानाधिकरण पद.** शुद्ध वाक्यांतील नामाचा विस्तार करण्यास समानाधिकरण पदें हीं विशेषणासारखींच उपयोगीं पडतात. किंबहुना यांना कांहीं

---

* तसेंच, संस्कृत किंवा मराठी किंवा मराठींत येणाऱ्या दुसऱ्या कोणत्याही भाषेंतील क्रियाविशेषणें, शब्दयोगी अव्ययें, किंवा दुसरा कोणताही शब्दवर्ग— यांपासून साधलेल्या विशेषणांचा याच ठिकाणीं उल्लेख केला पाहिजे. उदाहरणार्थ 'क्वचित्', 'येथील अथवा येथली', 'बेवकूफ', 'इनसाफी' इत्यादि.

अंशीं विशेषणांचाच अर्थ असतो. मराठींत व्याकरण करतांना ज्यांची उद्देशार्थी प्रथमा करण्याची रूढी आहे तीं हीं समानाधिकरण पदें. हीं प्रथमा विभक्तीतच असतात असें नाहीं. हीं पाहिजे त्या विभक्तींत येऊं शकतील. 'सोनें ही मौल्यवान् धातू आहे', 'आमचा मुलगा कृष्णा सिव्हिल सर्विसच्या परीक्षेसाठीं इंग्लंडास जाणार आहे', 'अलीकडे आम्ही ब्राह्मण अगदीं नादान झालों आहों', 'पंक्तोबारगिरांस आम्हांस अलीकडे कोणी पुसत नाहीं', 'राजा शिवाजीचे पराक्रम अजून लोकांच्या स्मरणांतून गेले नाहींत', 'या गतवैभव राजधानींत पुण्यांत आतां वल्गनांशिवाय कांही उरलें नाहीं', 'हिंदुस्थानच्या अधिस्वामिनी व्हिक्टोरिआ राणीस सिंहासनारूढ होऊन पन्नास वर्षें झालीं', 'विनय आणि विद्वत्ता यांचा संगम क्वचित् होतो' इत्यादि वाक्यांतील 'सोनें', 'मुलगा' इत्यादी शब्द केवळ विशेषणें नाहींत, तथापि थोडयाशा ओढाताणीनें ते विशेषणार्थक शब्द आहेत असें दाखवितां येईल. अशा प्रकारच्या शब्दांस 'समानाधिकरण पदें' म्हटलें असतां चालणार आहे. यांनीं त्या त्या वाक्यांतील नामांचा विस्तार होत आहे हें उघडच आहे. मराठींत नामाप्रमाणें समानाधिकरण विशेषणेंही येतात. 'पाड लागलेला असा एक अंबा मला दे', 'विनयवती, रूपवती, बुद्धिमती, व विदुषी अशी भार्या प्राप्त होणें हें मोठें भाग्य आहे'; या वाक्यांतील 'असा' व 'अशी' या विशेषणाच्या मागची विशेषणें 'समानाधिकरण' विशेषणें आहेत. मराठींत नामांचा विशेषणांनीं विस्तार करतांना तीं पृथक्त्वानें घालतां येतात, किंवा तीं सर्व 'समानाधिकरण' विशेषणें करून सार्वनामिक 'असें' या विशेषणांत अंतर्भूत करून घालतां येतात. इंग्रजींत अशी रचना फार क्वचित् आढळते.

३. **अव्ययांत नामें व धातुसाधितें.** इंग्रजी भाषेंत नामांस व धातुसाधितांस शब्दयोगी अव्ययें लावून विशेषणार्थक वाक्यांश करण्याचा पुष्कळ परिपाठ आहे. मराठींत व संस्कृतांत जीं कामें विभक्तिप्रत्ययांनीं व समासांनीं होतात, तीं इंग्रजींत शब्दयोगी अव्ययांनीं करतात; कारण त्या भाषेंत फक्त तीनच विभक्तींस प्रत्यय आहेत, व तेही सर्व प्रकारच्या नामवाचक शब्दांस लागत नाहींत; यामुळें इंग्रजींत विभक्तींच्या जागीं शब्दयोगी अव्ययांचा उपयोग करावा लागतो. विभक्तींची कामें करणाऱ्या शब्दयोगी अव्ययांस 'केस प्रेपोझीशन्स' (Case prepositions) म्हणजे विभक्ति–अव्ययें म्हणतात. मराठींत नामास किंवा धातुसाधितांस शब्दयोगी अव्ययें जोडिली असतां बहुश: अव्ययांत क्रियाविशेषणें सिद्ध होतात. ज्या कितीएक संस्कृत नामात्मक शब्दांस मराठींत अव्ययें मानिलें आहे, त्यांच्या योगानें मराठींत मात्र विशेषणार्थक अव्ययांत वाक्यांश सिद्ध करतां

येतात. उ० 'इंग्रजांनी ठिकठिकाणी धर्मार्थ दवाखाने घातले आहेत.' वास्तविक पहातां 'धर्मार्थ' हा विशेषणार्थक बहुव्रीहि समास आहे; तथापि 'अर्थ' या शब्दास मराठींत शब्दयोगी अव्यय मानिलें असतां, त्याच्या योगानें 'धर्मार्थ' असा अव्ययांत वाक्यांश होऊन तो 'दवाखाने' याचें विशेषण झाला, असें मानण्यास हरकत नाहीं. कोणीं 'धर्मार्थ' या अव्ययांत वाक्यांशास 'क्रिया-विशेषण' मानिलें तरी त्यांस फारशी हरकत करतां येणार नाही. इंग्रजींत जे इतके अव्ययघटित विशेषणात्मक वाक्यांश दिसतात ते त्या भाषेंत विभक्तिप्रत्यय फार नाहींत म्हणून दिसतात; व त्या भाषेंतल्याही अशा प्रकारच्या वाक्यांशांचा बारीक रीतीनें विचार केला असतां, ते क्रियाविशेषणेंच आहेत असें दिसून येतें. 'रिंग ऑफ गोल्ड' (Ring of gold, सोन्याची अंगठी) या वाक्यांशांतील 'ऑफ् गोल्ड' हा पोटवाक्यांश दिसण्यांत विशेषणात्मक दिसतो खरा, पण तो 'मेड' (made म्ह० केलेली) या अध्याहृत (understood) भूतकालवाचक कर्मणी धातुसाधिताचें क्रियाविशेषण (Adverb) आहे. तात्पर्य, मराठींत नामांवरून किंवा धातुसाधितांवरून साधिलेले विशेषणार्थक अव्ययांत वाक्यांश फार क्वचित् आढळतात.

**४. विभक्त्यंत नामें व धातुसाधितें.** शुद्ध वाक्यांतील नामांचा विस्तार करण्यास विभक्त्यंत नामें व धातुसाधितें फारच उपयोगीं पडतात. इंग्रजींत वरल्या कलमांत सांगितल्याप्रमाणें जें काम विभक्ति-अव्ययांनीं होतें, तें मराठींत ज्यांस-विभक्तिप्रत्यय लाविले आहेत अशा नामांनीं, धातुसाधितांनीं, व विशेषणार्थक इतर प्रकारच्या शब्दांनीं होतें. विभक्त्यंत-नामांपैकीं षष्ठ्यंत नामांवरून विशेषणें फार होतात; किंबहुना षष्ठी विभक्ति विशेषणात्मकच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. षष्ठ्यंत शब्द बहुश: क्रियाविशेषण होत नाहींं. उद्देश्यस्थानीं येण्याचा त्याचा क्वचितच संभव आहे. आग्रहानें पाहिजे तर तें एखाद्या वाक्यांत उद्देश्य करतां येईल; पण असा प्रसंग फार थोडा येणार आहे. षष्ठ्यंत नामांवरून साधलेलीं विशेषणें अनेकार्थ असतात; व व्याकरणकारांनीं त्या अनेक अर्थांची पुष्कळ फोड केली आहे. पण वाक्यमीमांसकास त्या अर्थबाहुल्यांत पडण्याची गरज नाहीं. षष्ठ्यंत नामें, धातुसाधितें, व इतर शब्द बहुश: विशेषणें असतात, येवढें त्यानें सांगितलें कीं त्याचें काम झालें. 'पाठीचा कणा', 'उष्ण रक्ताचे प्राणी', 'थंड रक्ताचे प्राणी', 'कासवाची पाठ', 'माशाच्या काळजाचें तेल', 'घरचा खर्च', 'वाचावयाचें पुस्तक', 'खेळण्याची जागा', 'गेल्याचा शोक', 'बोलणा-राचें तोंड', 'मारल्याचा हात', 'वरचा इमला', 'खालची जमीन', 'पाण्याचे पितर', 'मौजेची गोष्ट' इत्यादि शब्दद्वयांतील षष्ठ्यंत शब्द विशेषणें आहेत.

षष्ठीशिवाय इतर विभक्तींवरूनही विशेषणें होतात, पण तीं फार नाहींत. बारीक रीतीनें विचार करतां असें दिसून येईल कीं, षष्ठी विभक्तीशिवाय इतर विभक्तींवरून क्रियाविशेषणें साधलीं जात नाहींत. 'शहरांतली रोषनाई', 'दरबारांतील व्यवस्था' इत्यादि विशेषणांस विभक्त्यंत म्हणण्यापेक्षां अव्ययांत म्हणणेंच कदाचित् विशेष सयुक्तिक होईल.

आतांपर्यंत 'उद्देश्य' व 'कर्म' यांच्या जागी येणाऱ्या नामांचा विस्तार पृथक्त्वेंकरून किती प्रकारांनीं होतो हें दाखविलें. या प्रकारांपैकीं प्रत्येक वेळीं एकच प्रकार असतो, असा अर्थ नाहीं. वरील चार प्रकारांपैकीं दोन, तीन, किंवा चारही प्रकारांनी पाहिजे तर एकसमयावच्छेदेंकरून नामांचा विस्तार करतां येतो.

१. नामांच्या पूर्वी विशेषणें जोडतांना त्या विशेषणांचा ज्या विभक्त्यंत किंवा अव्ययांत शब्दांशीं संबंध असेल, ते शब्दही घालतां येतात; उ० 'लिहिण्यांत हुशार', 'पैशाविषयीं दक्ष', 'खाण्याला मधुर', 'मनाचा मोकळा', 'भीमाहून शूर', 'पायानें लंगडा', 'जिवावर उदार', "द्रव्याविषयीं बेपर्वा अशा पुरुषांस कोणापासूनही अपमान सोसून घेण्याची गरज नाहीं"; "त्यांनीं फार चांगलें काम केलें" इ. नामांस किंवा धातुसाधितांस शब्दयोगी अव्ययें लाविल्यानें क्रियाविशेषणें होतात, हें मागें सांगितलेंच आहे. क्रियेची कोणत्याही प्रकारची रीति, स्थिति, काल इत्यादि दाखविणें हें क्रियाविशेषणांचें मुख्य काम आहे, हेंही खरें आहे. तथापि भाषेपेक्षां विचार फार झपाट्यानें चालत असल्यामुळें, व विचाराच्या चंचलतेबरोबर भाषेची चंचलता दाखविण्याचा प्रयत्न मनुष्य नेहमीं करीत असल्यामुळें, ज्या क्रियाविशेषणांनीं क्रियेच्या रीतिस्थितीचा बोध व्हावा तीं बोलण्याच्या घाईत क्रियापदांचा लोप होत असल्यामुळें, कधीं विशेषणांचीं, व कधीं दुसऱ्या क्रियाविशेषणांचीं, आनुषंगिकें होतात. 'फार चांगलें', 'अतिशय कडू' अशा प्रकारच्या वाक्यांतील 'फार', 'अतिशय' इत्यादि शब्दांस पाहिजे तर विशेषणें किंवा क्रियाविशेषणें मानितां येतील. इंग्रजींत अशा प्रकारच्या शब्दांना क्रियाविशेषणें मानितात. विशेषणांनीं किंवा क्रियाविशेषणांनीं ज्ञात होत असलेल्या भावांची इयत्ता, परिमाण, किंवा प्रमाण विशेषणांनीं किंवा क्रियाविशेषणांनीं होतें, हें म्हणणें व्याकरणकारांच्या इच्छेवर अवलंबून आहे. हा संज्ञाभेदाचा प्रश्न आहे, अर्थभेदाचा नाहीं.

२. नामांमागें विशेषणांचा उपयोग करतांना त्या विशेषणांचा संबंध ज्या शब्दांशीं असेल ते शब्द ज्याप्रमाणें शुद्ध वाक्यांत घालतां येतात, त्याप्रमाणें त्यांत येणाऱ्या प्रत्येक नामाच्या पूर्वी दोन किंवा अधिक विशेषणें घालूनही त्याचा

विस्तार करतां येतो. 'येत्या रविवारच्या बाजारांत माझ्यासाठीं एक सागवानी लांकडाची बिनहाती व्हार्निश केलेली सुरेख खुर्ची घे.' या वाक्यांतील 'खुर्ची'स पांच विशेषणें लागलीं आहेत.

३. विशेषणाप्रमाणें योजिलेल्या अव्ययांत किंवा विभक्त्यंत नामांचा ज्या शब्दांशीं संबंध असेल ते सारे शब्द शुद्धवाक्यांत घालतां येतात. "माझ्या संसाराची तुला काळजी नको" यांत 'माझ्या' हें 'संसाराचें' आणि 'संसाराची' हें काळजीचें विशेषण आहे. याप्रमाणेंच 'निढळाच्या घामानें कमाविलेल्या पैशाचा हवा तसा व्यय करवत नाहीं', 'त्याच्या गळ्यांतल्या गांठल्यांतील वाघनखाच्या मोत्यांचें पाणी गेल्यास पुष्कळ दिवस झाले.'

**४. तथापि शुद्धवाक्यांचा विशेष विस्तार होण्यास सर्वांपेक्षां धातुसाधितें** अधिक कारण होतात. यांच्यासारखे त्या कामास अनुकूल असे दुसरे शब्द नाहींत. पूर्ण क्रियापदांच्या जागीं धातुसाधितांचा उपयोग करून, कंटाळवाण्या लांब वाक्यांच्या ऐवजीं आटपसर वाक्यांशाची योजना या धातुसाधितांनीं करतां येते. कित्येकदां हीं नामार्थक असतात. पण हीं धातूंपासून साधलीं असल्यामुळें यांनीं क्रियापदांचीं कित्येक कार्यें होतात. धातुसाधितनामें सकर्मक धातूपासून साधलीं असतां त्यांना कर्में असूं शकतात. 'असलीं कामें करण्याची मला दगदग नको' यांत 'करण्याची' हें षष्ठ्यंत विशेषण 'करणें' या धातुसाधितनामावरून झालें असल्यामुळें, व 'कर' धातु सकर्मक असल्यामुळें 'करण्याची' या विशेषणापूर्वी 'कामें' हें कर्म घालतां आलें. व 'काम' नाम असल्यामुळें त्याच्यापूर्वी 'असलें' हें विशेषण घालतां आलें. 'असलें'च्याबरोबर 'घाणेरडें', 'जिकीरीचें', 'जबाबदारीचें', 'नुकसानीचे' अशीं आणखी पाहिजे तितकीं विशेषणें घालतां येतीं. या विशेषणांशीं संबंध असलेले दुसरे विभक्त्यंत व अव्ययांत शब्द घालतां येते. याप्रमाणें वाक्यांचें शुद्धत्व न जाऊं देतां तें पाहिजे तितकें लांबवितां येतें. सकर्मक धातुसाधितनामांस आणि विशेषणांस ज्याप्रमाणें कर्में जोडतां येतात, त्याप्रमाणें अकर्मक आणि सकर्मक धातुसाधितांच्यापूर्वी क्रियाविशेषणेंही घालतां येतात; व क्रियाविशेषणें सिद्ध करण्याचेही अनेक प्रकार असल्यामुळें त्या सर्वांचा उपयोग करण्यास मार्ग खुला होतो. या रीतीनें एका धातुसाधिताच्या अनुषंगानें पाहिजे तेवढी शब्दमाला वाक्यांत आणून फिरून त्याचें शुद्धत्व जसेंच्या तसें कायम ठेवितां येईल. मराठींत बहुतेक सार्‍या प्रकारच्या विशेषणांचा नामासारखा उपयोग करतां येतो. धातुसाधित विशेषणें या नियमास अपवादक नाहींत. धातुसाधित विशेषणांचे भूत, वर्तमान, भविष्य इत्यादि अनेक प्रकार आहेत. या सर्व प्रकारांवरून धातुसाधित नामें सिद्ध करितां येतात, व धातुसाधित नामांशीं

आणि विशेषणांशीं कर्माचा आणि क्रियाविशेषणांचा योग करतां येत असल्यामुळें मराठी वाक्यरचना सुगम व आटपसर झाली आहे.

उद्देश्यविस्ताराचें प्रकरण संपविण्यापूर्वी उद्देश्यविशेषण आणि विधेयविशेषण अथवा विधिविशेषण यांतील भेदाविषयीं दोन शब्द सांगितले पाहिजेत. जीं विशेषणें उद्देश्याशीं जोडलेलीं असतात, त्यांवरून असा बोध होतो कीं, निदान असा बोध होतो असें समजण्याचा संप्रदाय आहे कीं, त्या विशेषणांनीं जे गुण दाखविले जात असतात ते गुण त्या विशेष्याच्या किंवा उद्देश्याच्या अंगीं आहेत, हें ऐकणारास किंवा वाचणारास ठाऊक असतें. 'पांढरा कागद', 'तांबडी शाई', 'पडकें घर', 'उभा रस्ता', 'वहाती नदी', 'हिरवीं पानें', —अशा रीतीनें नामांपूर्वी विशेषणांचा उपयोग केला असतां तद्दर्शित गुण त्या त्या नामांच्या ठायीं वास करीत आहेत, व त्यांबद्दल कोणास संशय नाहीं, असें बोलणारा किंवा लिहिणारा घेऊन चालतो. विधेयान्वित विशेषणांची तशी गोष्ट नाहीं. त्यांचा विधेयाशीं संबंध असल्यामुळें उद्देश्याचा आणि त्यांचा संबंध सिद्ध व्हावयाचा आहे, अशी कल्पना असते. 'कोळसा काळा असतो' या वाक्यांत 'काळा' हें विधेयविशेषण किंवा विधिविशेषण आहे कोळशाविषयीं कांहीं माहिती करून द्यावी, या उद्देशानें हें वाक्य रचलें आहे असें मानावें लागतें. कोळशाच्या स्वरूपाचें अगदीं स्थूल ज्ञान जरी त्याच्या काळेपणावरून होऊं लागतें, व त्याविषयीं जी पहिली गोष्ट ध्यानांत रहाते ती काळेपणा होय, हें जरी खरें आहे, तरी जेव्हां 'कोळसा काळा असतो' असें आपण कोणापुढें म्हणतों, तेव्हां ऐकणारास कोळशाचा रंग ठाऊक नाहीं, व तो आपण सांगत आहों, अशी आपण क्षणभर कल्पना करतों. शास्त्रीय कामासाठीं नित्याच्या वस्तूंच्या व्याख्या देत असतां कधीं कधीं अशा प्रकारचीं शाब्दिक वाक्यें योजावीं लागतात. त्यांपासून वास्तविक पहातां नवीन ज्ञान होत नसतें. परंतु वाक्य हें शेंकडा नव्याण्णव बाबतींत शुद्ध विधानाचा सांचा आहे. आणि विधान म्हणजे कोणत्याही वस्तूविषयी कांहीं तरी सांगणें किंवा माहिती देणें.

## विधेयविस्तार

शुद्ध वाक्यांत एकच पूर्ण क्रियापद असतें हें मागें सांगितलेंच आहे. 'चंद्र उगवला', 'सूर्य मावळला', 'पाऊस आला', तारे चमकले', 'वीज पडली' इत्यादि वाक्यांत एकेक पूर्ण क्रियापद असून त्यांत पूर्णविधान झालें आहे. इंग्रजी तर्कशास्त्रांत 'चंद्र उगवला' या वाक्याचें तार्किक पृथक्करण करतांना 'चंद्र उगवला आहे' म्हणजे 'चंद्र उगवलेली वस्तू आहे' असें वाक्याचें स्वरूप करतात.

तसेंच 'तो आहे' म्हणजे 'तो जिवंत आहे' किंवा 'तो अस्तित्वांत आहे'. 'तो खचित मेला' म्हणजे 'तो मेला हें खचित आहे'. असें करण्याचा हेतु येवढाच कीं ज्या वस्तूविषयीं जें कांहीं सांगावयाचें असेल तें डोळ्यांपुढें स्पष्ट आणावयाचें. कोणत्या वस्तूविषयीं काय सांगावयाचें आहे हें दोन पृथक् शब्दांनीं निश्चित केल्यावर त्यांचा संबंध जोडून देण्यासाठीं 'आहे' किंवा 'आहेत' या क्रियापदाची योजना करतात. निषेधार्थक विधान करावयाचें असतां, म्हणजे उद्देश्य आणि विधेय यांचा वियोग किंवा व्यधिकरण व्यक्त करावयाचें असतां, 'नाहीं' किंवा 'नाहींत' या निषेधक क्रियापदाची योजना करतात. उद्देश्य आणि विधेय यांचीं अशा प्रकारची एकता किंवा विभक्तता दाखविण्याऱ्या 'आहे' किंवा 'नाहीं' या क्रियापदांस इंग्रजी तार्किक किंवा नैय्यायिक शृंखला (Copula कॉप्यूला–सांखळी) म्हणतात. या 'अस्.' धातूच्या सत्तावाची व निषेधवाची सांखळीनें उद्देश्य आणि विधेय हीं परस्परांशीं निगडित असतात. असो; व्याकरणवाक्य-मीमांसेंत इतक्या खोल पाण्यांत शिरण्याची गरज नाहीं. व्याकरणांतील पूर्ण क्रियापदांत तार्किक 'विधेय आणि शृंखला' या उभयतांचा अंतर्भाव झालेला असतो. 'घोडा धावतो' म्हणजे 'घोडा धावत आहे' किंवा 'धावणारी वस्तू आहे' अशी फोड व्याकरणवाक्यमीमांसेंत करण्याची गरज नाहीं. 'घोडा धावतो' अशा प्रकारच्या वाक्यांत 'घोडा' उद्देश्य आणि 'धावतो' विधेय, असें समजून निर्वाह करावयाचा.

वर जीं उदाहरणें घेतलीं आहेत तीं सारीं अकर्मक क्रियापदांचीं आहेत. वाक्यांत सकर्मक क्रियापद असलें म्हणजे त्यांत कर्ता, कर्म, आणि क्रियापद असे तीन शब्द येतात. यांपैकीं क्रियापद आणि कर्म यांनीं विधेय झालेलें असतें. 'ईश्वर भक्तांस तारतो', 'शेतकरी जमीन लावतात', 'राघू मिरच्या खातात', 'सोनार दागिने करील', 'सुतारानें गाडी केली', 'माझ्यानें काम करवत नाहीं' इत्यादि वाक्यांतील विधेयांत दोन दोन शब्द आहेत; व शेवटल्यांत तीन आहेत. यावरून काय झालें कीं, विधेय क्रियापद सकर्मक असतां त्याचा कर्मानें विस्तार होतो. कर्म हें नाम किंवा नामार्थक शब्द असतें, हें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां ज्या विधेय क्रियापदाला कर्म लागत असेल तें त्या कर्मानेंच विस्तृत होईल असें नाहीं, तर कर्मस्थानीं नाम किंवा नामार्थक शब्द येत असल्यामुळें, जितक्या साधनांनीं नामांचा विस्तार होतो, तितक्या साधनांनीं विस्तृत केलेलें कर्म आपल्या विधेयाशीं संलग्न होऊन अतिविस्तृत विधेय उत्पन्न करील. उद्देश्याच्या विस्ताराचें विवेचन करतांना नामाचा विस्तार करण्याचीं साधनें पूर्वीं सांगितलींच आहेत. तेव्हां त्यांची येथें

पुनरुक्ति करण्याची गरज नाहीं. 'पुण्यापासून बारातेरा मैलांवर असलेल्या शिवा-पूरच्या बागेंतील शेलक्या झाडाचे पाडास आलेले निवडक आंबे गोविंदरावांनीं आणविले.' या वाक्यांत 'आंबे'च्या पाठीमागें जी शब्दमालिका आहे ती त्याचा विस्तार आहे. या वाक्यांत 'गोविंदरावांनीं' हा शब्द उद्देश्य आहे, व 'पुण्या-पासून...आणविले' येवढें विधेय आहे. विधेय क्रियापद 'आणविलें' सकर्मक आहे, म्हणून त्याला 'आंबे' हा शब्द कर्म आहे; व तें नाम असल्यामुळें त्याच्या पाठी-मागें पूर्वी सांगितलेल्या पद्धतीनें विस्तारपदांचा तांडा लाऊन देतां आला आहे !

कित्येकदां असें होतें कीं, सकर्मक विधेयक्रियापदाचें कर्म सांगितलें असूनही वाक्याचा पूर्ण अर्थ होत नाहीं. 'आम्हीं त्यांस नेमिलें', 'फ्रेंच लोकांनीं नेपो-लियनाला केलें' या व अशा प्रकारच्या इतर वाक्यांत कर्में सांगितलीं असूनही वाक्यार्थ पूर्ण होत नाहीं. तो होण्यास कर्मांशिवाय आणखी एखादा शब्द सांगावा लागतो. 'आम्हीं त्यास कमिशनर नेमिलें', 'फ्रेंच लोकांनीं नेपोलिअनाला डिक्टेटर केलें', 'माधवराव पेशव्यानें रामशास्त्र्यास मुख्य न्यायाधीश केलें' अशा रीतीनें नवीन शब्द घातले असतां पूर्वी अपूर्ण वाटत असलेलीं वाक्यें पूर्ण झालीं असें वाटूं लागतें. या वाक्यांतील सकर्मक क्रियापदांस 'अपूर्ण सकर्मक क्रियापदें', आणि ज्या शब्दांच्या साहाय्यानें त्यांचा अर्थ पूर्ण करून घेतला जात आहे, त्यांस त्यांचीं 'पूरकें' म्हटलें असतां चालेल. सकर्मक क्रियापदांचीं पूरकें त्यांच्या कर्मांच्या विशेषणासारखीं असतात; तेव्हां कर्माची जी विभक्ति, म्हणजे द्वितीया विभक्ती, तीच त्यांची (म्हणजे पूरकांची) विभक्ती हें सांगायाला पाहिजे असें नाहीं. 'माधवराव पेशव्यानें...' इत्यादि वाक्यांतील 'न्याया-धीश' या शब्दाची द्वितीया विभक्ति समजली पाहिजे. द्वितीयेचा प्रत्यय नसतां द्वितीया विभक्ति कां समजावी, हे मागें सांगितलेंच आहे.

वरील उदाहरणांवरून कित्येक सकर्मक क्रियापदेंच अपूर्ण असतात असें वाटण्याचा संभव आहे; पण तसें नाहीं. कित्येक अकर्मक क्रियापदेंही अपूर्ण असतात. वास्तविक पहातां ज्या वाक्यांत अकर्मक क्रियापद विधेय असेल, त्याचें उद्देश्य सांगितलें म्हणजे बस व्हावें. पण कधीं कधीं तेवढें सांगून वाक्याचा पूर्ण अर्थ होत नाहीं. अकर्मक क्रियापदाशिवाय आणखी एखादा शब्द सांगावा लागतो. तो नेहमीं नाम किंवा नामार्थक शब्द असतो, असाच नियम नाहीं. तो विशेषण किंवा क्रियाविशेषणही असूं शकेल. 'तें पुस्तक वाचनीय आहे', 'हे गृहस्थ मामलतदार आहेत', 'आमचा बंधु विद्वान निघाला', 'तुम्ही शहाणेच पडलात', 'तो दिवा आहे' इत्यादि वाक्यांतील क्रियापदें अकर्मक आहेत. तरी तेवढींच

सांगितली असती तर वाक्यांचा अर्थ पूर्ण न होता. तो होण्यासाठीं त्यांशिवाय दुसरे शब्द सांगावे लागले आहेत. त्यांपैकीं कांहीं नामें व कांहीं विशेषणें आहेत. अशा प्रकारच्या अकर्मक क्रियापदांस अपूर्ण अकर्मक क्रियापदें मानून ज्या शब्दांच्या साहाय्यानें वाक्याचा अर्थ पूर्ण करून घेतात, त्यांस त्यांचीं (अकर्मक क्रियापदांचीं) पूरकें म्हणावें. व ज्याअर्थी या पूरक शब्दांपैकीं कांहीं प्रत्यक्ष विशेषणें असतात, व जीं नामें असतात त्यांचा विशेषणासारखा अर्थ असतो, त्याअर्थी उद्देश्याची जी विभक्ति ती पूरकांची विभक्ति समजावी. 'अस्' धातूचा अस्तित्वार्थ नसतां त्यावरून नेहमीं अपूर्ण अकर्मक क्रियापदें होतात. 'अस्' प्रमाणें दुसरेही बरेच धातू मराठींत आहेत.

आतांपर्यंत विधेयाचा विस्तार करण्याच्या दोन साधनांचा म्हणजे 'कर्म' आणि 'पूरकें' यांचा विचार झाला. अजून क्रियापदांचा विस्तार करणारे जे मुख्य शब्द त्यांचा विचार करावयाचा आहे. ते शब्द क्रियाविशेषणें होत. क्रियाविशेषणें नेहमीं एकशब्दात्मकच असतात असा नियम नाहीं. क्रियाविशेषणांच्या जागीं अनेक तऱ्हेचे शब्दसमुदाय येतात. त्यांचे स्थूल विभाग खालीं देतों:—

**१. नामवाचक शब्द आणि त्यांच्याबरोबर दुसरे विशेषणात्मक शब्द; विशेषणें.**

**२ विभक्त्यंत नामें व धातुसाधितें.**

**३. अव्ययांत नामें व धातुसाधितें.**

**४. धातुसाधितांत वाक्यांश.**

'हे गहूं सुमारें पल्ला दीड पल्ला आहेत.' या वाक्यांत 'पल्ला' हें क्रियाविशेषण आहे. 'मी चार दिवस कलकत्त्यास होतों', 'तुमची सरी चोवीस तोळे भरली', 'आमच्या कामास पन्नास फूट लांकूड पाहिजे' 'त्याचें धोतर आठ हात व दीड वीत भरलें' इत्यादि वाक्यांतील 'चार दिवस' 'चोवीस तोळे', 'पन्नास फूट', 'आठ हात व दीड वीत' इत्यादि परिमाणदर्शक शब्द क्रियाविशेषणें आहेत. कोणी यांस परिमाणार्थक प्रथमांत विशेषणें मानतात. तथापि एकंदरीनें पहातां यांचा नामापेक्षां क्रियापदांकडे विशेष संबंध असल्यामुळें यांस क्रियाविशेषणें मानावें, हें बरें दिसतें. या कामास पन्नास फूट लांकूड पाहिजे, म्हणजे 'पन्नास फूटपर्यंत', 'ज्याची लांबी पन्नास फुटांपर्यंत जाईल' असें लांकूड पाहिजे. तथापि हें थोडथाशा मतभेदाचें स्थळ आहे, हें कबूल केलें पाहिजे.

पुष्कळ वाक्यांत शुद्ध विशेषणांचा क्रियाविशेषणांसारखा उपयोग केलेला असतो. कांहीं ठिकाणीं क्रियाविशेषणांच्या जागीं विशेषणांचा उपयोग स्पष्ट

असतो. पण काहीं ठिकाणीं विशेषण कीं क्रियाविशेषण हें ठरविण्याची पंचाईत पडते. साधारणपणें हें लक्षांत ठेवावें की क्रियापदाच्या अनुषगानें विशेषण योजण्यांत आलें म्हणजे त्याचा क्रियाविशेषण बनण्याचा झोंक असतो. 'तो चांगलें बोलला', 'त्यानें काठी सरळ केली', 'आम्ही उभे राहिलों', 'कारलें कडू लागतें', 'आम्ही त्याला भित्रा म्हटलें', त्यानें पाणी उष्ण (उन्हन, ऊन) ठेविलें पाहिजे', 'मीं त्याला वाट पहात सोडिलें', 'तुम्ही त्याला पळतांना पहात आहां', 'त्यानें ओरडून अरेडून आपला घसा कोरडा केला', 'विजेनें त्याला ठार केलें', 'त्यांनीं खांब नीट बसविला' असल्या वाक्यांत असलेलीं विशेषणें थोडींशीं क्रियाविशेषणासारखीं दिसतात, व थोडींशीं विशेषणासारखीं दिसतात. वरील वाक्यांपैकीं सकर्मक वाक्यांतील विशेषणाच्या ठायीं अप्रत्यक्ष कर्मत्वाचा झोंक दिसतो, हेंही सुज्ञ वाचकांच्या लक्षांत आल्याखेरीज राहणार नाहीं. अप्रत्यक्ष कर्मास क्रियाविशेषणें मानण्यास हरकत नाहीं. 'त्यानें ब्राह्मणांस दक्षिणा दिली' यांत 'ब्राह्मणांस' हें क्रियाविशेषण मानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

२. पुष्कळ वाक्यांत विभक्त्यंत नामें आणि धातुसाधित नामें क्रियाविशेषणांचें काम करीत असतात. 'समुद्रांत वडवानल पेट घेतो', 'आम्ही काशीहून आलों', 'त्याला हैदराबादेस जावयाचें आहे', 'हें काम करण्यास तुम्हाला मुळींच श्रम पडणार नाहींत', 'वरिष्ठांचा हुकूम तोडण्यास तो कधींही धजला नाहीं', 'त्यांनीं गाईला चारा घातला', 'न्यायाधिशानें कैद्यास पंचवीस रुपये दंड केला', 'त्याच्या पदरीं पुष्कळ चाकरमाणसें आहेत', 'त्यानें स्वपराक्रमानें दिगंत कीर्ति गाजविली' इत्यादि वाक्यांत 'समुद्रांत', 'काशीहून', 'हैदराबादेस', 'करण्यास', 'तोडण्यास', 'गाईला', 'कैद्यास', 'पदरीं', 'स्वपराक्रमानें' — हे शब्द क्रियाविशेषणें आहेत. वरील शब्दांपैकीं 'गाईला' कोणी 'घातला' या क्रियापदाचें दुसरें कर्म करून, 'घातला' हें द्विकर्मात्मक क्रियापद करतील. 'पंचवीस रुपये' हें आमच्या मतें क्रियाविशेषण करावें. पण त्यावर कोणी असा आक्षेप घेतील की 'पंचवीस रुपये' या शब्दांचा संबंध उघडपणें 'दंड' या नामाकडे असतां त्यांस तुम्ही क्रियाविशेषण म्हणतां हें कसें ? नामाचा गुण विशेषणांनीं दाखविला जातो, सबब त्यास विशेषण म्हणणें रास्त आहे. त्यावर असें उत्तर आहे कीं 'पंचवीस' हें रुपयांचें संख्याविशेषण आहे हें निर्विवाद आहे, पण 'रुपये' दंडाचें विशेषण म्हणजे काय ? 'पंचवीस रुपयांचा दंड' असा अर्थ केल्यास कदाचित् 'पंचवीस रुपये' दंडाचे विशेषण करतां येईल. पण 'पंचवीस रुपयांचा दंड' याचा तरी अर्थ काय ? ज्या दंडाची इयत्ता किंवा परिमाण पंचवीस रुपये झालें आहे, हाच कीं नाहीं ? हाच जर असेल तर अन्यत्र

येणाऱ्या कालदर्शक किंवा परिमाणदर्शक शब्दांप्रमाणें यासही क्रियाविशेषण कां करूं नये ? पुढल्या 'त्यानें स्वपराक्रमानें ' या वाक्यांतील 'दिगंत ' हें क्रियाविशेषण केलेंच पाहिजे.

३. विभक्त्यंत नामांप्रमाणें व धातुसाधित नामांप्रमाणें अव्ययांत नामें व धातुसाधितेंही क्रियाविशेषणांच्या जागीं येतात. 'बक्षिसें वांटण्यासाठीं गव्हरनरसाहेबांस बोलाविलें आहे ', 'पाणी करण्यासाठीं ऑक्सिजन व हैड्रोजन काढून ठेविले आहेत ', 'तुमच्या असल्या वागण्यामुळें आम्हांस इतका त्रास पडतो ', 'पोटासाठीं मनुष्यास ज्याच्या त्याच्यापुढें तोंडें वेंगाडावीं लागतात ', 'आम्हांकरितां तुझ्या तातें, समरीं टाकुनियां शस्त्रातें, गमन केलें स्वर्लोकातें ' इ० अव्ययांत नामांवरून व धातुसाधितांवरून कलेलीं क्रियाविशेषणांची अनंत उदाहरणें आहेत; त्यांचें येथें दिग्दर्शन सुद्धां करतां येणार नाहीं. मराठींत अनेक प्रकारचीं शब्दयोगी अव्ययें आहेत. त्यांचा नामाशीं किंवा नामार्थक कोणत्याही प्रकारच्या शब्दाशीं संयोग झाला कीं, त्यापासून क्रियाविशेषणें उत्पन्न होतात. शब्दयोगी अव्ययांचे अगदीं ठळक वर्ग आठ किंवा दहा होतात, व त्यांनीं निरनिराळे अर्थ दाखविले जातात. 'आंत ', 'वर ', 'कडे ', 'पासून ', 'पावेतों ', 'समोर ', 'मध्यें ', 'पलीकडे ', इत्यादि अनेक **स्थान**दर्शक शब्दयोगी अव्ययें आहेत. 'नंतर ', 'पूर्वी ' इत्यादि **काळ** दाखवितात. 'कडून ', 'द्वारें ', 'करवीं ', 'करतां ', 'स्तव', 'अर्थी ', इत्यादिकांनीं **कारण, हेतु, आशय** वगैरेंचा बोध होतो. 'विषयीं ', 'बद्दल ' इत्यादि **संबंध**सूचक आहेत. 'शिवाय ', 'खेरीज ', 'व्यतिरिक्त ' इत्यादिकांनीं **व्यावृत्ति** स्पष्ट होते. 'प्रमाणें ', 'अनुरूप ' इत्यादिकांनीं **कल** अथवा **संमति** दाखविली जाते. 'विरुद्ध ', 'उलट' इत्यादि **विरुद्धता, तिरस्कार** किंवा **प्रतिबंध** दाखविण्यासाठीं योजतात. 'सह ', 'सहवर्तमान ', 'निशीं ' इत्यादिकांनीं **संयोग** दाखविण्याचें काम होतें. या सर्व प्रकारच्या शब्दयोगी अव्ययांचा नामार्थक शब्दांशीं संयोग होऊन क्रियाविशेषणें होतात.

४. वरील तीन प्रकारांशिवाय आणखी एका प्रकारचीं एकशब्दात्मक व अनेकशब्दात्मक क्रियाविशेषणें मराठींत वारंवार येतात. हीं धातुसाधितांनीं झालेलीं असतात. कधीं कधीं एकट्या धातुसाधितांचा क्रियाविशेषणासारखा उपयोग करतां येतो. 'तो पळत गांवास गेला ', 'तो बसत उठत आला ' या वाक्यांतील 'पळत ' व 'बसत उठत ' हे शब्द क्रियाविशेषणें आहेत. पण कधीं कधीं धातुसाधितें त्यांच्या परिवारासह वाक्यांत योजिलीं असल्यामुळें, त्यांपासून बऱ्याच लांबीचीं क्रियाविशेषणें उत्पन्न होतात. अशा प्रकारच्या क्रियाविशेषणांस

येथें 'धातुसाधितांत' क्रियाविशेषणें किंवा 'क्रियाविशेषणार्थक धातुसाधितांत वाक्यांश' असें नांव देणें सोईचें होईल. 'वर्तमानकालवाचक', 'भूतकालवाचक' व 'भविष्यकालवाचक' असे धातूसाधितांचे तीन प्रकार आहेत. या प्रत्येकांतील धातुसाधितांपैकीं कांहीं 'व्ययी' आहेत म्हणजे विशेषणाप्रमाणें त्यांस लिंगविभक्त्यादि कार्यें होतात, व कांहीं 'अव्ययी' आहेत. 'अव्ययी' धातुसाधितें अव्ययांसारखीं आहेत; त्यांना 'व्ययी' धातुसाधितांप्रमाणें विभक्त्यादिकांचे प्रत्यय लावून त्यांचीं रूपांतरें होत नाहीत. तथापि तीं क्रियापदांपासून निघालीं असल्यामुळें, त्यांस क्रियापदांचीं पुष्कळ कार्यें होतात. कधीं कधीं क्रियापदाप्रमाणें त्यांना कर्ता असतो. तीं सकर्मक असल्यास त्यांच्याबरोबर त्यांचीं कर्में योजतां येतात; व क्रियाविशेषणें तर पाहिजे त्या प्रकारच्या धातुसाधितांच्या अनुषंगानें घालतां येतात. 'व्ययी' धातुसाधितें विशेषणांसारखीं किंवा नामांसारखीं असल्यामुळें त्यांस विभक्त्यादिकांचे प्रत्यय लागतात इतकेंच नाहीं, तर त्यांचा शब्दयोगी अव्ययाशीं देखील संयोग करतां येतो. 'मुलगे आपले धडे करीत असतां आम्ही भातुकल्या खेळत होतों' हें शुद्ध वाक्य आहे. यांत 'असतां' या धातुसाधिताचा 'मुलगे' हा स्वतंत्र कर्ता आहे. मुलगे आपले धडे करीत असतां' हा स्वतंत्र धातुसाधितांत वाक्यांश 'खेळत होतों' या क्रियापदाचेंकालवाचक क्रियाविशेषण आहे. इंग्रजींत अशा प्रकारच्या वाक्यांशाला 'अॅब्सोल्यूट फ्रेज' (Absolute phrase स्वतंत्र किंवा असंबंधित वाक्यांश) म्हणतात. ज्या क्रियाविशेषणार्थक धातुसाधितांत वाक्यांशाचा कर्ता वाक्यांतील पूर्ण क्रियापदाच्या कर्त्याहून निराळा असतो, त्यासच 'स्वतंत्र' किंवा 'तुटक' वाक्यांश म्हणतात. असल्या धातुसाधितांच्या कर्त्याची विभक्ती, पूर्ण क्रियापदाच्या कर्त्याप्रमाणें, प्रथमा, तृतीया, किंवा चतुर्थी असूं शकते. 'तुम्ही निघालां असतां मीही निघेन', 'सूर्य उगवल्यावर आपण पुढें चालूं लागूं', 'त्यानें ही गोष्ट मान्य केल्यास माझी हरकत नाहीं', 'मला न करवल्यास तेवढें तुम्ही तरी करा' इत्यादि वाक्यांतील धातुसाधितांचे कर्ते प्रथमा, तृतीया, व चतुर्थी विभक्तींत आहेत; व धातुसाधितांपैकीं शेवटचीं तीन विशेषणासारखीं असल्यामुळें त्यांपैकीं पहिल्यास शब्दयोगी अव्यय, व शेवटच्या दोहोंस विभक्तिप्रत्यय लागले आहेत. अशा ठिकाणीं कै. कृष्णशास्त्री गोडबोले 'उगवला, यावर', 'केलें, यास', 'करवलें, यास' अशी शब्दफोड करून, अशा प्रकारच्या 'शुद्ध' वाक्यांचीं 'मिश्र' वाक्यें करतात. अशा रीतीनें शब्दांची फोड करीत बसणें म्हणजे जेथें अडचण नाहीं तेथें ती उकरून काढण्यासारखें होय. 'उगवला', 'केलें', 'करवलें' हीं जर मूळचीं धातुसाधित विशेषणें आहेत, व विशेषणांना

नामांप्रमाणें लिंगवचनविभक्त्यादी कार्यें होतात, तर त्यांना विशेषणें कल्पून इतर शब्दांप्रमाणें अशा ठिकाणीं त्यांचीं विभक्तिप्रत्ययांनीं व शब्दयोगी अव्ययांनीं सामान्यरूपें झालीं आहेत असें समजणें बरें, कीं कै. कृष्णशास्त्र्यांप्रमाणें त्यांना द्विधा करून, व त्यांतील 'पूर्ण क्रियापदें' आणि विभक्त्यंत व अव्ययांत सर्वनामें काढीत बसून, वाक्याच्या अर्थांत निरर्थक घोंटाळा उत्पन्न करणें चांगलें- याचा सुज्ञ वाचकांनीं विचार करावा. इतर गोष्टींप्रमाणें भाषेचीही सुधारणा होत असते. तेराव्या शतकांतील मराठी भाषेचे सारे नियम आजच्या मराठीस लाऊं म्हटलें, तर कधींही चालायाचें नाहीं. भाषेंत कोणत्याही नवीन प्रकारचे संप्रदाय पडून ते सुशिक्षित लोकांस संमत झाले, व ते वारंवार त्यांच्या बोलण्यांत व लिहिण्यांत येऊं लागले, म्हणजे व्याकरणकारांनीं आपले दुराग्रह एकीकडे ठेऊन त्यांचा आदर केला पाहिजे. आपले जुने नियम त्यांवर चालविण्याचा प्रयत्न करण्यांत कांहीं नफा नाहीं. 'केल्यास', 'केल्यावर' इत्यादि शब्दांची फोड करण्याचा द्राविडीप्राणायाम करीत बसण्यापेक्षां, त्यांस विभक्तींनीं व अव्ययांनीं झालेलीं धातुसाधितांचीं सामान्यरूपें मानून निर्वाह करून घेणें विशेष सोईचें आहे. 'सूर्य उगवल्यावर आपण पुढें चालूं लागलों' या वाक्याचें 'पृथक्करण' किंवा 'व्याकरण' करतांना 'सूर्य उगवला', 'यावर (किंवा मग) आपण पुढें चालूं लागलों' असा दीर्घ अर्थ दोन वाक्यांनीं निर्दिष्ट करण्याचा बोलणाराचा हेतु असता, तर त्यानें आपण होऊन दोन वाक्यें घातलीं असतीं; तें काम त्यानें व्याकरणकारावर किंवा वाक्यमीमांसकावर सोंपविलें नसतें. दुसरें हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे, कीं अशा रीतीनें वाक्याची फोड करूं गेल्यास, वाक्याच्या ज्या भागाला महत्त्व देण्याचा उद्देश नसतो, त्यास महत्त्व देण्यांत येतें. अशा रीतीनें उद्दिष्ट अर्थाचा अनर्थ करण्याचा अधिकार व्याकरणकाराला नाहीं, व वाक्य-मीमांसकालाही नाहीं. 'उगवला आणि मग' असे शब्द न घालतां 'उगवल्यावर' असा एक संयुक्त शब्द घालण्यांतच 'सूर्य उगवल्यावर' या वाक्यांशानें स्वतंत्र वाक्यार्थाचा बोध न होतां, फक्त कालवाचकक्रियाविशेषणार्थक वाक्यांशाचा बोध व्हावा, असा बोलणाराचा किंवा लिहिणाराचा आशय असावा, असें स्पष्ट सिद्ध होतें. निदान या पुस्तकांत तरी वरील कारणांस्तव अशा प्रकारच्या वाक्यांस 'शुद्ध' वाक्यांत गणिलें आहे.

कित्येकदां या क्रियाविशेषणार्थक वाक्यांशांतील धातुसाधिताचा कर्ता, वाक्यांतील क्रियापदांच्या कर्त्याहून भिन्न असतां, सांगितलेला नसतो. 'पुण्यास जाऊन तरी काय फायदा होणार आहे ?' या वाक्यांतील 'जाऊन' चा कर्ता अध्याहृत आहे. ज्या इसमाला जाऊन फायदा होईल किंवा नाहीं, अशी शंका

आहे, तो इसम त्या 'जाऊन 'चा कर्ता आहे. ज्या ठिकाणीं अशा रीतीनें कर्ता सहज समजण्याची सोय नसते, त्या ठिकाणीं तो स्पष्ट सांगण्यांत येतो. 'त्यांनीं जाऊन तरी काय केलें ?' या वाक्यांतील 'जाऊन ' चा कर्ता 'त्यांनीं ' पैकीं 'ते' अध्याहृत आहे. ते गेले, पण त्यांनीं काय केलें असा अर्थ आहे. 'जाऊन तरी' हा क्रियाविशेषणार्थक वाक्यांश होय. "लार्ड चॅथॅम् पार्लमेंटमध्यें बोलत असतां घेरी येऊन पडला." या वाक्यांत 'चॅथॅम्' हा 'बोलत असतां' या धातुसाधिताचा आणि 'पडला' या क्रियापदाचा कर्ता आहे. 'पार्लमेंटमध्यें बोलत असतां' हा कालवाचक क्रियाविशेषणार्थक वाक्यांश आहे. याप्रमाणेंच 'त्यानें आम्हांस दोन तास वाट पहात बसविलें', 'आम्ही मारेकऱ्यास त्याला मारतांना पाहिलें' यांतील 'दोन तास वाट पहात' व 'त्याला मारतांना ' हे क्रियाविशेषणार्थक धातुसाधितांत वाक्यांश समजले पाहिजेत. यांपैकी पहिल्यानें क्रियापदाच्या रीतीचा व दुसऱ्यानें काळाचा बोध होतो. संस्कृतांत अशा प्रकारचे वाक्यांश विशेषणार्थक होतात. पण मराठींत तसें करणें अप्रशस्त दिसतें. इंग्रजींतही कधीं कधीं अशा प्रकारच्या वाक्यांशास विशेषण म्हणावें किंवा क्रियाविशेषण म्हणावें, अशी पंचाईत पडते. मराठी वाक्याविषयीं जर असा स्थूल नियम घातला कीं, धातु साधितांपैकीं जीं धातुसाधितें अव्ययी आहेत, म्हणजे ज्यांना लिंगवचनविभक्त्यादि कार्यें होत नाहींत, त्यांवरून क्रियाविशेषणार्थक वाक्यांशच होतात, विशेषणार्थक होत नाहीत, तर फारसा बाध येईल असें वाटत नाहीं. अशा प्रकारचीं अव्ययी धातुसाधितें किंवा कृदंतें फक्त तीन आहेत; दोन वर्तमानकालवाचक व एक भूतकालवाचक. 'तो काम करून आला', 'मी चालतां चालतां (अथवा चालतांना) थकलों' यांत 'काम करून ' व 'चालतां चालतां (अथवा चालतांना)' हीं क्रियाविशेषणें मानणें बरें दिसतें. तसेंच, 'शिपायांनीं कैद्याला मारीत नेलें', 'तो साऱ्या वाटभर रडत आला' यांत 'मारीत' व 'रडत' हीं क्रियाविशेषणें करणें बरें दिसतें. या 'ईत' किंवा 'अत' प्रत्ययांत कृदंतांचा कधीं कधीं विशेषणासारखाही उपयोग होतो. शिवाय यांच्या योगानें संयुक्त क्रियापदें होतात.

वरील सर्व विवेचनावरून हें ध्यानांत ठेवायाचें कीं, शब्द कोणत्याही प्रकारचा असो, त्यापासून जर क्रियाविशेषणाचा अर्थ निघत असेल तर तो बेधडक क्रियाविशेषण करावयाचा. इतर ठिकाणीं तो नामार्थक, विशेषणार्थक, किंवा अन्यार्थक असला म्हणून ज्या ठिकाणीं तो क्रियाविशेषणार्थक असेल त्या ठिकाणीं त्याला क्रियाविशेषण म्हणण्यास मागें पुढें पाहतां कामां नये.

क्रियापदाचा विस्तार फक्त क्रियाविशेषणांनीं होतो, व हीं क्रियाविशेषणें अनेक प्रकारच्या शब्दांवरून व वाक्यांशांवरून साधतां येतात हें वर दाखविलें.

आतां क्रियाविशेषणांनीं क्रियेच्या संबंधानें कोणते अर्थ व्यक्त केले जातात, हें थोडक्यांत सांगितलें असतां, वाक्यांतील कोणताही शब्द किंवा शब्दसमूह (वाक्यांश) क्रियाविशेषणार्थक आहे किंवा नाहीं, हें समजण्यास सुलभ पडेल. क्रियाविशेषणें सहा प्रकारचीं आहेत :–

**(१) स्थानदर्शक; (२) कालदर्शक; (३) इयत्ता अथवा परिमाणदर्शक; (४) अनिश्चय किंवा निश्चयदर्शक; (५) कारण व कार्य अथवा परिणाम-दर्शक; (६) रीतिदर्शक.**

कोणी वाक्यमीमांसक तिसऱ्या आणि चवथ्या प्रकारच्या क्रियाविशेषणांचा सहाव्यांत अंतर्भाव करून क्रियाविशेषणांचे चारच प्रकार करतात.

१. 'स्थानदर्शक' क्रियाविशेषणांपासून स्थितीचा व गतीचा बोध होतो. गत्यर्थदर्शक क्रियाविशेषणेंही दोन प्रकारचीं आहेत; ज्या स्थानापासून गतीस आरंभ होतो तत्स्थानदर्शक, व ज्या दिशेकडे किंवा ज्या स्थानाकडे गतीचा ओघ असतो, ती दिशा किंवा तें स्थान दाखविणारीं. 'तो शनवारांत राहतो' (स्थान). 'आगबोट कराचीहून आली' (गति—आरंभस्थान).'आनंदीबाई विद्यासंपादनार्थ अमेरिकेस गेली' (गति—लयस्थान).

२. 'कालदर्शक' क्रियाविशेषणांपासून वर्तमान, भूत, व भविष्य इत्यादि निश्चितकाळ, पौनःपुन्य, व कालावस्थिति इत्यादिकांचा बोध होतो. 'पांडव पूर्वीं होऊन गेले' (काल—भूत), 'तो आतां वाचीत आहे' (काल—वर्तमान), 'धारण पुढें सवंग होईल" (काल—भविष्य), 'कोंकणांतील भिक्षुक प्रतिवर्षीं देशावर येतात' (काल—पौनःपुन्य), 'गिबन आपला रोमचा इतिहास पंचवीस वर्षें लिहित होता' (काल—अवस्थिति). कोणी व्याकरणकार पौनःपुन्य आणि अवस्थिति यांत फारशी तफावत मानीत नाहींत. 'वारंवार', 'क्वचित्', 'कधीं कधीं', 'मधून मधून', 'दरमहिन्यास', 'नेहमीं' इत्यादि क्रियाविशेषणें पौनःपुन्य व अवस्थिति हीं दोनही दाखवितात असें म्हणण्यास हरकत नाहीं.

३. इयत्तार्थदर्शक किंवा परिमाणदर्शक क्रियाविशेषणांचे उपभेद केलेच तर असे होतील. 'त्यानें आपल्या जिवाउपरांत कष्ट केले' (परिमाण—अतिशयता); 'हें पाणी बहुतकरून वर्षभर पुरेल', 'जिलब्यांचा कांहीं अंशीं तोटाच आला म्हणावयाचा' (परिमाण—न्यूनत्व); 'गतवर्षीं पाऊस रगड झाला', 'तुमचें म्हणणें अगदीं बरोबर आहे', 'तुम्ही वाजवी बोललां' (परिमाण—पूर्ति); 'तुमचा मुलगा उत्तरोत्तर बिघडत चालला', 'तुम्ही हळू हळू भकूं लागलां', 'थेंबें थेंबें तळें सांचे' (परिमाण—पारंपर्य). 'जसा-तसा', 'जितकें—तितकें' इत्यादि तुलनार्थदर्शक क्रियाविशेषणांचा याच सदरांत समावेश केला पाहिजे.

४. 'निश्चय व अनिश्चय'दर्शक क्रियाविशेषणांत संशय व निःसंशय, संदिग्धता व असंदिग्धता, आणि निषेध दाखविणाऱ्या क्रियाविशेषणांचा समावेश केला पाहिजे. 'आज कदाचित् पाऊस पडेल' (संशय); 'त्याला खरोखरी वेड लागलें आहे' (निःसंशय); 'कदाचित् ते तुम्हांला भेटतील' (संदिग्धता); 'मी एक ब्रसुद्धां काढणार नाहीं हें तुम्हाला साफ सांगून ठेवितों' (असंदिग्धता); 'मासे जमिनीवर क्वचित् येतात' (निषेध). अकरणरूपी क्रियापदांतील 'न'कार कधीं कधीं कवितेंत निराळा काढतात; अशा ठिकाणीं त्यास निषेधार्थक क्रियाविशेषण मानण्यास हरकत नाहीं. तसेंच अलीकडील कित्येक मोठे विद्वान् इंग्रजींतील 'इज् नॉट् (is not)'चें भाषांतर 'नाहीं आहे' असें करीत असतात. हा प्रकार प्रचारांत आल्यास त्यांतील 'नाही'स 'आहे'चें क्रियाविशेषण मानावें लागेल. 'संशय व निःसंशय' आणि 'संदिग्धता व असंदिग्धता' यांत म्हणण्यासारखा भेद नाहीं. 'हो', 'छे', 'यदाकदाचित्', 'दैववशात्', 'एकाएकीं नशीब उघडून', 'अकस्मात् दैवाची रेघ उमटल्यास अथवा रेषा उमटल्यास' वगैरे शब्द किंवा शब्दसमूह या सदरांतील क्रियाविशेषणें किंवा क्रियाविशेणार्थक वाक्यांश मानण्यास हरकत नाहीं.

५. कारण व कार्य अथवा परिणामदर्शक क्रियाविशेषणें किंवा क्रियाविशेषणार्थक वाक्यांश 'मुळें', 'द्वारें', 'करवीं', 'करतां', 'साठीं', 'स्तव', 'प्रमाणें', 'अर्थी' इत्यादि शब्दयोगी अव्ययांचा नामांशीं व धातुसाधितांशीं संयोग होऊन होतात. 'तूं गेलास म्हणून तो आला.' यांत 'म्हणून' हें उभयान्वयी अव्यय कारणदर्शक क्रियाविशेषणही आहे. 'दिवस लहान झाल्यामुळें अगदीं फावेंनासें झालें आहे.' यांत 'दिवस लहान झाल्यामुळें' हा कारणदर्शक क्रियाविशेषणार्थक वाक्यांश आहे.

६. रीति दाखविणारीं क्रियाविशेषणें गुणदर्शक विशेषणाप्रमाणें अमर्याद आहेत. जीं क्रियाविशेषणें वर दिलेल्या पांच प्रकारांत येत नसतील त्या सर्वांचा या प्रकारांत समावेश केला पाहिजे. कोणतीही क्रिया करण्याच्या तऱ्हा अनंत असतात, असें म्हणण्यास हरकत नाहीं. या तऱ्हा दाखविणारे जितके शब्द तितके सारे क्रियाविशेषणें होतात. उदाहरणार्थ 'त्यानें चेंडू फेंकला' हें वाक्य घ्या. यांतील 'फेंकला' या क्रियापदाच्या पाठीमागें रीतिदर्शक हवीं तितकीं क्रियाविशेषणें लावतां येतील; 'जलद फेंकला', 'सावकाश फेंकला', 'एकदम फेंकला,' 'अकस्मात् फेंकला', 'एकाएकीं फेंकला', 'जोरानें फेंकला', 'हळू फेंकला,' 'घाईनें फेंकला,' 'संथपणानें फेंकला,' 'ऐटीनें फेंकला', 'सफाईनें फेंकला,' 'तिरकस फेंकला', 'झुगारून फेंकला', 'बरोबर फेंकला', 'बिनचूक फेंकला',

'वेडावांकडा फेंकला', इत्यादि किती तऱ्हा होतात त्या पहा. या सर्व तऱ्हा एकेका शब्दानें दाखविल्या आहेत. यांच्या जागीं अनेक शब्दात्मक वाक्यांश घातले तर त्यांचा विस्तार केवढा होईल, हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. येथपर्यंत शुद्ध वाक्यांच्या अंगांचा किंवा घटकावयवांचा विचार झाला. पुढें **मिश्रसंयुक्तादि** बाकीच्यांच्या अंगांचा विचार करावयाचा. तो करण्यापूर्वी एकवार मागें फिरून 'शुद्ध' वाक्याच्या विस्ताराचें संक्षिप्त स्वरूप विद्यार्थ्यांच्या सोईसाठीं थोडक्यांत पुनः देतों:

१. **शुद्ध वाक्य**— ज्या वाक्यांत एकच '**उद्देश्य**' व एकच पूर्ण क्रियापद असतें, तें शुद्ध वाक्य होय.

२. **उद्देश्य**— नाम, सर्वनाम, धातुसाधित नाम किंवा दुसरा कोणताही नामार्थक शब्द 'शुद्ध' वाक्यांत उद्देश्य होऊं शकतो.

३. **विधेय क्रियापद**— 'शुद्ध' वाक्यांतील क्रियापद पूर्ण पाहिजे. त्यास 'काळ,' 'अर्थ', 'पुरुष', इत्यादिकांसाठीं लागणारे प्रत्यय, किंवा होणारें रूप झालें असलें पाहिजे. सकर्मक क्रियापदास कर्म असतें.

४. **उद्देश्याचा व कर्माचा विस्तार**— 'उद्देश्य' व 'कर्म' हीं नामें किंवा नामार्थक शब्द असल्यामुळें त्या उभयतांचा विशेषणांनीं, किंवा विशेषणार्थक शब्दांनीं विस्तार होतो.

५. 'शुद्ध' वाक्यांतील नामाचा विस्तार (१) विशेषणांनीं, (२) समानाधिकरण पदांनीं, (३) अव्ययांत नामांनीं व धातुसाधितांनीं, आणि (४) विभक्त्यंत नामांनीं व धातुसाधितांनीं होतो. (२), (३) व (४) यांतील शब्द जेव्हां नामांचा विस्तार करतात तेव्हां त्यांस विशेषणें समजावयाचें.

६. या चार साधनांपैकीं हवीं तीं पाहिजे तितके वेळ योजून 'शुद्ध' वाक्यांतील कोणत्याही नामाचा विस्तार हवा तितका करतां येईल. वाक्याच्या सुगमतेशिवाय या विस्तारास दुसरी मर्यादा नाहीं.

७. शुद्ध वाक्याच्या विधेयांत मुख्य शब्द 'क्रियापद' होय. हें सकर्मक असल्यास त्यास कर्म असतें. कर्म नामवाचक असल्यामुळें त्याचा वर सांगितलेल्या चार प्रकारांनीं विस्तार करतां येतो. कित्येक सकर्मक व अकर्मक क्रियापदें 'अपूर्ण' असतात; त्यांचा अर्थ पूर्ण करण्यासाठीं कांहीं 'पूरक' शब्द घालावे लागतात. 'अपूर्ण' अकर्मक क्रियापदांच्या कर्त्यांची जी विभक्ति ती त्यांच्या पूरकांची विभक्ति असते. 'अपूर्ण' सकर्मक क्रियापदांच्या कर्मांची विभक्ति त्यांच्या पूरकांस असते. 'पूरक' शब्द आणि 'कर्में' हीं विधेय क्रियापदांचीं 'आद्य' विस्तारकें होत.

८. 'पूरक' व 'कर्मे' यांशिवाय विधेय क्रियापदांचा विस्तार करणारे शब्द 'क्रियाविशेषणें' होत. मराठींत कांहीं शुद्ध क्रियाविशेषणें आहेत. त्यांशिवाय क्रियाविशेषणांच्या जागी जे शब्द येतात ते :—(१) नामें, किंवा विशेषणें आणि नामें; विशेषणें. (२) विभक्त्यंत नामें व धातुसाधितें. (३) अव्ययांत नामें व धातुसाधितें. (४) आणि धातुसाधितांत वाक्यांश.

९. ज्या शब्दसमूहांत पूर्ण क्रियापद नाहीं, पण ज्याच्या योगानें एक विवक्षित कार्य होत असतें, त्याला 'वाक्यांश' म्हटलें आहे. 'उद्देश्या'चा विस्तार करणाऱ्या अनेक प्रकारच्या शब्दांस **उद्देश्यगुणवाचकें,** आणि विधेय क्रियापदांचा, 'पूरक' आणि 'कर्मे', यांशिवाय, विस्तार करणाऱ्या इतर शब्दांस **विधेयक्रियाविशेषणवाचकें** म्हणावें.

१०. 'शुद्ध' वाक्यांतील उद्देश्य, कोणत्याही वाक्यांतील उद्देश्याप्रमाणें, पाहिजे त्या विभक्तीचें असण्यास जरी हरकत नाहीं, तरी तें बहुधा प्रथमांत किंवा तृतीयांत आणि क्वचित्स्थळीं चतुर्थ्यंत असतें.

## मिश्र वाक्याचा विस्तार

**मिश्र** वाक्यांत एक मुख्य उद्देश्य व एक मुख्य विधेय असून दोन अथवा अधिक पूर्ण क्रियापदें असतात.

'पृथ्वी वाटोळी आहे हें सहज सिद्ध करून देतां येतें', 'तुम्ही सांगाल तिकडे मी जाईन', 'मनुष्य जसें करतो तसें भोगतो'. यांपैकीं पहिल्या वाक्यांत 'पृथ्वी वाटोळी आहे' येवढें सारें वाक्य 'मुख्य उद्देश्य' आहे; कारण या वाक्यांत जो सिद्धांत किंवा विधान केलें आहे तें कशा प्रकारचें आहे हें समग्र वाक्याचा सांगण्याचा उद्देश आहे. 'पृथ्वी वाटोळी आहे.' ही 'सहज सिद्ध करण्याजोगी' गोष्ट आहे, असें सांगावयाचें आहे. तेव्हा अर्थातच 'पृथ्वी वाटोळी आहे' हें 'मुख्य उद्देश्य' होतें, व 'सहज सिद्ध करून देतां येतें' हें मुख्य विधेय होतें. याप्रमाणेंच दुसऱ्या वाक्यांत 'मी' हा शब्द 'मुख्य उद्देश्य' व 'जाईन' हा 'मुख्य विधेय' आहे, व तिसऱ्या वाक्यांत 'मनुष्य' हा शब्द 'मुख्य उद्देश्य' असून 'भोगतो' हें 'मुख्य विधेय' आहे. पुनः 'ज्या जिव्हेनें त्वां असले अमंगळ शब्द उच्चारिले ती तुझी जिव्हा एकदम झडो', या वाक्यांत 'ती तुझी जिव्हा' हें 'मुख्य उद्देश्य' आहे, व 'एकदम झडो' हें 'मुख्य विधेय' आहे. शुद्ध वाक्यांत उद्देश्यस्थानीं असणारा नामार्थक शब्द ज्या प्रकारचें काम करतो, त्या प्रकारचें काम पहिल्या वाक्यांत 'पृथ्वी वाटोळी आहे' या वाक्यानें होत आहे, हें उघड आहे; तेव्हां या वाक्यास **नामार्थक** वाक्य किंवा **नामवाक्य**

म्हणण्यास हरकत नाहीं. दुसऱ्या वाक्यांतील 'तुम्ही सांगाल तिकडे' या पोटवाक्यानें 'मी जाईन' या वाक्यांतील 'जाईन' या क्रियापदाच्या स्थलाचा निर्देश होत आहे, तेव्हां त्यास **क्रियाविशेषणार्थक** किंवा **क्रियाविशेषणवाक्य** म्हटलें पाहिजे. चवथ्या वाक्यांतील 'ज्या जिव्हेनें त्वां असले अमंगळ शब्द उच्चारिले' या पोटवाक्यानें पुढल्या वाक्यांतील 'जिव्हा' शब्दाचें वर्णन होत असल्यामुळें त्याच्या ठायीं गुणदर्शकत्व येऊन तें त्या शब्दाचें विशेषण होत आहे, तेव्हां त्यास **विशेषणार्थक** किंवा **विशेषणवाक्य** म्हणणें अवश्य आहे. या स्वल्प विवेचनावरून 'शुद्ध' व 'मिश्र' वाक्यांतील भेद वाचकांच्या तेव्हांच लक्षांत येण्यासारखा आहे. शुद्ध वाक्यांतील नामें, विशेषणें, व क्रियाविशेषणें एकशब्दात्मक असतात किंवा अनेकशब्दात्मक असतात. पण जेव्हां तीं अनेकशब्दात्मक असतात, तेव्हां त्यांत पूर्ण क्रियापद असतां कामां नये असा निर्बंध आहे; कारण दुसरें पूर्ण क्रियापद आल्याबरोबर वाक्यांत वाक्य तयार होऊन दोन उद्देश्यें व दोन विधेयें उत्पन्न होतात, व शुद्ध वाक्याच्या व्याख्येचा अतिक्रम होतो. यावरून काय झालें कीं, जर एखाद्या शुद्ध वाक्यांत नामाच्या, विशेषणाच्या किंवा क्रियाविशेषणाच्या जागीं एका शब्दाची, अथवा क्रियापदाव्यतिरिक्त शब्दसमूहाची (म्हणजे वाक्यांशाची) योजना करण्याची सोय नसली, व क्रियापदयुक्त शब्दसमूह घालण्याची आवश्यकता असली, तर त्या वाक्याचें शुद्धत्व नाहीसें होऊन तें तत्काळ 'मिश्र' वाक्य बनतें. कित्येक नामात्मक, विशेषणात्मक, व क्रियाविशेषणात्मक अर्थ, भाषेच्या अडचणीमुळें, एका शब्दानें किंवा वाक्यांशानें व्यक्त करितां येत नाहींत. ते व्यक्त करण्यासाठीं पूर्ण वाक्यें योजावीं लागतात. पण अशा अडचणीमुळें ज्या 'मुख्य' वाक्यांत अशीं वाक्यें येतात, त्यांनी त्या 'मुख्य' वाक्याच्या संबंधानें फक्त नामाचें, विशेषणाचें किंवा क्रियाविशेषणाचेंच काम होत असतें. अशा रीतीनें एका 'मुख्य' वाक्यांत लपेटून गेलेलीं, किंवा त्याचे अंशभूत झालेलीं, जीं 'नामार्थक', 'विशेषणार्थक', व 'क्रियाविशेषणार्थक' वाक्यें त्यांस **गौण** वाक्यें म्हणतात, व लपेटणाऱ्या किंवा आधारभूत वाक्यांस **प्रधान** वाक्यें म्हणतात; अथवा मिश्र वाक्याच्या ज्या भागांत 'मुख्य विधेय' व 'मुख्य उद्देश्य' असतात त्यास 'प्रधान' वाक्यें म्हणून, दुसऱ्यास 'गौण' म्हटलें तरी चालेल.

'मिश्र' वाक्यांत समानाधिकरण गौण वाक्यें असलीं तर **मिश्रसंयुक्त** वाक्य होतें. 'श्रीपतरावास तीन मुली आहेत, व त्यांपैकीं दोघींचीं लग्नें झालीं आहेत, असें त्यानें मला सांगितलें.' या मिश्र वाक्यांत 'असें त्यानें मला सांगितलें' हें 'प्रधान' वाक्य आहे, व पहिलीं दोन गौण वाक्यें आहेत. प्रधान वाक्यांतील

'सांगितलें' या क्रियापदाचीं पहिलीं दोन्ही वाक्यें कर्में आहेत. जेव्हां कोणत्याही दोन अथवा अधिक वाक्यांचा कोणत्याही शब्दाशीं किंवा वाक्याशीं एका प्रकारचाच संबंध असतो, तेव्हां त्यास **समानाधिकरण** वाक्य म्हणतात. 'समानाधिकरण' म्हणजे सारखें स्थान. 'श्रीपतरावास......सांगितलें' या मिश्र वाक्याचा पूर्ण अर्थ असा आहे कीं 'श्रीपतरावास तीन मुली आहेत, असें त्यानें मला सांगितलें,' व 'त्यांपैकीं दोघींचीं लग्नें झालीं आहेत, असें त्यानें मला सांगितलें.' हीं दोन पृथक् 'मिश्र' वाक्यें मिळून 'मिश्रसंयुक्त' वाक्य होतें; व या 'मिश्रसंयुक्त' वाक्यांतील गौण वाक्यांचा प्रधान वाक्यांशीं एकाच प्रकारचा, म्हणजे येथें कर्माचा संबंध असल्यामुळें त्यांस 'समानाधिकरण' वाक्यें म्हटलें पाहिजे. मिश्र वाक्यांतील गौण वाक्यें नेहमीं '**समानाधिकरणच**' असतात, असा नियम नाहीं. तीं **व्यधिकरण** किंवा असमानाधिकरणही असूं शकतात. 'प्रेंडरगास्ट यानें थीबास कैद केलें ही बातमी लॉर्ड डफरिन यास समजली तेव्हां त्याला आपण आपल्या अंगावर घेतलेल्या जबाबदारींतून पार पडलों असें वाटलें असेल, यांत संशय नाहीं.' या मिश्र वाक्यांतील गौण वाक्यें एकमेकांवर अवलंबून आहेत, म्हणजे व्यधिकरण आहेत, समानाधिकरण नाहींत. याच मिश्र वाक्याच्या आरंभीं जर असें असतें कीं 'प्रेंडरगास्ट थीबाच्या राजधानीस सैन्यासह सुरक्षित पोंचला, व त्यानें त्यास कैद केलें ही बातमी इत्यादि .....', तर पहिलीं दोन छोटीं वाक्यें तिसऱ्या वाक्याच्या संबंधानें समानाधिकरण झालीं असतीं. यावरून सुज्ञ वाचकांस हें दिसून येईल कीं मिश्र वाक्यांत पाहिजे तितकीं व्यधिकरण गौण वाक्यें असूं शकतील; तसेंच त्यांत पाहिजे त्या ठिकाणीं समानाधिकरण गौण वाक्येंही घालतां येतील.

गौण वाक्यें तीन प्रकारचीं आहेत. **१. नामार्थक,** २. **विशेषणार्थक**, व ३. **क्रियाविशेषणार्थक**. यांहून चवथा प्रकार होत नाही. शुद्ध वाक्यांचे 'प्राथमिक' अवयव नामें आणि क्रियापदें; व 'सहकारी' अवयव विशेषणें आणि क्रियाविशेषणें. यांपैकीं क्रियापदाबद्दल वाक्य योजण्याची अवश्यकता येत नाहीं; कारण कोणत्याही क्रियापदानें व्यक्त होणारी क्रिया वाक्यानें व्यक्त करण्याचा प्रयत्न करण्यांत फायदा नाहीं. शिवाय, वाक्याशीं कितीही हातचलाखी केली तरी त्याला क्रियापदत्व प्राप्त होत नाहीं; म्हणजे त्यापासून क्रियापदाचा अर्थ निघूं लागत नाहीं. नाम, विशेषण, व क्रियाविशेषण यांची तशी गोष्ट नाहीं. यांचे जागीं एकटे शब्द, पूर्ण क्रियापदांशिवाय शब्दसमूह (वाक्यांश), व पूर्ण क्रियापदांसह शब्दसमूह (वाक्यें) योजतां येतात. जोंपर्यंत वाक्यांत एक क्रियापद असून नामें, विशेषणें आणि क्रियाविशेषणें—यांच्या जागीं एकटे शब्द किंवा वाक्यांश असतात, तोंपर्यंत त्यांचें शुद्धत्व कायम राहतें. पण जेव्हां या तिहींपैकीं एकाचे, दोहोंचे,

किंवा सर्वांचे जागीं वाक्यें घातलीं जातात, तेव्हां त्यांचें शुद्धत्व लयास जाऊन त्यांचें 'मिश्र' वाक्य होतें.

## नामार्थक अथवा नामवाक्यें

शुद्ध वाक्यांत ज्या ज्या स्थलीं नाम किंवा नामार्थक शब्द येतो त्या त्या स्थलीं 'मिश्र' वाक्यांत **नामवाक्य** येतें. शुद्ध वाक्यांत नामें १. उद्देश्यस्थानीं, २. सकर्मक क्रियापदांच्या कर्मस्थानीं, ३. विशेषणार्थक समानाधिकरणपदस्थानीं, आणि ४. अपूर्ण क्रियापदांच्या पूरकस्थानीं येतात, म्हणून पूर्वी सांगितलें आहे. 'मिश्र' वाक्यांतही या चारही ठिकाणीं 'नामवाक्यें' घालतां येतात; अथवा मिश्र वाक्यांत या चार ठिकाणीं येणारीं जीं वाक्यें तीं 'नामवाक्यें' होत. 'तो आधीच निघून गेला हें फार वाईट झालें', 'मी काय करीन तें मी आतां सांगत नाहीं', 'त्यानें तें केलें ही गोष्ट उघड होती', 'त्या वेडाचा परिणाम असा झाला कीं त्यानें शेवटीं विहिरींत जीव दिला.' या चार मिश्र वाक्यांपैकीं पहिल्यांतलें गौण वाक्य 'उद्देश्य' आहे, दुसऱ्यांतलें 'कर्म' आहे, तिसऱ्यांतलें 'गोष्ट' या शब्दाशीं समानाधिकरण आहे, व चवथ्यांतलें 'झाला' या क्रियापदाचें पूरक आहे.

गौण वाक्य प्रधान वाक्यापूर्वी आलें असतां त्याबद्दल प्रधान वाक्याच्या आरंभीं 'असें', 'हें' वगैरे सार्वनामिक शब्द घालण्याची चाल आहे. हे शब्द घातल्यानें मागल्या वाक्याचा एका शब्दांत अंतर्भाव केल्यासारखें होऊन, सर्व वाक्यास एक प्रकारचा आटपसरपणा येतो. गौण वाक्य प्रधान वाक्याच्या मागून आलें असतां, त्याच्या दरम्यान 'कीं' हें उभयान्वयी अव्यय बहुधा येतें, आणि गौण वाक्याबद्दल प्रधान वाक्यांत प्रायः 'असें' किंवा 'हें' यांपैकीं एखादें दर्शक सर्वनाम येतें. गौणप्रधान वाक्यांचा संबंध होतांना कोणता तरी सार्वनामिक शब्द किंवा उभयान्वयी अव्यय आलेंच पाहिजे असा नियम नाहीं. पद्यांत पुष्कळ ठिकाणीं कोणतेंही सर्वनाम किंवा अव्यय मुळींच घालीत नाहींत; पण अलीकडील गद्यांत बहुधा घालतात. इंग्रजींत 'इट्' (It) आणि 'दॅट्' (That) या शब्दांनीं मराठींतील 'हें', 'असें' आणि 'कीं' यांचें काम होतें.

तातादिक म्हणति मनीं सुमति खळाला अचक्षुला रत्न !
शूद्रास श्रुति देतो राम, न चालेचि यापुढें यत्न. ॥

या आर्येंत 'तातादिक म्हणति मनीं' हें प्रधान वाक्य आहे, व 'सुमति खळाला' इत्यादि गौण वाक्य आहे. तथापि त्या उभयतांचा संबंध जोडणारा 'कीं' शब्द वृत्ताच्या सोईसाठीं घातलेला नाहीं. तसेंच पुढील समानाधिकरण गौण वाक्यांतील 'आणि' हें समुच्चयार्थक उभयान्वयी अव्ययसुद्धां गाळलें आहे. 'हें असें कसें

झालें कोण जाणे.' या मिश्र वाक्यांत 'कोण जाणे' हें प्रधान वाक्य आहे, व 'हें असें कसें झालें' हें गौण वाक्य आहे; पण त्यांस जोडणारें दर्शकसर्वनाम किंवा उभयान्वयी अव्यय नाहीं. 'तो तसाच आहे हें मला ठाऊक आहे' या मिश्र वाक्यांत 'तो तसाच आहे' हें 'आहे' या अपूर्ण विधेय क्रियापदाचें उद्देश्य आहे, व 'ठाऊक' हें त्याचें पूरक आहे, हें उघडच आहे. पण थोडा बारकाईचा विचार केला असतां असें दिसून येईल कीं 'तो तसाच आहे' हें 'ठाऊक' या विशेषणाचें कर्म आहे. 'तो तेवढें करील अशा आशेनें मी तें पत्करिलें' या मिश्र वाक्यांत 'अशा आशेनें' या वाक्यांशाचा अर्थ 'असें वाटून' असा आहे, व 'तो तेवढें करील' हें त्या आशार्थक 'वाटून'चें कर्म आहे. यावरून काय दिसतें कीं कांहीं नामांना व विशेषणांना क्रियापदाप्रमाणें कर्माकांक्षा असते. पृथक्करण करतांना अशा नामांना व विशेषणांना नामें व विशेषणेंच मानिलें पाहिजे. पण कधीं कधीं त्यांत क्रियापदांचें सामर्थ्य असतें, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. गौण वाक्यानंतर जें दर्शकसर्वनाम येतें, त्याशीं तें वाक्य समानाधिकरण असतें. 'तो केव्हां गेला हें मला ठाऊक नाहीं', या मिश्र वाक्यांत 'तो केव्हां गेला' हें वाक्य 'हें' या पुढील दर्शकसर्वनामाशी समानाधिकरण समजावयाचें, आणि पृथक्करण करतांना 'हें मला ठाऊक नाहीं' या प्रधान वाक्याचें 'हें' हें उद्देश्य मानून 'तो केव्हां गेला' हें वाक्य त्यापुढें त्याचें समानाधिकरण म्हणून लिहावयाचें, व मागून त्याचें स्वतंत्र पृथक्करण करावयाचें.

मिश्रवाक्यांतील नामार्थक गौण वाक्याच्या जागीं नामार्थक वाक्यांश घालून मिश्राचें शुद्ध वाक्य करतां येतें. 'तो इतका हुशार आहे, हें मला ठाऊक नाहीं', हें मिश्रवाक्य आहे. हेंच शुद्ध करावयाचें असल्यास 'तो इतका हुशार आहे' याबद्दल 'त्याची येवढी हुशारी' असा वाक्यांश घालून 'हें' मुळींच काढून टाकावें, म्हणजे 'त्याची येवढी हुशारी मला ठाऊक नाहीं' असें नवीन वाक्य होतें, व हें शुद्ध आहे. याप्रमाणेंच इतर मिश्रवाक्यांतील नामवाक्यांच्या जागीं नामें किंवा नामवाक्यांश घालून त्या मिश्रवाक्यांचीं शुद्ध वाक्यें करतां येतील. वाक्याच्या ऐवजीं वाक्यांश घालणें किंवा न घालणें हें भाषारहस्यज्ञतेवर अवलंबून आहे.

## विशषेणार्थ किंवा विशेषणवाक्यें

ज्याप्रमाणें विशेषणांनीं नामाची व्याप्ति मर्यादित होऊन त्यांच्या अर्थाचा विस्तार होतो, त्याप्रमाणेंच विशेषणांचे मुख्य प्रतिनिधि जीं विशेषणवाक्यें त्यांनीही होतें. 'अंतरीं निर्मळ। वाचेचा रसाळ। त्याच्या गळां माळ। असो

नसो ।' या अभंगांत अमुक प्रकारच्या पुरुषाच्या गळ्यांत माळ असो किंवा नसो, असा मुख्य भावार्थ आहे, म्हणून 'त्याच्या गळां माळ असो नसो' हें प्रधान वाक्य झालें. या प्रधान वाक्यांत 'असो' व 'नसो' या दोन समानाधिकरण क्रियापदांमधील 'किंवा' हें उभयान्वयी अव्यय गाळलें आहे, हें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें. दिसण्यांत जरी प्रधान वाक्य एक दिसत आहे, तरी तें दोहोंचें एक केलेलें आहे, व त्याचें पृथक्करण करतांना त्याचीं दोन करावीं लागतील. या प्रधान वाक्यांतील 'त्याच्या' या षष्ठ्यंत सर्वनामानें दर्शित विवक्षित प्रकारच्या पुरुषाचें वर्णन, '(जो) अंतरीं निर्मळ (आहे) व (जो) वाचेचा रसाळ (आहे)', या मागल्या विशेषणार्थक समानाधिकरण दोन गौण वाक्यांत आहे. यावरून काय झालें कीं नामांस विशेषणें लाविलीं असतां त्यांवर जो परिणाम होतो, तोच 'विशेषणवाक्यांनीं' होतो. शिवाय, विशेषणाप्रमाणें विशेषणवाक्यही नामालाच मर्यादित करून त्याचा अर्थ वाढविण्याच्या कामाचें आहे. विशेषणाप्रमाणें विशेषणवाक्यही फक्त नामाचें अनुषंगी आहे.

वाक्यांत ज्या ज्या ठिकाणीं नामें येतात, त्या त्या ठिकाणीं विशेषणें घालतां येतील, व ज्या ज्या ठिकाणीं विशेषणें घालतां येतील, त्या त्या ठिकाणीं विशेषणवाक्यें घालतां येतील. वाक्यांत नामाचीं मुख्य ठिकाणें तीन : (१) उद्देश्य, (२) कर्म, व (३) क्रियाविशेषणार्थक विभक्त्यंत शब्द व वाक्यांश. (४) 'नाम' कधीं कधीं अपूर्ण क्रियापदाचें 'पूरक'ही असतें. तेव्हां या सर्व ठिकाणीं असलेल्या नामांच्या पाठीमागें विशेषणवाक्यें जोडून देतां येतील. ज्यावर तुझें प्रेम आहे तो आजारी आहे', 'समुद्रांतून ज्यांवर छापा घालतां येणार नाहीं असे पुष्कळ किल्ले शिवाजीनें बांधले', 'ज्या दसऱ्याला आतां मराठे लोक फक्त शमीपूजनासाठीं सीमोल्लंघन करतात, त्या दसऱ्याला पेशवाईंत मराठे सरदार शत्रूवर मोहीम करण्यास सुमुहूर्तानें नगराबाहेर पडत', 'ज्यानें बापाच्या उज्वल कीर्तीला सर्व प्रकारें काळोखी आणिली असा कुलकलंक संभाजी निघाला.' या चार मिश्र वाक्यांतील पहिल्यांतलें विशेषणार्थक गौण वाक्य प्रधान वाक्यांतील उद्देश्याचें विशेषण आहे, दुसऱ्यांतलें कर्माचें आहे, तिसऱ्यांतलें क्रियाविशेषणांतर्गत नामाचें आहे, व चौथ्यांतलें पूरकाचें आहे.

'जो' हें विशेषणवाक्यांचें संबंधी सर्वनाम होय. हें प्रत्येक वाक्यांत उक्त असतेंच असा नियम नाहीं. इंग्रजींत या 'जो' बद्दल 'हू' (who), 'व्हिच' (which), 'व्हॉट्' (what) व 'दॅट्' (that) हीं संबंधी सर्वनामें येतात.

कित्येक ठिकाणीं प्रश्नार्थक व इतर क्रियाविशेषणांचाही, विशेषणाप्रमाणें उपयोग करतात. 'जो' हें संबंधी सर्वनाम गौण वाक्यांत येतें, व त्याच्या 'अनुरूप' 'तो' हें दर्शकसर्वनाम प्रधान वाक्यांत येते. कधीं कधीं प्रधान वाक्यांतील 'तो' ही गाळतात. पण 'तो'पेक्षां 'जो' फार गाळतात. 'जो'च्या पाठीमागून 'तो' बद्दल 'असा' वगैरे तदर्थक दुसरीं दर्शक सर्वनामेंही येतात. कित्येक ठिकाणीं नामार्थक गौण वाक्यें व विशेषणार्थक गौण वाक्यें यांतील भेद नीट लक्ष देऊन काढावा लागतो. 'तूं कोठें गेला होतास तें मला सांग' हें मिश्र वाक्य थोडें संदिग्ध आहे. प्रधान वाक्यांतील 'तें' हें गौण वाक्यांतील फक्त 'कोठें' चें दर्शक होईल, किंवा सर्व गौण वाक्याचें दर्शक होईल. तें फक्त 'कोठें' चें दर्शक असेल तर 'तें' नामाप्रमाणें योजलेलें विशेषण मानिलें पाहिजे, किंवा त्यानंतर 'ठिकाण' या नामाचा अध्याहार केला पाहिजे. 'तें' मागल्या समग्र गौण वाक्याचें दर्शक असेल तर 'तें'नंतर स्थान या शब्दाचा अध्याहार करण्याची गरज नाहीं. 'तें'नें तें ठिकाण असें समजण्यास मागल्या 'कोठें'नें 'कोठचें ठिकाण' असें समजलें पाहिजे. 'नंतर कसा काय प्रकार झाला तो मला माहित नाहीं' या मिश्र वाक्यांतील 'कसा काय प्रकार झाला' इत्यादि गौण वाक्यांतही संबंधी सर्वनाम नाहीं. तेव्हां हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं विशेषणवाक्यांत संबंधी सर्वनाम सर्वदा उक्त किंवा अध्याहृत असलेंच पाहिजे असें नाहीं. तीं दुसऱ्या सर्वनामांच्या साहाय्यानेंही होतात. विशेषणवाक्य म्हणजे विशेषणच होय. तेव्हां ज्या ठिकाणीं नाम असेल त्या ठिकाणींच विशेषण असण्याचा संभव आहे. विशेषणानें मर्यादिलेलें नाम उक्त नसल्यास त्याचा अध्याहार केला पाहिजे. पण कोणत्या तरी रीतीनें विशेषणानें मर्यादित असें कोठें तरी नाम आहे, असें स्पष्ट दाखविलें पाहिजे. मराठींत व संस्कृतांत नामांस व विशेषणांस लिंगवचनविभक्त्यादि प्रत्यय लागत असल्यामुळें व नामाच्या जागीं विशेषणांचा उपयोग वारंवार करण्यात येत असल्यामुळें, नामवाक्य व विशेषणवाक्य यांतील भेदाविषयीं वरील इशारत ध्यानांत ठेवणें फायदेशीर होणार आहे.

ज्याप्रमाणें नामवाक्यांच्या जागीं नामें किंवा नामार्थ वाक्यांश घालून मिश्र वाक्यांचीं शुद्ध वाक्यें करतां येतात, त्याप्रमाणें विशेषणवाक्यांच्या जागीं विशेषणें किंवा विशेषणार्थक वाक्यांश घालून मिश्र वाक्यांचीं शुद्ध वाक्यें करतां येतात. 'तूं आजपर्यंत जीं कृत्यें केलीं आहेस त्यांची हकीकत थोडक्यांत मला सांग' या वाक्याऐवजीं 'तूं आजपर्यंत केलेल्या कृत्यांची हकीकत थोडक्यांत मला सांग' हें वाक्य योजलें तर मिश्र वाक्याच्या ऐवजीं शुद्ध वाक्य योजिलें असें होईल.

शुद्ध वाक्यांतील उद्देश्यविशेषणें आणि विधेयविशेषणें यांत जसा थोडासा भेद आहे, त्याप्रमाणें कित्येक संबंधी सर्वनामांनीं झालेल्या विशेषणांतही आहे. ज्याप्रमाणें विशेषणवाचक शब्द नामांचे मर्यादक शब्द खरे, तरी वाक्यांत ज्या शब्दांच्या संबंधानें ते घातले असतील ते त्यांच्या योगानें मर्यादित झाले पाहिजेतच असा नियम नाहीं, त्याप्रमाणें प्रत्येक विशेषणवाक्य नाममर्यादक असेलच, असें मानतां येणार नाही. त्याच्या बाह्य स्वरूपावरून व भाषेच्या नित्य रूढीवरून तें मर्यादक आहे असें वाटेल; पण बारिक विचार करतां तें तसें नाहीं असें मानण्यासही कारण आहे, असें दिसून येईल. उदाहरणार्थ मोरोपंतांची पुढील आर्या घ्या:—

'तिसरे दिवशीं चक्रव्यूह सुदुर्भेद्य युक्तिनें रचिला ।
जो धीर-वीर-हार-प्रवर-प्रकरें करोनिया खचिला ॥'

या आर्येचा उत्तान अर्थ असा आहे कीं (कौरवयोद्धयांनीं युद्धाचे) तिसरे दिवशीं (एक मोठा) सुदुर्भेद्य चक्रव्यूह (मोठ्या) युक्तिनें रचिला, 'आणि तो' धैर्यवान् वीररूपी उत्तम उत्तम अनेक हिऱ्यांनीं खचला. ज्याप्रमाणें सोन्याची आंगठी करून तींत तयार केलेल्या कोंदणांत मौल्यवान् खडे बसवावयाचे, त्याप्रमाणें अगोदर चक्रव्यूहाकार सैन्यरचना करून, मग ऐन मान्याच्या जागीं युद्ध निष्णात वीर नेमावयाचे अशी कल्पना आहे. तेव्हां वरील आर्येंतील 'जो' हें संबंधी सर्वनाम 'आणि तो' या दोन शब्दांबरोबर असून 'जो धीर वीर'...इत्यादि वाक्य केवळ विशेषणार्थक मानण्यास थोडी अडचण वाटते. वास्तविक पहातां या आर्येंतील 'जो' संबंधी सर्वनाम नाहीं, तर उभयान्वयी अव्यय आणि दर्शक सर्वनाम आहे. इंग्रजींत अशा अर्थाच्या संबंधी सर्वनामाला 'को-ऑर्डिनेटिंग् रिलेटिव्ह' (Co-ordinating Relative) म्हणजे 'समानाधिकरण वाक्यान्वयी संबंधी सर्वनाम' म्हणतात. वरील आर्येंतील 'जो'स अशा प्रकारचें सर्वनाम मानल्यास तींतील वाक्य मिश्र न करतां संयुक्त करावें लागेल. संबंधी सर्वनामांनीं कोणत्या ठिकाणी विशेषणार्थक वाक्यान्वय होत आहे, व कोणत्या ठिकाणीं समानाधिकरण वाक्यान्वय होत आहे, हें जेथल्या तेथें अर्थनिर्णय करून ठरविलें पाहिजे. अशा प्रकारचा अर्थनिर्णय करतांना मतभेद होण्याचा संभव आहे.

समानाधिकरण वाक्यान्वयी संबंधी सर्वनामांची उदाहरणें मराठी गद्यांत तर आढळतच नाहींत. पद्यांत मात्र कोठें कोठें आढळतात; व पद्यांत जीं आढळतात त्यांची थोडी ओढाताण केली तर तीं विशेषणार्थक वाक्यान्वयी आहेत, असें भासवितां येतें. 'ज्यानें आमचें उत्तम आदरातिथ्य करून आमची

योग्य संभावना केली त्या भोजराजाकडें आम्ही गेलों', या वाक्याचा उत्तान अर्थ असा आहे कीं आम्ही भोजराजाकडे गेलों, व त्यानें आमचें उत्तम आतिथ्य करून योग्य संभावना केली. 'ज्यानें' याचा अर्थ 'व त्यानें' आहे. परंतु आम्हां महाराष्ट्रीयांस भाषाविषयक अर्थजालाशीं झगडण्याची संवय अद्यापि फारशी लागली नसल्यामुळें, अशा प्रकारच्या वाक्यांस शुद्ध विशेषणवाक्यें मानण्याची सहज प्रवृत्ति होते. शिवाय असल्या वाक्यांचा अर्थ करतांना, 'त्या'चा 'अशा' या शब्दानें अर्थ केला तर त्यास 'विशेषणवाक्य' मानण्यास बलवत्तर कारण झाल्यासारखें वाटतें.

## क्रियाविशेषणार्थक किंवा क्रियाविशेषणवाक्यें

क्रियापदांनीं दर्शविलेल्या क्रियेंत क्रियाविशेषणांनीं ज्या प्रकारचे फेरफार होतात, त्याच प्रकारचे फेरफार 'क्रियाविशेषणवाक्यांनीं' होतात. ज्याप्रमाणें विशेषणें व विशेषणवाक्यें नामविकारी आहेत, त्याप्रमाणें क्रियाविशेषणें व क्रियाविशेषणवाक्यें क्रियाविकारी आहेत. क्रियाविशेषणांनीं क्रियापदांच्या किंवा धातुसाधितांच्या रूपांत बदल होत नाहीं; त्यांच्या अर्थांत बदल होतो. म्हणजे क्रियापदाचा स्वतंत्र अर्थ, तें क्रियाविशेषणान्वित घेतलें असतां त्यापासून जो अर्थ निघतो, त्याहून भिन्न असतां, नामांच्या व क्रियापदांच्या व्याप्तींत व अर्थांत बदल करणाऱ्या शब्दांस 'विकारी' ही सामान्य पारिभाषिक संज्ञा दिली असतां चालणार आहे.

क्रियाविशेषणें मुख्यत्वेंकरून क्रियापदविकारी आहेत खरीं; पण परिमाणादि-दर्शक कित्येक क्रियाविशेषणें विशेषणविकारी व अन्यक्रियाविशेषणविकारी असतात. 'तो फार चांगला मुलगा आहे', 'तो फार जलद वाचतो' या दोन वाक्यांपैकीं पहिल्यांत 'फार' हें परिमाणदर्शक क्रियाविशेषण 'चांगला' या विशेषणाचें विकारी आहे, व दुसऱ्यांत 'जलद' या क्रियाविशेषणाचें विकारी आहे. ज्याप्रमाणें परिमाणादि दर्शक क्रियाविशेषणें व क्रियाविशेषणार्थक वाक्यांश, त्याप्रमाणेंच क्रियाविशेषणवाक्येंही बहुधा क्रियापदविकारी, पण क्वचित् विशेषण-विकारी व अन्यक्रियाविशेषणविकारी असतात. 'सांडलेलें तेल भरून घेतां येईल इतकी गुळगुळीत जमीन त्यांनीं केली', 'ऐकणारांच्या सर्व वृत्ति तटस्थ होतील इतकें चांगलें तो गातो' या दोन मिश्र वाक्यांपैकीं पहिल्यांतलें क्रियाविशेषणार्थक गौणवाक्य 'गुळगुळीत' या विशेषणाचें, व दुसऱ्यांतलें 'चांगलें' या क्रिया-विशेषणाचें विकारी आहे. पाहिजे असल्यास हीं क्रियाविशेषणार्थक गौण वाक्यें 'इतकें' या परिमाणदर्शक क्रियाविशेषणाचीं विकारी करून, तें 'गुळगुळीत'

व 'चांगलें' या विशेषणाचें विकारी केलें तरी हरकत नाहीं. क्रियापदांनीं अथवा धातुसाधितांनीं जेथें जेथें क्रियेच्या अर्थाचा बोध होतो, तेथें तेथें क्रियाविशेषणांचा व क्रियाविशेषणार्थक वाक्यांशांचा उपयोग करतां येतो; व ज्या ठिकाणीं या दोहोंचा उपयोग करतां येतो त्या ठिकाणीं क्रियाविशेषणवाक्यांचाही उपयोग करतां येतो; म्हणजे क्रियाविशेषणवाक्यें सर्व प्रकारच्या क्रियार्थांची विकारी होऊं शकतात; आणि याच कारणासाठीं जितके क्रियाविशेषणार्थक वाक्यांशांचे तितकेच क्रियाविशेषणवाक्यांचेही प्रकार करता येतात. ते प्रकार उदाहरणांसह थोडक्यांत खालीं देतो:—

१. स्थानदर्शक क्रियाविशेषणवाक्यें.

जेथें तो पडला तेथेंच तो राहिला.
मी जिकडे जाईन तिकडे तुम्हाला येतां येत नाहीं.

२. कालदर्शक क्रियाविशेषणवाक्यें.

जेव्हां मी जागा झालों तेव्हां सहा वाजले होते.
सद्दी आहे तोंपर्यंत हात चालवून घ्या.

३. परिमाणदर्शक क्रियाविशेषणवाक्यें.

आम्हाला वाटलें होतें त्यापेक्षां ते बरे आहेत.
आजपर्यंत जितका कोणी थकला असेल तितका मी थकलों आहें.

४. निश्चय–अनिश्चय–संकेतादिदर्शक क्रियाविशेषणवाक्यें.

जर तुम्ही प्रामाणिक असाल तर तुम्हाला मान मिळेल.
माझी चुकी नसेल तर मला उगीच कां त्रास देतां ?
त्यानें पुष्कळ खटपट केली पण (तरी) त्याला तें साधेना.
तुम्ही त्याला कितीही साहाय्य केलें (त) तरी त्याच्यानें तें करवणार नाहीं.

५. कारण–कार्य–हेत्वादिदर्शक क्रियाविशेषणवाक्यें.

मीं असें केलें याबद्दल मला धिक्कार असो.
ज्याअर्थीं तुम्ही असें म्हणतां त्याअर्थीं आम्ही त्यावर विश्वास ठेवितों.
तो इतका थकून गेला कीं त्याला घेरी आली.
त्यांनीं इतका आक्रोश केला कीं त्यामुळें सारी चाळ हलून गेली.
हुमायुनास दीर्घायु प्राप्त व्हावें म्हणून बाबरानें आपला मृत्यू आपणावर अकालीं आणवून घेतला असें म्हणतात.
तुमच्या जिवावर गदा येणार आहे म्हणून तुम्ही त्याला हात लाऊं नका.

६. रीत्यादिदर्शक क्रियाविशेषणवाक्यें.

त्याला वाटेल तसा तो वागतो.
तो दिसतो तसाच तो आहे.
त्याला वाटतें तसें तो बोलतो.

क्रियाविशेषणवाक्याचें वरील वर्गीकरण सर्वसंमत झालेंच पाहिजे असें नाहीं. व्याकरणकारांत व वाक्यमीमांसकांत त्याविषयीं कमीअधिक मतभेद आहे. मिश्र वाक्यांतील विशेषणार्थक गौणवाक्यांतर्गत व प्रधानवाक्यांतर्गत संबंधी व दर्शक सर्वनामांविषयीं जें लिहिण्यांत आलें आहे, तेंच युक्त फेरफार करून क्रियाविशेषणार्थक गौणवाक्यांतर्गत व प्रधानवाक्यांतर्गत संबंधी व दर्शक सार्वनामिक क्रियाविशेषणांविषयीं लिहितां येणार आहे. यासंबंधानें प्रस्तुत लेखकाच्या हातची पुनरुक्ति टाळण्यासाठीं कै. कृष्णशास्त्री गोडबोले यांचे व्याकरणांतील एका पानाचा उतारा येथें घेतों.

" संबंधी क्रियाविशेषणानंतर त्याशीं अनुरूप दर्शक क्रियाविशेषण येतें. गद्यांत कधीं कधीं पहिल्याचा अध्याहार असतो, आणि कवितेंत कधीं कधीं पहिलें असून दुसऱ्याचा अध्याहार असतो. जसें,

(जेव्हां) 'रंगीं सर्व मिळाले, तेव्हां आली तयांत दमयंती.'

(जोपर्यंत) 'मी परत येई तोंपर्यंत (किंवा पर्यंत) तूं जाऊं नको.'

(तेव्हां) 'वाटे तया परम दुर्लभ ते नवोढा, जेव्हां पुरोहित म्हणे धनु कां न वोढा.'

(तैसे) 'दोष गेले अनंत जन्मींचे जैसे पर्वत तृणाचे अग्निसंगें भस्म होती.' 'जेथें', 'जिकडे', 'जेव्हां', 'जेवीं', इत्यादि संबंधी क्रियाविशेषणानंतर त्यांशीं अनुरूप 'तेथें', 'तिकडे', 'तेव्हां' 'तेवीं', इत्यादि दर्शक क्रियाविशेषणें येतात. परंतु कवितेंत पदाच्या न्यूनाधिक्यामुळें 'जेधवां—तैं', 'जों—तंव', इत्यादि क्रमभंग आढळतात. जसें,

'त्यातें वेष्टुनि ताडिति कपिकोटी जेधवां अगनगांनीं
तैं कोटि होम होतो ऐसें क्षण भाविलें गगनगांनीं.'
'अवलोकूनि कश्यपाश्रम । आंत जों पाहे नृपसत्तम
तंव कण्वऋषीचा आश्रम । अतिरमणीय देखिला.'
'गरुडें जेवि सुधा त्या प्रभुनें श्रीरुक्मिणी तशी हरली.'
'एक अयुत महारथी । तात्काल पाडी उत्तरापती
जेथें शंभर राजपुत्र रक्षिती । त्या स्थळासी पातला.'

'आजा प्रतीप होता ज्या काळीं तेधवांचि हा राजा.'
परंतु गद्यांतही कधीं कधीं असा क्रमभंग आढळतो. जसें, 'तो ज्या वेळेस आला तेव्हां मी जेवीत होतों'; 'तो जेथें गेला त्या ठिकाणीं मी गेलों.' येथें 'ज्या वेळेस' बद्दल 'जेव्हां' किंवा 'तेव्हां' बद्दल 'त्या वेळेस' असावें; आणि 'जेथें' बद्दल 'ज्या ठिकाणीं', किंवा 'त्या ठिकाणीं' बद्दल 'तेथें' असावें." (पान २४८.)

क्रियाविशेषणवाक्यांच्या जागीं क्रियाविशेषणें किंवा क्रियाविशेषणार्थक वाक्यांश घालून मिश्र वाक्यांचीं शुद्ध वाक्यें करतां येतात. 'रंगीं सर्व मिळाले तेव्हां आली तयांत दमयंती' या मिश्र वाक्याबद्दल 'रंगीं सर्व मिळाल्यावर (किंवा मिळाले असतां) त्यांत दमयंती आली' असें शुद्ध वाक्य घालतां येईल. 'तुमच्या इच्छेस येईल तसें वागा' या गद्यात्मक मिश्र वाक्याबद्दल 'तुमच्या इच्छेप्रमाणें वागा' हें शुद्ध वाक्य योजण्यास हरकत नाहीं. क्रियाविशेषणवाक्यांश कोठें घालावा व क्रियाविशेषणवाक्य कोठें घालावें, हें प्रसंगाच्या अवसानावर व भाषारूढीवर अवलंबून आहे.

## ३. संयुक्त वाक्य

दोन अथवा अधिक (शुद्ध अथवा मिश्र) वाक्यांनीं झालेलें जें वाक्य त्यास संयुक्त वाक्य म्हणतात.

'वारा आला आणि पाऊस गेला'; 'ज्याबद्दल आनंद मानावा असें कांहीं झालें नाहीं, व ज्याबद्दल खेद मानावा असेंही कांहीं झालें नाहीं.' या दोन वाक्यांपैकीं पहिलें, दोन शुद्ध वाक्यांनीं झालेलें, व दुसरें, दोन मिश्र वाक्यांनीं झालेलें, संयुक्त वाक्य आहे. पाहिजे तर एक 'शुद्ध', व एक 'मिश्र' अशा दोन वाक्यांनींही 'संयुक्त' वाक्य करतां येईल. यावरून वाचकाचे ध्यानांत हें येईल कीं, हवे असल्यास 'संयुक्त' वाक्याचे **शुद्धसंयुक्त, मिश्रसंयुक्त** व **उभयसंयुक्त** असे उपभेद करतां येतील. इंग्रजी वाक्यमीमांसेंत असले उपभेद केलेले नाहींत, व असलीं नांवेंही दिलेलीं नाहींत.

'वारा आला आणि पाऊस गेला' या संयुक्त वाक्यांतील अवयवभूत दोन्ही वाक्यें स्वतंत्र असतां एकमेकांशीं 'आणि' या उभयान्वयी अव्ययानें ग्रथित झालीं आहेत, म्हणजे एकत्र जखडलीं गेलीं आहेत. या दोहोंपासून उत्पन्न होणारा अर्थही स्वतंत्र आहे; पण तो एकत्र घेतला जावा व त्यांत कांहीं संगति आहे असें वाटावें, एतदर्थ त्यास अव्ययाच्या शृंखलेनें बद्ध करून त्यास संयुक्तता आणिली

आहे. 'संयुक्त' वाक्यांतील अवयवभूत वाक्यें स्वतंत्र म्हणण्याचा परिपाठ आहे; पण तीं अगदीं स्वतंत्र मानिलीं तर त्यांनी 'संयुक्त' वाक्य तरी कसें होईल? तीं स्वतंत्र तर खरीच; पण परस्परांवर त्यांचें अवलंबन मुळीच नाहीं असें समजतां कामा नये. इतकेच कीं, मिश्र वाक्यांतील अवयवभूत वाक्यांचें अन्योन्यावर जितकें अवलंबन असतें, तितकें सयुक्त वाक्यांतील अवयवभूत वाक्यांचें नसतें. संयुक्त वाक्याचे अवयव अगदीं स्वतंत्र होतील तर अर्थसंतति कशी उत्पन्न करतां येईल?

'संयुक्त' वाक्याचे अवयव शुद्ध वाक्यें आहेत, किंवा मिश्र वाक्यें आहेत, अथवा शुद्ध आणि मिश्र यांची भेसळ आहे, या धोरणावर त्याचे पोटभेद करीत नाहींत. ते त्यांत येणाऱ्या उभयान्वयी अव्ययांच्या पोटभेदांवर बसविले आहेत.

उभयान्वयी अव्ययें दोन प्रकारचीं आहेत : **समानाधिकरण उभयान्वयी व व्यधिकरण उभयान्वयी**. ज्या उभयान्वयी अव्ययांनीं दोन अथवा अधिक समांतर—सारख्या—किंवा समान वाक्यांचा किंवा शब्दांचा अन्वय होतो, त्यांस 'समानाधिकरण उभयान्वयी अव्ययें' म्हणतात. 'बाजारांत जाऊन एक छत्री व एक दऊत घेऊन ये' यांत 'व' हें समानाधिकरण शब्दोभयान्वयी (उभयशब्दान्वयी) अव्यय आहे. 'माडीवर बैस आणि आपला धडा पाठ कर'—यांत 'आणि' हें समानाधिकरण वाक्योभयान्वयी (उभयवाक्यान्वयी) अव्यय आहे. ज्या उभयान्वयी अव्ययांनीं दोन अथवा अधिक असमांतर—असमान किंवा अननुरूप वाक्यांचा अन्वय होतो, त्यांस 'व्यधिकरण उभयान्वयी' म्हणतात. 'तुम्ही याल तर आम्ही येऊं' यांत 'तर' हें 'व्यधिकरण उभयान्वयी अव्यय' आहे.

'समानाधिकरण उभयान्वयी' अव्ययांचे तीन पोटभेद करतात. (१) **समुच्चयदर्शक**; (२) **परिणामदर्शक**; व (३) **विरोधदर्शक**. 'आणि', 'शिवाय', 'त्यांतून', 'फिरून', 'पुनः', 'बरें', 'याप्रमाणें', 'नंतर' इत्यादि 'समुच्चयदर्शक' उभयान्वयी अव्ययें आहेत. 'म्हणून', 'यास्तव', 'यासाठीं', 'याकरितां', 'सबब' इत्यादि 'परिणामदर्शक' उभयान्वयी अव्ययें आहेत. 'नाहीं—तर', 'अथवा', 'परंतु' इत्यादि 'विरोधदर्शक' उभयान्वयी अव्ययें होत. 'विरोधदर्शकांचे' फिरून तीन पोटभेद करतात : (१) **अयोन्यव्यावृत्तिसूचक**; (२) **विकल्पसूचक**; आणि (३) **न्यूनत्व** अथवा **निवृत्तिसूचक**. 'येथें आतां बडबड करावयाची नाहीं तर कामें करावयाचीं' यांत 'अन्योन्यव्यावृत्ति' आहे. 'तूं जा अथवा रहा' यांत विकल्प सूचित केला आहे. 'तो मेहनती आहे

पण त्याला तारतम्य नाहीं ' यांत ' पण 'नें ' तो 'च्या अंगच्या न्यूनत्वाचा बोध होतो.

' व्यधिकरण उभयान्वयी ' अव्ययांचे चार उपभेद किंवा पोटभेद करतात : (१) **कारणदर्शक**; (२) **संकेतदर्शक**; (३) **हेतु** अथवा **उद्देशदर्शक**; आणि (४) **कालदर्शक.** 'त्याला कोणी पुसत नाहीं, कारण तो हातपाय हालवीत नाहीं ' (कारण). 'तुम्ही याल तर आम्हीही येऊं' (संकेत). 'त्यानें जावें म्हणून आम्हीं इतकी घाई केली ' (हेतु). 'पाऊस येईपर्यंत (येई तोंपर्यंत) पुढें चालण्यास हरकत नाहीं ', 'आम्ही आलों तों तो निघून गेला ' (काल).

ज्या वाक्यांत ' व्यधिकरण उभयान्वयी ' अव्ययें असतात तीं ' मिश्र ' वाक्यें असतात, व ज्यांत ' समानाधिकरण उभयान्वयी ' अव्ययें असतात, तीं ' संयुक्त ' वाक्यें असतात; अथवा ' मिश्र ' वाक्यांत जी अव्ययें असतात त्यांस ' व्यधिकरण उभयान्वयी अव्ययें ' म्हणतात, व ' संयुक्त ' वाक्यांत जीं असतात त्यांस ' समानाधिकरण उभयान्वयी अव्ययें ' म्हणतात. वाक्यस्वरूपांवरून अव्ययस्वरूपांचा निर्णय करणें युक्त असल्यामुळें ' मिश्र ' व ' संयुक्त ' वाक्यांतील अव्ययांस अनुक्रमें ' व्यधिकरण ' आणि ' समानाधिकरण ' म्हणणें विशेष प्रशस्त आहे.

' समानाधिकरण उभयान्वयी ' अव्ययांच्या तीन पोटभेदांवरून ' संयुक्त ' वाक्यांचे (१) **समुच्चयदर्शक**; (२) **परिणामदर्शक**; आणि (३) **विरोधदर्शक** असे तीन पोटभेद करतात. वास्तविक पहातां हे अव्ययांचे भेद आहेत. त्यांनीं समानाधिकरण वाक्येंच एकमेकांशीं जोडलीं जातात, येवढें सांगितलें म्हणजे बस व्हावें; परंतु कित्येक वाक्यमीमांसक समुच्चयादि समानाधिकरण वाक्यांचे पोटभेद मानून जें विवेचन उभयान्वयी अव्ययांविषयीं लिहित असतां यावें, तें ' संयुक्त ' वाक्यांविषयीं लिहितांना आणतात.

' संयुक्त ' वाक्यांत दोहोंपेक्षां अधिक वाक्यें असल्यास, उभयान्वयी अव्यय बहुधा शेवटच्या वाक्याच्या आरंभीं एकदां घालतात. कधीं कधीं संयुक्त वाक्यांत उभयान्वयी अव्यय मुळींच घालीत नाहींत. असें करण्यांत विचाराची फार शीघ्रता आहे, व भाषा तदनुसारी होते—असें भासविण्याचा उद्देश असतो. ' मीं देवदर्शन केलें, भाजी घेतली, आणि घराचा रस्ता धरला ', यांत ' आणि ' फक्त शेवटल्या वाक्याच्या आरंभीं घातलें आहे.

' समानाधिकरण उभयान्वयी ' अव्ययांपैकीं ' परिणामदर्शक ' आणि ' व्यधिकरण उभयान्वयी ' अव्ययांपैकीं ' कारणदर्शक ' व ' हेतु अथवा उद्देशदर्शक '

अव्ययें थोडासा घोंटाळा उत्पन्न करण्यासारखीं आहेत. 'माशांस फुप्फुसें नाहींत, म्हणून त्यांस शब्द नाहीं' यांत 'परिणामदर्शक' वाक्य 'त्यांस शब्द नाहीं' हें आहे, व त्या परिणामाचें 'कारणदर्शक' 'माशांस फुप्फुसें नाहींत' हें आहे; आणि दोहोंचा 'म्हणून' या परिणामदर्शक उभयान्वयी अव्ययानें संयोग होऊन, त्या उभयतांपासून 'संयुक्त' वाक्य झालें आहे. या 'संयुक्त' वाक्यांतील 'परिणाम किंवा कार्यदर्शक' वाक्य प्रथम सांगितलें, व कारणदर्शक वाक्य मागून सांगितलें कीं त्याच्या संयुक्तत्वाचा लोप होऊन त्याच्या ठायीं मिश्रत्व येतें. 'माशांस शब्द नाहीं, कारण त्यांस फुप्फुसें नाहींत', हें संयुक्त वाक्य नाहीं, 'मिश्र' वाक्य आहे. वाक्यमीमांसक असें मानतात कीं 'कारण' आधीं सांगून 'कार्य' किंवा 'परिणाम' मागून सांगितला असतां, 'कारणदर्शक' व 'कार्यदर्शक' वाक्यें स्वतंत्र दिसतात; निदान 'कार्य' आधीं सांगितलें असतां 'कारण दर्शक' वाक्याचें त्याच्यावर जितकें अवलंबन दिसतें, तितकें 'कारण' आधीं सांगितलें असतां 'कार्यदर्शकाचें' दिसत नाहीं. 'माशांस शब्द नाहीं, कारण त्यांस फुप्फुसें नाहींत.' यांत 'त्यांस शब्द नाहींत' हें केवळ पहिल्या वाक्याच्या समर्थनार्थ सांगितलें आहे, दुसरा कांहीं हेतु नाहीं, असा भास होतो; व येवढ्याच कारणा-साठीं 'कारणदर्शक' वाक्यास 'गौण' मानून सर्व वाक्यास मिश्र वाक्य म्हणतात. हा निर्णय करतांना असा विचार केला आहे कीं, कार्यांत कारणाचा अंतर्भाव होतो, पण कारणांत कार्याचा, होत नाहीं. "कारण" असून कार्योत्पत्ति होईल किंवा नाहीं, परंतु जेथें कार्योत्पत्ति झाली आहे तेथें कारणोत्पत्ति झालीच असली पाहिजे, असें कित्येकांचें मत आहे. हें मत अर्थात् 'कारण' या शब्दाचा अर्थ करण्यावर अवलंबून रहातें. कार्योत्पादनसमर्थ ज्या गोष्टी त्यांसच जर कारण म्हटलें, तर 'कारण' कोठें संपतें व कार्यास कोठें आरंभ होतो हें सांगतां येणें कठिण वाटून, 'कार्यकारण' या समकालीन क्रिया मानाव्या, अशी मनाची वृत्ति होतें. फिरून ज्याअर्थीं यांचें स्पष्ट द्वैत भासतें, व यांपासून 'उत्पादक' आणि 'उत्पादित अथवा उत्पन्न' या दोन कल्पनांचा पृथक् बोध होतो, त्याअर्थीं कारण व कार्य यांत पूर्वोत्तर संबंध आहे, असें कबूल केलें पाहिजे असें वाटतें. 'कार्य' व 'परिणाम' आणि 'कारण', 'हेतु' व 'उद्देश' या पांच शब्दांपैकीं पहिले दोन व दुसरे तीन एकमेकांशीं इतके सारखे आहेत कीं वक्ते व लेखक पुष्कळदां एकाच्या जागीं दुसऱ्याचा उपयोग करतात. त्यामुळें 'व्यधिकरण उभयान्वयी' अव्ययांत 'कारणदर्शक' व 'हेतु आणि उद्देशदर्शक' असे स्वतंत्र पोटभेद करावे किंवा नाहीं, हा एक संशय आहे. तसेंच, 'कारण' आधीं व 'कार्य' मागून सांगितलें असतां, तद्दर्शक वाक्यांत जी स्वतंत्रता भासते, ती इतकी उत्तान आहे

काय कीं, तिच्यासाठीं 'मांशांस फुप्पुसें नाहींत, म्हणून त्यांस शब्द नाहीं' असलीं वाक्यें 'संयुक्त' करावीं, आणि कार्य आधीं व कारण मागून सांगितलें असतां, तद्दर्शक वाक्यांत इतकी परतंत्रता उत्पन्न होतें काय, कीं तिच्यासाठीं 'माशांस शब्द नाहीं, कारण त्यांस फुप्पुसें नाहींत' असलीं वाक्यें 'मिश्र' करावीं, हा मोठा विचार आहे. जी गोष्ट घडली कीं तिच्या पाठोपाठ दुसरी गोष्ट घडलीच पाहिजे, अशा गोष्टीसच कारण समजावयाचें असे मानिलें, तर कारण व कार्य या बहुतेक समकालीन क्रिया आहेत, असें वाटूं लागतें, व त्यामुळें त्यांपैकीं कोणतीही आधीं सांगितली किंवा मागून सांगितली, तरी त्या उभयतांमध्यें असलेल्या निकट संबंधांत कांहीं भेद होत नाहीं, म्हणून तो ज्या वाक्यांत प्रदर्शित केलेला असतो, त्यांस 'संयुक्त' न मानतां 'मिश्र' मानावें, असा कित्येकांचा अभिप्राय आहे; व ज्यांना शब्दशास्त्रांतील बारीकसारीक भेद पहाण्याचा कंटाळा वाटत असेल, त्यांनीं हाच अभिप्राय बरा मानून तदनुसार वाक्यपृथक्करण केलें तरी कांहीं वावगें होणार नाहीं. या अभिप्रायाप्रमाणें 'परिणामदर्शक', 'कारणदर्शक' व 'हेतु अथवा उद्देशदर्शक' उभयान्वयी अव्ययें 'व्यधिकरण' अव्ययें होऊन, तीं ज्या वाक्यांत येतील तीं सारीं 'गौणप्रधानवाक्यात्मक' मिश्र वाक्यें होतील. कार्यकारणदर्शक वाक्यांपैकीं कार्यदर्शक वाक्यास 'प्रधान' व 'कारण, हेतु, किंवा उद्देशदर्शक' वाक्यास 'गौण' म्हटलें पाहिजे, हें सांगायाला नकोच. तसेंच संकेतार्थक वाक्यांपैकीं ज्यांत 'करार', 'अट' किंवा 'शर्त' उक्त असते, त्यास 'पूर्व वाक्य' किंवा कारणदर्शक वाक्य, आणि ज्यांत 'कार्य' 'परिणाम' अथवा 'निष्पत्ति' सांगितलेली असते, त्यास 'उत्तरवाक्य' किंवा 'परिणामदर्शक' वाक्य म्हणतात, हें ही विशेष स्पष्ट करीत बसण्याची गरज नाहीं. या वादग्रस्त विषयाविषयीं प्रस्तुत लेखकाचें मत असें आहे, कीं 'कार्यदर्शक' वाक्य मागून आलें असतां सारें वाक्य 'संयुक्त' करावें, व 'कारणदर्शक' मागून आलें असतां सारें वाक्य 'मिश्र' करावें.

## ४. संकुचित वाक्यें.

वास्तविक पहातां संकुचित वाक्यांचा निराळा भाग करायाला नको होता. पण मराठींत संस्कृत किंवा इंग्रजी धर्तीचा कर्मणी प्रयोग नसल्यामुळें, वाक्यांत जागोजागीं कर्त्यांचा, कर्मांचा, क्रियापदांचा, व इतर शब्दांचा अध्याहार व संकोच करण्याची रीत फार पडली आहे. कर्म प्रथमांत असून, क्रियापद कर्माच्या लिंग-वचनाप्रमाणें असलें, म्हणजे आमचा कर्मणी प्रयोग होतो. संस्कृत व इंग्रजी वाक्यांत कर्मक्रियापदांचा असा संबंध झाला, म्हणजे विधान कर्माविषयीं होतें, असें मानितात. इंग्रजींत तर अशा प्रकारच्या कर्माला 'उद्देश्यकर्ता' (Subject-nomi-

native) असें म्हटलें आहे; कारण क्रियेचा खरा कर्ता निराळा असून तो बहुधा 'बाय्' (By) या विभक्ति–अव्ययानें तृतीयांत झालेला असतो, व कर्म प्रथमांत होऊन वाक्याचें 'उद्देश्य' व 'कर्ता' झालेलें असतें. अशा रीतीनें प्रधानत्व पावलेलें 'कर्म' संस्कृत वाक्यांत 'उद्देश्य' होतें, व इंग्रजी व्याकरणकारांच्या रूढीप्रमाणें त्याला कर्ताही म्हणतां येईल. संस्कृतांत त्याला कर्ता म्हणत नाहींत. सकर्मक क्रियापदाचा खरा कर्ता प्रथमेशिवाय दुसऱ्या कोणत्याही विभक्तींत असला तरी त्यामुळें त्याचें कर्तृत्व नाहींसें होत नाहीं.

इंग्रजी वाक्यसंप्रदायाप्रमाणें वाक्याचा कर्ता, म्हणजे ज्याविषयीं वाक्यांत विधान होत असतें, तो शब्द प्रथमांत पाहिजे, मग तो शब्द त्या वाक्यांतील क्रियेच्या खऱ्या कर्त्याचा दर्शक असो किंवा नसो; इंग्रजी व संस्कृत वाक्यांतील उद्देश्य मात्र नेहमीं प्रथमांत असतें. संस्कृत वाक्यांतील कर्ता प्रथमांत असला किंवा नसला तरी चालतो. मराठी वाक्यांतील 'कर्ता' किंवा 'उद्देश्य' प्रथमा विभक्तींत असलें पाहिजे असा नियम नाहीं. या सर्व प्रकरणाचा मागल्या एका भागांत खुलासेवार विचार केलाच आहे. येथें त्याचा आणखी एकदां स्फुट उल्लेख करण्याचें कारण येवढेंच कीं, इंग्रजी किंवा संस्कृत भाषेंतील कर्मणी प्रयोगासारखा सोईचा कर्मणी प्रयोग मराठींत नसल्यामुळें, व तसल्या प्रयोगाची अवश्यकता लिहिणारास व बोलणारास फार पडूं लागल्यामुळें, कर्त्याचा अध्याहार त्या दोन भाषांहून मराठींत अधिक होतो. हें वाचकांच्या लक्षांत आलें पाहिजे. 'जा' धातूच्या साहाय्यानें सकर्मक धातूपासून मराठींत जे कर्मणी (अथवा कित्येक लोक ज्याला कर्मकर्तरी प्रयोग म्हणतात) प्रयोग साधले आहेत, ते इंग्रजींतील 'पॅसिव्ह व्हॉइस्'च्या (Passive Voice), व संस्कृतांतील कर्मणीच्या, धर्तीवर गेले आहेत, व ते फार उपयोगीही आहेत. पण त्यांचा अद्यापि सर्वत्र स्वीकार न झाल्यामुळें ते लिहिण्यांत किंवा बोलण्यांत वारंवार येऊं लागले नाहींत; त्यांच्या जागीं बहुधा कर्त्याशिवाय कर्मणी प्रयोग घालतात. अशा वाक्यांचें व्याकरण करतांना असले अध्याहृत कर्ते स्पष्ट करून सांगण्याची चाल आहे. क्रियेच्या खऱ्या कर्त्याला 'कडून' सारखें एखादें शब्दयोगी अव्यय लावलें असेल, तरच त्याचें 'उद्देश्यत्व' नाहींसें होतें असें मानावें, असें कित्येकांचें म्हणणें आहे; परंतु तें सर्वथैव ग्राह्य दिसत नाहीं. कांहीं वाक्यांतील उक्त तृतीयांत कर्ते व पुष्कळ वाक्यांतील अध्याहृत तृतीयांत कर्ते, त्या त्या वाक्याचे 'उद्देश्य' नाहींत, हें त्यांच्या अर्थाच्या झोंकावरून स्पष्ट दिसत असतें. तेव्हां व्याकरण करतांना ज्याला (उक्त किंवा अध्याहृत) कर्ता म्हणतात, तोच 'उद्देश्य'ही असला पाहिजे असा आग्रह धरणें बरोबर नाहीं. "असें म्हणतात कीं मध्यआशियांत 'केरोसीनच्या' खाणी

सापडतात." या वाक्यांतील 'म्हणतात' या क्रियापदाचें व्याकरण करतांना त्याचा 'लोक' हा अध्याहृत कर्ता असें सांगण्यांत येईल. म्हणून त्याचें पृथक्करण करतांना उद्देश्यस्थानी 'लोक' हा शब्द ठेवणें बरोबर होणार नाहीं. 'केरोसीन'च्या उत्पत्तीविषयीं लोक काय म्हणतात हें सांगण्याचा या वाक्याचा हेतु दिसत नाहीं; तर 'केरोसीन'च्या उत्पत्तीविषयीं लोकांचें काय म्हणणें आहे तें पुढें आणण्याचा हेतु दिसतो. 'लोक' या शब्दांवर अवसान नसल्यामुळें त्याचा अध्याहार केला आहे. आतां कोणी अशी शंका घेतील कीं, 'म्हणतात' या क्रियापदाचें 'उद्देश्य' अध्याहृत 'लोक' शब्दच केलें पाहिजे, 'असें' करून चालावयाचें नाहीं; कारण 'म्हणतात' अनेकवचन व 'असें' एकवचन आहे. येथें व्याकरणाची अपरिहार्य अडचण आहे खरी. पण या अडचणीसारख्या दुसऱ्या अडचणी मराठी व्याकरणांत आलेल्या नाहींत असें नाहीं, व त्यांची जी निराकरणें करण्यांत आलीं आहेत तीही मोठीं समाधानकारक आहेत, असें नाहीं. 'सकर्मक भावी' म्हटलेल्या प्रयोगांत कर्ता कोणत्याही लिंगी व वचनी असला तरी क्रियापद नपुंसकलिंगी व एकवचनी असावें, हा किती विलक्षण नियम? पण तो आतां सर्वमान्य झाल्यासारखा झाला आहे कीं नाही? त्याप्रमाणेंच 'असें' हें 'उद्देश्य' करून 'म्हणतात' हें विधेय करण्यास काय हरकत आहे? पाहिजे तर विधेय सांगतांना 'लोक' हा त्याचा अध्याहृत कर्ता म्हणून सांगावें. संकेतार्थ असतां इंग्रजींत एकवचनी कर्ता व अनेकवचनी क्रियापद घालतात. शिवाय वाक्यमीमांसेंत वाक्यांतील शब्दांच्या व्याकरणापेक्षां वाक्यार्थाकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे, हें सांगण्याची गरज नाहीं. 'कोणत्या वस्तूविषयीं काय म्हटलें आहे' या प्रश्नाचा वाक्यार्थ करतांना फार जपून निकाल केला पाहिजे. 'मध्यआशियांत केरोसीनच्या खाणी सांपडतात असें म्हणतात', या सर्व वाक्याचा नीट विचार केला तर 'मध्यआशियांत केरोसीनच्या खाणी सांपडतात' हें वाक्य 'उद्देश्य' व 'म्हणतात' हें विधेय आहे, असें वाटेल. मराठी भाषेच्या रूढी-प्रमाणें या सर्व वाक्याबद्दल 'असें' हें सर्वनाम घालून, तें त्याशीं समानाधिकरण केलें आहे. मराठींत खरा कर्मणी प्रयोग नाहीं हें ध्यानांत ठेवलें असतां, ज्या वाक्यांत कर्ते न सांगतां कर्मणी प्रयोग केले असतील, म्हणजे कर्माच्या अनुरोधानें क्रियापदें घातलीं असतील, त्या वाक्यांतील अध्याहृत कर्ते अवश्यकता असली, तरच स्पष्ट करावे, नाहीं तर कर्मच कर्ते (अथवा उद्देश्य) मानून क्रियापदें अकर्मक विधेयें मानावीं, हें बरें दिसेल. 'पानें वाढलीं, जेवायाला उठा;' या वाक्यांपैकीं पहिल्याचें पृथक्करण करतांना 'ब्राह्मणांनी' अथवा 'बायकांनी'— असा अध्याहृत कर्ता घेऊन, तो उद्देश्यस्थानीं मांडण्याची गरज नाहीं. 'पानें'

उद्देश्य आणि 'वाढली' विधेय असें करण्याची रूढी पडली तर पृथक्करण अधिक सोपें व यथार्थ होणार आहे.

येथपर्यंत एक प्रकारच्या अध्याहृत शब्दांचा विचार झाला. मराठींत आणखी एका तऱ्हेनें शब्दांचा अध्याहार किंवा संकोच करण्यांत येत असतो. संयुक्त वाक्यांत एक शब्द दोन अथवा अधिक वेळ येत असल्यास त्याची पुनरुक्ति टाळण्यासाठी तो एकदांच घालतात. 'गोविंदा, विठू आणि कृष्णा साताऱ्यास राहिले'; या एका वाक्यांत वास्तविक पहातां 'गोविंदा साताऱ्यास राहिला', विठू साताऱ्यास राहिला', आणि 'कृष्णा साताऱ्यास राहिला' या तीन वाक्यांचा संकोच आहे. कोणी असें म्हणतात कीं या वाक्यांतील 'आणि' वाक्यें न जोडतां शब्द जोडीत आहे, असें समजावें; कारण 'राहिले' अनेकवचनी क्रियापद असल्यामुळें 'गोविंदा, विठू, आणि कृष्णा' हे तीन मुलगे असा अर्थ केला पाहिजे. हे तीन इसम एकत्र समजून अनेकवचनी क्रियापद घातलें आहे. ज्या ठिकाणीं कर्तें अनेक असून क्रियापद एकवचनी असेल, त्या ठिकाणीं मात्र असा संकोच समजावा. हें म्हणणें काहीं वावगें नाहीं; व असें केलें तरच वाक्यपृथक्करण सुलभ होणार आहे. उभयान्वयी अव्ययांचें मुख्य काम वाक्यें जोडणें खरें; पण तीं कधीं कधीं शब्द जोडतात हेंही मानिलें पाहिजे. वाक्यमीमांसेप्रमाणें 'उद्देश्यें', 'कर्में', 'विधेयक्रियापदें', 'विशेषणें', व 'क्रियाविशेषणें' हीं वाक्याचीं मुख्य अंगें होत. यांपैकीं क्रियापदांशिवाय दुसरीं कोणतींही अंगें 'समुच्चयवाचक' अव्ययानें जोडलीं असतां तीं एकत्र समजावीं म्हणजे ठीक पडेल. 'गोविंदा आणि कृष्णा साताऱ्यास राहिले' यांत 'गोविंदा आणि कृष्णा' येवढें उद्देश्य करून 'राहिले' हें विधेय करावें. तार्किकांच्या मताप्रमाणें वरील वाक्यांत दोन वाक्यांचा संकोच आहे. 'गोविंदा आणि कृष्णा साताऱ्यास व पुण्यास राहिले', यांत 'गोविंदा आणि कृष्णा' येवढें उद्देश्य, 'साताऱ्यास व पुण्यास' येवढें विधेयक्रियाविशेषणवाचक, व 'राहिले' हें विधेयक्रियापद करावें. असें करतांना येवढें मात्र ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं 'गोविंदा आणि कृष्णा अनुक्रमें साताऱ्यास व पुण्यास राहिले' असा या वाक्याचा अर्थ नाहीं. तसा असेल तर त्याचें पृथक्करण करतांना 'गोविंदा साताऱ्यास राहिला' व 'कृष्णा पुण्यास राहिला' अशीं दोन निराळीं वाक्यें केलींच पाहिजेत. 'त्यांनीं व आम्हीं पेरू व केळीं खाल्लीं' या वाक्यांत तार्किकांच्या मताप्रमाणें चार वाक्यांचा संकोच आहे. पण वाक्यपृथकरणांत तसें करण्याची गरज नाहीं. 'त्यांनीं व आम्हीं पुण्यास व वसईस पेरू व केळीं खाल्लीं' या वाक्यांत वास्तविक पहातां आठ वाक्यांचा संकोच आहे! 'त्यांनीं व आम्हीं पुण्यास व वसईस पेरू व केळीं वाटलीं व खाल्लीं',

यांत तर सोळा वाक्यांचा संकोच आहे! तार्किकांची ही वाक्यमीमांसा खोटी नाहीं इतकेंच नाहीं, पण हीच खरी आहे. पण अशा प्रकारच्या वाक्याचें यथास्थित पृथक्करण करावयाचें म्हणजे निरनिराळ्या सोळा वाक्यांचें पृथक्करण करावें लागेल. यासाठी साधारणपणें असा नियम करावा की, ज्या वाक्यांत दोन पृथक् विधेयक्रियापदें असतील त्या वाक्यांतच दोन वाक्यांचा संकोच झाला आहे असें समजावयाचें. असें केलें असतां संकुचित वाक्यांचें पृथक्करण सोपें होईल. विधानाचें सारें अवसान विधेयक्रियापदावर असतें. तीं जितकीं असतील तितकीं निराळीं वाक्यें आहेत, असें समजणें साहजिक आहे. या नियमास अनुसरलें असतां, वरील सोळा वाक्यांच्या संकोचानें झालेल्या एका वाक्याचें पृथक्करण करतांना त्याचीं फक्त दोन वाक्यें करावीं लागतील. वास्तविक पहातां हा नियम कांहीं अंशी सोईसाठीं म्हणून करण्यांत आला आहे हें सांगावयाला पाहिजे, असें नाहीं.

आतां फक्त 'संक्षिप्त' वाक्यांचा विचार करणें राहिलें आहे. तो करण्या-पूर्वी 'मिश्र', 'संयुक्त' व 'संकुचित' वाक्यांविषयीं ध्यानांत ठेवण्यासारखे स्वल्प नियम विद्यार्थ्यांच्या सोईसाठीं थोडक्यांत खालीं देतों :—

१. जें वाक्य दुसऱ्या एखाद्या विशेष व्यापक वाक्याचा अंश किंवा अवयव झालेलें असतें, त्यास 'अवलंबी', 'अंशभूत', किंवा **अवयवभूत वाक्य** म्हणतात.

२. **अवयवभूत** वाक्यें **स्वतंत्र** असतात किंवा परतंत्र असतात. ज्या 'अवयवभूत' वाक्यांत दुसऱ्या वाक्याच्या मदतीशिवाय विधान होतें, तें **स्वतंत्र अवयवभूत** वाक्य होय; पण जें 'अवयवभूत' वाक्य नाम, विशेषण किंवा क्रिया-विशेषण बनून दुसऱ्या एखाद्या वाक्याचें अंग होऊन जातें, तें **परतंत्र अवयवभूत** वाक्य होय.

'(१) वारा आला आणि (२) पाऊस गेला' यांत (१) व (२) 'स्वतंत्र अवयवभूत' वाक्यें आहेत. '(१) आम्हाला तें नको (२) असें जें तुम्ही म्हणालां (३) तें त्यांना समजलें आहे'. यांपैकीं (१) व (२) हीं परतंत्र अवयवभूत वाक्यें आहेत. यांपैकीं पहिलें दुसऱ्यावर, व दोनही तिसऱ्यावर अवलंबून असल्यामुळें पहिल्याचें पारतंत्र्य दुसऱ्याच्याहून अधिक आहे.

३. 'अवयवभूत वाक्यें' स्वतंत्र असोत किंवा परतंत्र असोत, विवक्षित वाक्यांत जर त्यांना समान स्थान प्राप्त झालें असेल तर तीं समानाधिकरण होतात. '(१) वारा आला आणि (२) पाऊस गेला' यांत (१) व (२) **अवयवभूत स्वतंत्र समानाधिकरण** वाक्यें आहेत. '(१) तुम्हीं सांगितलेलें ऐकत नाहीं, व (२) अभ्यास करीत नाहीं ह्या गोष्टी वडिलांच्या कानावर गेल्या

—

आहेत.' यांत (१) व (२) **अवयवभूत परतंत्र समानाधिकरण** वाक्यें आहेत.

(४) ज्या वाक्यांत एक अथवा अधिक परतंत्र वाक्यांचा समावेश झालेला असतो, तें **मिश्र** वाक्य होय; ज्यांत दोन अथवा अधिक स्वतंत्र वाक्यांचा समावेश झालेला असतो, तें **संयुक्त** वाक्य होय. 'मिश्र' व 'संयुक्त' वाक्यांच्या या व्याख्या पूर्वी दिलेल्या व्याख्यांहून निराळ्या नाहींत. भेद इतकाच कीं या 'अवयवभूत' वाक्यांच्या स्वरूपावरून, व त्या 'उद्देश्य' व 'विधेय' यांच्या संख्येवरून व स्वरूपावरून, केलेल्या आहेत. 'मिश्र' वाक्यांतील 'अवयवभूत' वाक्यास 'गौण' व 'अवयवी' वाक्यास 'प्रधान' वाक्य म्हणतात.

५. गौण वाक्य ज्या प्रधान वाक्यावर किंवा दुसऱ्या गौण वाक्यावर अवलंबून असतें, त्याशीं तें 'व्यधिकरण उभयान्वयी' अव्ययानें, सर्वनामानें, किंवा सार्वनामिक विशेषणानें अथवा क्रियाविशेषणानें जोडलेलें असतें.

६. गौणवाक्यांपासून प्रधानवाक्याचीं जीं कार्यें होतात, त्यांवरून गौण वाक्यांचे प्रकार केले आहेत. गौण वाक्यें प्रधान वाक्याच्या संबंधानें 'नाम', 'विशेषण' आणि 'क्रियाविशेषण' यांचीं कामें करतात, म्हणून त्यांस अनुक्रमें 'नामवाक्यें', 'विशेषणवाक्यें', व 'क्रियाविशेषणवाक्यें' म्हणतात. 'नामवाक्य' उद्देश्य, कर्म, समानाधिकरण पद, व पूरक होऊं शकतें. 'विशेषणवाक्य' नामाला मर्यादित करतें किंवा त्याचें वर्णन करतें. क्रियाविशेषणाप्रमाणें 'क्रियाविशेषण-वाक्य' क्रियापदाचा, व क्वचित् विशेषणाचा आणि क्रियाविशेषणाचा काहीं तरी गुण दाखवितें.

७. 'मिश्र' व 'संयुक्त' वाक्यांतील समानाधिकरण वाक्यें बहुधा 'समानाधिकरण उभयान्वयी' अव्ययांनीं जोडलेलीं असतात.

८. 'शुद्ध', 'मिश्र', किंवा 'संयुक्त' वाक्यांतील अध्याहृत शब्द स्पष्ट करणें अवश्य असेल तेथेंच स्पष्ट करावा.

९. मराठींत चांगल्या प्रकारचे कर्मणी प्रयोग नाहींत, म्हणून स्वाभाविक-पणें कर्त्याचा अध्याहार केला असेल, तर उक्त कर्म 'उद्देश्य' मानून क्रियापदें अकर्मक समजावीं.

१०. 'संकुचित संयुक्त' वाक्यांत जितकीं स्वतंत्र (म्हणजे एकमेकांपासून अर्थानें निराळीं) क्रियापदें असतील, तितक्याच वाक्यांचा त्यांत संयोग झाला आहे, असें समजावें.

## ५. संक्षिप्त वाक्यें

या वाक्यांच्या संबंधानें जें सांगण्यासारखें आहे, तें सारें 'शुद्ध' व 'मिश्र' वाक्यांविषयीं जें लिहिलें आहे, त्यांत आलें आहे. असें असतां त्यांचा येथें निराळा उल्लेख करण्याचें कारण हें कीं, या ठिकाणीं ज्या वाक्यांना 'संक्षिप्त' वाक्यें म्हटलें आहे, तीं कै. कृष्णशास्त्री गोडबोले यांच्या संक्षिप्त वाक्यांहून अगदीं निराळीं आहेत. ते आपल्या व्याकरणाच्या २५२ पानांत असें म्हणतात कीं, "कृदंतांनीं संक्षिप्त वाक्यें होतात; जसें, 'तो, पुस्तक घेऊन, आला' (= त्यानें पुस्तक घेतलें आणि तो आला) ... अशीं संक्षिप्त वाक्यें संबंधीदर्शक सर्वनामांनीं, कालवाचक क्रियाविशेषणांनीं आणि उभयान्वयी अव्ययांनीं पूर्ण करतां येतात. उ. 'मारणाऱ्या माणसाचा हात धरवत नाहीं', 'मज आलिंगुनि, हांसुनि, विभु म्हणति कातराक्षि नेत्रास, उघडुनि निजयदुभट भृजकुतुक पहा, धरिशी कां मनें त्रास', 'तो खाऊन माजला', 'तो जाऊन आज दहा वर्षें झालीं', 'अनुष्ठानें करूनही पाऊस पडला नाहीं', 'मीं त्यास फिरतांना पाहिलें', 'संभाषण न समजतां आपण बोलूं नये". याप्रमाणें कै. गोडबोले यांची संक्षिप्त वाक्यांची कल्पना आहे. या पुस्तकांतील वाक्यविभागाप्रमाणें हीं सारीं शुद्ध वाक्यें आहेत. 'पुस्तक घेऊन', 'मज आलिंगुनि, हांसुनि', 'नेत्रास उघडुनि', 'खाऊन', 'तो जाऊन', 'अनुष्ठानें करून', 'फिरतांना', 'संभाषण न समजतां', वगैरे 'धातुसाधितांत क्रियाविशेषणवाक्यांश' किंवा 'धातुसाधितक्रियाविशेषणें' आहेत. वाक्यांतील क्रियापदांचा जो कर्ता तोच कधीं कधीं असल्या धातुसाधितांचा किंवा धातुसाधितांचे वाक्यांशांचा कर्ता असतो, व कधीं कधीं त्याहून निराळा असून उक्त किंवा अध्याहृत असतो, हें मागें सांगितलेंच आहे. 'तो जाऊन आज दहा वर्षें झालीं' अशा वाक्यांत 'तो' च्या जागीं 'त्याला' असाही प्रयोग आढळतो. 'तो जाऊन' या वाक्यांशांत 'तो' 'जाऊन' चा कर्ता आहे. 'त्याला जाऊन' असा वाक्यांश असला तरी वास्तविक पहातां 'त्याला'तील 'तो' च 'जाऊन' चा कर्ता आहे. धातुसाधिताचें क्रियादर्शकत्व मनांत कमी करून त्याचे ठायीं नामार्थकत्व किंवा विशेषणार्थकत्व संभाविल्यानें, त्याच्या कर्त्याची प्रथमा विभक्ति नाहींशी होऊन त्याला (कर्त्याला) चतुर्थी, पंचमी, षष्ठी वगैरे स्थानविशेषाप्रमाणें निरनिराळ्या विभक्ति लागतात. अशा ठिकाणीं इतर विभक्तींसह अप्रत्यक्ष कर्तृत्व येतें, असें म्हटल्यास हरकत नाहीं. इंग्रजींत व संस्कृतांतही असेंच होतें. 'तस्य गतस्य पंच दिनान्यभूवन्' (त्याला जाऊन पांच दिवस झाले) या वाक्यांतील 'गतस्य' या षष्ठ्यंत कृदंताचा म्हणजे धातुसाधिताचा कर्ता वास्तविक

पहातां 'तस्य' हें षष्ठ्यंत सर्वनाम आहे. 'गतस्य' हें धातुसाधित विशेषण आहे व 'जाऊन' हें त्याचें मराठी भाषांतर आहे. 'त्याला' ही चतुर्थी समजून 'जाऊन' चें 'गेल्यास' असें भाषांतर केलें तरी चालेल. 'आय् सॉ हिम् रनिंग' (I saw him running मी त्याला पळतांना पाहिलें), यांत 'रनिंग' हें क्रियाविशेषणार्थक धातुसाधित अव्यय असून त्याचा वास्तविक कर्ता 'हिम्' हें द्वितीयांत सर्वनाम आहे. प्रथमेशिवाय इतर विभक्त्यंत शब्दांसही अप्रत्यक्ष कर्तृकत्व कधीं कधीं प्राप्त होतें, हें कांहीं इंग्रजी व्याकरणकारांनीं आपापल्या पुस्तकांत नमूद करून ठेविलें आहे. वरील इंग्रजी वाक्यांतील 'रनिंग' शब्दास विशेषणदेखील मानितां येईल. संस्कृतांत तर 'रनिंग' बद्दल 'धावन्तं' असें द्वितीयांत धातुसाधित विशेषणच येईल. विधिविशेषणांचा झोंक नेहमीं कियाविशेषणें होण्याचा असतो, म्हणून जें व्याकरणकारांचें म्हणणें आहे, त्याचें हें एक उदाहरण आहे.

असो; येथें ज्या संक्षिप्त वाक्यांचा विचार करावयाचा आहे तीं कै. गोडबोल्यांच्या संक्षिप्त वाक्यांहून अगदीं निराळीं आहेत. 'ते जसे रागीट तसा तो हट्टी होता' हें मिश्र वाक्य आहे. यांतील गौण वाक्याचें क्रियापद 'होते' अध्याहृत आहे. संकुचित वाक्याप्रमाणें संक्षिप्त वाक्यांत द्विरुक्ति टाळण्यासाठीं दोन अथवा अधिक वाक्यांत सामान्य स्थलीं येणारा सामान्य शब्द एके ठिकाणीं घालून इतर ठिकाणीं गाळला असतो, असें नाहीं; तर वाक्याच्या अर्थावरून जो शब्द वाचकांच्या किंवा श्रोत्यांच्या ध्यानांत सहज येण्यासारखा असतो, असा शब्द वाक्यास आटपसरपणा व अवसान येण्यासाठीं वगळलेला असतो. मराठींत अशा तऱ्हेनें बहुश: क्रियापदांचा अध्याहार करतात. 'माझ्याहून किंवा माझ्यापेक्षां तो विशेष चतुर आहे', हें संक्षिप्त वाक्य आहे. 'मी चतुर आहें, पण माझ्याहून किंवा माझ्यापेक्षां चतुर तो आहे' असा याचा अर्थ आहे. तथापि असा अर्थ करीत बसून, हें 'संयुक्त' वाक्य करावयाचें नाहीं. या रीतीनें हें 'संक्षिप्त' वाक्य होतें येवढें समजलें म्हणजे झालें. 'माझ्यापेक्षां' किंवा 'माझ्याहून' हा परिमाणदर्शक क्रियाविशेषणवाक्यांश समजून त्याचा 'चतुर' या विशेषणाकडे संबंध घ्यावयाचा.

'तो माझ्याइतका उंच नाहीं' हें संक्षिप्त वाक्य आहे. 'मी जितका उंच आहें तितका उंच तो नाहीं' असा पूर्ण अर्थ आहे. पहिलें वाक्य शुद्ध आहे; दुसरें मिश्र आहे. 'तो तुमच्यासारखा चपळ नाहीं', म्हणजे 'तुम्ही जसे चपळ आहां तसा चपळ तो नाहीं.' 'हा आंबा अगदीं टाकण्याइतका लागलेला नाहीं', म्हणजे 'टाकण्यास आंबा जितका लागावा लागतो (किंवा लागलेला असतो) तितका लागलेला हा आंबा नाही.' 'दोष देण्याजोगा अपराध त्याच्याकडून झालेला नाहीं', म्हणजे 'दोष देण्यास जसला अपराध व्हावा लागतो तसला

अपराध त्याच्याकडून झालेला नाहीं.' 'मिश्र' किंवा 'संयुक्त' वाक्यांची या प्रकारचीं संक्षिप्त 'शुद्ध' वाक्यें करतांना 'पेक्षां', 'सारखा', 'जोगा', 'इतका' वगैरे कांहीं शुद्ध अव्ययें आणि अव्ययतुल्य विशेषणें, व 'जसा', 'ज्याप्रमाणें' वगैरे क्रियाविशेषणें, अथवा क्रियाविशेषणार्थक वाक्यांश—यांची योजना करण्यांत येते. संबंधी सर्वनामें, विशेषणें, व क्रियाविशेषणें हीं आपापलीं कामें करून, शिवाय उभयान्वयी अव्ययांचेंही काम करतात. जशीं उभयान्वयी अव्ययांनीं तशीं या शब्दांनीं वाक्यें एकमेकांशीं जोडतां येतात. 'संक्षिप्त' वाक्यें 'शुद्ध' किंवा 'मिश्र' असतात, 'संयुक्त' असत नाहींत.

'संक्षिप्त' व 'संकुचित' वाक्यांचें पृथक्करण करतांना त्यांत ज्या शब्दांचा अध्याहार केला असेल, तें प्रथम सांगून वाक्यें पूर्ण करून घ्यावीं, आणि मग त्यांचें पृथक्करण करावें, किंवा तीं आहेत आहेत तशीं घेऊन त्यांचें पृथक्करण करावें, हा थोडाशा मतभेदाचा प्रश्न आहे. कित्येकांचें म्हणणें असें आहे कीं अध्याहृत पदें सांगून वाक्यें पूर्ण करावीं, आणि मग त्यांचें पृथक्करण करावें. दुसरे असें म्हणतात कीं असें कांहीं करूं नये. वाक्यें असतील तशीं घेऊन त्यांचें पृथक्करण करावें. आम्हांस असें वाटतें कीं हीं दोनही मतें सर्वांशीं ग्राह्य नाहींत. कित्येक ठिकाणीं अध्याहृत पदें सांगावीं लागतील, व कित्येक ठिकाणीं तीं सांगण्याची जरूर नसेल. ज्या ठिकाणीं अध्याहृतपदें सांगितल्याशिवाय वाक्याचा अर्थ सहज स्पष्ट होत असेल, व त्यांतून कांहीं शब्द गाळले आहेत, असें वाटत नसेल, अशा ठिकाणीं एकदम पृथक्करण करूं लागण्यास कांहीं हरकत नाहीं. 'संकुचित' वाक्यांत दोन निराळीं क्रियापदें असल्यास अध्याहृत शब्द सांगून वाक्यें पूर्ण करून घेतलीं पाहिजेत. तसेंच 'संक्षिप्त' वाक्यांत क्रियापदाचा अध्याहार केला असल्यास तें सांगून वाक्य पूर्ण केलें पाहिजे.

'संकुचित' व 'संक्षिप्त' वाक्यांत क्रियापदाशिवाय इतर शब्दांचा अध्याहार केला असल्यास, तें सागणें किंवा न सांगणें वाक्य पाहून ठरविलें पाहिजे. त्याविषयीं ठरीव नियम घालता येत नाहीं.

## ६. प्रश्न, आज्ञा, व उद्गार.

(१) **प्रश्नार्थक व आज्ञार्थक** वाक्यांचें पृथक्करण इतर वाक्यांसारखेंच करावयाचें. या दोनही वाक्यांस पाहिजे तर सत्तावाची वाक्यांचें रूप देतां येतें. 'तूं गेलास काय' म्हणजे 'तूं गेलास किंवा नाहीं हें जाणण्याची मला इच्छा आहे.' 'तू जा' म्हणजे 'त्वां जावें (स) अशी माझी आज्ञा आहे.' या रीतीनें इतर प्रश्नार्थक किंवा आज्ञार्थक वाक्यांस सत्तावाचक वाक्यांचें रूप देऊन तीं

अर्थानें 'मिश्र' आहेत, असें दाखवितां येईल. पण वाक्यपृथक्करणांत असें करीत बसण्याची गरज नाहीं. इतर वाक्यांप्रमाणें यांचें पृथक्करण एकदम करण्यास कांहीं हरकत नाहीं.

'प्रश्नार्थक' वाक्यांत विधेय क्रियापदानें दर्शित क्रिया घडली आहे किंवा नाहीं, असा प्रश्न करावयाचा असतां 'काय' ह्या शुद्ध प्रश्नार्थक अव्ययाचा उपयोग करतात. क्रियापदाशिवाय वाक्याच्या दुसऱ्या कोणत्याही अंगाविषयीं प्रश्न करावयाचा असतां प्रश्नार्थक सर्वनामें, विशेषणें, व क्रियाविशेषणें, यांचा उपयोग करतात. 'तूं गेलास काय ?' 'तो कोण आहे ?' 'तुम्हांला कसलें झाड पाहिजे ?' 'तुझें पुस्तक कोठें पडलें ?' या चार वाक्यांपैकीं पहिल्यास प्रश्नार्थकत्व 'काय' या अव्ययानें, दुसऱ्यास 'कोण' या सर्वनामानें, तिसऱ्यास 'कसलें' या विशेषणानें, व चौथ्यास 'कोठें' या क्रियाविशेषणानें आलें आहे.

प्रश्नार्थक वाक्यें 'शुद्ध,' 'मिश्र' किंवा 'संयुक्त' असतात. 'तो कोठें गेला असेल?' 'तो आला नसेल असें होईल काय ?', 'तुम्ही आलांत केव्हां आणि गेलांत केव्हां ?'—यांपैकीं पहिलें वाक्य 'शुद्ध,' दुसरें 'मिश्र,' आणि तिसरें 'संयुक्त' आहे.

(२) आज्ञार्थक वाक्यांत आज्ञेच्या निरनिराळ्या छटा दाखविणाऱ्या वाक्यांचा समावेश केला पाहिजे. आज्ञार्थक वाक्यांचा खरा कर्ता द्वितीय पुरुष होय. वक्त्याचें आणि श्रोत्याचें प्रत्यक्ष भाषण होत असून वक्ता श्रोत्यास कांहीं क्रिया करण्यास आज्ञा, प्रार्थना, किंवा याञ्चा करीत आहे, असा बहुधा प्रश्नार्थक वाक्यांतून अर्थ निघत असतो. वक्ता श्रोत्यास प्रत्यक्ष बोलत असल्यामुळें क्रियेचा कर्ता स्पष्ट करण्याची गरज नसते. तो द्वितीय पुरुष आहे, हें सहज समजण्यासारखें असतें. आज्ञार्थक वाक्यांत द्वितीय पुरुष कर्ता असावा हा साधारण नियम खरा. पण कधीं कधीं अन्य पुरुषही कर्ता होऊं शकतो. 'चला आपण चतुःशृंगीस जाऊं आणि यात्रेची मजा पाहूं.' या वाक्यांतील 'चला', 'जाऊं' आणि 'पाहूं' हीं प्रथम पुरुषी आज्ञार्थक क्रियापदें मानिलीं पाहिजेत. तसेंच 'त्याला पाहिजे तें करूं दे, मी म्हणून येथून हालणार नाहीं' या वाक्यांतील 'करूं दे' क्रियापदाला 'तूं' हा अध्याहृत कर्ता मानणें फार गौण पक्ष आहे. त्याचा खरा कर्ता अध्याहृत 'तो' आहे. 'तो' कर्ता करून 'करूं दे' हें तृतीय पुरुषी आज्ञार्थक क्रियापद करावें. 'त्याला' ही चतुर्थी करणें प्रशस्त, पण द्वितीया केली तरी चालेल. 'पाहिजे' हें 'तें' चें विशेषण करावें, व सारें 'शुद्ध' वाक्य मानावें. अध्याहृत पदें सांगून पूर्ण वाक्य केल्यास त्यांचें पृथक्करण थोडें निराळें होईल. 'त्याला जें

पाहिजे तें तो करूं दे ' हें पूर्ण वाक्य होय. हें ' मिश्र ' आहे. ' त्याला जें पाहिजे ' हें विशेषणार्थक गौण वाक्य आहे. यांतील ' पाहिजे ' हें सकर्मक क्रियापद मानिलें तर ' त्याला ' हा त्याचा ' कर्ता ' आणि ' जें ' हें त्याचें ' कर्म ' होईल. तें अकर्मक किंवा कर्मणी मानल्यास ' जें ' हा त्याचा कर्ता होऊन ' त्याला ' हें चतुर्थ्यंत क्रियाविशेषण होईल. ' तें तो करूं दे ' या प्रधान वाक्यांतील ' तें 'चें विशेषण मागलें वाक्य आहे, व ' तो ' हा ' करूं दे ' या आज्ञार्थक संयुक्त क्रियापदाचा कर्ता आहे. कोणी ' करूं ' हें क्रियाविशेषण मानितात, व कोणी एक प्रकारचें द्वितीयांत धातुसाधित मानून ' दे 'चें कर्म करतात, व ' तें ' त्याचें म्हणजे ' करूं ' चें कर्म करतात. अशा प्रकारच्या वाक्यांचें व्याकरण करतांना ज्याप्रमाणें विकल्प ठेवावा लागतो, त्याप्रमाणें त्यांचें पृथक्करण करतांनाही तो ठेवावा लागतो. निरनिराळ्या पद्धति निरनिराळ्या दृष्टीनें ग्राह्य मानण्यासारख्या असतात, व त्या तशा असल्यामुळें अनेक संप्रदाय किंवा पंथ होतात. संस्कृतांत प्रथम पुरुषी व तृतीय पुरुषी क्रियापदांची आज्ञार्थक रूपें रूढ आहेत. इंग्रजींतही आहेत, पण त्यांस पूर्वीचे व्याकरणकार ओढून ताणून द्वितीय पुरुषी म्हणत. अलीकडील कांहीं अनेक भाषाभिज्ञ व्याकरणकार त्यांस प्रथम पुरुषी मानूं लागले आहेत.

प्रश्नार्थक वाक्यांप्रमाणें आज्ञार्थक वाक्येंही ' शुद्ध ', ' मिश्र ' किंवा ' संयुक्त ' असतात. ' मला पांच रुपये उसने दे ', ' तुम्ही जाल किंवा नाहीं तें आतां बोला ', ' घरांत जा आणि पाणी आण ' हीं अनुक्रमें तिहींचीं तीन उदाहरणें आहेत.

(३) एकशब्दात्मक उद्गारांत देखील वाक्यार्थ असतो हें मागें सांगितलेंच आहे. एकशब्दात्मक ' उद्गारवाची ' किंवा ' केवलप्रयोगी ' अव्ययांच्या जागीं कधीं कधीं लहान लहान वाक्यें घालतात. ' ही यांवर आकाशांतील कुऱ्हाड पडली ! ' असल्या वाक्यास शुद्ध उद्गार मानिल्यास तीं पृथक्करणांत दाखविण्याची गरज नाहीं. न मानल्यास प्रश्नार्थक व आज्ञार्थक वाक्यांप्रमाणेंच यांचीही व्यवस्था लावावी.



# १ लें परिशिष्ट

## वाक्यपृथक्करण करण्याच्या पद्धती

वाक्याच्या अवयवांचे 'प्राथमिक' आणि 'सहकारी' असे दोन भाग केले आहेत, ते वाचकांच्या ध्यानांत असतीलच. प्राथमिक अवयव नामें आणि क्रियापदें होत. उद्देश्यस्थानीं एक नाम व विधेयस्थानीं एक क्रियापद असल्याशिवाय वाक्य होतच नाही. विशेषणें आणि क्रियाविशेषणें सहकारी अवयव होत. हीं वाक्याच्या अस्तित्वास अपरिहार्य नसल्यामुळें यांवांचून भाषेंत पुष्कळ वाक्यें येतात; व ज्या वाक्यांत हीं येतात त्या वाक्यांत तीं नामाच्या व क्रियापदाच्या अंगभूत किंवा अनुषंगानें असतात. यासाठीं वाक्याचें स्थूल पृथक्करण करावयाचें असतां, यांस पृथक्त्वानें दाखविण्याची गरज नाहीं. शुद्ध किंवा मिश्र वाक्य केवढेंही असलें तरी त्याचें पृथक्करण उद्देश्य आणि विधेय या दोन सदरांत करून देतां येईल. याहून विस्तृत पृथक्करण करावयाचें असतां विधेयांतील विधेयक्रियापद, कर्म अथवा कर्मे, आणि क्रियाविशेषण अथवा क्रियाविशेषणें निराळीं दाखविण्याची चाल आहे. कोणी कोणी यापेक्षांही आणखी थोडेंसें पुढें जाऊन उद्देश्यांचीं आणि कर्मांचीं विशेषणें अथवा गुणवाचकें निराळीं दाखवितात. 'अपूर्ण' अकर्मक क्रियापदांचीं 'पूरकें' क्रियापदाच्या सदरांतच देण्याची चाल आहे. 'अपूर्ण' सकर्मक क्रियापदाचीं 'पूरकें' कर्माचीं एक प्रकारचीं विशेषणें असल्यामुळें तीं कर्मगुणवाचकांच्या सदरांत दाखवितात.

यावरून वाचकांच्या हें ध्यानांत येईल कीं, (१) वाक्याचें अगदीं स्थूल पृथक्करण करावयाचें असतां उद्देश्य आणि विधेय अशीं दोन सदरें, (२) त्याहून विस्तृत करावयाचें असतां उद्देश्य, विधेयक्रियापद, (असल्यास) कर्म, आणि क्रियाविशेषण अशीं चार सदरें, व (३) सर्वांत विस्तृत करावयाचें असतां उद्देश्य, उद्देश्यगुणवाचकें, विधेयक्रियापद, कर्म, कर्मगुणवाचकें, आणि विधेय क्रियाविशेषणवाचकें— अशीं सहा सदरें होतील. पुढें ज्या वाक्यांचें पृथक्करण करून दाखविलें आहे, त्यांचें तें ह्या शेवटल्या सहा सदरांत केलें आहे. विद्यार्थ्यांस पृथक्करण शिकवीत असतां, त्यांकडून तें प्रथम पहिल्या दोन सदरांत, मग दुसऱ्या चार सदरांत व अखेरीस शेवटच्या सहा सदरांत करवावें. कोणी कोणी या सहा सदरांस आणखी दोन किंवा तीन सदरें जोडतात. दोनच जोडल्यास त्यापैकीं पहिल्यांत ज्याचें पृथक्करण करावयाचें असेल तें वाक्य, व दुसऱ्यांत त्यांची जाति (शुद्ध, मिश्र, संयुक्त अथवा जी असेल ती) सांगतात. तीन

जोडल्यास पहिल्या दोहोंत वाक्य व त्याची जाति दाखवून, तिसऱ्यांत प्रधान व गौण, आणि समानाधिकरण स्वतंत्र व समानाधिकरण परतंत्र इत्यादि वाक्यप्रकारांस परस्परांशीं जोडणारीं उभयान्वयी अव्ययें दाखवितात. वास्तविक पहातां, वाक्यपृथक्करणांत अव्ययें दाखविण्याची गरज नाहीं; कारण तीं वाक्यांच्या अवयवांत गणतां येत नाहींत. पाहिजे असल्यास तीं दुसरीकडे दाखवावीं.

वाक्यपृथक्करणाचीं निरनिराळीं कोष्टकें किंवा त्यांतील सदरें कशीं पाडावीं याविषयीं हें सामान्य दिग्दर्शन झालें. आतां शुद्धमिश्रादि प्रत्येक प्रकाराविषयीं कांहीं विशेष सूचना करून हें पहिलें परिशिष्ट आटपतों.

'शुद्ध' वाक्याचें पृथक्करण करावयाचें असतां पुढील क्रमानें रकमा मांडाव्या:—

(१) वाक्याचें उद्देश्य; (२) उद्देश्यगुणवाचकें. हीं विधायक आहेत असें स्पष्ट होत नसल्यास मर्यादक मानावीं; (३) विधेय क्रियापद. हें 'अपूर्ण' अकर्मक असल्यास त्याबरोबर त्याचें पूरकही सांगितलें पाहिजे; (४) विधेयक्रियापद सकर्मक असल्यास त्याचें कर्म; (५) कर्माचीं विस्तारक किंवा गुणवाचक पदें असल्यास तीं; (६) विधेय क्रियाविशेषणवाचकें.

यांपैकीं ज्या रकमा एकाहून अधिक सदरांखालीं पडण्यासारख्या असतील, त्या विवक्षित वाक्याचें पृथक्करण करीत असतां कोणत्या सदरांत दाखविणें विशेष प्रशस्त आहे, हें सांगावें.

'मिश्र' वाक्यांचें पृथक्करण करतांना जीं गौण वाक्यें असतील त्यांस प्रथम नामार्थक, विशेषणार्थक, किंवा क्रियाविशेषणार्थक एक शब्द लेखून पृथक्करण करावें; व पुढें प्रत्येक गौण वाक्यांचें निराळें पृथक्करण करावें. मिश्र वाक्यांतील गौण वाक्यांची व्यधिकरणता आणि समानाधिकरणता वर्गप्रकाशक व गुणप्रकाशक अंकांनीं दाखवितां येईल.

अ+अ+अ$^{२}$+अ$^{३}$ = एक प्रधान वाक्य व त्यावर एकावर एक अवलंबून असलेलीं तीन गौण वाक्यें. अ+२ अ = एक प्रधान वाक्य व त्यावर अवलंबणारीं दोन समानाधिकरण गौण वाक्यें. अ+ २ अ+अ$^{२}$ = एक प्रधान वाक्य, त्यावर अवलंबणारीं दोन समानाधिकरण वाक्यें, व त्या दोहोंवर किंवा त्यांपैकीं एकावर अवलंबणारें तिसरें गौण वाक्य.

'संयुक्त' वाक्यांतील अवयवभूत समानाधिकरण (शुद्ध व मिश्र) वाक्यांचें वर सांगितल्याप्रमाणें पृथक्करण करून त्यांना जोडणारीं अव्ययें पृथक् दाखवावीं. संकुचित वाक्यांतील गाळलेला भाग दाखवून 'संयुक्त' वाक्याप्रमाणें त्यांचें पृथक्करण करावें. 'संक्षिप्त' वाक्यांचें पृथक्करण 'शुद्ध' वाक्याच्या पृथक्करणासारखें करावें.



# २ रें परिशिष्ट

## वाक्यांचें पृथक्करण

### शुद्ध वाक्यें

"पदार्थांपासून सर्व दिशांकडे किरण प्रसृत होत जातात."

१. उद्देश्य...'किरण.' ३. विधेयक्रियापद...'होत जातात.' ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें...(१) 'प्रसृत': हें विधिविशेषण असून यावर क्रियाविशेषणार्थाची छाया आहे. (२) 'पदार्थांपासून': हा अव्ययांत क्रियाविशेषणवाक्यांश आहे. (३) 'सर्व दिशांकडे :' हाही अव्ययांत क्रियाविशेषणवाक्यांश आहे.

या वाक्यांतील 'पदार्थांपासून' हा वाक्यांश वास्तविक पहातां 'होत जातात' याचा 'विकारी' नसून 'निघणारे' या 'किरणा'च्या अध्याहृत धातुसाधित विशेषणाचें क्रियाविशेषण आहे; कारण 'पदार्थांपासून निघणारे किरण' असा अर्थ आहे. मराठींत अव्ययांत नामें विशेषणें करण्याचा प्रघात लवकर पडेल तर बरें होईल. असें झालें असतां 'पदार्थांपासून'सारखे वाक्यांश क्रियापदाकडे किंवा अध्याहृत विशेषणाकडे लाऊन देत बसण्याची गरज पडणार नाहीं. ते एकदम विशेषणें करून टाकतां येतील. 'प्रसृत होत जातात' येवढें 'संयुक्त क्रियापद' केलें तरी चालेल.

"रामा आणि गोविंदा घरीं गेले."

१. उद्देश्य...'रामा आणि गोविंदा' : हें संयुक्त उद्देश्य होय. ३. विधेयक्रियापद...'गेले.' ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें...'घरीं.'

"त्यानें घर बांधावयाचें होतें."

१. उद्देश्य...'त्यानें.' ३. विधेयक्रियापद .'बांधावयाचें होतें' (संयुक्त). ४. कर्म...'घर.'

"त्यानें जायाचें होतें."

१. उद्देश्य...'त्यानें.' ३. विधेयक्रियापद...'जायाचें होतें.' (संयुक्त).

"त्याला जायाचें आहे."

१. उद्देश्य...'त्याला.' ३. विधेयक्रियापद...'जायाचें आहे' (संयुक्त).

पाहिजे तर 'जायाचें' उद्देश्य, 'आहे' विधेय, आणि 'त्याला' विधेय-क्रियाविशेषणवाचक करावें.

"तो या वेळेस घरीं जायाचा नाहीं."

१. उद्देश्य... 'तो.' ३. विधेयक्रियापद... 'जायाचा नाहीं' (संयुक्त). ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें...(१) 'या वेळेस' : विभक्त्यंत सविशेषण नाम. (२) घरीं : विभक्त्यंत नाम.

पाहिजे तर 'नाहीं' येवढेंच विधेयक्रियापद करून 'जायाचा 'स विधि-विशेषण करावें. तसें केल्यास तें ६ व्या सदराखालीं घालावें लागेल.

"तो न सांगता निघून जायाचा."

१. उद्देश्य...'तो'. ३. विधेयक्रियापद... 'जायाचा'. हें षष्ठ्यंत धातु-साधित विशेषण क्रियापदस्थानीं योजिलें आहे. ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें... (१) 'न सांगतां' : अव्ययी धातुसाधित. (२) 'निघून' : अव्ययी धातुसाधित (रीति).

पाहिजे तर 'निघून गेला' येवढें संयुक्त विधेयक्रियापद करतां येईल.

"आम्हीं किंवा आम्हांला काम केलें पाहिजे."

१. उद्देश्य... 'आम्हीं किंवा आम्हांला'. ३. विधेयक्रियापद...'केलें पाहिजे' (संयुक्त). ४ कर्म...'काम'.

पाहिजे तर 'काम' उद्देश्य, 'केलें पाहिजे' विधेयक्रियापद, आणि 'आम्हीं किंवा आम्हाला' विधेयक्रियाविशेषणवाचक करावें.

"त्याला लाडू खायाला पाहिजेत."

१. उद्देश्य...'त्याला'. ३. विधेयक्रियापद ..'पाहिजेत'. ४. कर्म...'लाडू' ६ विधेयक्रियाविशेषणवाचक... 'खायाला' : व्ययी धातुसाधित (हेतु).

पाहिजे तर 'लाडू' उद्देश्य, 'खायाला पाहिजेत' संयुक्त विधेयक्रियापद आणि 'त्याला' विधेय क्रियाविशेषणवाचक करावें.

"थीबाला मंडाले येथें कैद केलें".

१. उद्देश्य...अध्याहृत 'ब्रिटिश जनरलानें. ३. विधेयक्रियापद...' कैद केलें' (संयुक्त). ४. कर्म...' थीबाला' ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें...' मंडाले येथें'. 'मंडाले' या शब्दाचें 'येथें' या स्थ. क्रि. अव्ययाशीं सामानाधिकरण्य आहे.

पाहिजे तर 'केलें' येवढेंच विधेयक्रियापद करून 'कैद' थीबाचें विशेषण करावें. 'कैद' क्रियाविशेषण करणें गौणपक्ष होय. 'कैद' थीबाचें समानाधिकरण विशेषण होऊन त्यावर नामार्थाची छाया पडेल.

"माझें धोतर दहा हात रुंद आहे."

१. उद्देश्य...' धोतर'. २. उद्देश्यगुणवाचकें...' माझें' : षष्ठ्यंत सर्वनाम. ३. विधेयक्रियापद..' आहे' : अपूर्ण अकर्मक क्रियापद; 'पूरक' : 'दहा हात' हा 'रुंद' या विशेषणाचा परिमाणदर्शक सविशेषणनामघटित क्रियाविशेषण-वाक्यांश होय.

"मला कालपासून मळमळून येत आहे."

१. उद्देश्य...' मळमळून' : अव्ययी धातुसाधित. ३. विधेयक्रियापद...' येत आहे' (संयुक्त). ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें...(१)' मला '(स्थान, उगम); (२) कालपासून : अव्ययांत नाम (काल).

'मला' उद्देश्य व 'मळमळून येत आहे' संयुक्त विधेयक्रियापद करणें— हा अगदीं गौणपक्ष होय. 'मळमळणें' उद्देश्य व 'मळमळून येत आहे' विधेय-क्रियापद (संयुक्त) असें करणेंही विशेष प्रशस्त नाहीं.

"आम्हांला कातरजच्या तळ्यापाशीच उजाडलें."

१. उद्देश्य... अध्याहृत 'उजाडणें'; ३. विधेयक्रियापद...' उजाडलें'; ६. विधेय क्रियाविशेषणवाचकें...(१) 'आम्हांला' (संबंध); (२) 'कातरजच्या तळ्या पाशीच': अव्ययांत स्थलवाचक वाक्यांश;' कातरजचें' हें 'तळ्याचें' विशेषण.

"तूं कोण आहेस ?"

१. उद्देश्य...'तूं'; ३. विधेयक्रियापद...'आहेस': अपूर्ण अकर्मक क्रियापद; पूरक; 'कोण.'

"दिलीप म्हणून एक राजा होता."

१. उद्देश्य...' राजा'; २. उद्देश्यगुणवाचकें...(१) 'दिलीप म्हणून'; (२) एक; ३. विधेयक्रियापद ..' होता.'

या वाक्यांत 'म्हणून' हें कर्मणी व अव्ययी धातुसाधित विशेषणार्थक असून 'दिलीप' हा त्याचा कर्ता आहे.

"यूरोपखंडांतल्या सर्व देशांतील लोक होकायंत्राची उत्तर दिशा समजण्याकरितां त्या दिशेस फ्ल्युअरदिलीस नामें फूल काढितात."

१. उद्देश्य... लोक.' २. उद्देश्यगुणवाचकें...'युरोपखंडांतल्या सर्व देशांतील.' यांत 'देश' या शब्दाचीं 'युरोपखंडांतले' व 'सर्व' हीं दोन विशेषणें आहेत. ३. विधेयक्रियापद...'काढितात.' ४. कर्म...'फूल.' ५. कर्मगुणवाचकें...'फ्ल्युअरदिलीस नामें.' यांत 'फ्ल्युअरदिलीस' हें 'नामा'शीं समानाधिकरण आहे, व 'नामें' हें तृतीयांत विशेषण आहे. या तृतीयेचा षष्ठीसारखा (नांवाचें) अर्थ करावा. ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें... (१) होकायंत्राची उत्तर दिशा समजण्याकरितां (हेतु). हा अव्ययांत धातुसाधित वाक्यांश आहे. यांत 'होका'चें 'यंत्रा'शीं समानाधिकरण आहे; 'उत्तर' 'दिशे'चें विशेषण आहे; 'होकायंत्राची' येवढें 'उत्तर दिशे'चें षष्ठ्यंत विशेषण आहे; 'उत्तरदिशा' हें 'समजण्याकरितां' या अव्ययांत धातुसाधिताचें कर्म आहे. (२) 'त्या दिशेस': हा स्थानदर्शक विभक्त्यंत क्रियाविशेषणवाक्यांश होय.

"अशा प्रकारचे अनेक विचार आकाशांतील सृष्टीचें सौंदर्य पाहून त्याचें मनन करणाराचे मनांत येतील."

१. उद्देश्य... 'विचार.' २. उद्देश्यगुणवाचकें... (१) 'अशा प्रकारचे': षष्ठ्यंतनाम; (२) अनेक. ३. विधेयक्रियापद...'येतील'; ६. विधेय क्रियाविशेषणवाचकें... 'आकाशांतील... मनांत'; स्थानदर्शक विभक्त्यंत वाक्यांश. यांत 'आकाशांतील', 'सृष्टीचें,' व 'आकाशांतील सृष्टीचें' 'सौंदर्या'चें विशेषण आहे. 'आकाशांतील सृष्टीचें सौंदर्य' हें पाहून चें कर्म आहे. 'आकाशांतील सृष्टीचें सौंदर्य पाहून' येवढें सारें 'मनन करणाराचे' या विभक्त्यंत धातुसाधिताचें क्रियाविशेषण आहे. 'त्याचें' हें 'मनन'चें विशेषण आहे, व 'मनन' हें 'करणाराचे' या विभक्त्यंत धातुसाधिताचें कर्म आहे. शेवटीं 'आकाशांतील सृष्टीचें सौंदर्य पाहून त्याचें मनन करणाराचे' हें 'मनांत' या विभक्त्यंत नामाचें विशेषण आहे.

## मिश्र वाक्यें

"ह्या पात्राची कल्पना प्राचीन काळच्या लोकांस कांहींशी माहीत होती असें इतिहासावरून समजतें."

१. उद्देश्य...'असें'; याशीं समानाधिकरण 'ह्या पात्राची कल्पना...होती' हें वाक्य आहे. २. विधेयक्रियापद... 'समजतें.' ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें... 'इतिहासावरून'; उपकरण किंवा साधनदर्शक अव्ययांत नाम.

" ह्या पात्राची कल्पना प्राचीन काळच्या लोकांस कांहींशी माहीत होती " (समानाधिकरण नामवाक्य).

१. उद्देश्य...' कल्पना.' २. उद्देश्यगुणवाचकें .. ' ह्या पात्राची.' ३. विधेय-क्रियापद...' होती '; अपूर्ण अकर्मक क्रियापद; ' पूरक '; ' कांहींशी माहीत ' (विशेषण असून त्यावर क्रियाविशेषणाची छाया). ' प्राचीन काळच्या लोकांस ' या विभक्तयंत क्रियाविशेषणवाक्यांशाचा ' कांहींशी माहीत ' या विशेषणार्थक किंवा क्रियाविशेषणार्थक वाक्यांशाकडे संबंध आहे.

" घन परमाणूंच्या मध्यें मध्यें जशी अंतरें असतात तशीं प्रवाही पदार्थांच्या परमाणूंच्याही मध्यें मध्यें असतात."

१. उद्देश्य...' तशीं '; नामस्थानीं योजलेलें सार्वनामिक विशेषण. २. उद्देश्य-गुणवाचकें... ' घन...असतात.' ३. विधेयक्रियापद... ' असतात.' ६. विधेयक्रिया-विशेषणवाचकें...' प्रवाही परमाणूंच्याही मध्यें मध्यें ' (स्थान). येथें ' मध्यें ' सप्तम्यंत नाम मानून ' परमाणूंच्याही ' त्याचें विशेषण करावें, व ' प्रवाही पदार्थांच्या ' ' परमाणू 'चें विशेषण करावें.

" घन परमाणूंच्या मध्यें मध्यें जशीं अंतरें असतात " (विशेषणवाक्य).

१. उद्देश्य...' अंतरें.' २. उद्देश्यगुणवाचकें...' जशीं.' या संबंधी विशेषणाचा पुढील वाक्यांत नामस्थानीं योजलेल्या ' तशीं ' या दर्शक सार्वनामिक विशेषणाकडे संबंध आहे. ३. विधेयक्रियापद ...' असतात.' ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें...' घन परमाणूंच्या मध्यें मध्यें '; (स्थान).

" आकाशयान जसजसें वर जातें तसतशी श्वासोच्छ्वास करण्याची कांहींशी अडचण अनुभवास येते."

१. उद्देश्य... ' अडचण.' २. उद्देश्यगुणवाचकें... (१) ' तसतशी '; (२) ' श्वासोच्छ्वास करण्याची '; (३) ' कांहींशी '. यांपैकीं ' तसतशी 'वर क्रिया-विशेषणाची छाया असून तिचा ' येते 'कडे ओघ आहे. ' श्वासोच्छ्वास ' ' करण्याची ' या विभक्त्यंत धातुसाधिताचें कर्म. ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें... (१) ' आकाशयान जसजसें वर जातें '; (२) ' अनुभवास '.

" आकाशयान जसजसें वर जातें "; (परिमाणदर्शक क्रियाविशेषणवाक्य).

१. उद्देश्य...' आकाशयान.' ३. विधेयक्रियापद... ' जातें.' ६. विधेयक्रिया-विशेषणवाचकें...(१) ' जसजसें वर.' यांपैकीं ' जसजसें ' या संबंधीसार्वनामिक क्रियाविशेषणाचा ' वर ' या क्रियाविशेषणाकडे संबंध आहे. ' जसजसें ' व ' वर '

हीं दोन निराळीं क्रियाविशेषणें करणें बरें नाहीं. 'जसजसें वर' पुढल्या वाक्यांतील 'तसतशी'चें परिमाण आहे.

"ज्याप्रमाणें जड अशा बाह्यसृष्टींत पदार्थांच्या संयोगवियोगाला त्याचें समानधर्मत्व किंवा असमानधर्मत्व हीं कारणें होतात, त्याप्रमाणेंच चल अशा अन्तःसृष्टीची गोष्ट होय."

१. उद्देश्य...'गोष्ट.' २. उद्देश्यगुणवाचकें...'चल अशा अन्तःसृष्टीची.' यांत 'चल'चें 'अशा'शीं समानाधिकरण आहे. ३. विधेयक्रियापद...'होय.' ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें.. 'त्याप्रमाणेंच.' या अव्ययांत दर्शक सार्वनामिक क्रियाविशेषणवाक्यांशाचा मागल्या वाक्यांतील 'ज्याप्रमाणें'शीं संबंध आहे.

"ज्याप्रमाणें जड अशा...हीं कारण होतात" (क्रियाविशेषणवाक्य—रीती).

१. उद्देश्य...'हीं' या सर्वनामाचा मागल्या समानाधिकरण 'त्यांचें समानधर्मत्व किंवा असमानधर्मत्व' या संयुक्त नामाशीं संबंध आहे. ३. विधेयक्रियापद ...'होतात', अपूर्ण अकर्मक क्रियापद; पूरक : 'कारण.' ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें... (१) 'ज्याप्रमाणें'; (२) 'जड अशा बाह्यसृष्टींत'; (३) पदार्थांच्या संयोगवियोगाला.'

"विदुषी म्हणे म्हणा जा कीं म्यां कथिलें परोपरी पण तीं ।
प्रणति प्रभूंसि करिती अनुकंप्या मी स्वयंवरा म्हणती ।।"

१. उद्देश्य...'विदुषी.' ३. विधेयक्रियापद...'म्हणे.' ४. कर्म...'म्हणा जा... म्हणती' (नामवाक्य).

'म्हणा जा कीं... इत्यादि" (नामवाक्य). 'म्हणा जा' = 'जा आणि म्हणा.'

१. उद्देश्य...'तुम्ही' (अध्याहृत). ३. विधेयक्रियापद... 'जा.'

१. उद्देश्य...'तुम्ही'(अध्याहृत). ३. विधेयक्रियापद...'म्हणा.' ४. कर्म... 'म्यां कथिलें...म्हणती.'

"म्यां कथिलें परोपरी"; (नामवाक्य : कर्म).

१. उद्देश्य...'म्यां.' ३. विधेयक्रियापद...'कथिलें.' ६. क्रियाविशेषणवाचकें ...'परोपरी.'

"ती प्रणति प्रभूंसि करिती'; (हें मागल्या वाक्याशीं समानाधिकरण आहे).

१ उद्देश्य...'ती.' ३. विधेयक्रियापद..'करिती.' ४. कर्म...'प्रणति' ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें ..'प्रभूंसि.'

"अनुकंप्या मी स्वयंवरा म्हणती"; (याचें मागल्या वाक्याशीं समानाधिकरण आहे).

१. उद्देश्य...'ती'(अध्याहृत). ३. विधेयक्रियापद...'म्हणती'. ४. कर्म... 'अनुकंप्या मी स्वयंवरा ('आहें', अध्याहृत).

"अनुकंप्या मी स्वयंवरा (आहें)". नामवाक्य.

१. उद्देश्य....'मी'. २. उद्देश्यगुणवाचकें....'अनुकंप्या'. ३. विधेयक्रियापद ..'आहें' (अध्याहृत). अपूर्ण अकर्मक क्रियापद; पूरक : 'स्वयंवरा'.

या आर्येतील 'म्यां कथिलें परोपरी' हें वाक्य पाहिजे तर पुढल्या 'ती.... म्हणती' इत्यादि वाक्याचें क्रियाविशेषण करतां येईल; तसेंच 'प्रणति प्रभूंसि करिती' हें वाक्य 'अनुकंप्या.... म्हणती' इत्यादि वाक्याचें क्रियाविशेषण करतां येईल. मात्र असें करतांना 'जरी म्यां परोपरी कथिलें तरी' असा 'म्यां कथिलें परोपरी' या वाक्याचा व पुढील 'पणा'चा अर्थ केला पाहिजे; तसेंच 'प्रणति प्रभूंसि करिती' या वाक्याचा 'प्रणति प्रभूंसि करून' असा अर्थ केला पाहिजे. या दोन वाक्यांचे असे अर्थ केल्यास,'पहिलें विरुद्धता अथवा प्रतिकूलतादर्शक' क्रियाविशेषणवाक्य होईल, व दुसरें कालदर्शक क्रियाविशेषणवाक्य होईल.

"सौभद्र म्हणे शिरतों व्यूहीं, डोहीं जसा मतंगज, वा ।
हरिपोत दंतियूथीं, कीं दहनीं करुनिया पतंग जवा ॥

१. उद्देश्य....'सौभद्र.' ३. विधेयक्रियापद...'म्हणे.' ४. कर्म...."(मी) शिरतों....पतंग जवा."

"शिरतों व्यूहीं. .. पतंगजवा" नामवाक्य.

१. उद्देश्य.... 'मी' (अध्याहृत). ३. विधेयक्रियापद.... 'शिरतों'. ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें.... (१) 'व्यूहीं'; (२) 'तसा' (अध्याहृत); (३) 'जसा' मतंगज.... पतंग जवा'.

"डोहीं जसा मतंगज (शिरतो)"....क्रियाविशेषणवाक्य.

१. उद्देश्य.... 'मतंगज. ३. विधेयक्रियापद.... 'शिरतो' (अध्याहृत) ६. विधेयक्रियाविशेषणवाचकें.... (१)'जसा' (रीति); (२)'डोहीं' (स्थान).

"हरिपोत दंतियूथीं"....क्रियाविशेषणवाक्य. याचें मागल्याशीं समानाधिकरण आहे.

१ उद्देश्य....'हरिपोत'. ३ विधेयक्रियापद. ..'शिरतो' (अध्याहृत). (२) 'दंतियूथीं', (स्थान).

"दहनीं करुनिया पतंग जवा"....क्रियाविशेषणवाक्य. याचें मागल्याशीं समानाधिकरण आहे.

उद्देश्य...'पतंग.' ३ विधेयक्रियापद...'शिरतो' (अध्याहृत). ६ विधेय-क्रियाविशेषणवाचकें ..(१) 'जवा करुनिया'. (२) 'जसा' (अध्याहृत); (३) 'दहनीं'

या आर्येतील 'जवा करुनिया' हा धातुसाधितांत क्रियाविशेषण वाक्यांश फक्त शेवटच्या वाक्यांतील 'शिरतो' चाच विकारी मानिला पाहिजे असें नाहीं. तो तिन्हीही समानाधिकरण वाक्यांतील 'शिरतो'चा विकारी मानतां येईल इतकेंच नाहीं, तर त्याचा, पाहिजे तर, पहिल्या 'शिरतो' कडे सुद्धां संबंध लाऊन देतां येईल.

### संयुक्त, संकुचित, संक्षिप्त वाक्यें.

यांचें निराळें पृथक्करण करून दाखविण्यासाठीं जागा अडविण्याची गरज नाहीं; कारण 'संयुक्त' वाक्यांचे अवयव 'शुद्ध', 'मिश्र', अथवा 'शुद्ध व मिश्र' वाक्यें असणार. तेव्हां, केव्हांही 'संयुक्त' वाक्याचें पृथक्करण करणें झाल्यास त्याचीं अवयववाक्यें सांगून त्यांचें वर दाखविल्याप्रमाणें पृथक्करण करावें. संकुचित वाक्यांत स्वतंत्र क्रियापदें असल्यास त्यांतील गाळलेले सारे भाग सांगावे, व संक्षिप्त वाक्यांत क्रियापद गाळलें असतां तें सांगून वाक्य पूर्ण करून घ्यावें, आणि मग त्यांचें पृथक्करण करावें, हें मागें सांगितलेंच आहे.



# ३ रें परिशिष्ट

## अभ्यासाकरितां वाक्यें

### (अ) शुद्ध वाक्यें

हें सर्व पाहून जानू यक्षिणीकडे जाऊन तिच्या पायां पडला.

मनुष्यजातीचे दुधाचे दांत, म्हणजे लहानपणचे दांत, २० असतात.

एके समयीं वेनिसवाल्यांनीं पुष्कळ तुर्क लोकांस धरून आणून आपल्या शहरांत त्या बिचाऱ्यांस गुलाम म्हणून विकिलें.

असें बोलून तो निघून गेला.

तेव्हांपासून पुढें तो नवखा मनुष्य अक्षय सुख प्राप्त करून देणारीं कृत्यें करण्याकडे आपला सर्व काळ योजूं लागला.

असें झालें असतां तो देश वर्षानुवर्ष जास्ती जास्ती निकृष्ट दशेस येत जाईल.

तो फावल्या वेळीं वाद्यें वाजवावयास व चित्र काढावयास शिकत असे.

ताजमहाल ही इमारत आग्रानामें शहरापासून दीड कोसावर यमुना नदीच्या पश्चिम तीरावर आहे.

त्या इमारतीपेक्षां विशेष शोभायमान, विशेष भव्य, व विशेष सुंदर इमारत सर्व पृथ्वीवर दुसरी कोठेंही नाहीं.

मुंबईत रामचंद्रपंत म्हणून एक गृहस्थ होता.

मेणबत्तीच्या जोतीचें स्वरूप असें आहे.

ह्या जगांत आपणास मोठे म्हणविणारे असे पुष्कळ लोक आहेत.

झाडांच्या वयाच्या प्रमाणानें एकापासून चार वेळांपावेतों पानें तोडण्याची चाल आहे.

खालच्या प्रतींतल्या गृहस्थांच्या मुली बहुतकरून लग्न केल्यावांचून रहात नाहींत.

एका खेडेगांवचा रामराव देशमुख एके दिवशीं धान्य विकावयास कसब्यांत गेला होता.

एके दिवशीं तो शाळेंतून आल्यावर त्याच्या बापानें त्यास खाऊकरितां चार पैसे दिले.

एकेक वल्हें तीनचार हात लांब असून शेवटास कलथ्यासारखें पसरट असतें.

सर्वांनीं वस्त्र, पात्र, आणि स्थल, ही अवश्य स्वच्छ ठेविलीं पाहिजेत.

बैल किंवा गाय हें जनावर अंगानें मोठें असतें.

अकृतकृत्यहि अद्यापि तूं असून ।
क्रूर विधिनें त्वत्स्थिती केलि दीन ॥
परमेश्वर रूप धरी स्वपरजनहितोदया लुगडियांचें ।
निववाया सभ्यांसह मन नयनहि तो दयालु गडियांचें ॥
तो दुर्जन आधीं ही साधूच्या करुनि हानि रीतीची ।
नग्न सभेंत कराया पाहे खळ धरुनि हा निरी तीची ॥

## (ब) मिश्र वाक्यें

### १. नामवाक्यें

जनावरांचें जाणेंयेणें, बसणेंउठणें, खाणेंपिणें, राहणें इत्यादि गोष्टींविषयीं ज्या विद्वान् लोकांचें विशेष अवलोकन आहे त्यांची खातरी झाली आहे कीं, सर्व जातींच्या जनावरांत आपले मनोभाव एकमेकांस समजाविण्याचें कांहीं ना कांहीं साधन बहुतकरून असतेंच.

झाडाला डवचलें असतां रस बाहेर वाहतो, ह्यावरून झाडांमध्यें नेहमीं रस खेळत आहे, असें सिद्ध होतें.

फार सारा पडतो म्हणून धान्यास मोठी किंमत पडते असें नाहीं.

इंग्लंदांतील लोकस्थितीचें हें एक लक्षण आहे कीं कायद्यांची सत्ता सर्व लोकांवर सारखी चालते.

इंग्लंद देशांतील धर्म म्हटला म्हणजे ख्रिस्ती धर्म आहे असें सर्वांस माहीत आहे.

हिमालयपर्वताची सरासरी उंची समुद्राच्या सपाटीपासून १५७०० फूट आहे, असा सुमार काढिला आहे.

पुढें तो मुनीम तसेंच प्रामाणिकपणानें काम चालवीत असतां त्याचे कोणी आप्त येऊन असा बुद्धिभेद करूं लागले कीं, भाऊ, पहा ! हा एवढा कारभार तुम्हाकडे आहे, व लक्षावधी रुपये हातांत खेळतात, तर आतां आपला तळीराम गार करून एकदम कां सुखी होत नाहीं ?

संस्कृतांत संयुक्त क्रियापदांचें बंड मुळींच नाहीं असें म्हटल्यास चालेल.

भीम म्हणे राजे हो तरि पूर्वजगति न हो मला परिसा ।
जरि दुःशासनवक्षःक्षतज न सेवीन मी स्वयें हरिसा ।।
तातासि म्हणे आला नाहीं अद्यापि कच, नसे अवधी ।
लवधीर बुद्धि न धरी माझी, ताता सुनिष्ठुरा तव धी ।।

### २. विशेषणवाक्यें

मुंग्या कूच करतात त्या वेळेसही असाच प्रकार दृष्टीस पडतो.

वातावरणांत जी इतकी पाण्याची वाफ असते, तिचें कारण वायुभवन होय.

ग्रहांस सूर्याभोंवती प्रदक्षिणा करण्यास जो काळ लागतो त्यावरून ग्रहांवरचीं वर्षें मोजतात.

ह्या कारणानें ज्या कोणापाशीं थोडाकासा पैसा असेल ते तो जमिनींत पुरून ठेवतील.

येवढें मोठें विश्व असून माझ्या शरीरानें जेवढी जागा भरली जाते तेवढी खेरीजकरून बाकीच्या सर्व विश्वास मी मुकलों.

ज्यांचीं मनें हलकीं असतात ते दुसऱ्याचे क्षुल्लक देखील दोष बाहेर काढतात.

तिसरा मुलगा विठू जवळ होता, तो कांहीं बोलला नव्हता.

डोक्यास कांहीं तरी आच्छादन अगर भूषण घालावें अशी सर्व मनुष्यजातीमध्यें चाल आहे.

अंतरिक्षाचें ज्यास अवलोकन करणें असेल त्यानें रात्रीच्या शांत वेळीं उंच गच्चीवर किंवा सपाट मैदानांत गेलें पाहिजे.

> अकृतकृत्यहि अद्यापि जो, अशातें ।
> क्रूरदुर्विधिफणि चावलाचि तूतें ।।
> कृतकृत्य होऊनियां ज्याचें मन सुस्थ जाहलें आहे ।
> त्यातें विपत्ति तेही संपत्तिसमान होउनी राहे ।।

## ३. क्रियाविशेषणवाक्यें

ह्या सृष्टीमध्यें पाऊस, वीज, इंद्रधनुष्य वगैरे जसे अनेक चमत्कार आहेत तसा मृगजळ हा एक चमत्कार आहे.

घन पदार्थांचें द्रवीभवन होतांना जशी उष्णता अदृश्य होते, तशी द्रव पदार्थांचें वायुभवन होतांनाही ती अदृश्य होते.

ह्या दुःखाच्या गोष्टी नवऱ्याला कळवाव्या म्हणून वाईट तोंड करून त्याजकडे ती आली.

असें तो बोलत आहे इतक्यांत गृहस्थ म्हणाला.

ज्यापक्षीं (माझें आंधळेपण) ईश्वरास आवडलें त्यापक्षीं (तें) मलाही आवडलें.

अशा रीतीनें वृद्धापकाळीं स्वस्थपणानें सुखाचे दिवस घालवावे म्हणून माथ्यूहेलानें रजा घेतली.

कोळसे तयार झाले म्हणजे त्यांजपासून एक तापण्याचें काम होतें.

> विजा चमकती न जों नभि, न मेघ जों वर्षती ।
> जलाशयसरोवरें कलुषता न जों पावती ।।

प्रफुल्लनवपंकजीं कमलिनीवनीं सोंवरी ।
विलास कलहंसका सकलही मनींचे करी ॥

जेव्हां मोराला आनंद होतो, किंवा तो लांडोरीला पाहतो, तेव्हां तो आपला सर्व पिसारा उभारून आपली शोभा दाखवितो.

हवा उष्ण किंवा थंड असेल त्याप्रमाणें, लांडोर आपल्या अंड्यांवर २५ पासून ३० दिवसपर्यंत बसते.

मोर इतका शोभिवंत दिसतो तो पिसाऱ्यामुळे दिसतो.

महाराष्ट्र देशांतील लोक ब्राह्मणाच्या हत्येला जसे भितात, त्याप्रमाणें किंबहुना जास्त, रजपूत लोक भाटाच्या हत्येला भितात.

रामानें पतंग वर झोंकिला, इतक्यांत आडवा वारा येऊन त्याबरोबर जाऊन तो एका झुडपाशीं लागला तों त्याचें शेंपूट झुडपास गुंतून त्याचा माथा खालीं होऊन तो लोंबत राहिला.

व्यूहामाजी सांपडला पार्थकुमार । सहाजण महावीर
सोडिते झाले निर्वाणशर । एकलिया बाळावरी ॥

दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्याचा बाप बागेंत गेला, तों आपल्या आवडत्या झाडाची साल तासलेली त्याच्या दृष्टीस पडली.

आपण इमानानें वागलों तर आपल्या सोबत्यास वाईट वाटेल असें करणें कधीं कधीं भाग पडेल.

दुसऱ्यावर ममता करण्याची, व उपकार करण्याची बुद्धि आपण जशी जशी धरावी, तसें तसें आपणास सुख मिळेल.

शेले शालू साड्या क्षीरोदक लांब रुंद पाटावे ।
झाला अनंत वस्त्रें कीं तीस अनाथसें न वाटावें ॥
दुःशासन सोडाया झोंबे स्वकुळाहितोदया लुगड्या ।
तेव्हां स्मरली कृष्णा कृष्णा दीनाचिया दयालु गड्या ॥
गाई गृहासि आल्या मावळला रविहि कच न आढळला ।
तेव्हां सोडुनि धृतिनग शुक्रसुताबुद्धिभूमिला ढळला ॥

## (क) संयुक्त वाक्यें

पक्ष्यांना जशा हवा राहण्याच्या पिशव्या असतात तशा माशांनाही असतात, आणि पक्ष्यांस जशा त्या हवेंत तरण्यासाठीं उपयोगीं पडतात तशा त्याही माशांना पाण्यांत तरण्यासाठीं उपयोगीं पडतात.

बुडी मारण्याची घांट हें एक मोठें पात्र आहे; त्यांत वायू भरून मनुष्यांस आंत बसवून खोल पाण्यांत जातां येतें, आणि आंतील वायू नाहींसा होईपर्यंत त्यांत रहातां येतें.

हल्लीं आकाशयानें करितात तीं एका प्रकारचें रेशमी कापड तयार केलेलें असतें त्याचीं करतात, आणि दगडी कोळशांतून जो ग्यास निघतो तो त्यांत भरतात.

केवळ गिरिगुहांत गर्जना करणें किंवा गजभ्रमानें पाषाणराशीवर खर-नखरांचा मोघप्रयोग करणें हा जो आजपर्यंतचा क्रम तो जाऊन एका मदांधाक्ष कुंजराची आम्हांवर चाल होत आहे हें त्याचा बृंहितनाद सुचवीत आहे; तर आतां त्याच्या मदविलग्न गंडस्थलाचें विदारण करून त्यांतील यशोमौक्तिकाचें उद्धलन साऱ्या महाराष्ट्रभर करण्याकरितां झांप मारण्याच्या तयारीस लागतों.

शुक्रसुता गहिवरली म्हाणी तदुरस्थळासि अश्रु तिचे !
कवणाला न प्रिय तें गुणमणिमय केलिमंदिर श्रुतिचें ।।
शुक्रवरें नळ गेला शिरला अंतःपुरीं सुखें सुरसा !
भैमीच्या हा याच्या ती सेवी रूपसंपदा सुरसा ।।

प्रवाही पदार्थांत स्नेहाकर्षण कमी असल्यामुळें त्यांस कांहीं आकार देतां येत नाहीं; किंवा त्यांचे आपणास ढीगही घालतां येत नाहींत.

जेव्हां वायूंत ओलसरपणा फार असतो तेव्हांपासून शरीरास व्याधि उत्पन्न होतात, म्हणून पाऊन फार पडूं लागला असतां वायु फार जड असतो असें कदाचित् आपणास वाटेल, पण तसें असत नाहीं.

वायूची अशी स्थिति झाल्यामुळें मनुष्याच्या प्रकृति बिघडतात, फुप्फुसांचा व्यापार यथास्थित चालत नाहीं, रक्ताभिसरण चांगलें होत नाहीं, व दमा, ताप, माथेशूळ इत्यादि रोग उत्पन्न होतात.



# ४ थें परिशिष्ट

## वाक्यपृथक्करणांतील मुख्य संज्ञा

१ **उद्देश्य** Subject; उद्देश्यगुणवाचकें Attributive Adjuncts of the Subject.

२ **विधेय** Predicate; विधान Predication; विधेय Predicative; विधेयक्रियाविशेषणवाचकें Adverbial Adjuncts of the Predicate; अपूर्णविधेयक्रियापद Verb of Incomplete Predication; पूरक Complement.

३ **कर्म** Object; कर्मगुणवाचकें Attributive Adjuncts of the Object.

४ **वाक्यांश** Phrase; नामार्थक किंवा नामवाक्यांश Noun Phrase; विशेषणार्थक किंवा विशेषणवाक्यांश Adjective Phrase; क्रियाविशेषणार्थक किंवा क्रियाविशेषणवाक्यांश Adverb Phrase; विभक्त्यंत वाक्यांश Case-Phrase; अव्ययांत वाक्यांश Prepositional Phrase; धातुसाधितांत वाक्यांश Participle or Participial Phrase; क्रियार्थक वाक्यांश Verb-Phrase.

५ **वाक्य** Sentence; शुद्ध वाक्य Simple Sentence; मिश्र वाक्य Complex Sentence; संयुक्त वाक्य Compound Sentence; मिश्रसंयुक्त वाक्य Complex-Compound Sentence; प्रधान वाक्य Principal Sentence; गौणवाक्य Subordinate sentence; समानाधिकरण अथवा समानवाक्यें Co-ordinate Sentences; स्वतंत्र समानाधिकरण वाक्यें Independent Co-ordinate Sentences; परतंत्र समानाधिकरण वाक्यें Dependent Co-ordinate Sentences; विधानार्थक वाक्यें Predicative or Declaratory Sentences; आज्ञार्थक वाक्यें Imperative Sentences; प्रश्नार्थक वाक्यें Interrogative Sentences; सत्तार्थक अथवा सत्तावाची वाक्यें Affirmative Sentences; निषेधार्थक अथवा निषेधवाची वाक्यें Negative Sentences.

६ **संयुक्त** Compound; संयुक्त उद्देश्य Compound Subject; संयुक्त कर्म Compound Object; संयुक्त विशेषण Compound Adjective; संयुक्त क्रियाविशेषण Compound Adverb; संयुक्त क्रियापद Compound Verb.

७ **नाम** Noun; विशेष नाम Proper N.; सामान्यनाम Common N.; समुच्चयवाचक नाम Collective N.; द्रव्यवाचक नाम Material N.; भाववाचक नाम Abstract N.; नामस्थानीय अथवा नामप्रतिनिधि Substitutes for the N.

८ **विशेषण** Adjective; सार्वनामिक वि. Pronominal A.; समुच्चय-वाचक वि. Quantitative A.; गुणवाचक वि. Qualitative A.

९ **सर्वनाम** Pronoun; पूर्वसंबंध Backward Reference; उत्तरसंबंध Forward Reference; संबंधी स. Relative P.; दर्शक स. Demonstrative P. प्रश्नार्थक स. Interrogative P.; सामान्य स. Indefinite or Impersonal P.

१० **क्रियाविशेषण** Adverb; स्थानदर्शक क्रि. Place Ad.; कालदर्शक क्रि. Time Ad.; परिमाणदर्शक क्रि. Measure or Degree Ad.; निश्चय अथवा अनिश्चयदर्शक क्रि. Certainty or Uncertainty Ad.; कार्य-कारणदर्शक क्रि. Cause and Effect Ad.; गुण अथवा रीतिदर्शक क्रि. Manner or Quality Ad.

११ **शब्दयोगी अव्ययें** Prepositions; विभक्ति अ. Case Prepositions; स्थान अ. Place Prep.; काल अ. Time Prep.; उपकरण अथवा साधन अ. Agency Prep.; हेतु, आशय, उद्देशदर्शक अ. End Prep; संबंधसूचक अ. Reference Prep.; व्यावृत्तिसूचक अ. Separation or Exclusion Prep.; आनुकूल्यसूचक अ. Inclination or Conformity Prep.; स्थानीयतासूचक अ. Subtitution Prep.

१२ **उभयान्वयी अव्ययें** Conjunctions; समानाधिकरण (शब्द अथवा वाक्य) उभयान्वयी अ. Co-ordinating Conj.; व्यधिकरण (शब्द अथवा वाक्य) उभयान्वयी अ. Subordinating Conj.; विरुद्धतार्थक उ. अ. Adversative Conj.; समुच्चयार्थक उ. अ. Cumulative Conj.; परिणामार्थक उ. अ. Illative Conj; व्यावृत्त्यर्थक उ. अ. Exclusive Conj.; पक्षांतरबोधक उ. अ. Alternative Conj.; न्यूनत्वबोधक उ. अ. Arrestive Conj ; कारण हेतुदर्शक उ. अ. Cause or Reason Conj.; संकेतादिदर्शक उ. अ. Suppositon, Condition &c. Conj.; कालदर्शक उ. अ. Time Conj.



# ५ वे परिशिष्ट

## बेनच्या मोठ्या व्याकरणांतील इंग्रजी वाक्यांचे पृथक्करणाचा स्वल्प सारांश

## A BRIEF SUMMARY OF THE Analysis of Sentences from Bain's Higher Grammar

The Analysis of Sentences ascertains what is common to all sentences and shows how the different parts are related to each other.

Every sentence consists of two parts, the *Subject* and the *Predicate* : 'Gold' 'is precious.'

Sentences are *Simple*, *Complex*, and *Compound*.

The Simple Sentence contains one subject and one finite verb : 'The patience of Job is proverbial.'

A Complex Sentence, while consisting of one principal subject and predicate, contains two or more finite verbs : 'No one can say how the thing happened.'

A Compound Sentence contains two or more (simple or complex) sentences united : 'The sun rose and the mists disappeared.'

[*Contracted* and *Elliptical* sentences are only particular modes of Compound and Complex Sentences. In Contracted Sentences the part common to two or more Co-ordinate Sentences is expressed only once. In Elliptical Sentences, the omitted part is not necessarily the common part, but some part that can be easily understood and supplied; e.g. 'The sun gives light and (*the sun gives*) heat' ; 'He has written more letters than you (*have written many letters*)'. Of these, the first is a Contracted and the second an Elliptical sentence. The words that are generally omitted in such sentences are here enclosed within brackets].

At least two words are necessary for a sentence. They are a noun and a verb. These, therefore, may be called its Primary

Elements. These are respectively enlarged by 'adjectives' and 'adverbs', which, on that account, may be called its Secondary Elements. The object of a Transitive Verb, like the subject of every verb, is a noun or some equivalent of a noun, such as a pronoun, an infinitive phrase etc; and therefore the object can be enlarged in the same way in which the subject is enlarged.

**1. Enlargement of the Subject and the Object.**

The following are the various means of qualifying or modifying the Subject or the Object of a Simple Sentence : (1) **The Adjective** : 'We met an *old* soldier.' (2) **Possessive case** : 'The *King's* (royal) prerogative.' (3) **A Noun in apposition** : 'Havelock, *the hero*, is dead.' **A Phrase** made up of a **Preposition and a Noun** : 'A word in season.' (5) **A Participial Phrase** ; that is, a Participle, either alone or having an object, or qualified by an Adverb : 'A man *carrying a burden* passed a cow *quietly grazing*.'

The Subject or the Object may be enlarged by a combination of two or more of these modes : and the adjuncts may themselves be modified by other adjuncts.

**2. Enlargement of the Predicate.**

The Predicate may be a single verb, in which case it is called **Simple**; as 'The dog runs.' It is called **Complex** when it is *made up of a Verb of Incomplete Predication* and its complement; 'The dog *is sagacious*'; 'He *was made first consul*'; 'They elected him *captain*'. Of these, the last two are instances of incomplete transitive verbs passive and active. The negative 'not' ought to be considered a part of the predicate rather than an adverbial enlargement of it. **The Predicate, of a Transitive verb, is completed by means of an Object.** This Object is of the same nature as the subject, and is therefore, like it, enlarged by (1) an adjective, (2) a possessive case, (3) a noun in apposition, (4) a phrase made up of preposition and noun, and (5) a participial phrase.

**The Predicate is enlarged by an Adverb, or an Adverbial phrase.** The adverbial phrase appears in the form of (1) **A noun** : 'we walked *a mile*'; (2) **A Preposition and Noun** : 'He went *of necessity*'; (3) **A Noun qualified by some adjunct** : 'He rose

*his height*'; (4) **A Participle or a Participial Phrase**: 'They went along *singing*', 'He stood *gazing on the scene below*'; (5) **An Infinitive or a Gerund**: 'He is a fool *to throw away such a chance*' (infinitive with preposition), 'The courtier stoops *to rise*' (gerund).

**II. Enlargement of the Complex Sentence**

In the Complex Sentence, the part containing the principal Subject and Predicate is called the **principal clause**; the other part, the **subordinate clause**, or clauses: 'I saw' (principal) 'that something was wrong' (subordinate).

**Subordinate clauses are of three kinds**, according as they are *representative of the noun, of the adjective or of the adverb*. They are thus divided into **Noun** clauses, **Adjective** clauses, and **Adverbial** clauses.

*1. The Noun Clause*

**The Noun clause occupies the place of the Noun**: *i. e.* (1) it may be the **subject** or the **object** of the Principal **clause**: **as** '*That he had been rash* (subject) was apparent to all', '**I saw** *that the waters had risen*' (object); (2) it may be **in apposition** to some Noun: 'The idea *that any one should challenge his right* had never crossed his mind'; (3) it may be the **completion of the predicate**: as 'The consequence was *that we achieved a victory*'.

*2. The Adjective Clause*

**When a clause limits or qualifies a Noun or a Pronoun, it is of the nature of an Adjective**: 'Men *that are selfish* (selfish men) never win our esteem'; 'I remember *the* place *that he occupied* (the by-him-occupied place; *his* place)'.

An Adjective clause may be found (1) *With the subject*: 'He *that sows* will reap'; (2) *With the Object*: 'I love them *that love me*'; (3) *In Adverbial adjuncts*: 'In the day *that thou eatest thereof*, thou shalt die'.

*3. The Adverbial Clause*

**An Adverbial clause is the equivalent of an Adverb, and modifies a Verb**: 'He went away after the sun had risen.' **Adverbial Clauses** may be divided into those of (1) **Place**: 'We

remain *where we are* '; (2) **Time** : ' We left *while he was speaking* '; (3) **Degree** : ' The sea is *as deep as the mountains are high* '; (4) **Certainty or Uncertainty** : ' *As sure as I speak*, you will repent of this '; (5) **Cause or Reason** : ' The garrison surrendered, *because their provisions failed* '; (6) **Manner in General** : ' He did *as he was told* '.

### III. Enlargement of the Compound Sentence

Since a *Compound Sentence* is but a combination of two or more (Simple or Complex) sentences, nothing beyond what is said about the enlargement of *Simple* and *Complex* sentences need be said about the enlargement of the Compound Sentence.

### IV. Elliptical and Contracted Sentences.

*Elliptical* and *Contracted Sentences* are either *Complex* or *Compound*. The Contracted Sentences are one class of Elliptical Sentences; the part common to two or more Co-ordinate Sentences being expressed only once. Another class, somewhat more difficult, are those involving the Comparative Adverbs, ' as ', ' than ', ' the ', and others.

In analysing them the ellipsis should be filled up as ' The sun gives light and (*the sun gives*) heat '; ' He is more industrious than (*he is*) clever '.



# विविधविषयसंग्रह.

## भाग १ ला.

गोपाळ गणेश आगरकर, एम्. ए.

'सुधारकाचे 'चे कर्ते व फर्ग्यूसन कालेजांतील प्रोफेसर

यांनीं तयार करून

पुणें येथें 'आर्यविजय' छापखान्यांत छापविला.

सन १८९१.



किंमत १२ आणे

# प्रस्तावना

' सुधारकांतील निवडक निबंध ' पुस्तकरूपानें छापण्याविषयीं अनेकांकडून अनेक वेळां सूचना आल्यामुळें, ते वाचण्याची आणि पुस्तकरूपानें जवळ बाळगण्याची त्यांची इच्छा असावी, असें अनुमान करून, त्यांचा हा पहिला भाग प्रसिद्ध केला आहे. या भागाच्या वाचनामुळें कोणाचेंही मन दुखावलें जाऊं नये म्हणून यांत कोणत्याही प्रकारच्या वादग्रस्त विषयाचा समावेश केला नाहीं. उपयुक्त माहिती आणि मनोरंजन हे दोनच हेतु पुढें ठेवून यांतील निबंधांची निवड केली असल्यामुळें, अगदीं जुन्या पद्धतीच्या लोकांनीं देखील हा भाग वाचण्यास कांहीं हरकत नाहीं असें मला वाटतें. **सुधारकां**तील निबंधांशिवाय याच लेखकानें **केसरी** पत्रांत लिहिलेल्या अनेक निबंधांपैकीं चार निबंध ' आर्यभूषण ' छापखान्याच्या मालकांच्या परवानगीनें या भागांत छापिले आहेत. कादंबऱ्यांहून थोडयाशा वरिष्ठ प्रतीच्या वाचनाची ज्यांस गोडी लागली असेल त्या सर्व मराठी वाचकांस या भागाच्या वाचनानें आनंद किंवा बोध होईल, अशी मला आशा आहे. ती पूर्ण झाल्यास, म्हणजे प्रस्तुत आवृत्ति लौकर खलास झाल्यास, याची पुनरावृत्ति काढण्याला, किंवा राजकीय, सामाजिक, व धार्मिक विषयांचा दुसरा भाग छापण्याला मला उमेद येईल हें उघड आहे. ' काय होतें पहावें ! '

हें पुस्तक छापण्याच्या संबंधानें हरएक प्रकारचें श्रम आमचे मित्र रा० रा० हरि कृष्ण दामले यांनीं केले. मीं फक्त ही छोटेखानी प्रस्तावना लिहून तिच्याखालीं सही केली ! या त्यांच्या दगदगीबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

पुणें, ता० २२ नवंबर १८९१.

**गो. ग. आगरकर**

# विविधविषयसंग्रह

## वाचन

गुरुमुख, वाचन, विचार, अवलोकन, वाद इत्यादि ज्ञानसंपादनाचीं अनेक द्वारें आहेत. त्यांपैकीं वाचन हें अत्यंत महत्त्वाचें आहे. 'गुरु' शब्दांत अर्थात् सर्व वडील माणसांचा समावेश केला पाहिजे. बाल्यावस्थेंत गृह आणि शाला हीं दोन ज्ञानसंपादनाचीं स्थानें होत. घरीं मातापितरांनीं व इतर वडील माणसांनीं शिक्षण द्यावयाचें; शाळेंत शिक्षकानें द्यावयाचें. विद्यार्थी जसाजसा मोठा होत जातो, तसतशी त्याला गुरुमुखाच्या साहाय्याची गरज कमी पडूं लागते. आणि खरोखरींच ज्यांना मुलांच्या कल्याणाची इच्छा असेल त्यांनीं त्यांना फार वेळ भरवून घेण्याची संवय लावूं नये. मनुष्यास मानसिक श्रमाचा जात्या कंटाळा आहे; कारण, मानसिक श्रम शारीर श्रमापेक्षां अवघड आहे. मनाला एकदां दुसऱ्यापासून मदत घेण्याची खोड लागली, म्हणजे त्याचें स्वावलंबन अगदीं सुटतें. व्यवहारांत घडोघडीं अडचणी येणार. प्रत्येक घटकेस सल्ला देण्यास भेटणारा गुरु कोठून मिळणार ? मनाची लोखंडासारखी स्थिति आहे. लोखंड वहिवाटींत नसलें म्हणजे त्याला तांबेरा येऊन तें कुचकामाचें होतें. पण जर त्याच्यावर नित्य घर्षण घडत असलें तर तें सतेज राहून फार दिवस टिकतें. ज्याच्या मनाला श्रम करण्याची संवय लागलेली नाहीं, त्याचें मन लोखंडाप्रमाणें गंजून जाऊन कोणत्याही कामास निरुपयोगी होतें. वस्तऱ्याला जसा दगड, तशा बुद्धीला अडचणी आहेत. अडचणीच्या दगडावर बुद्धि लाविल्यानें ती अत्यंत तीव्र होते. जेव्हां तेव्हां गुरुमुखाची अपेक्षा केल्यानें हें घर्षण घडत नाहीं, व बुद्धीला मांद्य येतें. सबब, विद्यार्थ्यांच्या शिक्षणास गुरुमुखांतून अगदीं अपरिहार्य असेल तेवढेंच साहाय्य व्हावें. कित्येक श्रीमंत लोक आपल्या मुलांस शिकविण्यासाठीं खाजगी शिक्षक ठेवीत असतात. शाळेंतले शिक्षक अगदींच नादान असले, किंवा मुलांकडून वर्गाच्या मागें राहिलेली कांहीं बाकी मिळवून घ्यावयाची असली, किंवा त्यांच्याकडून एखाद्या इयत्तेवरून उडी मारवावयाची असली तर असें करणें बरोबर आहे. तसें नसेल तर मात्र घरच्या शिक्षकापासून मुलांचा अखेरीस तोटा होतो असा आमचा

वगैरे सर्व सद्‌गुण शिक्षणाचेंच फळ होत. आपण पुरुषांस प्रिय व्हावें, अशी जी बळकट इच्छा स्त्रियांच्या अंतःकरणांत वास करीत असते, त्यामुळेंच त्या विनीत, नम्र, व मर्यादशील असतात; व ही इच्छा जगाच्या अंतापर्यंत स्त्रीपुरुषांच्या मनांतून नाहींशी होणें अशक्य असल्यामुळें, शिक्षण मिळाल्यानें स्त्रिया पुरुषांची स्पर्धा करूं लागतील असें मानण्याचें अगदीं कारण नाहीं. 'समानशीलव्यसनेषु सख्यं' या न्यायानें शिक्षणरूप समानव्यवसायापासून स्त्रीपुरुषांच्या प्रेमांत अंतर न पडतां तें उलटें वृद्धिंगतच होईल.

आमच्या वरील विचारांवरून, शिक्षणापासून कोणत्याही स्थितींत केवळ चांगलेच परिणाम झाले पाहिजेत, त्यापासून यत्किंचित्‌ही अहित होणार नाहीं, असें प्रतिपादन करण्याचा आमचा हेतु आहे, असें कोणींही समजूं नये. जगांत अशी एकही गोष्ट नाहीं कीं जिच्यापासून सर्वतापरी व सर्वकाळीं केवळ इष्ट परिणामच घडून येतात. योजकाच्या मूर्खपणामुळें चांगल्याही साधनांचा दुरुपयोग होतो, हें आम्हांस कबूल आहे. त्याप्रमाणें प्रसंगविशेषीं शिक्षणाचाही दुरुपयोग होईल, हें आम्हांस कबूल आहे. आमचें म्हणणें इतकेंच आहे कीं, आज ज्यांस कांहीं काम करण्याची फारशी अवश्यकता नाहीं अशा निदान ५०००० स्त्रिया ग्रेट ब्रिटन देशांत आहेत, व प्रत्येक सुधारलेल्या देशांतही आपल्या मुलांबाळांची व्यवस्था करून व आपलीं गृहकृत्यें संभाळून ज्यांचा बराच काळ व्यवसायावांचून निरर्थक खर्च होतो, अशा पुष्कळ स्त्रिया नेहमीं असणारच. त्यांचा वेळ जाण्याचे जे कांहीं अन्य उपाय आहेत त्यांमध्यें शिक्षणासारखा निर्दोष उपाय दुसरा कोणताही नाहीं. यापासून मनुष्यमात्राची योग्यता वाढण्यासारखी आहे, व हा उपयुक्त असून अन्य उपायांपेक्षां खचित कमी अपाय करणारा आहे. दुसरें असें कीं, स्त्रियांचा संबंध नेहमी घराशींच असल्यामुळें त्यांस बाह्य जगाची थोडीच ओळख असते, व साधारणपणें त्यांस एकांतवासच कंठावा लागतो, असें म्हणण्यास हरकत नाहीं; व कधीं कधीं पुरुषांच्या हातीं त्यांस हालअपेष्टा सोसाव्या लागत असून त्यांबद्दल कोठें कुरकुर करण्यासही जागा नसते; तेव्हां अशा स्थितींत आपले कसें तरी समाधान करून घेण्याचें, व आपला कंटाळवाणा वेळ घालविण्याचें योग्य साधन त्यांचें त्यांच्याच स्वाधीन असण्यास त्यांस ज्ञान प्राप्त करून करून देण्यासारखा दुसरा मार्ग नाहीं, हें विचाराअंतीं प्रत्येकास दिसून येईल.

आतां स्त्रियांस ज्ञान मिळालें असतां त्यांनीं पुस्तकें लिहूं लागावींत, व अमक्या स्त्रीनें अमुक पुस्तक लिहिलें म्हणून तिच्या नांवाची जिकडेतिकडे टिमकी वाजत रहावी हें चांगलें नाहीं, वगैरे जे आक्षेप घेण्यांत येतात, त्यास उत्तर

इतकेंच की, आज जितक्या पुरुषांस विद्या मिळाली आहे, त्यांपैकीं ग्रंथकार किती आहेत याचा त्यांनीं विचार करावा. दुसऱ्यांकरितां पुस्तकें लिहिणारांपेक्षां, विद्येच्या योगानें ज्यांनी आपलीं स्वतांची मनें संस्कृत केलीं आहेत अशांचीच संख्या फार मोठी आहे; व त्या मानानें पुस्तकें लिहिणाऱ्या स्त्रिया एकंदर संख्येच्या मानानें पहातां केवळ शून्यवतच असतील हें उघड आहे; व आम्हीही जो स्त्रीशिक्षणाचा पुरस्कार करितों तो त्यांनीं ग्रंथ लिहावे या उद्देशानें करीत नाहीं. आमचा मुख्य हेतु म्हटला म्हणजे त्यांच्या स्वतःच्या सुखांत व कुटुंबसुखांत भर पडावी एवढाच आहे. स्त्रियांस नृत्यगायनादि कला अवगत असल्या, किंवा त्यांस चित्रकलेचें ज्ञान असलें म्हणजे त्यांनीं नाटकांत नाचावें, किंवा गाणीं-बजावणीं करावीं, किंवा प्रदर्शनांत चित्रें पाठवावीं, असा सिद्धांत काढणें मूर्खपणाचें आहे. या सर्व कलांचा उद्देश त्यांचें सुख वाढावें व स्वतांची करमणूक व्हावी इतकाच आहे. शिवाय स्त्रियांनीं पुस्तकें लिहून त्यांच्या नांवाची चर्चा व्हावी हेंच जर मोठें अनिष्ट असेल तर त्याचा परिणाम फारच थोडया स्त्रियांवर घडण्याचा संभव आहे. मिस एजवर्थ, मिसेस बारबाल्ड, किंवा मिसेस हॉमिल्टन (या सर्व प्रसिद्ध ग्रंथकर्त्या होऊन गेल्या, व यांपैकीं पहिलीचे ग्रंथ तर प्रख्यात कादंबरीकार सर वाल्टर स्कॉट यासही फारच आदरणीय झाले) यांच्या नांवाची जशी आज चर्चा होत आहे, तशी स्थिति कांहीं स्त्रियांस प्राप्त झाल्यास मोठें दुर्दैव खरें ! परंतु ती स्थिति त्या मोठ्या धैर्यानें सहन करतील, असेंही आम्हांस वाटतें !

दुसरें असें आहे कीं, पुरुष मूळचे अशिक्षित असले तथापि त्यांचा सर्व जगाशीं अवश्य संबंध पोहोंचत असल्यामुळें, व आपल्या मस्तकास श्रम देण्याचे त्यांस वारंवार प्रसंग येत असल्यामुळें, शेवटपर्यंत ते केवळ अडाणी रहाण्याचा संभव कमी असतो. बऱ्यावाईटाचा विचार करणें, सावधगिरी बाळगणें, बारीक गोष्टींवरही नजर ठेवणें वगैरे गुण, त्यांच्यावर जोखीम पडत असल्यामुळें, त्यांस हळूहळू प्राप्त होतात. परंतु स्त्रियांचें तसें नाहीं. त्यांचें जगाशीं दळणवळण अगदीं नसते, व त्यांचा सर्व वेळ घरांतच जाणारा असतो. म्हणून शाळेंत मिळणाऱ्या शिक्षणक्रमांत ज्या कांहीं काल्पनिक अडचणी येतात, व ज्यांच्या योगानें मनाचा गोंधळ होतो त्यांतून पार पडण्याची त्यांस संवय लागली तरच त्यांच्या बुद्धीस संस्कार होऊन ती प्रगल्भ होण्याचा संभव आहे. नाहीं तर त्या नेहमीं अप्रबुद्ध रहाणार. तेव्हां स्त्रियांच्या बुद्धीचा विकास होणें अवश्य असेल तर त्यांस शाळेंत पाठविल्यावांचून गत्यंतर नाहीं; व यावरूनच बायकांना जर नोकऱ्या, व इतर धंदे करावयाचे नाहींत तर त्यांस शाळेंत जाऊन काय करावयाचें आहे, ही समजूत किती चुकीची आहे हेंही व्यक्त होतें.

आजमित्तीस स्त्रीशिक्षणाचा एकंदर रोख म्हटला म्हणजे त्या पुरुषास अधिक प्रिय कशा होतील इतक्यापुरताच आहे. गायन, नर्तन, चित्रकला यांतच स्त्रियांस प्राविण्य मिळविण्याविषयीं विशेष श्रम घेण्यांत येतात. परंतु या सर्व कलांचा उपयोग अर्थातच मर्यादित असला पाहिजे. तारुण्यांत असतांना पुरुषांचें मन सुप्रसन्न करून आपण त्यांस आवडत्या व्हावें, व पुढेंही थोडा काळपर्यंत उभयतांस करमणूक व्हावी यापलीकडे या कलांचा फारसा उपयोग नाहीं. आतां या कलांवरच उपजीविका करण्याचा ज्यांचा उद्देश असेल त्यांनीं त्यांचा अभ्यास करण्यांतच सर्व वेळ खर्च केल्यास तें खचित गैरवाजवी होणार नाहीं. (येथें एक गोष्ट सांगणें अवश्य आहे कीं, इंग्लंड देशांत गाण्यावजावण्यावर उपजीविका करणाऱ्या सर्व स्त्रिया इकडल्याप्रमाणें वेश्यावर्गांतीलच नसतात.) परंतु ज्यांस तो धंदा करावयाचा नाहीं अशा स्त्रियांचा सर्व वेळ त्यांतच मुरविणें शहाणपणाचें नाहीं. सर्व जन्मभर गात नाचत बसण्याचे प्रसंग फारच थोडे असतात. प्रत्येक कुटुंबाचा आयुष्यक्रम म्हणजे सतत चालणारा 'आलिंपिक गेम' नसतो. मुलेंबाळें झाल्यावर स्त्रियांस या कलांचा उपयोग नाही. निसर्गतःच मोहक असणारें तारुण्य अधिक मोहक होण्यास मात्र काय तो त्यांचा उपयोग. त्यांच्या योगानें आपल्या मुलांच्या शिक्षणास स्त्रियांस फारशी मदत होत नाहीं हें कोणीही कबूल करील. आजारीपण फारसें जड जाऊं नये, एकांतवास कंटाळवाणा होऊं नये, वृद्धपणी ज्यानें त्यानें आपला तिरस्कार करूं नये, आपले आयुष्याचे दिवस विशेष महत्त्वाचे व उपयुक्त असे व्हावे, व मरणकाल विशेष भीतिप्रद होऊं नये, असें जर वाटत असेल तर स्त्रियांचा सर्व काल गायननर्तनादिकांत घालणें चांगलें नाहीं. आतां या सर्व विचारांवरून आम्ही या कलांचें महत्त्व मानीत नाहीं, असें मात्र कोणीं समजूं नये. आमचें म्हणणें इतकेंच आहे कीं, ज्ञानाविषयीं एकदा प्रीति जडली असतां त्यापासून ज्या नाना सुविचारांचा अखंड प्रवाह वाहील, तो जसा चिरकाल राहील व त्यापासून होणारें सौख्य जसें श्रेष्ठ व विस्तृत असेल तसें वरील कलांच्यानें होणें नाहीं. त्यांपासून फार तर तास दोन तास करमणूक होईल व तीही जोंपर्यंत त्यास तारुण्याची मदत आहे तोंपर्यंतच शक्य आहे. एकदा तारुण्य गेलें कीं त्याबरोबर त्यांची बहुतेक शोभा लयास गेलीच पाहिजे. याकरितां स्त्रियांची बुद्धि भिंतीवर टांगून राहण्यापेक्षां, किंवा मंजुल वाद्यांच्या तारांमध्यें तरंगित होण्यापेक्षां, किंवा वायुवश होऊन राहण्यापेक्षां, ज्या रीतीनें त्या आपल्या स्वतांस, आपल्या कुटुंबास, किंवा सर्व समाजासही भूषण होतील त्या रीतीनें त्यांच्या वेळेचा उपयोग करणें हें फार महत्त्वाचें आहे.

वरील विचारांचा आमच्या सद्यःस्थितीशीं संबंध अगदीं नाहीं हें कोणासही कळण्यासारखें आहे. इंग्लंड देशांतील स्त्रियांचा बहुतेक काल गायनवादनांतच

खर्च होत होता, तो मर्यादित करण्याच्या उद्देशानें वरील विचार निबंधकारांनी प्रदर्शित केले आहेत. आमच्या इकडे तर याच्या अगदीं उलट प्रकार आहे. येथील स्त्रीशिक्षणांत या कलांचा अतिरेक झाला नाहीं इतकेंच नाहीं, तर त्यांचा अजून प्रवेशच होणें आहे; व तो अंशतः होऊन त्यापासून स्त्रियांचें स्वतांचें मनोरंजन होऊन त्यांच्या पतींसही करमणूक होऊं लागली, व तेणेंकरून बाहेरख्यालीपणावर कांहीं अनुकूल परिणाम घडला, तर तें इष्टच आहे.

स्त्रियांस चांगलें शिक्षण मिळूं लागलें असतां पुरुषांच्या शिक्षणासही मदत होणारी आहे. मुलांच्या बाल्यावस्थेंत त्यांचा आईशी किती निकट संबंध असतो, व पुढें मनुष्य चांगला किंवा वाईट निपजणें हें त्याच्या लहानपणच्या गृह-शिक्षणावर किती अवलंबून असतें, याचा जो क्षणभर विचार करील त्यास असें दिसून आल्यावांचून रहाणार नाहीं कीं, हल्लीप्रमाणें स्त्रिया अशिक्षित राहणें हें मोठें दुर्दैव होय. शिक्षणाच्या योगानें त्यांचीं स्वतांचीं मनें जर प्रगल्भ झालेलीं नसलीं, तर मुलांस गृहशिक्षण मिळावें कसें? व त्यांस चांगली दिशा लागावी कशी? मुळीं आडांतच जर पाणी नाहीं तर पोहऱ्यांत यावें कोठून? आणि भावी देशसुधारणा गृहशिक्षणावर पुष्कळ अंशानें अवलंबून आहे हें जर खरें आहे, व गृहशिक्षणाचा पाया जर सर्वस्वीं स्त्रीशिक्षणावरच असणें साहजिक आहे, तर देशाची स्थिति सुधारावी अशी ज्यांची इच्छा आहे त्यांनीं स्त्रीशिक्षणाच्या आड येणें म्हणजे पायाशिवाय इमारत बांधण्याच्या विचारासारखें आहे!

कोणत्याही देशांत ज्ञानवान् लोकांची संख्या जितकी अधिक असेल तितकें त्या देशाचें अधिक हित झालें पाहिजे. आणि मनुष्यजातीतील अर्ध्या भागास आम्हीं मुद्दाम ज्ञानहीन राहूं देण्याचा आग्रह धरल्यानें आम्ही आपला अर्धा फायदा बुडवीत आहों. ईश्वरानें जर स्त्रियांसही पुरुषांप्रमाणें बुद्धि दिली आहे तर त्या बुद्धीचा पुरुषांच्या बुद्धीप्रमाणें देशास उपयोग व्हावा असें गृहीत धरून चालण्यास हरकत नाहीं. बुद्धि हा पदार्थ जर चांगला आहे असें प्रत्येकास कबूल आहे, तर अमुक ठिकाणी तिचा विकास होऊं देऊं नये असें म्हणतां येत नाहीं. तेव्हां पुरुषांच्या बुद्धीचा विकास झाला असतां अमुक फायदे होतात, परंतु स्त्रियांच्या बुद्धीचा विकास झाल्यास मात्र अमुक अनर्थ उद्‌भवतील असें स्पष्ट सिद्ध करून देण्याची जोखीम स्त्रीशिक्षणद्वेष्ट्यांवरच आहे, व तसें केल्यावांचून स्त्रीशिक्षणास दोष देणें हें निवळ आग्रहाचें व हटवादीपणाचें आहे हें उघड आहे!

वृद्धावस्थेंत मनुष्यास मान मिळून त्याचा आदर होण्यास ज्ञानासारखी दुसरी कोणतीच चीज नाही. कांहीं तरी योग्यता अंगीं असल्यावांचून कोणी

आदरास पात्र होत नाहीं. आणि या दृष्टीनें विचार केला असतां स्त्रियांस ज्ञानप्राप्तीची किती अवश्यकता आहे हें कोणासही दिसून येणार आहे. तारुण्य, दागदागिन्यांनीं येणारी शोभा, गायनवादनादि कलांचें ज्ञान, हीं सर्व सतत टिकणारीं नाहींत. तारुण्य व त्याचा विकास करणारे त्याचे अनुयायी हीं परस्परांवर अवलंबून असतात; व एकदा तारुण्याचा लोप होऊन तोंडावर सुरकत्या पडल्या म्हणजे तारुण्यांत मिळविलेल्या सर्व जयजयकारांचा लोप होऊन जातो. मग जे ते तिरस्कार करूं लागतात. परंतु ज्ञानाच्या बळावर ज्यानें योग्यता मिळविली असते, व ज्याची वाहवा झाली असते, असा मनुष्य वृद्ध झाला व त्याची बुद्धिही वयोमानानें ऱ्हास पावली असली, तथापि एकदा जी विद्वत्ता त्याचे अंगीं होती तिच्या नुसत्या स्मरणानें तो सर्वांस वंद्य असतो, व त्याच्या मृत्यूनंतरही त्याचें स्मरण झालें असतां त्याच्याबद्दल आदरबुद्धि जागृत होते. आणि म्हणून स्त्रियांच्या वृद्धावस्थेंत जी त्यांची दैना आज दृष्टीस पडते ती नाहींशी करणें जर महत्त्वाचें असेल, व त्यांची वृद्धावस्था सुखांत जावी अशी जर इच्छा असेल, तर त्यांस शिक्षण देणें फार अगत्याचें आहे.

वास्तविक पाहतां धार्मिकता किंवा नीति यांचा अज्ञानाशीं अगदीं संबंध नाहीं, परंतु स्त्रियांस शिक्षण दिलें असतां त्या अधार्मिक व अनीतिमान् होतील अशी एक भीति कित्येकांच्या मनांत शिरलेली दिसते. आतां ही त्यांची भीति पाहून अशी कल्पना करणें भाग पडतें कीं, धर्म व नीति यांसंबंधीं सर्व नियम केवळ फसवणुकीचे व लबाडीचे आहेत, व म्हणून ते होतील तितके गूढ राहतील तेवढे चांगले. ज्ञानवृद्धि होऊन एकदा का त्यांतील लबाडी लोकांच्या लक्षांत आली, कीं मग जिकडेतिकडे अधर्म व अनीति यांचा प्रसार होऊन एकच हाहाकार होईल व विशेषतः स्त्रियांवर तर या ज्ञानवृद्धीनें मोठे दुर्धर अनर्थ ओढवतील. परंतु आम्हांस ही सर्व भीति निराधार दिसते. धर्म व नीति यांचा उच्छेद करणारें असे ज्ञानाच्या अंगीं काय गूढ तत्त्व आहे याचा जर आम्हांस चांगला उमज पडता तर आम्हीही शिक्षणाचे कट्टे द्वेष्टे बनलों असतों. आम्हांस तर उलटें असें वाटतें कीं, नीतिविषयक जे जे कांहीं नियम मनुष्यमात्रास लावून दिलेले आहेत ते सर्व शहाणपणाचेंच फळ होत; व त्या सर्वांचा उद्देश मनुष्याचे सुखाची वृद्धि व्हावी हाच आहे. आणि यांत जर चूक नसेल, तर स्त्रियांस अधिक शिक्षण मिळालें असतां, त्या नियमांचें खरें रहस्य अधिक स्पष्टपणें कळून, व अनीतीचे दुष्ट परिणाम विशेष पूर्णतेनें मनावर ठसून त्यायोगें स्त्रिया अधिक धार्मिक व अधिक नीतिमान् होतील हेंच विशेष साहजिक दिसतें. नुसत्या ज्ञानाच्याच अंगीं सर्वांस नीतिमान् करण्याची योग्यता पूर्णत्वानें नाहीं हें

आम्हांसही कबूल आहे. ज्ञान ही एक शक्ति आहे, व जसें इतर शक्तींपासून योजकाच्या मूर्खपणामुळें प्रसंगविशेषीं अहित होतें तसें या शक्तीपासूनही होईल हें उघड आहे. अग्नीपासून जशी पाकनिष्पत्ति होते, तशींच घरेंही जळतात, म्हणून अग्नीचा उपयोग करूं नये असें कोणी प्रतिपादन करीत नाहीं. शिकलेले लोक खोटे कागद करितात म्हणून सर्व शाळा बंद कराव्या असें कोणाचें मत नाहीं. तात्पर्य, सुशिक्षित स्त्रियांपैकीं एकादी आपल्या शिक्षणाचा दुरुपयोग करील म्हणून स्त्रियांस मुळींच शिक्षण देऊं नये असा आग्रह धरणें केवळ अविचाराचें आहे.

---

## आफ्रिकेंतील हिऱ्यांच्या खाणी

पृथ्वींत अनेक ठिकाणीं हिऱ्यांच्या खाणीं आहेत. आमच्या गोवळकोंड्याच्या खाणींची फार प्राचीन कालापासून प्रसिद्धि आहे. पण ज्याप्रमाणें अलीकडे हिंदुस्थानाचा पाय साऱ्याच कामांत मागें पडल्यासारखा झाला आहे, त्याप्रमाणें त्याच्या खनिज द्रव्यांनाही मंदाई आली आहे कीं काय कोण जाणे ! तें कसेंही असो, येवढें खरें आहे कीं, आजमित्तीस आमची संपत्ति आम्हांस पारखी झाली आहे. इंग्लिश लोकांच्या कंपन्या येथें येऊन लोखंड काढतील, कोळसा काढतील, सोनें काढतील, मोत्यें काढतील, माणकें काढतील, पाहिजे तर हिरेही काढतील ! आम्हांस मात्र पोटापुरतें जमिनींतून धान्य काढतां येईनासें झालें आहे ! कित्येक नेटिव लोक या आमच्या दुर्दशेबद्दल इंग्लिश लोकांस दोष लावीत असतात. पण त्यांच्या मनांत असा विचार येत नाहीं कीं, आम्हीं इंग्लिश लोकांस आपली अशी दुर्दशा कां करूं दिली ? आम्ही आपलें स्वातंत्र्य संभाळण्यास समर्थ असतों तर आमच्या खाणी उकरण्याचे कष्ट इंग्रज लोक कशाला करते ? पण आम्ही जितके परावलंबी व निरुद्योगी आहों, तितकेच स्वावलंबी व उद्योगी इंग्लिश लोक असल्यामुळें, त्यांनीं आम्हांस व आमच्या जन्मभूमीस पादाक्रांत केलें आहे इतकेंच नाहीं, तर त्यांनीं आपल्या पराक्रमानें आणि उद्योगानें पृथ्वीचा बहुतेक भाग आपल्या आधीन करून सोडला आहे. जगांतील मोठमोठ्या नाक्यांच्या जागा, सुपीक बेटें, व्यापाराचे समुद्रावरील किंवा खुष्कीचे राजमार्ग—हे सारे इंग्रजांच्या ताब्यांत आहेत. पृथ्वीच्या तीनही कटिबंधांतील पाहिजे तो प्रदेश घ्या, त्यांत आंग्लतनय मिजासीनें वागत नाहीं असें दिसून येणार नाहीं. हें सारें त्याच्या करामतीचें फळ होय. अशांना निष्कारण दोष देत बसण्यापेक्षां आपल्याच वर्तनांतील दोष हुडकून काढून ते नाहीसे करण्याचा प्रयत्न करावा, आणि अशांचें उदाहरण पाहून त्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करावा, म्हणजे केव्हां ना केव्हां तरी आपणांस चांगला दिवस उगवेल यांत तिळमात्र संशय नाहीं.

ज्यांना इंग्लिश लोकांच्या उद्योगपरायणतेचें अनुकरण करण्याची इच्छा असेल त्यांनीं, या लोकांनीं आफ्रिकाखंडांत चालविलेल्या नाना प्रकारच्या उद्योगांची हकीकत वाचावी, अशी आम्ही शिफारस करतों. निदान तेथें तरी ते आपल्या निढळाच्या घामानें बुद्धिकौशल्यानें, आणि असामान्य कष्टाळूपणानें संपत्ति कमावीत आहेत, असें आम्हां हेवेखोर व निरुद्योगी नेटिव लोकांना कबूल करणें भाग पडेल. इंग्लिश लोकांनीं त्या अप्रसिद्ध खंडाचा शोध लावण्याच्या कामीं, तेथील उष्ण प्रदेश सुखावह करण्याच्या कामीं, तेथील मोठमोठ्या अरण्यांपासून आपलें हित करून घेण्याच्या कामीं, व तेथील सुपीक जमिनीपासून आणि नानाप्रकारच्या पशुपक्ष्यांपासून आपला फायदा करून घेण्यासाठीं असंख्य प्रयत्न चालविले आहेत. त्या प्रयत्नांपैकीं फक्त एकाविषयीं म्हणजे हिऱ्यांच्या खाणीतून हिरे काढण्यासाठीं इंग्रज लोकांनीं तेथें केवढाले टोलेजंग कारखाने घातले आहेत, त्याविषयीं चार शब्द येथें लिहिण्याचा आमचा विचार आहे.

हिरा हा एक दगड आहे हें सर्वांस ठाऊकच आहे! रसायनशास्त्रवेत्ते त्याला दगड न म्हणतां कोळसा म्हणतात. तेव्हां तो खरोखरी कोळसा आहे, किंवा दगड आहे, याचा निश्चय करणें अंमळ कठिण आहे! पण आपणांला त्या निश्चयाच्या उठाठेवींत पडण्याची गरज नाहीं. कारण, हिरा हा दगड असो किंवा कोळसा असो, तो फार मौल्यवान् आणि मोहक चीज आहे याविषयीं मुळींच मतभेद नाहीं. या मतभेदाच्या अभावामुळें विद्वान् आणि अविद्वान् या उभयतांसही त्याचा संग्रह करण्याविषयीं अत्यंत उत्कंठा असते, व या त्यांच्या उत्कंठेमुळें बाजारांत त्याला फार चांगला भाव येतो. बाजारांत ज्या वस्तूला पुष्कळ मागणी आहे, ती कितीही कष्टसाध्य असली तरी बाजारांत आल्याखेरीज रहात नाहीं. युरोपखंडांतील मोठमोठ्या बाजारांत या चकचकणाऱ्या कठिण दगडाच्या जाड चुराला इतक्या मागण्या आहेत कीं, हिऱ्याच्या खाणी आफ्रिकाखंडांत न सांपडतां, जेथें सहा महिने निबिड रात्र व सहा महिने संध्याप्रकाशासारखा दिवस असतो, व जमीन नेहमीं हिमाच्छादित असते, अशा प्रदेशांत जरी त्या सांपडत्या, तरी लोभी, कष्टाळू, व साहसी मनुष्यानें तेथें जाऊन त्यांचें विदारण केलें असतें, आणि त्यांच्या उदरांतून हे सतेज पाषाणाचे तुकडे तो घेऊन आला असता! आफ्रिकेंत हिऱ्यांच्या बऱ्याच खाणी आहेत; पण त्यांत प्रमुख दोनच आहेत. एक **डीबीर्स** व दुसरी **किंबर्ले.** बहुधा या खाणींयेवढ्या दुसऱ्या मोठ्या खाणी जगांत दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं नसतील! यांपैकी पहिलीच्या तोंडाचें क्षेत्र तेरा एकर आहे, व तिची खोली चारशें पन्नास फूट आहे. दुसरीचें क्षेत्र व खोली याहीपेक्षां अधिक आहेत. प्रस्तुत या खाणींत तोंडाकडून उतरत नाहींत, तर त्यांच्या तळांशी जाऊन

पोहोंचण्यासाठी तोंडांपासून बऱ्याच अंतरावर निराळीं भोंकें पाडतात, आणि त्यांत शिरून पांचशेंपासून बाराशें फुटांच्या लांबीच्या आडव्या वाटांनीं निळ्या जमिनीला येऊन ठेपतात.

वर 'निळ्या जमिनीला येऊन ठेपतात' असें जें म्हटलें आहे, ती निळी जमीन डीबीर्स आणि किंबर्ले या खाणींच्या तळांशीं लागलेली आहे. याच जमिनींत हिरे सांपडतात. हे हिरे शोधून काढण्याचें काम फार प्रयासाचें व खर्चाचें आहे. या खाणीपासून बऱ्याच अंतरावर एक विस्तीर्ण मैदान तयार केलेलें आहे. याचा परिघ सुमारें ६०० एकर आहे. हें सहाशें एकरांचें क्षेत्र फरशीसारखें गुळगुळीत व कठिण केलेलें आहे. निळी जमीन उकरून तींतील खंडोगणती माती या प्रचंड क्षेत्रांत आणून पसरतात. या निळ्या मातीचा सुमारें एक फूट उंचीचा थर साऱ्या क्षेत्रभर झाला, म्हणजे नवीन माती आणून घालण्याचें काम बंद करितात. आणून घातलेल्या मातीनें बरीच उन्हें खाल्ली म्हणजे तींतील हिऱ्यांची ढेंकळें आपोआप फुटूं लागतात. पण ही थराच्या वरच्या भागांतील ढेंकळें वर येण्याकरितां नांगर घालावे लागतात, आणि बरेच दिवस हें सहाशें एकराचें कृत्रिम शेत पुनःपुनः नांगरण्याचें काम चालतें. उन्हानें, नांगरानें आणि जनावरांच्या व माणसांच्या तुडवण्यानें साऱ्या ढेंकळांचा चूर झाला, म्हणजे नांगर काढून घेतात. नंतर सोनाराच्या शेगडींतील राखेप्रमाणें हिऱ्यांच्या या धुळीस धुण्याचा सपाटा सुरू होतो. हें धुण्याचें काम करण्याकरितां मोठ्या खर्चाचीं फार नाजूक यंत्रें केलेलीं आहेत. निरनिराळ्या चाळणींतून माती काढून टाकतां टाकतां शंभर पोत्यांच्या जागीं एक पोतें माती रहाते ! हा संशोधनविधि संपतो तेव्हां निळ्या आणि काळ्या वाळूच्या खड्यासारखे खडे मागें रहातात. नंतर पल्सेटर म्हणून एका प्रकारच्या यंत्रांत घालून ते खडे चाळले, म्हणजे आकाराच्या मानाप्रमाणें त्यांचे चार वर्ग होतात. या चार वर्गांत ही सारी मंडळी जाऊन बसली म्हणजे मग त्यांच्या गुणांप्रमाणें व रंगांप्रमाणें निवड करण्याच्या कामास सुरुवात होते. हें निवड करण्याचें काम ओलेपणी गोरे लोक टेबलावर करतात व वाळल्यावर हबशी लोक करतात. निवडीचें काम एका प्रकारच्या करणीनें होत असतें, व तें करण्यांत ते लोक इतके तरबेज झालेले असतात कीं, भलत्याच रंगाचा खडा भलत्याच खड्यांत कधींही मिसळला जात नाहीं. हिऱ्याचा रंग पांढराच असतो असें नाहीं; सर्व प्रकारच्या रंगांचे हिरे आहेत; तथापि हिरव्या, निळ्या, पिंगट, पिंवळ्या, केशरी, किंवा दुसऱ्या कोणत्याही रंगापेक्षां पांढरा रंगच सर्वांस विशेष प्रिय झाला आहे. सर्वांत लहान हिरा टांचणीच्या डोक्यायेवढा असतो. आजपर्यंत या खाणींत जो सर्वांत मोठा हिरा सांपडला त्याचें वजन ४२८½ क्यारट भरलें.

(दोन गुंजा म्हणजे एक क्यारट.) याला पैलू पाडून हा पारिसच्या प्रदर्शनांत ठेविला तेव्हां त्याचें वजन २२८३⁄₄ क्यारट म्हणजे ४५७ गुंजा किंवा ४३⁄₄ तोळे भरलें !

याप्रमाणें निवड झाल्यावर या हिऱ्यांची किंमत करण्यासाठीं फौजेची कुमक देऊन त्यांस किंमत करणाऱ्याच्या हपिसांत पाठवितात. ही किंमत करण्यापूर्वी ते त्यांस सल्फ्युरिक आणि नैट्रिक ॲसिडचें स्नान घालतात. या स्नानामुळें त्यांच्या अंगावरील फालतू मळ बिलकुल नाहींसा होऊन ते आपल्या नैसर्गिक तेजानें चमकूं लागतात. हें स्वरूप त्यांस प्राप्त होऊन आकार, रंग, वजन यांच्या मगदुराप्रमाणें त्यांचा आंकडा ठरला कीं, **डीबीर्स** कंपनीचे हपिसांत विक्रीकरितां त्यांची मांडणी करण्यांत येते. या हपिसांत पाय टाकल्याबरोबर, दृष्टीची व मनाची काय स्थिति होत असेल याचा वाचकांनींच विचार करावा ! **डीबीर्स** कंपनी प्रतिदिवशीं सुमारें ५,५०० क्यारट वजनाचे हिरे काढते, व दुकानांत सुमारें ६०,००० क्यारट वजनाचे हिरे बहुधा शिल्लक ठेविते.

हिरे काढण्याचें काम वर्षांतून सुमारें तीन महिने चालतें. या तीन महिन्यांपुरते जे नेटिव हबशी लोक नोकरीस ठेवण्यांत येतात, त्या बिचाऱ्यांस ते तीन महिने केवळ सक्त मजुरीच्या शिक्षेचे होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण भारी मजूरी मिळत असल्यामुळें त्या गरीब लोकांस त्याचें कांहींच वाटत नाहीं. प्रत्येक दिवशीं संध्याकाळीं कामावरून परत आल्यावर सगळा पोषाख काढून ठेवायाचा, आणि शुद्ध दिगंबर बनावयाचें ! अशा स्थितींत कांहीं अंतरावर कोंडलेल्या जागा असतात त्यांत गेल्यावर तोंड, नाक, कान, शेंडी, खांका वगैरे शरीरांत थोडाबहुत अवकाश असणाऱ्या प्रत्येक भागाची कडकडीत तपासणी झाल्यावर त्यांस एका प्रकारच्या जाडी घोंगड्या नेसावयास देतात, आणि मजूरी देऊन टाकतात. या घोंगड्या नेसून हे लोक त्यांच्यासाठीं दुकानें घातलेली असतात त्यांत आवडेल तो जिन्नस विकत घेण्यासाठीं जातात. खाणेंपिणें झाल्यावर कंपनीनें बांधून दिलेल्या खोल्यांत ते जाऊन निजतात. त्यांच्यामागें त्यांनीं काढून ठेवलेल्या कपड्यांची मोठ्या बारकाईनें तपासणी करतात. दुसरे दिवशीं त्यांनीं फिरून आपापले कपडे घालावे, आणि कामावर जावें अशी शिस्त आहे.

युरोपियन लोक प्राण गेला तरी पैशासाठीं अशी कदर किंवा कैद सहातील काय ? कधीं नाहीं. कंपनी त्यांवर इतकी सक्ती करीत नाहीं इतकेंच नाहीं, तर त्यांच्या सुखाकरतां व ऐषआरामाकरितां हर एक प्रकारची तजवीज करते. लायब्ररी, खेळाची जागा, वर्तमानपत्रें, विश्रांतिस्थान वगैरे सर्व गोष्टी त्यांना कंपनीच्या खर्चानें पुरविल्या जातात. काळ्या लोकांस पाणी, रहाण्याच्या जागा व दुखणेंबाहणें आलें असतां औषधें वगैरे कंपनी फुकट देते.

इतका बंदोबस्त ठेविला आहे, व हिऱ्याची चोरी म्हणजे सदोष मनुष्य-वधाचा गुन्हा समजून तो करणारास एकपासून पंधरा वर्षेपर्यंत काळ्यापाण्याची शिक्षा देण्याची चाल आहे, तरी दगलबाजी ही झाल्याशिवाय रहातच नाहीं ! शेंकडा दहा किंवा पंधरा रुपये किमतीचे हिरे चोरीस जातात असें म्हणतात. हिरे काढण्याचा ऋतु संपून नेटिव लोकांस आपापल्या घरीं जाऊं द्यावयाची वेळ आली म्हणजे त्यांनीं अखेरच्या एकदोन दिवसांत जर कांहीं हिरे खाल्ले असतील, तर ते बिनचूक सांपडावें म्हणून जी शोधाची अमंगळ पद्धत घातली आहे, तिचें वर्णन करण्यापेक्षां वाचकांनीं तिची कल्पना करावी, हेंच बरें !

हिऱ्यांचा सट्टा बहुतकरून युरोपांतील व्यापाऱ्यांचे एजंट करतात. चोरलेले हिरे खरेदी करणारे व्यापारी इंग्लिश लोकांच्या कायद्याची परवा न करतां तसला माल खरेदी करून **फ्रीस्टेट्स्**मध्ये बेलाशक चालते होतात. ट्रँन्सव्हालची सीमा ओलांडून फ्रीस्टेट्स्च्या सीमेच्या आंत त्यांचें पाऊल पडलें, म्हणजे इंग्रजी पोलिसाचें कांहीं एक चालत नाहीं ! एकदा अशा प्रकारच्या बिलंदर चोरानें फारच मौज केली. त्यानें चोरीचा माल खरेदी केला असावा, अशी पोलिसास शंका आल्यावरून त्यांनीं त्याचा झाडा घेतला, पण त्यांत कांही निष्पन्न झालें नाहीं. तेव्हां पोलिस लोक निराश होऊन मागें परतले. त्या गबानें फ्रीस्टेट्स्च्या सीमेच्या आंत पाऊल टाकल्याबरोबर त्यांस हांका मारून उभें केलें, आणि त्यांच्या डोळ्यांदेखत आपल्या घोड्याचें पोट कापून त्यांतून काढलेले हिरे त्यास दाखविले !

सोनें, रुपें वगैरे उपयुक्त धातूंच्या कारखान्यांत मनुष्यांनीं कोट्यवधि रुपये घालावे, आणि अतोनात परिश्रम करावे यांबद्दल त्यांस फारसा दोष लावतां येणार नाहीं. पण रानटी लोकांच्या स्त्रियांप्रमाणें तेजोमय दगडांनीं स्वशरीरें विभूषित करणाऱ्या स्त्रियांच्या कौतुकासाठीं आम्हां सुधारलेल्या लोकांनीं इतका पैसा आणि इतके श्रम व्यर्थ खर्च करावे हें किती लाजिरवाणें आहे बरें ? बरें इतकेंही करून या कांतिमान् पाषाणशकलांनीं तरुण, रूपवती, व गुणवती स्त्रियांचे देहच सालंकृत होते तर अशा प्रकारची टीका करणें केवळ न्याय्य झालें नसतें, परंतु तसेंही होत नाहीं. तेव्हा अखेरचा सिद्धांत काय काढावा लागतो की, पुरुषांची उत्पत्ति कशापासूनही झाली असो, स्त्रियांची उत्पत्ति तरी माकडा-पासूनच झाली असली पाहिजे ! निदान लॉर्ड रँन्डॉल्फ चर्चिल यांचें असें म्हणणें आहे !



# कै. विष्णु कृष्ण चिपळोणकर

---

देह त्यागितां कीर्ति मागें उरावी ।
मना सज्जना हेचि क्रीया धरावी ।।

**श्री रामदास**

गेल्या शुक्रवारीं सकाळीं सात आठ वाजण्याच्या सुमारास डोळकर आळींत एकच गर्दी झाली. शाळांतील लहान मोठीं मुलें, व त्याप्रमाणेंच गांवांतील तरुण आणि वृद्ध लोक यांचीं तोंडें म्लान होऊन त्यांवर विपरीत कळा आली. इतक्यांत चिपळोणकरांच्या वाड्यांतून स्त्रियांचा दीर्घरुदनस्वर बाहेर आला ! त्याबरोबर घात झाला अशी खात्री होऊन सर्वजण तोंडाला पदर लावून रडूं लागले. या वेळीं शाळेंतील मुलांनीं रडून जो कल्होळ केला तो सांगतां पुरवत नाहीं. विष्णुशास्त्री एखाद्या रोगानें चार सहा महिने खितपत पडले होते असें नाहीं. पंधरा दिवसांपूर्वी त्यांपमध्यें फोटोग्राफ घेण्यासाठी टेबलावर उभे राहिले असतां एकाएकीं पित्तप्रकोप होऊन जी चक्कर आली त्यासरशीं ते धाडकन् जमिनीवर बेशुद्ध पडले. कांहीं वेळानें शुद्धीवर आल्यावर त्यांस घरीं आणिलें. नंतर थोडासा ज्वर भरला, पण तो अशा थराला जाईल असें कोणाच्या स्वप्नांत देखील आलें नाहीं. त्या ज्वरामुळें त्यांस क्षीणता आली होती हें खरें, पण तो अशा तीव्र वेगानें उलटून, बोलतां बोलतां पुण्यांतील मोहरा रातोरात घेऊन जाईल असें कोणासही वाटलें नाहीं. परंतु दैवाची परम विचित्र गति ! ! शास्त्रीबोवांस कलंगड खाऊन थंड पाणी पिण्याची बुद्धि झाली; त्यासरशीं कुपथ्य झाल्याचें निमित्त होऊन तात्काळ सन्निपात झाला तो त्यांना घेऊनच गेला. शास्त्रीबोवांच्या अकालिक मृत्यूनें "केसरी"चा एक पाय लंगडा झाला यांत कांहींच नाहीं. आज महाराष्ट्रवाणीचा पति परलोकवासी झाल्यानें ती गतभर्तृका झाली व महाराष्ट्रीयांनीं अद्वितीय रत्न गमाविलें, अशी आमची समजूत आहे. "मरणं प्रकृतिः शरीरिणाम्" अशी कविकुलगुरूक्ति आहे ती आम्हांस अक्षरशः मान्य आहे. परंतु हा अबाधित सृष्टिनियम शास्त्रीबोवा वयातीत झाल्यावर त्यांस लागू

पडता म्हणजे आम्हांस इतका खेद करण्यास जागा उरतीना. परंतु ज्याप्रमाणें एखादा प्रचंड वृक्ष फळास येतो आहे नाहीं तों विद्युत्पात होऊन तो जमीनदोस्त व्हावा, त्याप्रमाणें आतां आतां कोठें शास्त्रीबोवांच्या बुद्धीचीं परिपक्वफलें हवीं तशीं लोकांस मिळूं लागलीं होतीं तों त्यांस करुणाविमुख मृत्यूनें हरून नेलें हा केवढा दुःखाचा प्रसंग !! गेल्या वर्षीच आम्हीं एकत्र होऊन एक दिलानें प्रस्तुत उद्योग आरंभिला तेव्हांची वीरश्री कोणीकडे आणि केसरीराजाच्या नैसर्गिक उद्धत वृत्तीला अननुरूप अशी सांप्रतची खिन्नावस्था कोणीकडे ? असो, धैर्य धरून आला दिवस कसा तरी घालविलाच पाहिजे. गतवर्षीं बाळाजी बापूजी साने व चिंतामण सखाराम चिटणीस यांची मृत्युवार्ता कळविण्याचें दुःखाचें काम केलें; आज आम्हांपैकींच एकाच्या संबंधानें मृत्युलेख लिहिण्याचें आमच्या कपाळीं आलें आहे, त्या कामासाठीं शोक क्षणभर एकीकडे ठेवून धैर्याचें अवलंबन करितों.

विष्णुशास्त्री हे प्रसिद्ध कृष्णशास्त्री यांचे चिरंजीव. यांचें जन्म १८५० त झालें. यांना लहानपणापासून वाचण्याचा जबरदस्त नाद असे. ज्याप्रमाणें डॉक्टर जान्सन बापाच्या दुकानावर बसून फावल्यावेळीं अनेक विषयांवरील व्हाल्मेंच्या व्हाल्में फडशा करी, त्याप्रमाणें "दक्षिणाप्रैज कमिटी" किंवा "नेटिव प्रेसचे रिपोर्टर" या नात्यानें कृष्णशास्त्र्यांकडे जी पुस्तकें येत तीं हे भावी शास्त्री वाचून टाकीत. या रीतीनें माट्रिक्युलेशन होण्यापूर्वीच विष्णुपंताच्या नजरेखालून अनेक ग्रंथ जाऊन मराठी भाषेवर त्यांचें प्रेम जडलें, व तें उत्तरोत्तर वृद्धिगत होत गेलें. १८६५ त विष्णुशास्त्री पहिली परीक्षा होऊन ते कॉलेजांत गेले. त्यांना गणिताचा मोठा कंटाळा असे. मेकालेप्रमाणें ते आपला सारा वेळ ऐतिहासिक ग्रंथ वाचण्यांत घालवीत. १८७२ त त्यांची बी. ए. ची परीक्षा पास झाली. १८७३ त कांहीं महिने बाबा गोखले यांच्या शाळेंत शिक्षकाचें काम केल्यानंतर येथील सरकारी हायस्कुलांत त्यांना नव्वदांची जागा मिळाली, व पुढें नव्वदांचे शंभर झाले. निबंधमालेचा पहिला अंक १८७४ त बाहेर आला. निबंधमाला जों जों मोठी होऊं लागली तों तों शास्त्रीबोवांचीं मतें बाहेर पडून स्वातंत्र्यशत्रु आणि स्तुतिप्रिय अशा अधिकाऱ्यांशीं त्यांचें तेढें पडूं लागलें. आपल्या कर्तव्यांत निरंतर तत्पर असल्यामुळें शास्त्रीबोवा कधीं कोणाची पर्वा ठेवीत नसत. याचा परिणाम असा झाला कीं, जात्या परप्रतिष्ठाअसहिष्णु असे आमचे डायरेक्टर चाटफील्ड साहेब यांच्या तापट प्रकृतीवर कित्येक निदकांनीं तैलवृष्टि केल्यामुळें तिनें जो पेट घेतला त्यासरशीं त्यांनीं शास्त्रीबोवांची 'परशुराम क्षेत्रास' गठडी वळली. कोंकणवास विष्णुशास्त्र्यांना पराकाष्ठेचा दुःसह होऊन राजसेवाशृंखलांतून आपला पाय काढून घेण्याविषयीं त्यांचा निश्चय झाला. १८७८ त कृष्णशास्त्री

वारले. १८७९ च्या एप्रिलांत विष्णुशास्त्री चाकरी सोडण्याच्या बेतानें आपलें चंबूगबाळें आटोपून पुण्यास आले. चारपांच महिने काय करावें, कोणता धंदा काढावा अशा विचारांत गेले. या सुमारास डेक्कन कालेजांतील दोनतीन गृहस्थांचा सरकारी नोकरी न करितां स्वतंत्रपणें लोकोपयोगी एखादें काम करण्याचा निश्चय झाला. नोकरी सोडून गांवांत शास्त्रीबोवा येऊन बसले आहेत असें कळल्याबरोबर सदहू मंडळी त्यांस जाऊन भेटली, व उभयतांच्या विचारें एक शाळा काढण्याचा विचार झाला; त्याप्रमाणें १८८० च्या जानेवारी महिन्यांत 'न्यू इंग्लिश स्कूल' या नांवानें मोरोबादादा फडणीस यांच्या वाड्यांत शाळा घातली; ती आतां कोणत्या स्थितींत आहे हें सांगायला पाहिजे असें नाहीं. शाळेस पुरें वर्ष झालें न झालें तों तिला आणखी एक दोन गृहस्थ येऊन मिळाले. पांचसहा मंडळी एका हेतूनें व एका मतानें वागत असल्यामुळें शाळेचें काम आटोपून आणखीही कांहीं करितां येईल असें वाटल्यावरून शुद्ध इंग्रजी आणि शुद्ध मराठी अशीं दोन वर्तमानपत्रें काढण्याचा विचार झाला, व त्याप्रमाणें ८१ च्या जानेवारींत मराठा व केसरी हे बाहेर आले. या दोघांनीं मिळून एका वर्षांत महाराष्ट्र देशांत केवढी चळवळ करून सोडिली आहे, याचा वाचकांनींच विचार करावा. याखेरीज शास्त्रीबोवांचे खासगी धंदे जोरानें चालले होते. निबंधमाला, किताबखाना, चित्रशाळा, वगैरे गोष्टी नेटानें चालल्याच होत्या. येणेंप्रमाणें शास्त्रीबोवा ज्या उद्योगांत व्यग्र असत त्यांची थोडीशी हकीकत झाली. शास्त्रीबोवांचे बहुतेक विचार त्यांच्या मालेंतून आणि केसरींतून प्रसिद्ध आहेत, तेव्हां त्यासंबंधानें विशेष लिहावयाचें आहे असें नाहीं. पण ज्या गोष्टी अतिशय भिडस्त स्वभावामुळें शास्त्रीबोवा जिवलग मित्रांबरोबर कधींही काढीत नसत, त्यासंबंधानें येथें दोन शब्द लिहिण्याचा हेतु आहे.

आपल्या देशाचें पारतंत्र्य आणि दारिद्र्य ही शास्त्रीबोवांच्या अंतःकरणाला जशीं खात तसें दुसरें कांहीं खात नसे. आपल्या लोकांची दैन्यावस्था पाहून त्यांचा जीव तिळतिळ तुटे. पारतंत्र्याला ज्ञान आणि दारिद्र्याला उद्योग हींच वस्ताद औषधें असें ते नेहमीं म्हणत. लोकांना खरें ऐहिक सुख होण्याला त्यांची राज्यव्यवस्था कशी पाहिजे याचा विचार त्यांच्या मनात नेहमीं घोळत असे. लोकांत विद्याप्रसार होऊन त्यांना राजकारणांतील तत्वें कळावीं, व तदनुसार त्यांनीं वर्तन ठेऊन या हतभाग्य भरतखंडास त्यांनीं एकदां तरी सुदिन आणावा ही त्यांची बळकट इच्छा असे. परकीय लोक राज्य करीत असल्यामुळें आमचे लोक सत्वहीन होत जाऊन अप्पलपोटे, भेकड, हांजीहांजीखोर, मट्ठ, निर्लज्ज, अभिमानशून्य

असे झालेले पाहून त्यांच्या अंगाचा तिळपापड होई. परकीय या नात्यानें इंग्रेजांचा त्यांना अत्यंत कंटाळा असे, पण त्यांची करामत, दृढता, कौशल्य आणि उद्योग हीं पाहून त्यांस त्यांचें पराकाष्ठेचें आश्चर्य वाटत असे. हिंदुलोकांचा, हिंदुधर्माचा, हिंदुरिवाजांचा, सारांश ज्याला ज्याला म्हणून 'हिंदु' हें विशेषण लाविता येईल त्याचा त्यांना मोठा अभिमान असे. सर्वांपेक्षा मराठी भाषेवर त्यांचें जें प्रेम असे तें कांहीं पुसूंच नये. एकसारखी सात वर्षे तिची उपासना करून त्यांनीं तिला अगदीं भारून टाकल्यासारखें केलें होते. ज्याप्रमाणें प्रख्यात फ्रेंच ग्रंथकर्ता व्होल्टेर यानें एकदां कोरडा उचलला म्हणजे स्टाकहोम व रोम, आणि पीतर्सबर्ग व लिस्बन यांच्या दरम्यान चटसारी मंडळी चळचळ कांपत असे, त्याप्रमाणें शास्त्रीबोवांनी लेखणी उचलली कीं रावसाहेब, रावबहादुरें, रेवरंडें, सरस्वती— यांची पांचावर धारण बसे. आपल्या मागें आपलें नांव चालविण्यास त्यांनीं एक सप्तसंवत्सरा निबंधमाला कन्येखेरीज दुसरें कांहीं ठेविलें नाहीं. त्यांच्या त्या गद्य कृतीला "स्फुरत्कलालापविलासकोमला" हें बाण कवीचें वर्णन हुबेहूब लागतें. कोणीं एकदां शास्त्रीबोवांना असा प्रश्न केला होता कीं असे कडक लेख लिहिण्यास तुम्ही कसे धजतां? त्यावर त्यांनीं असें उत्तर केलें कीं अगोदर तुरुंगांत एक पाय ठेवून मग आम्हीं देशोन्नतीसाठीं आपली लेखणी हातीं घेतली. एखाद्या वेळेस त्यांचा कल्पनाविहंग पूर्ण पंख पसरून भराऱ्या मारूं लागला म्हणजे त्याला हिंदुस्थान देश स्वतंत्र होऊन प्रजासत्ताक राज्याखालीं सुखानें नांदत आहे असें दिसे. पुनर्विवाह, बालविवाह, स्त्रीशिक्षण, स्त्रीस्वातंत्र्य, धर्मसंस्थापना, जातिभेद यासंबंधानें त्यांचे विचार जुन्या मताचे दिसत, परंतु ते वास्तविक रीतीनें अगदीं पुढें सरसावलेल्या सुधारकाप्रमाणें होते. फार कशाला, गेल्या केसरींतील 'देशोन्नति' या सदराखालचा निबंध जो कोणी लक्ष लावून वाचील त्याला शास्त्रीबोवांचे जातिभेदासंबंधानें काय विचार होते हें सहज लक्षांत येईल. इतकें खरें आहे कीं ते या विषयासंबंधानें फारसें कधीं लिहीत नसत; पण लिहूं लागल्यास वृद्धपिढीचा रोष होईल म्हणून आपलीं खरीं मतें पुढें करण्यास ते कधींही भीत नसत. सारांश हिंदुस्थानचें पारतंत्र्य नष्ट होऊन तो स्वराज्याखालीं सुखी होण्याचें कोणतेंही साधन असल्यास त्याला ते अडथळा घेणारे नव्हते. अस्तु; बरवेप्रकरण चालू असतां त्यांचा एकाएकी अंत झाला हें पाहून कोणीं अधमांनीं अशी कंडी उठविली कीं, कारभाऱ्याला भिऊन जाऊन त्यांनी आत्महत्या केली; असले नीच नरपुंगव कोण असतील ते असोत. शास्त्रीबोवांना तर आपल्या लेखणीच्या सामर्थ्याविषयीं अशी धमक होती की प्रसंग पडल्यास तुरुंगांतल्या तुरुंगांत "असल्या शेंपन्नास राजशत्रूंना सर्व महाराष्ट्राकडून मी 'छी थू' करून सोडीन."

येथवर शास्त्रीबोवांचीं ठळकठळक राजकीय व सामाजिक मतें सांगण्यांत आली. हिंदुस्थानच्या दारिद्र्याच्या संबंधानें त्यांची अशी खातरी झाली होती कीं येथें व्यापारवृद्धि झाल्याविना आमच्या देशाचें डोकें वर निघणार नाहीं. याच उद्देशानें त्यांनीं सरकारी दास्याची रुपेरी बिडी तोडून घेऊन पुणें येथें स्वतंत्रपणानें वास्तव्य करण्याचा विचार केला, व एकीकडे अध्ययन, अध्यापन आणि ग्रंथ-रचना यांत आपला कालक्रम करण्याचा निश्चय करून दुसरीकडे आपल्या नजरेखालीं छापखाना, चित्रशाळा, किताबखाना वगैरे कारखाने काढिले. लव-करच कांहीं खटपट करून कागदाचें एक यंत्रही आणविण्याचा त्यांचा विचार होता. हे धंदे त्यांनीं द्रव्यसंपादनेच्छेनें काढिले असें नाहीं, कारण द्रव्यसंबंधानें शास्त्रीबोवा जितके निरपेक्ष होते तितका दुसरा पुरुष सापडणें कठिण. त्यांचा हेतु असा असे कीं देशांत कारखाने निघून लोकांस काम मिळावें व त्यांस भाक-रीची वाण पडूं नये. शास्त्रीबोवांनीं वर जे कारखाने काढिले त्यांत तरी त्यांचा येवढाच हेतु होता. त्यांपासून स्वत:चा फायदा करून घेण्याची इच्छा त्यांनीं कधीं धरली नाहीं. त्यांचें असें म्हणणें असे कीं, बुद्धिवान् आणि चतुर लोकांनीं मोठ-मोठे धंदे अंगावर चालूं करावे आणि मग ते साधारण लोकांच्या हातांत देऊन आपण त्यांपासून अलग रहावें. आम्हांस तर असें वाटतें कीं शास्त्रीबोवांसारखा हिम्मतवान, प्रशांत, गंभीर आणि निरपेक्ष मनुष्य अत्यंत विरळा असेल. कोणी हित-चिंतक मित्र विनोदानें आमच्या गट्टीस ग्राज्येटपंचायतन, ग्राज्येट पांडव असें म्हणत. निष्ठुर मृत्यूनें आम्हांपैकीं आमचा भ्राता धर्मराज आज यमसदनास पाठविला, व आमच्या बंधाचा ग्रंथिमणि हिरावला ही गोष्ट खरी. तथापि आमची अशी उमेद आहे कीं आम्ही एकवार मनाचा निश्चय करून देशोन्नतीसाठीं झटण्याचा केलेला संकल्प होतां होईल तों ढळूं देणार नाहीं. प्रथम लोकांना आम्हांविषयीं अशी भीति होती कीं, द्रव्यसंबंधानें आमच्यांत आपआपसांत कलागती लागून आमची जूट फुटेल. पुढें बर्वेप्रकरण येऊन धडकलें तेव्हां तर कित्येकांना असें वाटलें कीं, या ग्राजुएटांची फटफजीती होते ! आणि आतां तर आम्हांपैकीं एकानें परलोकास प्रयाण केलें; तेव्हां आम्हांविषयीं लोकांच्या मनांत नानातऱ्हेचे तरंग येऊं लागले यांत नवल नाहीं. पण सर्वांनीं एक गोष्ट लक्षांत धरावी ती ही कीं, आम्हीं जो उद्योग आरंभिला तो लोकांनीं घोड्यांवर बसविलेल्या रडतरावाची मनो-वृत्ति धारण करून आरंभिला नाहीं. हें काम आम्हीं आपल्या आपखुशीनें आणि आपसमजुतीनें आमचें आम्हीं आपल्या अंगावर घेतलें; तें तडीला लावण्यासाठीं आमच्याकडून होईल तितका प्रयत्न करण्यास आम्ही कधींही सोडणार नाहीं. देवाच्या किंवा दैवाच्या इच्छेपुढें इलाज नाहीं, अशा

रीतीनें मनाची खोटी समजूत घालून अशा लोकहिताच्या कामांत प्रतिपक्षाची क्षमा मागण्याचें काम आमच्या हातून होणार नाहीं. अधिकार, धन, वजन यापुढें टिकाव धरणें दुस्तर आहे हें आम्ही कबूल करितों. परंतु सत्याचा कैवार घेऊन शुद्ध अंतःकरणानें लोकहितासाठीं भांडणारांना कोणत्याही प्रकारची धास्ती बाळगण्याचें कारण आहे असें आम्हांस वाटत नाहीं. आणि असें असूनही प्रसंग येऊन बेतलाच तर तो साहण्यास आम्ही कचरूं अशी कोणीही शंका घेऊं नये. आमचें धैर्य आणि कार्यनिष्ठा ही कसास लावण्याची संधी आली आहे असें आम्ही समजतों. शास्त्रीबोवांचीच कथा काय, पण आम्हांपैकीं एक जरी तळावर असला तरी तो आम्हीं सर्वांनीं आरंभिलेले उद्योग अविच्छिन्न चालविण्यास होईल तितकी खटपट करील. ‘ निबंधमाला ’ मात्र पुढें चालविण्याचा आमचा विचार नाहीं, कारण शास्त्रीबोवांनींच ८४ व्या अंकांत तिची समाप्ति करून तिच्या जागीं ‘ ग्रंथमाला ’ प्रसिद्ध करण्याची इच्छा प्रदर्शित केली आहे. तो अंक कारणांसह लोकांपुढें लवकरच येईल. देशोन्नति, देशकल्याण वगैरे गोष्टी थोडी-बहुत अंगास झीज लाऊन घेतल्याखेरीज फुकाच्या पोकळ गप्पा मारून होत नांहींत हें आम्ही पक्कें समजत आहों. ती लाऊन घेण्यास आम्ही तयार आहों. प्रयत्न करणें आमचें काम आहे, यश येणें न येणें बाह्योपाधींवर अवलंबून आहे. त्याचा आम्ही विचार करीत नाहीं. येवढें सांगून व त्या महात्म्याला परलोकीं सर्वोत्कृष्ट शांति आणि कल्याण चिंतून हा लेख आटोपतों.

(वर्ष २, अंक १२)

**आगरकर–वाङ्मय समाप्त**



# १. व्यक्तिनामसूची


अलेक्झांडर ३३५
आपटे, वा. शि. ४४
आरलेबार ३४७
आरकीमिडीस ३४८
आर्योद्धारक मंडळी ४३, ४४
ॲरिस्टॉट्ल ३३७, ३४८, ४२८
ऑरनॉल्ड, मेथ्यु २०८,
इर्व्हिंग, वॉशिंग्टन ४२९
इलिझाबेथ ५५, ५६
ॲडम्स ४००
ओबरमार, एम्. २५
कणाद ३४८
काक्रेन, बेलिक २६
कानिटकर, नारायण बापूजी ५०
कानफ्यूशिअस ४०९, ४१०, ४१३
कालिदास ४८, ४९, ३४१, ३४६
किर्लोस्कर, अण्णासाहेब ३३८
कीर्तिकर, डॉ. ३४१
केळकर, वा. बा. ४४
केप्लर ३४८
कोपरनिकस ३४८
कोलरिज ४७, ६३
कॉमटी ३३६
कॉरनेल ४९
क्रानमर ३१
क्रूकशांक, डॉक्टर ५, १७
ख्रिस्त ३३६, ३३७, ४०६
गिझो ४७
गेटी ४७, ४९, ६३, ३४६
गोडबोले, कृष्णशास्त्री २०७, २१७, २३०, २४३, २४५, २६२, २६३, २७८, २८९, २१०
गोळे, म. शि. ४४
गौतमबुद्ध ३३६, ३३७, ४१०–४१२
गंगाबाई ३१
ग्यारिक ५४
ग्यालिलीओ ३१, ३०८, ३५५
ग्लाडस्टन ३३८
चर्चिल, लॉर्ड रॅनडॉल्फ ४४४
चाट्फील्ड ३५१, ४४८
चिटणीस, चिंतामण सखाराम ४४८
चिपळोणकर, कृष्णशास्त्री २०७, २०९, २१७, २१९, २२१, २३६, २४३, ४४८
चिपळोणकर, विष्णु कृष्ण ६, ३६, ४५, ४६, ३३८, ४४७–५२
छत्रे, केरो लक्ष्मण (नाना) ३४७–३५२, ३५६
जरव्हायनस ४७, ६६
जान्सन् ५३–५५, ३४१, ४४८
जूल ३४८
जेम्स दुसरा ३१

झांजिझखान ३३५
टिळक, बा. गं. १४, ४०, ३८०
टिंडाल ३४८
टेनिसन्, लॉर्ड ३४१
टेंपल, डॉक्टर ४१६
टॉक्व्हील्, एम्. डी. ३८४
डफ, ग्रांट ३१
डान्टी ४९
डारविन ४१७
डिमॉस्थेनीस ३३७
डौडेन ४७
ड्यूप्ले ३८६
तैमूरलंग ३३५
त्रिंबकजी ३२
दातार, कृ. शा. ३५७
दादोबा पांडुरंग (तर्खडकर) २०७, २१७, २३४, २४३, २४५
दीक्षित, दत्तात्रय कमलाकर ३८३, ३८४
नाना (फडणवीस) ३१
नारायण दाजी ३७०
नेपोलियन ३३५, ३३६, ३६५, ३८६
न्यूटन ३३५, ३४८, ३९७
पामर्स्टन, लॉर्ड ३८८
पाणिनी २३१, ३४८
पील ३५१
प्लेटो ३४८
प्लिनी ४२९
फडणवीस, मोरोबादादा ४४९
फाटक, नारायण गोपाळ ४४
फ्रेडरिक् धी ग्रेट ३३६
फ्रांक्लिन्, बेंजामिन ४०३
बर्बेज ५४
बर्ले ५५, ५८
बर्वे, महादेव वासुदेव ३६९, ३८०, ४५०, ४५१
बार्बाल्ड, मिसेस ४३६
बाण कवी ४५०
बेकन ५५, ५८, ३४१
बेन २०८, २०९, ३११
भगीरथ ३८६
भवभूति ४८, ४९, ३४६
भाऊ दाजी ३७०
भास्कराचार्य ३४१, ३४८
भांडारकर, रा. गो. ३५१
भिडे, नाना ११
मंडलिक ३६
मनु ३३७
माधवराव, सर टी. ३५७
माधवराव, सवाई ३१
मिल्टन ४९, ३४६
मिल्ल ३३६
मेकॉलि ३४१, ४४८
मेरी (राणी) ५६
मॅड्लर ३९५, ३९९
मोरेल २०८
मोलिअर ४९, ३४६
याज्ञवल्क्य ३३७
युंग लो ४१५
रामशास्त्री ३१, २४१, २५८
राले ५५, ५८
रानडे, म. गो. ३८४
रानडे, वामनराव ११
रानडे, शंकर मोरो ५०, ५३

रिपन, लॉर्ड ८
रे, लॉर्ड ३७९, ३८०
लिव्हरिअर ४००
लेसेप्स, एम्. डी. ३८६–३८९
लॅसिल, डॉ. ३९९
ल्युई, चवदावा ३०, ३१
ल्यूथर, मार्टिन ५७
वर्ड्स्वर्थ, प्रिन्सिपॉल ३६, ३४७
वाल्मीकि ३२४, ३३७
वुइल्सन् ४८
वेब्स्टर ४३१
व्यास ३२४, ३३७
व्हिट्ने २०८
व्होल्टेर ४५०
शंकराचार्य ३३६, ३३७
शृंगर्षि ४१६
शेक्स्पीअर ४१, ४४–४९, ५२–५६, ५८, ६०–६३, ६५, ६६, ३४१, ३४६
श्लेजेल ४७, ४९
सखारामबापू ३१
सफॉक्लीज ३३८
साक्रेटिस ३०, ३२२, ३३६, ३३७, ३५०
साने, बाळाजी बापूजी ४४८
सीझर ३३५, ३३६
सेबाईन, जनरल ३५६
सुब्रराव रावजी ४२४
स्कॉट्, सर वॉल्टर ४३६
स्टिफन्सन्, राबर्ट ३८८
स्पेन्सर, हर्बर्ट २५, ५५
स्मिथ्, सिडने ४२९
स्विफ्ट ३२
हर्शल, डॉ. ३९८, ३९९
हायले २०८
हास्किन्स २६
होमर ३३७, ३३८
हॅमिल्टन, मिसेस् ४३६
हूकर ५५, ५८
हॅले ३९७, ३९८



# २. विषयसूची


अकर्तृक क्रियापदे २१९
आज्ञार्थक वाक्ये २४४, २९१–९३
इंग्रजी आणि मराठी प्रयोग-प्रकरणातील भेद २२३–३९
उद्देश्य २११–१३, २२३–३९
उद्देश्यगुणवाचके २६८
ऐहिक सुधारणेचा मुख्य उद्देश १३
कर्ता आणि उद्देश्य २२३
'कारागृहनीति', हर्बर्ट स्पेन्सरचे विचार २५–२६
एम्. ओबरमारचा प्रयोग २५–२६
कैदी, त्यांच्याविषयी लोकांचे गैर-समज १२, १५–१६
कैद्यांचे हाल, कारणे १९
ते दूर करण्याचे उपाय २०, २४-२५, २८–२९
क्रियापद आणि विधेय २२३
क्रियापदे, संयुक्त २३९
क्रियाविशेषणवाक्य २७६–७९
तुरुंगांची सद्यःस्थिती आणि सुधारणा २०–२९
थोर पुरुष जन्माला येण्याची कारणे ५५–५८
नग्न किंवा कृशवाक्य २१६
नाटकाचे भाषांतर शक्य तो मुळास धरून असावे ४५–४९
नाटकाची भाषा पात्रानुरोधाने असावी काय ? ४९–५२
नाटक पाहण्यापेक्षा वाचण्याचे फायदे ५९
नामवाक्य २७१–७२
पंजरसम वाक्य २४९
प्रयोग, मराठी आणि इंग्रजीतील भेद २२३–३९
मराठी आणि संस्कृतातील भेद २२३–३५
प्रश्नार्थक वाक्य २४४, २९१-९३
मिश्रवाक्य २४६–४७, २६८–७९
वाक्य २१२, २१९–२२
वाक्य एका शब्दाचे असू शकेल काय ? २१९–२२
कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे मत २१९–२१
आगरकरांचे मत २२२
वाक्यमीमांसा २१२, २२७, २३८
वाक्यांचे प्रकार
विधानार्थक, प्रश्नार्थक, आज्ञार्थक २४४, २९१–९३
नग्न किंवा कृश वाक्य २१६
नाम वाक्य २७१–७२
पंजरसम वाक्य २४९
मिश्र वाक्य २४६–४७, २६८–७९

शाब्दिक आणि तात्त्विक वाक्ये
२२२
शुद्ध वाक्य २४५, २४६,
२४८, २५७-५८
सत्तावाची आणि निषेधवाची
वाक्ये २४५
संकुचित वाक्य २४८, २८३–८७
संक्षिप्त वाक्य २४८, २८९–९१
संयुक्त वाक्य २४७, २७९-८३
वाचनाभिरुची व पुस्तकनिर्मिती
यांचा अन्योन्यसंबंध ४३
'विकारविलसित' या भाषांतरा-
मागील हेतू व अडचणी ४३
विधानार्थक वाक्य २४४
विधेय आणि क्रियापद २२३
शब्द आणि वाक्य २१९-२२२
शब्दांच्या जाती २१२–१८
दादोबांचे मत २१७
कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे मत
२१७, २१९, २२१
कृष्णशास्त्री गोडबोल्यांचे मत २१७
शाब्दिक वाक्य आणि तात्त्विक वाक्य
२२२
शुद्ध वाक्य २४५-४६, २४८, २५७-
५८
शृंखला (copula) २५७
संकुचित वाक्य २४८, २८९–९१
संक्षिप्तवाक्य २४८, २८९-९१
सत्तावाची व निषेधवाची वाक्ये २४५
संयुक्त क्रियापदे २३९
'स्पेनची प्रस्तुत स्थिती' या ग्रंथातील
मननीय विचार २६–२७
'हॅम्लेट' वरील समीक्षेचा परामर्श
६०–६६



'विचारानें क्षुद्र बुद्धी निरस्त होऊन मन विस्तृत झालें, आणि 'वसुधैव कुटुंबकम्' अशी वृत्ती त्यांत उत्पन्न झाली म्हणजे जो आनंद होतो तो कांहीं अनिर्वाच्य असतो. असें नसतें तर कालिदास–भवभूत्यादि महाकवींचा लौकिक सगळ्या जगभर पसरता काय ! . . . असले कवी विवक्षित देशाकडे किंवा देशाचारांकडे लक्ष न देतां मनुष्यजातीच्या ज्या अगाध मनोवृत्ती आहेत त्यांत वस्ताद पाणबुड्याप्रमाणें बुडी मारून तळीं काय आहे तें पाहण्यासाठीं झटत असतात !'

— गो. ग. आगरकर

'महाबळेश्वरच्या पश्चिमेस सुमारें तेरा मैलांवर इतिहासप्रसिद्ध प्रतापगडचा किल्ला आहे. ज्याला त्या किल्ल्याची चढण चढण्याचें सामर्थ्य नसेल त्याला खुर्चीत बसून जाण्याची सोय होते. फक्त मावळ्यांच्या पोटाला दोन अडीच रुपये देण्याचा उदारपणा केला म्हणजे झाले! शिवाजीच्या हाताखालीं ज्या अडाणी लोकांनीं तोंडांत बोटें घालण्यासारखे जिवावरच्या धाडसाचे पराक्रम करून मुसलमानांची खोड मोडली, व इतिहासांत आपलें नाव चिरायु करून सोडिलें, त्या मावळ्यांस पोटाची वीतभर खळी भरण्यासाठीं मडमांस, पार्शिणींस, साहेबांस, खुर्च्यांत घालून खांद्यावर वहावें लागत आहे, यावरून दैवाची गति मोठी विचित्र आहे, असा विचार... मनांत आल्या-वांचून रहात नाहीं! असले किल्ले पहाण्यास जाण्यांत आनंद किंवा दुःख यांपैकीं कोणत्या विकाराचें प्राबल्य क्षणभर अधिक होईल हें सांगतां येणें कठिण आहे!'

—गो. ग. आगरकर

